# सिंहगर्जना

प्रल्हाद केशव अत्रे



प्रकाशन क्रमांक १५०

परचुरे प्रकाशन मन्दिर, गिरगांव, मुंबअी ४

मूल्य साडे सात रुपये

माझ्या मराठी बंधूंनो,

'सिंहगर्जना,' हें माझें १५० वें प्रकाशन. वास्तविक 'सिंहगर्जना' हा ग्रंथ पूर्वसंकेतानुसार दि. १५ मे १९५७ ला प्रसिद्ध व्हायला हवा होता. तसें प्रकट आश्वासन मीं दिलें होतें. परंतु तीन महिने उशिरानें आज हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे. आचार्य अत्रे यांचें प्रभावी व्यक्तिमत्त्व नि मराठी माणसाला आचार्य अत्रे यांच्याविषयीं वाटत असलेला अपरंपार आदर यांमुळेंच ग्रंथ उशिरां प्रसिद्ध होत असूनहि तुमचा रोष माझ्यावर झाला नाहीं याची पूर्ण जाणीव मला आहे.

संयुक्त महाराष्ट्राची चळवळ चालू झाल्यापासून आजपावेतों तन, मन, धन खर्च करून संयुक्त महाराष्ट्राची पताका दिमाखानें सारखी फडकत ठेवणारा एकमेव साहित्यिक म्हणजे आचार्य अत्रे होत. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला जें अपूर्व यश अद्यापपावेतों मिळालेलं आहे त्याचा मोठा वांटा आचार्य अत्रे आणि त्यांचा 'नवयुग' व 'मराठा' यांच्या प्रभावी प्रचाराकडे जातो. 'नवयुग' नि 'मराठा' हीं पत्रें नसतीं तर निवडणुकींत इतकें घवघवीत यश मिळविणें संयुक्त महाराष्ट्र समितीला कठीण गेलें असतें असें राजकीय निरीक्षक म्हणतात. मी त्यांच्याशीं सहमत आहें.

हा प्रचार करीत असतां क्षणाक्षणाला आचार्य अत्रे यांचा जीव किती धोक्यांत होता नि आर्थिक अडचणी अति निकरावर आल्यामुळें त्यांचें मन किती अस्थिर होतें हें मीं अगदीं जवळून पाहिलें आहे. असें असतांहि केवळ महाराष्ट्रप्रेमानें प्राप्त कर्तव्य म्हणून पंडित नेहरू, मोरारजी देसाई, स. का. पाटील, इत्यादि सर्व महाराष्ट्रद्वेष्ट्यांवर भेदक टीकास्त्र सोडून काँग्रेसवाल्यांचीं काळीं कारस्थानें त्यांनीं मराठी जनतेसमोर मांडलीं. आणि त्याचा अपेक्षित परिणाम होऊन अनेक वर्षांचे आपसांतील मतभेद विसरून संयुक्त महाराष्ट्र समितीच्या रूपानें सर्व मराठी जनता एकजुटीनें द्विभाषिक गाडण्यासाठीं आज पवित्र्यांत उभी आहे.

संयुक्त महाराष्ट्राच्या तेजस्वी लढ्याचें मूल्यमापन इतिहासकार करतील तेव्हां करोत. भारतीय स्वातंत्र्यसंग्रामांतील सशस्त्र क्रांतिकारकांच्या प्रभावी कामगिरीकडे विकृत दृष्टीनें पाहून त्यांचेवर अन्याय करण्याची परंपरा, सत्य-अहिंसेच्या पोकळ गप्पा मारणाऱ्या काँग्रेसी सरकारच्या साहाय्यानें तशीच पुढें चालू ठेवून संयुक्त

महाराष्ट्राच्या तेजस्वी लढ्याचा खोटानाटा इतिहास अहंमन्य नेहरूभाट खुशाल लिहोत. परंतु खोटानाटा इतिहास लिहीत असतांहि आचार्य अत्रे यांच्या उल्लेखा-विना त्यांना इतिहास पुरा करतां येणार नाहीं यांत कांहीं शंका नाहीं.

सत्य कांहीं लपून राहूं शकत नाहीं. केव्हां तरी तें उजेडांत येणारच. इतिहास हा उत्तम गुरु नि शास्ता आहे. उद्यांच्या पिढीला महाराष्ट्रानें लढविलेल्या या संयुक्त महाराष्ट्राच्या तेजस्वी लढ्याचें खरेंखुरें दर्शन घडावें, आपल्यावर होणाऱ्या अन्याया-वर आघात करण्यास स्फूर्ति मिळावी नि मराठी माणसाचा मराठी बाणा चिरंतन टिकावा या हेतूनें मी आचार्य अत्रे यांनीं लिहिलेल्या उपयुक्त प्रभावी लेखांचा हा संग्रह पुस्तक-रूपानें प्रसिद्ध करीत आहे.

हा महत्त्वाचा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा मान मला देऊन आचार्यांनीं माझा बहुमान केला आहे. मी आचार्यांचा अत्यंत ऋणी आहें. स्वातंत्र्यवीर सावरकर नि आचार्य अत्रे यांच्या आशीर्वादानेंच ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर या संस्थेला प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे.

दि. १३ ऑगस्टला आचार्य अत्रे यांचा ५९ वा वाढदिवस आहे. ६१ व्या वाढदिवशीं आचार्य अत्रे यांचा एक अपूर्व ग्रंथ आपल्या हातीं देण्याची उमेद मी बाळगीत आहें.

जय महाराष्ट्र !

गोरेगांवकर चाळ क्र. २
गिरगांव, मुंबई ४

ग. पां. परचुरे

# लेखानुक्रम



आचार्य अत्रे : (प्रकाशक परचुरे यांस) 'सिंहगर्जने'ची प्रस्तावना झाली अखेर लिहून !

भारतीय स्वातंत्र्याचे भीष्माचार्य

संयुक्त महाराष्ट्राच्या सत्याग्रही संग्रामाचे सेनानी

आणि

'महाराष्ट्र मेला, तरी राष्ट्र मेले
मराठ्याविना राष्ट्रगाडा न चाले !
महावीर, वैरी पराधीनतेचा
महाराष्ट्र आधार ह्या भारताचा !'

ह्या महाराष्ट्राच्या अस्मितामंत्राचे उद्गाते महर्षि

**सेनापति बापट**

ह्यांच्या पूज्य चरणीं —

# प्रस्तावना

'संयुक्त महाराष्ट्रा'ची पहिली घोषणा शेहचाळीस सालच्या मे महिन्यांत बेळगांवच्या साहित्य संमेलनामध्यें आम्हीं मराठी लेखकांनीं केली. तत्पूर्वी मराठी भाषिकांचें एकीकरण व्हावें एवढीच भाषा उच्चारली जात होती. पण सर्व मराठी भाषिक प्रदेश एकत्रित आणून त्यांचा एक अखंड 'संयुक्त महाराष्ट्र' तयार करावा ही कल्पना बेळगांवच्या साहित्य संमेलनांत नांवारूपाला आली. त्यानंतर सर्वपक्षीय 'संयुक्त महाराष्ट्र परिषद्' स्थापन करण्यांत येऊन तिच्या अध्यक्षस्थानीं श्री. शंकरराव देवांची स्थापना करण्यांत आली. पुढें देशाला स्वातंत्र्य मिळालें. तेव्हां भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न नव्या भारत सरकारच्या डोळ्यांपुढें प्रामुख्यानें उभा राहिला. कारण, देशाला स्वातंत्र्य मिळालें तर सर्व घटक राज्यांची पुनर्रचना भाषिक तत्त्वावर करूं असें काँग्रेस एकवीस सालापासून सतत सव्वीस वर्षें जनतेला आश्वासन देत होती.

त्याप्रमाणें भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न सोडविण्यासाठीं सरकारनें 'दार कमिशन'ची नेमणूक सत्तेचाळीस सालच्या अखेरीस केली. मध्यंतरीं देशाच्या दृष्टीनें एक महान् दुर्घटना घडून आली. अठ्ठेचाळीसच्या जानेवारी महिन्यांत महात्मा गांधींचा खून झाला. ही खून करणारी व्यक्ति मराठी भाषिक असल्यामुळें काँग्रेसश्रेष्ठींची महाराष्ट्राकडे—सर्व मराठी माणसांकडे—बघण्याची दृष्टि एकदम कलुषित होऊन गेली. आधींच त्यांना महाराष्ट्राबद्दल फार प्रेम! त्यांत गोडश्यांनीं हें विष कालवल्यावर मग कांहीं विचारूंच नका. महाराष्ट्र हा त्यांना एकदम देशाचा दुष्मन् वाटूं लागला. आणि काय वाटेल तें झालें तरी देशाच्या राजकारणांत महाराष्ट्राचें महत्त्व आणि सामर्थ्य वाढूं द्यावयाचें नाहीं, अशी सरदार पटेल आणि पंडित नेहरू ह्यांनीं आपल्या मनाशीं खूणगांठ बांधली. त्याचा पडताळा 'दार कमिशन'च्या अहवालांत प्रथम आला.

भाषावार प्रांतरचनेच्या मुळावरच 'दार कमिशन'नें घाव घातला. भाषिक प्रांतरचनेची कल्पना ही राष्ट्राचा घात करणारी आहे, तिला तत्काळ मूठमाती देण्यांत यावी, असें 'दार कमिशन'नें सरळ सांगून टाकलें. त्याचबरोबर संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही राष्ट्रद्रेष्ट्या पुणेरी कंपूच्या मेंदूमधून निर्माण झालेली असून, पुढेंमागें भाषिक महाराष्ट्र निर्माण करण्यासारखी परिस्थिति उत्पन्न झाली तरी त्याच्यांत मुंबईचा समावेश कदापिहि होऊं शकणार नाहीं, मुंबई शहर हें स्वतंत्रच ठेवावयाला हवें, अशी महाराष्ट्राची धादांत निंदानालस्ती करणारी आणि त्याच्या वर्मावर घाव घालणारी भाषा उच्चारून 'दार कमिशन'नें महाराष्ट्र-द्वेषाची मुहूर्तमेढ भारतीय राजकारणांत प्रथम रोवली. भाषावार प्रांतरचना आणि संयुक्त महाराष्ट्र ह्या संबंधींचा 'दार कमिशन'चा निर्णय म्हणजे पटेल-नेहरू ह्यांचा वैयक्तिक अभिप्राय होय हें निराळें सांगावयाला नको. मुंबई इलाख्याचे भाषावार विभाग न पाडतां त्यांत महागुजरात मिळवून तो बहुभाषिक प्रांतच ठेवावा ही कल्पना ह्याच सुमारास श्री. के. एम्. मुनशी प्रतिपादीत होते, ह्याचा आतां विचार केला म्हणजे मराठी भाषिकांची 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा'ची मागणी अमान्य करून त्यांना महाद्विभाषिकांत जबरदस्तीनें दडपावयाचें हें काँग्रेसश्रेष्ठींचें कारस्थान किती जुनें होतें हें लक्षांत येतें.

'दार कमिशन'च्या शिफारशींचा धिक्कार केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर साऱ्या देशांत झाला. त्यावेळच्या 'महाराष्ट्र काँग्रेस कमिटी'नें त्यांचा भडक शब्दांत निषेध केला आणि 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र' ताबडतोब बनविण्यांत यावा अशी मागणी केली. 'दार कमिशन'च्या निर्णयाविरुद्ध देशांतील लोकमत अत्यंत प्रक्षुब्ध झालें आहे हें पाहिल्यानंतर त्याला मान्यता देण्याचें धैर्य जयपूर काँग्रेसला सुद्धां झालें नाहीं. तिनें पुन्हा भाषावार प्रांतरचनेचा विचार करण्यासाठीं नेहरू, पटेल आणि पट्टाभि ह्या तिघांची समिति नेमली. ही समिति म्हणजे लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्याचें एक शुद्ध नाटक होतें. कारण 'दार कमिशन'चा बुरखा पांघरून नेहरू-पटेलांनीं भाषावार प्रांतरचनेच्या विरुद्ध जें मत एकदां देऊन टाकलें, त्यापेक्षां तिघांच्या नव्या समितीमधून निराळें असें मत तें थोडेंच प्रतिपादणार होतें? म्हणून दार कमिशनच्याच शिळ्या शिफारशींची मखलाशी करावयाला त्यांनीं पुन्हा सुरुवात केली. 'भाषावार प्रांतरचनेमुळें देशांत फुटीरपणाची आणि विघटनेची वृत्ति बळावेल

आणि आत्यंतिक त्याग करून मिळविलेलें स्वातंत्र्य गमावण्याची आपल्यावर पाळी येईल' असला भोंगळ आणि हास्यास्पद युक्तिवाद ते करूं लागले.

भाषिक प्रांतरचना देशहिताची नाहीं असें ज्या तोंडानें ते म्हणत, त्याच तोंडानें भाषिक महाराष्ट्र पुढेंमागें झाला तर त्यांत मुंबईचा मात्र समावेश होणार नाहीं असें बजावून सांगायला ते कधींहि चुकत नसत, ही विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. बरें, भाषिक प्रांतरचना जर खरोखरच राष्ट्रघातकी स्वरूपाची आहे असें नेहरू-पटेलांचें प्रामाणिक मत होतें, तर तसें त्यांनीं स्पष्टपणें त्याच वेळीं सांगून टाकावयाचें, कीं यापुढें भाषावार प्रांतरचनेची मागणी कोणींहि करतां कामा नये. ती कल्पना आतां आम्हीं कायमची निकालांत काढली आहे. पण तसें न म्हणतां 'एखाद्या विभागानें भाषावार तत्त्वावर आपली रचना व्हावी अशी जोरदार आणि व्यापक मागणी केली तर लोकशाही सरकारला ती मागणी अमान्य करणें अशक्य आहे.' अशी एक चोरटी पळवाट त्यांनीं आपल्या निर्णयामध्यें मोठ्या धूर्तपणानें ठेवून दिली. भाषावार राज्यरचना राष्ट्रहिताची नाहीं ही भाषा केवळ मराठी भाषिकांच्या तोंडावर मारून त्यांना भिवविण्यासाठीं. पण, त्याचबरोबर इतर भाषिक राज्यें देण्यास पुढेंमागें अडचण पडूं नये, म्हणून त्याबाबत त्यांनीं 'जोरदार आणि व्यापक मागणी करावी' अशी मात्र त्याच वेळीं त्यांनीं हलकेच चिथावणी देऊन ठेवली. पण समजा, 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राबद्दल' मराठी भाषिकांनींच तशी जोरदार आणि व्यापक मागणी केली तर? तरीहि 'मुंबई संमिश्र आणि बहुभाषिक असल्यानें ती कोणत्याहि एका भाषेच्या गटांत येऊं शकणार नाहीं, कारण तसें केल्यास तिचें महत्त्व कमी होईल!' अशी मुंबईबाबत मराठी भाषिकांना त्यांनीं अखेरची आणि निरंतरची ताकीद देऊन ठेवली.

पुढें भाषिक-आंध्र-निर्मितीसाठीं श्री पोट्टी रामलू ह्यांनीं १९ ऑक्टोबर १९५२ रोजीं प्राणांतिक उपोषणाला प्रारंभ केला. अठ्ठावन्न दिवसांच्या उपोषणानंतर १५ डिसेंबर रोजीं ते मरण पावले. त्यामुळें आंध्रांत प्रचंड लोकप्रक्षोभ झाला. तेव्हां १९ डिसेंबर रोजीं लोकसभेंत पंडित नेहरूंना नाक मुठींत धरून स्वतंत्र-आंध्रप्रांत-निर्मितीची घोषणा करावी लागली. तथापि, एवढी नाचक्की होऊनसुद्धां भाषिक राज्याला बाह्यात्कारीं विरोध करीत राहण्याच्या नेहरूंच्या आडमुठ्या नि ढोंगी धोरणांत मात्र मुळींच फरक पडला नाहीं. त्याबाबत लोकसभेंत बोलतांना ते म्हणाले, " खरें विचाराल तर मला ह्या प्रश्नाबाबत मुळींच प्रेम वाटत नाहीं. उलट

मी असेंच म्हणतों कीं आजच्या परिस्थितींत भाषिक प्रांत हे राष्ट्राला घातकच ठरतील. पण तुम्हांला जर भाषिक प्रांत पाहिजेच असतील, तर तुम्ही आपापसांत मतैक्य घडवून आणा. याबाबत माझी समजूत कशी काढावयाची हा प्रश्न नसून तुम्हीं एकमेकांची समजूत कशी करावयाची हा मुख्य प्रश्न आहे." हिंदु-मुसलमानांनीं परस्परांची समजूत घालून एकमतानें स्वातंत्र्याची मागणी करावी असा लुच्चेगिरीचा उपदेश त्यांना करणाऱ्या इंग्रज राज्यकर्त्यांची भाषाच पुन्हा नेहरू बोलत होते.

त्रेपन्न सालच्या जानेवारी महिन्यांत हैद्राबाद येथें काँग्रेसचें अधिवेशन भरलें. साहजिकच भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न ह्या अधिवेशनांत निकालांत निघेल अशीच सर्वांची अपेक्षा होती. महाराष्ट्राची आणि कर्नाटकाची मंडळी मोठ्या आशेनें मुद्दाम त्या ठिकाणीं गेली होती. पण नानातऱ्हेच्या लंगड्या नि पांगळ्या सबबी सांगून नेहरूंनीं भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाला साफ वाटाण्याच्या अक्षता लावून टाकल्या. ते म्हणाले, "भाषावार प्रांतरचनेच्या भानगडींत आपण पडलों तर पहिल्या पंचवार्षिक योजनेचें काय होणार? आंध्रप्रांत निर्माण करावयाचें आपण ठरविलें आहे. त्याचें काय होतें तें आपण पुढील तीन वर्षांत बघूं. मग तें तत्त्व इतर प्रांतांना लावायचें कीं नाहीं तें आपण ठरवूं. भाषिक प्रांत करावयाचे म्हणजे हैद्राबादची फाळणी करावी लागेल. त्यांत अनेक भानगडी निर्माण होतील. अन् दक्षिण भारताचा तोल ढळेल!" हैद्राबाद संस्थानचें विसर्जन करावयाला नेहरूंचा सर्वांत मोठा विरोध होता. कारण हैद्राबाद संस्थानची एक विशिष्ट संस्कृति आहे आणि तिचें रक्षण करावयाला पाहिजे असा नेहरूंचा आग्रह होता. तथापि, हैद्राबाद संस्थानचें विसर्जन केलें तर दक्षिण भारताचा तोल ढळेल, असला बाष्कळ आणि हास्यास्पद युक्तिवाद आजपर्यंत कोणींहि भारतीय मुत्सद्द्यानें केला नसेल. सारांश, नेहरूंच्या सांगण्यावरून भाषावार प्रांतरचनेचा मुद्दा पांच वर्षेपर्यंत खड्ड्यांत गाडून ठेवण्याचा निर्णय हैद्राबादच्या काँग्रेसनें घेतला.

तथापि, ह्या निर्णयाचा महाराष्ट्रांतील आणि कर्नाटकांतील भाषिक राज्याच्या चळवळीवर उलटा परिणाम झाला. त्या थंडावण्याऐवजीं त्यांना जास्तच जोर चढला. संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीसाठीं महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं परिषदा भरूं लागल्या. कर्नाटक काँग्रेसनें तर एका वर्षाच्या आंत 'स्वतंत्र कर्नाटक' झाला नाहीं तर याद

राखा असा सरकारला सरळ दम भरला. स्वतंत्र कर्नाटकाच्या आंदोलनाला एवढें प्रखर आणि रौद्र स्वरूप प्राप्त झालें कीं त्याचें पर्यवसान हुबळीच्या भयंकर दंगलींत झालें. महाराष्ट्रांत त्या वेळीं अशी दंगल झाली नाहीं खरी. पण संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर महाराष्ट्रांतील जनता निर्धारानें जागृत होऊं लागली आहे आणि तिच्या असंतोषानें महाराष्ट्राचें वातावरण धूसर होऊं लागलें आहे हें सरकारच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

त्याच सुमारास महाराष्ट्रांत मोठा दुष्काळ पडला. त्याची पाहणी करण्याचें निमित्त करून पंडित नेहरूंनीं महाराष्ट्रामधून सहा दिवसाचा एक झंझावाती दौरा काढला. ह्या दौऱ्यांत त्यांनीं जीं भाषणें केलीं त्यांत दुष्काळाचें कुठें नांव नव्हतें. पंचवार्षिक योजनेचे पोवाडे गाण्याचें ढोंग करून त्यांनीं संयुक्त महाराष्ट्राविरुद्ध सारा प्रचार केला. देशाची प्रगति हीच आपल्या प्रांताची प्रगति आहे. फुटीर वृत्तींत राष्ट्राचा नाश आहे. जातीयतेप्रमाणें प्रांतीयता देशाला हानिकारक आहे. भाषावादावर आधारलेल्या भाषिक राज्याच्या मागण्या व्यापक देशहिताच्या नाहींत. प्रादेशिकतेची भाषा मूर्खपणाची आहे. जिल्हा, तालुका किंवा प्रदेश ह्यापुरता संकुचित दृष्टिकोन भारतीयांनीं सोडून द्यावा. असें सांगून महाराष्ट्रांतल्या संयुक्त-महाराष्ट्रवादी जनतेचें मन कलुषित करण्याचा नेहरूंनीं ह्या दुष्काळी दौऱ्यांत निकराचा प्रयत्न केला. पंचवार्षिक योजनेंत महाराष्ट्राला विशेष स्थान न मिळाल्यामुळें आणि संयुक्त महाराष्ट्राची मराठी जनतेची मागणी पद्धतशीरपणें डावलण्याच्या कॉंग्रेसश्रेष्ठींच्या धोरणामुळें मराठी जनता कॉंग्रेसवर अत्यंत रुष्ट झाली होती. म्हणून तिची समजूत घालण्यासाठीं नेहरूंना महाराष्ट्रांतल्या कॉंग्रेसवाल्यांनीं मुद्दाम बोलावलें होतें. पण त्यांच्या आगमनानें लोकांचा राग कमी होण्याऐवजीं त्यांच्या भाषिक-प्रांत-विरोधी प्रचारानें लोकांच्या संतापांत अधिक भरच पडली.

त्रेपन्न सालामध्यें भारतामधील निरनिराळ्या भागांमधून भाषिक राज्यांची मागणी जोरानें होऊं लागली. पंजाबामधील शीख लोक देखील भाषावार प्रांत अत्यंत निकडीनें मागूं लागले. भाषिक आंध्रराज्य झालें तरीहि त्यानें तेलगू भाषिकांचें समाधान झालें नाहीं. ते विशाल आंध्र पाहिजे असें म्हणूं लागले. स्वतंत्र कर्नाटकवाद्यांनीं आपल्या चळवळीची धार अधिकच तिखट केली. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचा आवाज आतां जास्त प्रकट होऊं लागला. पण त्याबरोबरच संयुक्त महाराष्ट्राचे शत्रूहि जागे होऊन तो हाणून पाडण्याची ते सिद्धता करूं लागले.

महागुजरातवाल्यांनीं भाषिक गुजरात मागण्याऐवजीं 'मुंबईचा अंतर्भाव संयुक्त महाराष्ट्रांत होऊं नये' अशी ओरड करण्यास ह्याच वेळेपासून सुरुवात केली. मुंबई शहरांतल्या गुजराती भांडवलवाल्यांनीं सरदार पटेलांचे कल्याण शिष्य सदोबा पाटील ह्यांच्यामार्फत मुंबई शहर भाषिक राज्यांत न घालतां त्याचें स्वतंत्र राज्य करावें असा एक नवीनच आवाज उठवला.

'संयुक्त महाराष्ट्रा'बाबत सर्व मराठी भाषिकांचें ऐक्य नाहीं असा पुकारा प्रथम 'दार कमिशन'नें केला. असें करण्यामध्यें त्यांचा हेतु 'संयुक्त महाराष्ट्रा' मधले निरनिराळे घटक एकत्र येऊं नयेत आणि महाराष्ट्राचें एकीकरण होऊं नये असा होता. मध्यप्रदेशचे अर्थमंत्री श्री. ब्रिजलाल ब्रियाणी ह्यांनीं 'महाविदर्भा'चा समावेश संयुक्त महाराष्ट्रांत न होतां त्याचा निराळा स्वतंत्र प्रांत व्हावा अशी खटपट चालविली होतीच. म्हणून, संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीला सर्व मराठी भाषिकांचा एकमुखी पाठिंबा नाहीं, त्याबाबत त्यांच्यामध्यें अनेक मतभेद आहेत, ते मिटेपर्यंत भाषिक महाराष्ट्र निर्माण होणें अशक्य आहे अशा तऱ्हेचा युक्तिवाद नेहरूप्रभृति काँग्रेसश्रेष्ठी वारंवार करीत असत. एवढ्यासाठीं महाराष्ट्र, महाविदर्भ आणि मराठवाडा ह्या संयुक्तमहाराष्ट्राच्या तीन घटकांमधील जबाबदार पुढाऱ्यांनीं एकत्र येऊन 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा'ची निःसंदिग्ध आणि एकमुखी घोषणा जाहीरपणें करणें जरूर होतें. तो योग चौपन्न सालच्या सप्टेंबरांत जमून आला.

महाराष्ट्र, महाविदर्भ आणि मराठवाड्यामधील बारा संयुक्तमहाराष्ट्रवादी पुढाऱ्यांनीं नागपूर येथें एकत्र येऊन सर्व मराठी भाषिकांच्या सलग प्रदेशांचें एक अखंड राज्य बनवावें आणि त्याची राजधानी मुंबई असावी असा एक अकरा कलमी करार केला. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीच्या दृष्टीनें ही सर्वांत महत्त्वाची घटना घडून आली. कारण, त्या योगानें स्वतंत्र मुंबई राज्याचा आणि महाविदर्भाचा पुरस्कार करणाऱ्या भांडवलवाल्या कंपूचीं तोंडेंच बंद झालीं. आणि संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीला प्रातिनिधिक आणि जबाबदार स्वरूप प्राप्त झालें. 'नागपूर करार' झाल्यानंतर चार-दोन दिवसांनींच 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा'चा ठराव श्री. यशवंतराव मोहिते ह्यांनीं मुंबई कायदेमंडळामध्यें आणला. तथापि, मोरारजी देसाई ह्यांनीं त्या ठरावावर चर्चा न करतां 'ह्या वादामुळें राज्यकारभाराचा समतोलपणा ढळेल' अशी सबब पुढें करून तो

बिनमुदत पुढें ढकलला. कॉंग्रेसश्रेष्ठींच्या संयुक्त महाराष्ट्रविरोधी कारस्थानाला येथूनच प्रारंभ झाला असें म्हणावयास हरकत नाहीं.

भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न पांच वर्षें पुढें ढकलला पाहिजे अशी घोषणा हैद्राबादच्या कॉंग्रेसमध्यें पंडित नेहरूंनीं त्रेपन्न सालच्या जानेवारी महिन्यांत केली. पण त्यानंतर अवघ्या अकरा महिन्यांनींच न्या. फाजलअली ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न 'निर्विकारपणें' सोडविण्यासाटीं सर्वाधिकारसंपन्न 'राज्यपुनर्रचना कमिशन'चीं नेमणूक त्यांना करावी लागली. ह्यावरून भाषावार प्रांतरचनेच्या मागणीचें दडपण पंडित नेहरूंवर आंतून आणि बाहेरून किती जोरानें त्या वेळीं आलें असलें पाहिजे हें दिसून येतें. सदर कमिशननें आपल्या शिफारसी दीड वर्षांनीं म्हणजे पंचावन्न सालच्या जूनमध्यें जाहीर कराव्यात असा त्याला आदेश देण्यांत आला. ही मुदत पुढें तीन महिन्यांनीं वाढविण्यांत आली.

'संयुक्त महाराष्ट्र परिषदे'नें डॉ. धनंजयराव गाडगीळ ह्यांच्या मार्गदर्शकत्वाखालीं मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची अत्यंत मुद्देसूद आणि बिनतोड कैफियत तयार करून ती 'राज्यपुनर्रचना कमिशन'ला चौपन्न सालच्या मे महिन्यांत सादर केली. भारतामधील कोणत्याहि इतर भाषिकांतर्फे एवढी प्रभावी कैफियत आली नव्हती असें म्हणतात. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीविरुद्ध घेण्यांत येणाऱ्या सर्व आक्षेपांना निश्चित पुराव्यानिशीं ह्या कैफियतीमध्यें उत्तरें देण्यांत आलीं होतीं. राज्यपुनर्रचना कमिशनचे अध्यक्ष न्या. फाजलअली ह्यांच्या मनावर ह्या कैफियतीचा अनुकूल परिणाम होऊन, त्यांनीं मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची मराठी भाषिकांची मागणी मान्य केल्याचें परिषदेच्या कांहीं पुढाऱ्यांना खाजगी रीत्या सांगितलें सुद्धां होतें. पण संयुक्त महाराष्ट्राच्या मस्तकावर प्रहार करावयाला हातामध्यें हातोडा घेऊन जेथें पंडित नेहरू स्वतः बसले होते तेथें बिचाऱ्या फाजलअलींचें काय चालणार? दार कमिशन आणि ज. व. प. समिति ह्यांचें संयुक्त महाराष्ट्राबद्दलचें जें धोरण होतें, तेंच फाजलअली समितीला अखेर स्वीकारावें लागलें. त्याचें कारण त्या धोरणाचे पडद्यापाठीमागचे एकमेव सूत्रधार पंडित नेहरू हे होते हें उघड आहे.

फाजलअली कमिशनचा अहवाल १० ऑक्टोबर १९५५ रोजीं प्रसिद्ध झाला. त्याच्या आधीं तीन महिन्यांपासून फाजलअली कमिशननें मराठी भाषिकांची

भाषिक राज्याची मागणी धुडकावून लावली असल्याच्या बातम्या कानावर येऊं लागल्या होत्या. सोळा ऑगस्ट रोजीं गोव्याच्या अत्याचाराची मुंबईमध्यें जी प्रतिक्रिया झाली ती पाहिल्यावर पाटणा येथें पंडित नेहरू अनवधानानें एकदम बोलून गेले कीं 'राज्यपुनर्रचना समितीचा अहवाल प्रसिद्ध झाल्यानंतर होणाऱ्या अत्याचारांची ही रंगीत तालीमच मुंबईमध्यें झाली म्हणावयाची!' त्याच वेळीं मराठी भाषिकांच्या लक्षांत येऊन चुकलें कीं राज्यपुनर्रचना समितीनें संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीला हरताळ फासलेलें असावें म्हणून! नंतर दोन ऑक्टोबर रोजीं गांधीजींच्या जन्मदिनाच्या मुहूर्तावर जळगांवपासून बेळगांवपर्यंत साऱ्या महाराष्ट्रांत बंदूकधारी पोलिसांचा जेव्हां पहाराच मोरारजीनें उभा केला, तेव्हां आपल्या भवितव्यांत काय वाढून ठेवलें आहे, ह्याबद्दल मराठी भाषिकांची अगदीं खात्रीच झाली. राज्यपुनर्रचना कमिशनच्या शिफारसी पाहून महाराष्ट्रांतील जनतेच्या तळपायाची आग मस्तकाला जाणार आणि त्यामुळें महाराष्ट्रांत असंतोषाचें प्रचंड वादळ उठणार ही गोष्ट पंडित नेहरूंना आधींपासून माहीत होती. आणि म्हणून लोकप्रक्षोभाचें हें तुफान बंदुकीच्या गोळ्यांनीं तेथल्या तेथें चिरडून टाका असा आदेश स्वतः नेहरूंनींच मोरारजींना देऊन टाकला असावा हें स्पष्ट होतें.

राज्यपुनर्रचना कमिशननें 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा'ची मागणी केवळ लाथाडलीच नाहीं, तर तिचा चेंदामेंदा करून अक्षरशः खून केला. महाराष्ट्राबद्दल पंडित नेहरूंच्या मनामध्यें अठ्ठेचाळीस सालापासून जो भयंकर आकस धुमसत होता, तो सर्व त्यांनीं राज्यपुनर्रचना कमिशनच्या शिफारसीमधून एकदांचा उगवून आपल्या आत्म्याची शांति करून घेतली. महाराष्ट्रावर असा अघोर अन्याय, असा भीषण आघात आजपर्यंत कोणीं केला नव्हता. 'एक भाषा, एक राज्य' हें तत्त्व आपल्याला मान्य नाहीं असें म्हणत म्हणत राज्यपुनर्रचना कमिशननें भारतांत नऊ भाषिक राज्यें निर्माण केलीं आणि विदर्भ, बेळगांव, कारवार हे महाराष्ट्राचे सोन्यासारखे भाग कापून उरलेला छिन्नविच्छिन्न महाराष्ट्र मुंबईसकट महागुजरातमध्यें ढकलून त्याचें एक धेडगुजरी द्विभाषिक राज्य बनविलें ह्यापेक्षां अधिक ढोंगीपणाचें, कपटाचें नि राक्षसीपणाचें राजकारण भारताच्या इतिहासांत कोणाला दाखवून देतां येईल काय?

मुंबई महाराष्ट्राला कां द्यायची नाहीं तर मुंबईत महाराष्ट्रीय लोक अल्पसंख्याक म्हणजे ४३·६ टक्के आहेत म्हणून. (वस्तुतः, कमिशनचें हें विधान किती खोटें

आहे तें पुढें सार्वत्रिक आणि मुंबई कॉर्पोरेशनच्या निवडणुकींत सिद्ध झालेंच.) आणि बेळगांवांत मराठी लोक बहुसंख्य असतांना त्याचा अंतर्भाव कर्नाटकांत कां करावयाचा ? तर राज्यकारभाराच्या दृष्टीनें तें जास्त सोयीस्कर होईल म्हणून. मुंबई गुजरातपासून कां तोडावयाची नाहीं तर मुंबईच्या वाढीला अन् विकासाला तें घातक ठरेल आणि त्यामुळें देशाला धक्का बसेल ! आणि विदर्भ महाराष्ट्राला कां जोडावयाचा नाहीं तर महाराष्ट्रांतला जातीयवाद म्हणे विदर्भाच्या राजकारणांत शिरेल ! सारांश, महाराष्ट्राची कोणतीहि मागणी मुळीं मान्यच करावयाची नाहीं असा निश्चय करूनच महाराष्ट्राच्या विरुद्ध जेथें जो युक्तिवाद सुचेल तेथें त्याचा कमिशननें कावेबाजपणानें आणि दुष्टपणानें अवलंब केला. सारांश, राज्य-पुनर्रचना कमिशनचा अहवाल म्हणजे संयुक्त महाराष्ट्राचें मृत्युपत्रच होतें. साहजिकच, महाराष्ट्रानें या अहवालाचा एकमुखानें धिक्कार केला.

पंडित नेहरूंच्या आणि महाराष्ट्राच्या संघर्षाला येथून खरा प्रारंभ झाला. राज्यपुनर्रचना कमिशनच्या अहवालाच्या निषेधाच्या प्रचंड सभा जेव्हां सर्वत्र महाराष्ट्रांत भरूं लागल्या आणि मोर्चे निघूं लागले, तेव्हां पंडित नेहरूंनीं महाराष्ट्राच्या कांहीं पुढाऱ्यांना तांतडीनें बोलावून घेतलें. त्यामुळें सर्वसामान्य लोकांची अशी समजूत झाली कीं ह्या वाटाघाटींतून कांहीं तरी तडजोड निघणार आणि महाराष्ट्राला न्याय मिळणार. पण तें सगळें नेहरूंचें ढोंग होतें. यापुढें एक भयानक कपटनाटक मदाराष्ट्रांशीं खेळावयाचा नेहरूनीं निर्धार केला होता. महाराष्ट्राच्या वतीनें शंकरराव देवांनीं नेहरूंशीं अगदीं सरळ युक्तिवाद केला कीं, 'व्यापक देशहितासाठीं जर सर्व महागुजरात तुम्हीं द्वैभाषिक मुंबई राज्यांत घातलात, तर संयुक्त महाराष्ट्रामधून तुम्ही मराठी भाषिक विदर्भ तेवढा कां बाजूला काढलात ? द्वैभाषिक राज्यांत सर्व गुजरात्यांप्रमाणें सर्व मराठी भाषिकांना घाला आणि तो प्रयोग पांच वर्षें करून पाहा !' पण द्विभाषिक राज्यांत विदर्भाचा समावेश करावयाला गुजरात प्रदेश कॉंग्रेसनें आणि विशेषतः मोरारजी देसाई ह्यांनीं विरोध केला. द्विभाषिक राज्य जर महाराष्ट्राला मान्य नसेल तर महाराष्ट्र, गुजरात आणि मुंबई अशीं तीन राज्यें बनविण्यांत यावींत अशी त्यांनीं आग्रहाची मागणी केली.

मुंबईचें स्वतंत्र राज्य करावें हा नेहरूंचा पहिल्यापासूनचाच डाव होता. द्विभाषिक राज्य ही नुसती मधली हुलकावणी होती. महाराष्ट्र तें अमान्य

करणार हें त्यांना माहीतच होतें. आणि तसें झालें कीं महाराष्ट्र, गुजरात आणि मुंबई अशीं तीन राज्यें करून मोकळें व्हावयाचें असा त्यांनीं ढेबर आणि मोरारजी ह्यांच्या मदतीनें सारा व्यूह रचला होता. तो त्यांच्या अपेक्षेप्रमाणें खरा ठरला. त्याचबरोबर महाराष्ट्राच्या वतीनें बोलणीं करावयास दिल्लीला गेलेल्या शंकरराव देव आणि महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसच्या नेत्यांना नेहरूंनीं आपला रौद्रावतार दाखवून त्रिराज्य योजनेला त्यांच्याकडून जबरदस्तीनें मान्यता मिळविली आणि संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीमधून त्यांना फोडून बाजूला काढलें.

संयुक्त महाराष्ट्र परिषदेच्या कार्यकारिणींत बहुसंख्य मंडळी काँग्रेसचीच होती. अध्यक्ष शंकरराव देव, कार्याध्यक्ष भाऊसाहेब हिरे, उपाध्यक्ष रामानंद तीर्थ, डॉ. गोपाळराव खेडकर, देवकीनंदन नारायण, सभासद रामराव देशमुख, यशवंतराव चव्हाण, नानासाहेब कुंटे. असे काँग्रेसचे मोठमोठे पुढारी संयुक्त महाराष्ट्राच्या या आंदोलनांत अग्रभागीं होते. ‘मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा’ची एकमुखानें मागणी करणाऱ्या ‘नागपूर करारा’वर ह्या सर्व मंडळींच्या सह्या होत्या. त्यामुळें संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचें नेतृत्व महाराष्ट्र, विदर्भ आणि मराठवाडा ह्यामधील काँग्रेस नेत्यांच्या हातीं आहे असेंच कोणालाहि वाटलें असतें. नेहरूंचीहि तशीच समजूत होती. म्हणून संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीमधून काँग्रेसच्या पुढाऱ्यांना एकदां बाजूला काढलें कीं त्या चळवळीचें कंबरडें मोडलें अशी नेहरूंनीं आपल्या मनाशीं खूणगांठ बांधून काँग्रेसनिष्ठा कीं महाराष्ट्रनिष्ठा असा बिकट पेच त्यांनीं त्या मंडळीपुढें टाकला. त्या पेचांत ते सारे अडकले. त्यांतून बाहेर पडण्याचें धैर्य आणि हिंमत एकाहि तेजस्वी मराठी काँग्रेसनेत्यानें त्या वेळीं दाखविली नाहीं. नेहरूंच्या निष्ठेपुढें त्यांना संयुक्त महाराष्ट्राची निष्ठा क्षुद्र वाटली. महाराष्ट्राशीं विश्वासघात करून त्यांनीं एकजात नेहरूंच्या पायावर लोटांगणें घातलीं.

दिल्लीहून शंकरराव देव प्रभृति काँग्रेस पुढारी जे परत आले, ते तोंडाला टाळीं लावून बसले. स्वतंत्र मुंबई राज्याला मान्यता देऊन संयुक्त महाराष्ट्राचा गळा कापूनच ते तेथून आले. तेव्हां त्यांना मराठी जनतेशीं बोलावयाला तोंडच मुळीं होतें कुठें? पुढें राज्यपुनर्रचना कमिशननें सुचविलेली द्विभाषिक राज्याची योजना मागें घेऊन पंडित नेहरूंनीं ऐन दिवाळीच्या मुहूर्तावर जेव्हां त्रिराज्याची नवी घोषणा केली, तेव्हां मराठी जनतेच्या संतापाला पारावारच उरला नाहीं. महाराष्ट्रापासून मुंबई तोडून नेहरूंनीं आपल्या काळजाचा जणुं कांहीं लचकाच तोडला आहे

असें मराठी जनतेला अपरंपार दुःख झालें. ह्या अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठीं तमाम महाराष्ट्र एकजुटीनें उभा राहिला. येथपासून संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला अत्यंत प्रखर आणि रौद्र स्वरूप प्राप्त झालें. महाराष्ट्रामधली कॉंग्रेसची प्रतिष्ठा आणि लोकप्रियता एकदम समाप्त झाली. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचीं सूत्रें तोंपर्यंत ज्यांच्याकडे होतीं ते शंकरराव देव आणि महाराष्ट्र कॉंग्रेसचे इतर पुढारी हे महाराष्ट्राचे दुष्मन् आहेत असें मराठी जनतेला एकाएकीं वाटूं लागलें. अन् त्यामुळें त्यांना महाराष्ट्रांतून सन्मानानें वावरणें सुद्धां मुष्कील होऊन बसलें.

स्वतंत्र मुंबई राज्याविरुद्ध मराठी जनतेची प्रतिक्रिया एवढी भयंकर होईल अशी पंडित नेहरूंना मुळींच कल्पना नव्हती. त्यांना वाटलें कीं लाठीधारी आणि बंदूकधारी पोलिसांच्या नुसत्या निदर्शनानें मराठी जनता घाबरेल आणि दबेल. पण सत्याग्रह, संप नि हरताळ हीं स्वातंत्र्यलढ्यांतील अमोघ शस्त्रें जेव्हां हातांत घेऊन नेहरूंच्या जुलमी निर्णयाचा प्रतिकार करावयास मुंबई शहरांतील मराठी जनता उभी राहिली, तेव्हां मोरारजीच्या सर्वांगाचा साहजिकच भडका उडाला. निर्वाणीची वेळ आली म्हणजे कोणत्या उपायांचा अवलंब करावयाचा हें नेहरूंनीं आणि त्यांनीं पूर्वीं ठरवून ठेवलेंच होतें. त्याप्रमाणें २१ नोव्हेंबर १९५५ रोजीं मुंबई शहरांत गोळीबार करून मोरारजींनीं पंधरा माणसें ठार मारलीं आणि संयुक्त महाराष्ट्रवाद्यांवर सूड उगवण्याच्या आपल्या राक्षसी मोहिमेला प्रारंभ केला.

मोरारजींच्या ह्या हिंस्र दडपशाहीचा मुंबईच्या जनतेवर कांहींहि परिणाम झाला नाहीं. उलट, मुंबई शहराचा समावेश महाराष्ट्रांत केला पाहिजे असा प्रचंड बहुमतानें ठराव मान्य करून मुंबई कॉर्पोरेशननें नेहरूंवर उलट बॉंबगोळाच फेकला. त्रिराज्ययोजना मुंबई विधानसभेमध्यें घाईघाईनें मंजूर करून टाकण्याचा मोरारजींनीं डाव रचला होता. तो देखील फसला. मुंबई शहरांत मराठी जनता अल्पसंख्य आहे अशा तऱ्हेचा प्रचार राज्यपुनर्रचना कमिशननें आपल्या अहवालांत केला होता. पण मुंबई शहरांत संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला जें भव्य नि उग्र स्वरूप प्राप्त झालें, तें पाहिल्यानंतर मुंबईच्या सार्वजनिक जीवनांत मराठी जनतेचें फार मोठें वर्चस्व आहे ही गोष्ट आपोआपच सिद्ध झाली. म्हणून मुंबईचें स्वतंत्र राज्य जर उद्यां अस्तित्वांत आलें तर त्याचीं सत्तासूत्रें संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्याच हातीं जातील ही गोष्ट नेहरूंच्या ताबडतोब ध्यानांत आली. तसें जर झालें तर मुंबईचें राज्य आणि महाराष्ट्राचें राज्य आपल्या

एकीकरणाचा ठराव चुटकीसरसा मंजूर करतील आणि जें 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र' निर्माण होऊं नये म्हणून इतकीं वर्षे आपण एवढा खटाटोप केला त्यावर सपशेल पाणी पडेल. म्हणजे जें आपल्याला नको आहे, तेंच नेमकें आपल्या बोकांडीं येऊन बसावयाचें, हें पुढें घडणाऱ्या गोष्टींचें सर्व चित्र नेहरूंच्या डोळ्या-पुढें दत्त म्हणून राहिलें. त्याबरोबर त्यांनीं आपला पवित्रा झटक्यासरशीं बदलला आणि १६ जानेवारी १९५६ रोजीं पहांटे मुंबई शहरामधील संयुक्त महाराष्ट्राच्या प्रमुख पुढाऱ्यांची नि शेकडों कार्यकर्त्यांची धरपकड करून त्याच सायंकाळीं मुंबई केंद्रशासित केल्याची नभोवाणीवरून घोषणा केली. केवळ 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र' द्यावयाचा नाहीं ह्या आकसामुळें मुंबईसंबंधीं तीन महिन्यांत तीन निरनिराळे निर्णय देऊन नेहरूंनीं आपल्या राजकीय दिवाळखोरीचें आणि खुनशी स्वभावाचें अत्यंत हिडिस प्रदर्शन केलें.

त्यानंतरच्या सात दिवसांत मोरारजींनीं माणुसकीला काळिमा फासणारे जे भयंकर राक्षसी अत्याचार मुंबई शहरांत केले ते पाहून तैमूरलंगानें आणि चंगीझखानानें सुद्धां लाजेनें खालीं माना घातल्या असत्या. 'जालियनवाला बाग'ची पुनरावृत्ति करून जनरल डायरवर मात करण्याचाच जणुं कांहीं मोरारजींनीं विडा उचलला होता. तीनशेंतीन छापाच्या घातकी बंदुकांनीं 'दिसेल त्याला गोळी घाला नि ठार करा' असा मोरारजींनीं आपल्या पोलीस अधिकाऱ्यांना सर्रास परवाना देऊन टाकला. सात दिवसांत मुंबई शहरामधलीं शहात्तर माणसें ठार झालीं आणि दोनशें शहात्तर माणसें जखमी झालीं. अर्थात् हे मुंबई सरकारनें दिलेले आंकडे आहेत. त्यापेक्षां मेलेल्यांची नि जखमी झाल्यांची संख्या अधिक असावी असा पुष्कळांचा अंदाज आहे. मेलेल्या माणसांपैकीं पुष्कळसे लोक आपापल्या घरांत, चाळींत किंवा दुकानांत बसलेले होते. सुभाष बोरकर, महंमद अल्ली इब्ने अल्ली आणि विजयकुमार बेडेकर हीं तीन मुलें तर नऊ नऊ वर्षांचीं होतीं. बाहेरून आलेल्या गोळ्या लागून आपा-पल्या घरांत तीं मेलीं. जखमी झालेल्यांच्या संख्येंत आनंदा भाऊ, मंदा हणमंत आणि नलिनी शिवाजी हीं तीन तीन महिन्यांचीं मुलें होतीं. रस्त्यावर शांतपणें उभ्या राहिलेल्या जनसमुदायावर जसा बेदरकारपणें गोळीबार करण्यांत आला, त्याप्रमाणें अश्रुधुराचा मारा चाळीवर करून आंतील रहिवाशांना बाहेर काढण्यांत आलें आणि मग त्यांना गोळ्या घालण्यांत आल्या. रस्त्यावर मरून किंवा जखमी

होऊन पडलेल्यांच्या मदतीला जे गेले त्यांना देखील गोळ्या घालून ठार करण्यांत आलें. ह्या काळांत पोलीस अधिकाऱ्यांनीं कितीहि अत्याचार केले तरी त्याची मागून चौकशी होणार नाहीं असें मोरारजींनीं त्यांना आधींच आश्वासन देऊन ठेवलें होतें. त्यामुळें त्यांच्या अंगांत साक्षात् सैतानच संचारला होता म्हणातात.

अन्यभाषिकांच्या जीविताला आणि मालमत्तेला धोका उत्पन्न झाला होता म्हणून किंवा पोलिसांना आत्मसंरक्षणासाठीं गोळीबार करण्यांत आला असें त्याचें सरकार-कडून पुढें समर्थन करण्यांत आलें. पण ही गोष्ट सर्वस्वीं खोटी होती. पोलिसांच्या गोळीबारामध्यें इतकीं माणसें मेलीं किंवा जखमी झालीं, पण एकहि पोलीस किंवा अन्यभाषिक माणूस मराठी भाषावाद्यांनीं अत्याचार केले म्हणून बळी पडला किंवा गंभीर तऱ्हेनें जखमी झाला असें सरकारला सिद्ध करतां आलें नाहीं. कायदा आणि सुव्यवस्था प्रस्थापित करण्यासाठीं नव्हे, तर संयुक्तमहाराष्ट्र-वाद्यांवर सूड उगविण्यासाठीं आणि त्यांना कायमची दहशत बसावी हा गोळी-बाराचा एकमेव उद्देश होता. मराठी भाषिकांवर केवळ गोळीबार करूनच मुंबई सरकारचें समाधान झालें नाहीं तर त्यांची साऱ्या भारतांत—नव्हे, साऱ्या जगांत—जास्तींत जास्त बदनामी कशी करतां येईल ह्याचीहि पर्वणी सरकारनें यावेळीं साधून घेतली. गुजराती नागरिकांवर आणि विशेषतः स्त्रियांवर मराठी माणसांनीं अनन्वित अत्याचार केले असा धादांत खोटा प्रचार बहुतेक सर्व इंग्रजी व अन्य भाषिक वृत्तपत्रांनीं करून महाराष्ट्राच्या अब्रूला डांबर फासण्याचा प्रयत्न केला. स्वतः मोरारजी देसाई ह्यांनींहि ह्या प्रचाराला प्रत्यक्ष हातभार लावला. ह्या आरोपामधला एकहि आरोप कोणाला कधीं सिद्ध करून दाखवतां आलेला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मुंबईमधल्या गोळी-बाराची आणि अत्याचारांची न्यायालयीन चौकशी झाली असती तर काँग्रेस सरकारच्या राक्षसी दुष्कृत्यांचा भयानक इतिहास जगापुढें नागव्या-उघड्या स्वरूपांत मांडण्याची आणि आपलें निरपराधित्व सिद्ध करण्याची मुंबईमधल्या मराठी भाषिकांना संधि मिळाली असती. पण ती देखील त्यांना मिळूं नये म्हणून न्यायालयीन चौकशीची मागणी मोरारजींनीं आणि पंडित नेहरूंनीं कटाक्षानें फेटाळून लावली.

एवढेंच नव्हे तर 'मुंबईच्या दंग्यांत ज्यांनीं अनिष्ट आणि बेजबाबदार कृत्यें केलीं त्यांचा उद्देश मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत व्हावा हा नसून भारताचें ऐक्य

आणि सामर्थ्य खर्ची करावें असा होता!' असा आरोप करण्यापर्यंत पंडित नेहरूंची मजल गेली. ते म्हणाले, "विध्वंसक शक्तीपुढें काँग्रेस व सरकार नमतें घेणार नाहीं. आम्हीं गुंडांना देशांत राज्य करूं देणार नाहीं. सामान्य नागरिकांच्या प्राणांशीं समाजशत्रू खेळूं लागले तर भ्याडपणानें आणि दुबळेपणानें वागून भागणार नाहीं. 'भ्याडपणापेक्षां हिंसा बरी!' असें गांधीजी म्हणत. आम्ही प्रांतवाद मुळांतूनच खुडून काढूं." यावरून मोरारजी सरकारनें मुंबईत जो राक्षसी गोळीबार केला त्याला नेहरूंचा पूर्ण पाठिंबा होता, एवढेंच नव्हे तर 'भ्याड-पणापेक्षां हिंसा बरी' ह्या गांधीजींच्या तत्त्वानुसार तो करण्यांत आला असें नेहरूंनीं त्याचें उलट समर्थन केलें. पुढें लोकसभेंत भाषण करतांना तर नेहरू ह्याच्याहि पुढें आणखी गेले. ते म्हणाले, "मुंबईत किती गोळीबार झाला तें मीं कांहीं पाहिलें नाहीं. पण दुसऱ्या कोणत्याहि देशांत असे प्रकार घडले असते तर रस्त्यामध्यें लष्कर आणि रणगाडे बोलावले गेले असते. मुंबईमध्यें फक्त पोलिसांचाच उपयोग करण्यांत आला."

ह्या काळामध्यें नेहरूंच्या संतापाचा पारा इतका वर गेला होता कीं 'बुद्धजयंती' सारख्या पवित्र प्रसंगीं बुद्धचरित्रावर भाषण करण्याऐवजीं त्यांनीं नांव न घेतां संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांवरच यथेच्छ तोंडसुख घेतलें. ते म्हणाले, "एखादा निर्णय मीं चुकीनें सुद्धां घेतला असेल. पण त्या निर्णयासाठीं मी लढल्याखेरीज राहणार नाहीं. काँग्रेस जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत काँग्रेसचा आणि हें सरकार जिवंत आहे तोंपर्यंत ह्या सरकारचा कोणताहि निर्णय हिंसेनें बदलूं शकणार नाहीं, मग ती हिंसा ह्या देशांत घडलेली असो वा परदेशांत घडलेली असो. प्रत्येक गोष्टीचा निर्णय लोकशाहीच्याच मार्गानें लागेल— रस्त्यामध्यें नव्हे. रस्त्यामध्यें निर्णय लावावयाच्या गोष्टी जे बोलतात, त्यांचा रस्त्यामध्येंच 'निर्णय' लावावयाला हवा!" मुंबईची लढाई मुंबईच्या रस्त्यांतच लढली जाईल असें मागें काका गाडगीळ जें लोकसभेंत बोलले होते त्याला नेहरूंनीं हें असें उत्तर दिलें. मुंबईच्या बाबत माझा निर्णय चुकीचा असला तरी त्यासाठीं मी शेवटपर्यंत लढेन, याद राखा, असें नेहरूंनीं ह्या भाषणांत मराठी भाषिकांना अगदीं सरळच आव्हान देऊन टाकलें.

स्वतः नेहरू जिथें असें बोलत, तेथें मोरारजींची मजल कोठपर्यंत गेली असेल तें काय सांगावयाला पाहिजे? मोरारजी म्हणाले, "मुंबईची दंगल ज्यांनीं केली

त्यांना सरकार उखडून टाकावयाचें होतें आणि मुंबई शहर जबरदस्तीनें हस्तगत करावयाचें होतें. एवढेंच नव्हे तर मुंबई ही महाराष्ट्राला मिळावी ह्या गोष्टीला मुंबईमधल्या महाराष्ट्रीयेतर जनतेची जबरदस्तीनें मान्यता मिळवावयाची होती. महाराष्ट्रीयांनीं केलेल्या दंगलीच्या मानानें एकंदरींत गोळीबार फारच कमी झाला. गोळीबारांत एकंदर शहात्तर माणसें मेलीं. पण त्यावरून पोलिसांनीं बेफाम गोळीबार केला असा अर्थ होत नाहीं. त्या वेळीं लष्करी फौज बोलवावी अशी देखील कित्येकांनीं मागणी केलेली होती. ती जर बोलावली असती तर मृत्यूचा आंकडा ह्याहिपेक्षां अधिक वाढला असता. पोलिसांनीं जें केलें तें पराकाष्ठेची सावधगिरी बाळगून केलें. म्हणून मी त्यांचे आभार मानतों. पोलिसांनीं ह्याहिपेक्षां जास्त कडक वागावयाला हवें होतें अशीहि टीका कित्येकांनीं माझ्यावर केलेली माझ्या ऐकिवांत आहे. पण जास्तींत जास्त बळाचा वापर करण्यावर सरकारचा विश्वास नाहीं!'' शेक्सपियरच्या नाटकांतला एकादा भयंकर खलपुरुष बोलतो आहे असा मोरारजींचें हें आत्मसमर्थनात्मक भाषण वाचतांना भास होतो. 'दंगेखोर संयुक्तमहाराष्ट्रवाद्यां'चा हेतु भारताचें ऐक्य खची करावें असा होता असें नेहरूंचें म्हणणें, तर मुंबई सरकार उखडून मुंबई आपल्या ताब्यांत घ्यावी असा त्यांचा उद्देश होता असें मोरारजींचें सांगणें. मराठी भाषिकांवर एवढे भयंकर आरोप करून त्याबाबत एकादा दुसरा पुरावा देखील ह्या दोघांनीं दिलेला नाहीं हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

न्यायालयीन चौकशीची मागणी मुंबई कायदेमंडळांत ज्यांनीं केली त्यांच्यावरच उलट भडकून मोरारजी म्हणाले, "ज्यांना मुंबईमध्यें आणखी जास्त दंगल व्हावयाला हवी आहे, तेच दंगलीच्या चौकशीची मागणी करीत आहेत. अशी चौकशी सुरू केली तर तिच्यामधून आणखी अनिष्ट प्रकार उद्भवतील आणि अशी कठिण परिस्थिति होईल कीं तिला सरकारला तोंड देतां येणार नाहीं. ही मागणी शहाणपणाची नाहीं. चौकशी म्हटली की शेकडोंशें साक्षी आणि जबाब घ्यावे लागतील. आणि त्यामुळें जनतेच्या भावना पुन्हा एकदां प्रक्षुब्ध होतील. तसें होतां कामा नये." मुंबईमधल्या दंगलीची जाहीर चौकशी करण्याची मागणी काका गाडगीळांनीं लोकसभेंत केली. ती पंडित नेहरूंनीं मोरारजींप्रमाणेंच फेटाळून लावली. ते म्हणाले, "जेथें दंगल घडली असेल तेथें चौकशी व्हावी असें सामान्यपणें माझें मत आहे. पण मुंबईच्या घटनेबाबत चौकशीचा विचार करतांना माझें

मन जरा गोंधळलें आहे हें मला कबूल करावयाला हवें. कारण ह्या चौकशीला प्रचंड स्वरूप येईल. ती पुरी व्हावयाला वर्षानुवर्षें लागतील. पण त्याशिवाय अशा चौकशीमुळें लोकांच्या भावना प्रक्षुब्ध होतील असें नव्हे का? प्रत्येक पक्ष दुसऱ्याच्या डोक्यावर खापर फोडण्याचा प्रयत्न करील आणि त्याचा परिणाम असा होईल कीं जखमा बऱ्या आणि दुरुस्त होण्याऐवजीं आरोपांचा आणि प्रत्यारोपांचा धुमाकूळ माजेल. त्यापासून चांगलें कांहीं निष्पन्न होणार नाहीं. म्हणून लोकांच्या प्रक्षुब्ध भावना थंड झाल्यानंतर आणि शांतता प्रस्थापित झाल्यानंतर मुंबईचा प्रश्नाचा पुन्हा विचार करतां येईल." चौकशी न करण्याचीं पंडित नेहरूंनीं दिलेलीं हीं सर्व कारणें खोटीं आणि लबाडीचीं आहेत. लोकांवर बेफाम गोळीबार आणि वाटेल ते आरोप करावयाचे आणि त्यांच्या न्यायालयीन चौकशीला साफ नकार द्यावयाचा हें नेहरूंचें वर्तन पाहिल्यानंतर ह्या माणसाला लोकशाहीचा 'ओनामा' तरी कळला आहे कीं काय ह्याची शंका येते.

अमृतसरच्या कॉंग्रेसमध्यें राज्यपुनर्रचनेच्या प्रश्नावर बोलतांना मात्र नेहरूंनीं निराळाच सूर लावला. ते म्हणाले, "मुंबईचा समावेश कुठेंहि झाला तरी मला त्याची परवा नाहीं. कारण राज्यांच्या सीमाभागाचें मला विशेष महत्त्व वाटत नाहीं. प्रत्येक राज्य मला सारखेंच आहे. मुंबईच्या दंग्याबद्दल मी कुठल्याहि जमातीला दोष देत नाहीं. हा निःसंशय गुंडांचा उद्योग आहे. बहुतेक सर्व दंगल गुंडांनीं आणि बदमाषांनीं घडवून आणली. त्याबद्दल कोणत्याहि एका जमातीवर आरोप करणें हें चूक आहे." नेहरूंची ही सर्व भाषा ढोंगीपणाची आहे. मुंबईचा दंगा 'भारताचें ऐक्य आणि सामर्थ्य खची करण्यासाठीं करण्यांत आला होता' असा पूर्वीं त्यांनीं स्पष्ट आरोप केला होता. त्यावेळीं त्यांच्या डोळ्यासमोर कांहीं मुंबईमधले गुंड आणि बदमाष नव्हते. त्या बिचाऱ्यांना 'भारत' म्हणजे काय हें तरी माहीत असेल काय? संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना उद्देशूनच नेहरूंनीं तो प्रहार केला होता. तेव्हां मागाहून 'मुंबईच्या दंगलीबद्दल मी कोठल्याहि जमातीला दोष देत नाहीं' असें म्हणण्यांत काय अर्थ होता? 'मुंबईचा समावेश कुठेंहि झाला तरी मला त्याची परवा नाहीं. सीमाभागाचें मला विशेष महत्त्व वाटत नाहीं. प्रत्येक राज्य मला सारखेंच आहे' असें निष्काळजीपणाच्या आणि निःस्वार्थीपणाच्या स्वरांत जें नेहरू बोलले तें सुद्धां त्यांचें नाटकच होतें. काय वाटेल तें झालें तरी मुंबईचा समावेश भाषिक राज्यांत होणार नाहीं असें ह्यापूर्वीं

छपन्न वेळां नेहरू आपल्या जाहीर भाषणांत आवेशानें म्हणाले होते. म्हणून मुंबईचा समावेश कुठेंहि झाला तरी मला त्याची परवा नाहीं हें त्यांचें म्हणणें मनापासूनचें आहे असें कोणता माणूस म्हणूं शकेल? ‘मृच्छकटिक’ नाटकांत वसंतसेनेचा घात करणारा शकार ज्याप्रमाणें ‘मी वसंतसेनेला मारली नाहीं हो’ असें म्हणतो, तशाचपैकीं नेहरूंचे हे उद्गार आहेत कीं ‘मुंबईचा समावेश कुठेंहि झाला तरी मला त्याची परवा नाहीं!’ मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत होऊं नये असा या भारतांत जर कोणा एका माणसाचा जास्तींत जास्त हट्ट असेल तर तो नेहरूंचा हें न जाणण्याइतके का मराठी लोक मूर्ख आहेत? नेहरू म्हणतात कीं सीमाभागाचें महत्त्व मला वाटत नाहीं. मग बेळगांव-कारवार हे महाराष्ट्राचे सीमा-भाग महाराष्ट्रामधून काढून कर्नाटकांत कोंबण्याबद्दल ते कां एवढा अट्टाहास धरतात? म्हणे ‘प्रत्येक राज्य मला सारखेंच वाटतें.’ साफ खोटी गोष्ट आहे ही! तसें असतें तर भारतामधील तेरा राज्यें भाषावर तत्त्वावर करून एकट्या महाराष्ट्राच्या बाबतींत असा राक्षसी अन्याय आणि पक्षपात त्यांनीं कधींहि केलाच नसता.

लोकांच्या प्रक्षुब्ध भावना थंड झाल्यानंतर आणि शांतता प्रस्थापित झाल्यानंतर मुंबईच्या प्रश्नाचा फेरविचार करूं असें लोकसभेंत पंडित नेहरूंनीं मोठ्या संभावितपणें आश्वासन दिलें होतें. तें आश्वासन पुढें चार महिन्यांनंतर म्हणजे ३ जून १९५६ रोजीं ‘पांच वर्षें मुंबई केंद्रशासित करण्याचा’ भयंकर निर्णय तीन कोटी मराठी जनतेच्या मस्तकावर मारून त्यांनीं फार उत्तम तऱ्हेनें पाळलें. वस्तुतः ‘सिलेक्ट कमिटी’चा निर्णय लागण्यापूर्वी आणि राज्यपुनर्रचना विधेयक लोकसभेंत रीतसर मंजूर होण्याआधीं मुंबई शहर पांच वर्षें केंद्रशासित करण्याची ही दवंडी चौपाटीच्या वाळवंटावर पिटण्याचा नेहरूंना मुळींच अधिकार नव्हता. पण मुंबईमधल्या बहुसंख्य मराठी जनतेनें नेहरूंच्या ह्या सभेवर बहिष्कार टाकला असल्यानें पंचवीस हजार पोलिसांच्या गराड्यांत पंधरा हजार गुजरात्यांच्या नि अन्य भाषिकांच्या बुद्रुक सभेसमोर आपल्याला भाषण करावें लागत आहे, ही मानहानि नेहरू ह्यांच्या जिव्हारीं एवढी झोंबली आणि त्यांच्या सर्वांगाचा एवढा भडका उडाला कीं लोकशाहीचीं सारीं तत्त्वें त्यांनीं गुंडाळून ठेवून संयुक्त-महाराष्ट्रवाद्यांवर शिव्यांची अक्षरशः लाखोली वाहिली. ‘बेमान’, ‘कमीने’, ‘बत्तमीज’ असल्या शिवराळ शिव्या नेहरूंसारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या मुत्सद्द्यांच्या तोंडून बाहेर पडतांना पाहून त्यांच्या श्रोत्यांनीं देखील लाजेनें खालीं

माना घातल्या असतील. नेहरू म्हणाले, "असल्या गुंडगिरीला मी नमणार नाहीं. आपण कोण माणसें आहोंत का जनावरें? निवडणुकीची मला परवा नाहीं. खड्डयांत गेल्या निवडणुका. माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत—अन् मी कांहीं दुबळा नाहीं—मी ह्या अपमानाला शरण जाणार नाहीं. आम्ही ब्रिटिशांच्या लाठ्यांना आणि गोळ्यांना तोंड दिलें आहे. आम्ही दगडांना भितों होय? कॉंग्रेस मेली तरी हरकत नाहीं. पंजाब मेला तरी हरकत नाहीं. सबंध भारतवर्ष नष्ट झाला तरी हरकत नाहीं. पण मी अत्याचार सहन करणार नाहीं. देशांत सत्याग्रहाचा हा काय तमाशा चालला आहे? कुणींहि उठावें, दगड फेकावा, दोन चार दहा दिवस तुरुंगांत जावें आणि 'वीर' बनावें. हा ह्यांचा सत्याग्रह! पंचवीसशें वर्षांनीं आम्हीं बुद्धजयंती साजरी केली आहे. बुद्ध म्हणाला, 'जे हिंसेनें जगतात, ते हिंसेनेंच नष्ट पावतात. जे हिंसेचें विष पसरवितात, ते त्याच विषानें मरतात.' निवडणुकांत आमचा पराभव झाला तर ठीकच होईल. कॉंग्रेस-वाल्यांचा आळस झडेल. आठ वर्षें काम करून मीहि थकलों आहें. आम्हांला विश्रांति मिळेल आणि दुसऱ्या क्षेत्रांत जाऊन कामें करतां येतील. मुंबईचा प्रश्न हा भूगोलानें आणि गणितानें सुटणार नाहीं. मुंबईनें आपलें भवितव्य ठरविण्याचा हक्क गमावला आहे. मुंबईची मनःस्थिति सध्यां ठीक नाहीं. पांच वर्षेंपर्यंत मुंबईवर दिल्लीचीच हुकमत राहील!" कॉंग्रेस मेली तरी हरकत नाहीं किंवा भारत-वर्ष नष्ट झाला तरी परवा नाहीं, पण मुंबई आपण महाराष्ट्राला देणार नाहीं, ह्या-पेक्षां महाराष्ट्रद्वेषाचें अधिक भयानक प्रदर्शन कोणीहि करूं शकेल असें आम्हांस वाटत नाहीं. तरीहि शंकरराव देव मराठी जनतेला कळवळून सांगतच होते कीं 'नेहरूंच्या न्यायबुद्धीवर विश्वास ठेवा' नि काका गाडगीळ दांत विचकून म्हणत होते कीं, 'पंडित नेहरूंना न्यायाची चाड आहे हाच त्यांतल्या त्यांत आशेचा एक किरण आहे!'

नेहरूंच्या ह्या सभेनंतर परत जातांना मुंबई प्रदेश कॉंग्रेस कमिटीचे उपाध्यक्ष के. के. शहा ह्यांच्या BMU ९६८४ नंबरच्या निळ्या गाडीमध्यें बसलेल्या वाडीलाल पांचाळ नांवाच्या एका 'शांतिसेने'च्या कार्यकर्त्यानें कांहीं कारण नसतांना आपला भरलेला पिस्तूल रस्त्यावर झाडला आणि सीताराम घाडीगांवकर ह्या अठरा वर्षांच्या मराठी तरुणाला ठार केलें. लोकांचा जमाव आपल्याला मारावयाला धावला म्हणून आत्मसंरक्षणासाठीं आपण पिस्तूल झाडला आणि त्यांत घाडीगांवकर मेला

असें वाडीलाल पांचाळानें पोलिसांना सांगितलें. त्यावर विश्वास ठेवून पोलिसांनीं त्याला सोडून दिलें. वाडीलालची ही कथा धादांत खोटी होती, कारण ह्या कोऱ्या करकरीत मोटारीवर नखाचा एक ओरखडा देखील उठला नव्हता. आणि वाडीलालला न्यायासनासमोर उभें न करतां परस्पर सोडून देण्याचा पोलिसांना सुतराम् अधिकार नव्हता. सगळ्यांत आश्चर्याची गोष्ट ही कीं पंडित नेहरूंनीं देखील वाडीलालच्या ह्या खुनी कृत्याचें समर्थन केलें. मुंबईचे एक तरुण ॲडव्होकेट दामोदर वगळ ह्यांनीं नेहरूंना ह्या बाबतींत खाजगी पत्र लिहिलें. त्याला आपल्या नं. ३४२–पी. एम्. ओ. । ५६, दि. ९ जून १९५६ च्या पत्रांत उत्तर देतांना नेहरू म्हणाले, "मला माहिती मिळाली ती अशी कीं एक मोठ्या जमावानें मोटरीवर हल्ला केला आणि आंतील माणसांना बाहेर ओढलें. त्यांना 'ठार करा' असें लोक ओरडत होते. तेव्हां त्यांतील एका माणसानें आपला परवान्याचा पिस्तूल झाडला नि दुर्दैवानें एक तरुण मुलगा मेला. ही गोष्ट कितीहि खेदाची असली तरी त्याची जबाबदारी गाडीवर हल्ला करणाऱ्या जमावावर आहे." वस्तुतः, कारोनरच्या कोर्टानें रीतसर निर्णय द्यायच्या आधीं खाजगी रीतीनें मिळालेल्या आणि त्याहि धादांत खोट्या माहितीच्या आधारावर नेहरूंनीं ह्या प्रकरणीं स्वतःचें मत देणें मुळींच सयुक्तिक नव्हते. तथापि, ह्या काळांत नेहरूंच्या मनाची ठेवण कशी पक्षपाती झाली होती एवढ्यासाठींच ही गोष्ट इतक्या तपशिलानें येथें सांगितली.

संयुक्त महाराष्ट्राबाबत आणि मुंबईसंबंधींहि नेहरूंनीं ह्या पत्रांत जे विचार व्यक्त केले तेहि येथें देण्यासारखे आहेत. ते म्हणतात, "I am convinced that the kind of violent forces that have been let loose will do more injury to Maharashtrians and to the Maharashtra State than any thing else.——So far as Bombay is concerned obviously the best course is for the people of Bombay to decide. They cannot do so in the present state of affairs because of the passion and violence...We have therefore said that after five years or so let there be a full opportunity to decide this question by the people." (ज्या तऱ्हेची हिंसात्मक शक्ति आज धुडगूस घालते आहे तिनें महाराष्ट्रीयांचें नि महाराष्ट्र राज्याचें नुकसानच होईल अशी माझी खात्री आहे...मुंबईचें भवितव्य मुंबईच्या लोकांनीं ठरवावें हा सर्वोत्तम मार्ग आहे. पण सध्यांच्या हिंसेच्या नि भावनेच्या वातावरणांत

त्यांना त्याबाबत निर्णय घेतां येणार नाहीं. पांच वर्षांच्या काळांनंतर लोकांना ह्या प्रश्नाचा निर्णय घेण्याची पूर्ण संधि मिळूं द्या हें आमचें म्हणणें.) मुंबईचा दंगा कोणत्याहि जमातीनें केलेला नसून तो गुंडांचा नि बदमाषांचा उद्योग आहे अशी पूर्वी ज्या नेहरूंनीं जाहीर कबुली दिली होती, त्यांनींच संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनांत हिंसात्मक शक्ति धुडगूस घालत आहेत असा ह्या ठिकाणीं स्पष्ट आरोप केलेला आहे हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. तसेंच, 'मुंबईचें भवितव्य मुंबईच्याच लोकांनीं ठरवावें' हा ह्या पत्रांत उद्घोषित केलेला सिद्धांत स्वतः नेहरूंनींच पुढें कसा आणि किती पाळला हेंहि पण बघण्यासारखें आहे.

त्यानंतर थोड्याच दिवसांनीं नेहरू विलायतेला गेले. जाण्यापूर्वी एका जाहीर सभेंत भाषण करतांना ते म्हणाले, "पांच वर्षें मुंबई केंद्रशासित करण्याच्या निर्णयाचा महाराष्ट्रीय जनतेनें स्वीकार करावा. माझा निर्णय अनेक महाराष्ट्रीयांना आवडला नाहीं. संकल्पित महाराष्ट्र राज्यांत मुंबईचा समावेश करण्याबद्दलचा दावा चांगलाच आहे यांत शंका नाहीं. पण दुसऱ्याहि कांहीं गोष्टी विचारांत घेणें जरूर आहे. देशाच्या हितासाठीं त्यांनीं मुंबईसंबंधींचा निर्णय मान्य करावा. पुढचें ध्येय साध्य करण्यासाठीं त्यांनीं मुंबई शहरांतल्या दुसऱ्या जमातींच्या मनांतल्या शंका नि भय नाहींसें करावें. मुंबई शहर कोणत्याहि प्रदेशांत गेलें तरी मला त्याची परवा नाहीं. कांहीं झालें तरी भारत एकच आहे. आणि कोणता जिल्हा कुठूनहि सुरू झाला म्हणून काय बिघडावयाचें आहे? आपल्यावर अन्याय झाला असें महाराष्ट्रीयांना वाटत असेल, तर त्यांनीं ह्या सर्व प्रश्नाचा विचार करावा आणि सध्यांचा झगडा थांबवावा. स्वतःच्या देशाला त्यांनीं अन्याय करूं नये." मुंबई कुठेंहि गेली तरी आपल्याला त्याची परवा नाहीं, संकल्पित महाराष्ट्र राज्यांत मुंबईचा समावेश करण्याबद्दलचा मराठी लोकांचा दावा चांगला आहे आणि मुंबई शहराच्या बाबतींत आपल्यावर अन्याय झाला असें महाराष्ट्रीयांना वाटत असेल तर त्यांनीं त्याबाबत झगडा करून साऱ्या देशावर अन्याय करूं नये हीं नेहरूंचीं तीन विधानें एकामागून एक वाचलीं म्हणजे जगांत तर्कशास्त्र नांवाची एक चीज आहे ह्याची नेहरूंना गंधवार्ताहि नसावी ह्याबद्दल अगदीं खात्री होते. मुंबईबद्दलचा मराठी जनतेचा दावा चांगला आहे अन् मुंबई कुठेंहि गेली तर त्याची आपल्याला परवा नाहीं अशी जर नेहरूंची ह्याबाबत भूमिका आहे, तर मुंबई महाराष्ट्राला देऊन हें विकोपाला जाणारें भांडण ते

एकदम मिटवून कां टाकत नाहींत असेंच कोणीहि त्यांना विचारील. महाराष्ट्रापासून मुंबई हिरावून घेऊन मराठी जनतेवर जाणून बुजून अन्याय करावयाचा आणि त्या अन्यायाचा महाराष्ट्रानें प्रतिकार केला तर त्यामुळें बाकीच्या देशाला अन्याय होतो असा शंख करीत सुटावयाचें हा कुठल्या मुलखाचा न्याय ?

पांच वर्षेपर्यंत मुंबईवर दिल्लीचें राज्य चालेल असा संतापाच्या भरांत नेहरूंनीं निर्णय देऊन टाकला खरा, पण मुंबईतील मराठी जनतेचें रौद्रस्वरूप डोळ्यांनीं पाहिल्यानंतर नेहरूंची मनोमन खात्री झाली कीं, मुंबईवर दिल्लीचा अंमल आणल्यानें मुंबई शहरामधील मराठी जनता वठणीवर यावयाच्या ऐवजीं भलतीच भडकेल आणि कह्याबाहेर जाईल. अन् त्याचा पुढें परिणाम असा होईल कीं पांच वर्षांनंतर किंवा त्याच्या अगोदर नाक मुठींत धरून मुंबई शहर संयुक्त महाराष्ट्राच्या पायावर अर्पण करणें आपल्याला भाग पडेल. त्यापेक्षां मुंबई शहर महाराष्ट्राला कधींहि न मिळेल अशी एक कोलदंड्याची पक्की योजना तयार करून मुंबईचा नि संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न कायमचाच निकालांत काढून टाकलेला बरा असा नेहरूंनीं विचार केला आणि त्या दृष्टीनें ते फिरून महाद्विभाषिक राज्याच्या योजनेची तपासणी करूं लागले. शंकरराव देवांनीं सुचविलेला महाद्विभाषिक राज्याचा पर्याय पूर्वी त्यांनीं आणि मोरारजींनीं झिडकारला होता. ह्याचें कारण 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र' मिळण्यापूर्वीची एक तात्पुरती तडजोड अशा भूमिकेनें देवांनीं तो पर्याय मांडला होता. पण समजा हा पर्याय कायमच्याच स्वरूपांत जर अंमलांत आणला तर त्याला काय हरकत आहे या दृष्टीनें जेव्हां नेहरू विचार करूं लागले, तेव्हां महाराष्ट्राची खोड मोडण्याचा तोच एक रामबाण उपाय आहे अशी त्यांची खात्री पटली.

त्या योगानें एका धोंड्यानें दोन पक्षी मारतां येतात. मुंबई मिळवून दिल्याचें गुजराती लोकांनाहि समाधान देतां येतें. आणि मुंबई महाराष्ट्राला न देण्याचा आपलाहि निर्धार तडीस जातो. खेरीज, ह्या द्विभाषिक राज्याला 'मुंबई राज्य' असेंच संबोधावें लागणार असल्यानें भारताच्या नकाशांतून 'महाराष्ट्र' हें नांव आपोआपच पुसलें जातें तो फायदा आणखी निराळाच. दुसरें एक संकट असें होतें कीं, 'निवडणुकीचा निकाल कांहींहि लागला तरी आपल्याला त्याची परवा नाहीं' असें मुंबई पांच वर्षें केंद्रशासित राहील अशी चौपाटीच्या सभेंत घोषणा करतांना जरी नेहरू म्हणाले होते, तरी ती त्यांची बेपरवाई नाटकी होती. खंडित महाराष्ट्रांत

काँग्रेसचा निश्चित पराभव होईल आणि संयुक्त महाराष्ट्राचें सरकार अधिकारावर येईल हें त्यांना माहीत होतें. तें संकट टाळण्याचा महाद्विभाषिकावांचून दुसरा मार्गच नव्हता. अशा सर्व दृष्टींनीं विचार केल्यानंतर महाद्विभाषिक राज्य हाच एक अखेरचा नि बिनतोड तोडगा आहे असें नेहरूंना समजून चुकलें. आणि त्याप्रमाणें लोकसभेच्या सभासदांमध्यें महाद्विभाषिकाचा गुप्तपणें प्रचार करण्याचा आदेश अशोक मेहता आणि तुळशीदास कीलाचंद ह्या आपल्या हस्तकांना देऊन नेहरू निश्चिंत मनानें विलायतेला गेले.

नेहरू स्वदेशीं परत आले तेव्हां महाद्विभाषिकाचें हें कारस्थान शिजून तयार झालें होतें. त्याच्या आधीं एक आठवडा संयुक्त महाराष्ट्राच्या सत्याग्रही आंदोलनाचा प्रचंड लोंढा दिल्लीच्या लोकसभेच्या दारावर जाऊन आदळला होता. त्याच्या लाटा काँग्रेस श्रेष्ठींच्या नाकातोंडांत जाऊन त्यांचे डोळे पांढरे झाले होते. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचा हा उच्चांक म्हटला पाहिजे. त्या वेळीं लोकसभेमधील कांहीं काँग्रेसपक्षीय सभासदांशीं बोलतांना महाद्विभाषिकाच्या पर्यायानें पुन्हा उचल खाल्ली असल्याचें मला समजलें. पण त्याला मीं विशेष महत्त्व दिलें नाहीं. कारण, मुंबई पांच वर्षेपर्यंत केंद्रशासित झाली हा नेहरूंचा निर्णय अपरिवर्तनीय आहे अशीच त्या वेळी सर्वांची दृढ समजूत होती. चिंतामणराव देशमुखांशींहि महाद्विभाषिकाबद्दल मीं चर्चा केली. पण तो पर्याय सध्यांच्या परिस्थितींत व्यवहार्य नाहीं असेंच स्पष्ट शब्दांत त्यांनीं मला सांगितलें. संयुक्त महाराष्ट्र समितीचे चार पुढारी त्याच वेळीं नेहरूंना जाऊन भेटले. पण त्यांच्याशीं बोलतांना चुकून देखील महाद्विभाषिकाचा उल्लेख नेहरूंनीं केला नाहीं. तथापि, चिंतामणराव देशमुखांच्या अर्थमंत्रिपदाचा राजिनामा स्वीकारण्याची नेहरूंनीं जेव्हां घिसाडघाई केली, तेव्हां त्यांच्या डोक्यांत कांहींतरी निराळाच डाव रचला जात असावा असा एक संशय माझ्या मनाला चाटून गेल्यावांचून मात्र राहिला नाहीं.

मुंबई शहर केंद्रशासित करण्याची नेहरूंनीं जेव्हां घोषणा केली तेव्हां त्या निर्णयाचा निषेध करण्यासाठीं आपल्या मंत्रिपदाचे राजिनामे देण्याच्या वल्गना अनेक मराठी मंत्र्यांनीं केल्या. पण त्या प्रतिज्ञेची अंमलबजावणी करणारा 'मायेचा पूत' एका चिंतामणराव देशमुखाखेरीज दुसरा कोणीहि काँग्रेसमंत्री निघाला नाहीं. हा राजिनामा स्वीकारावा कीं नाहीं ह्याचा पुष्कळ दिवसपर्यंत नेहरूंना प्रश्न पडला होता. पण महाद्विभाषिकाचें कारस्थान पूर्णपणें शिजलें असें विलायतेहून परत

आल्यानंतर जेव्हां नेहरूंना समजलें, तेव्हां देशमुखांचा राजिनामा त्यांनीं ताडकन् स्वीकारला. आपल्या राजिनाम्याचीं कारणें लोकसभेला सांगतांना पंडित नेहरू किंवा कॉंग्रेस ह्यांच्या रागालोभाची परवा न करतांना चिंतामणरावांनीं जें अत्यंत तेजस्वी आणि बाणेदार भाषण केलें, तें ऐकतांना राघोबा पेशव्याला देहांत प्रायश्चित्ताची शिक्षा फर्मावणारा रामशास्त्री प्रभुणेच त्यांच्या मुखानें पुन्हा बोलतो आहे किंवा काय असा सर्वांना भास झाला. देशमुख म्हणाले, "महाराष्ट्रापासून मुंबई शहर अलग करण्याच्या जबाबदारींत सहभागी होण्याची इच्छा नसल्यानें मीं राजिनामा दिलेला आहे. मंत्रिमंडळानें न सोपविलेले अधिकार पंतप्रधानांनीं आणि कांहीं मंत्र्यांनीं दडपून आपल्याकडे घेतले. आणि मंत्रिमंडळातर्फे कित्येक निर्णय अनधिकृतपणें घेऊन अन् ते बेदरकारपणें जाहीर करून घटनाबाह्य वर्तन केलें असें माझें मत आहे. राज्यपुनर्रचना विधेयक लोकसभेसमोर असतांना आणि ते चिकित्सा समितीकडे सोपविलेले असतांना मुंबईसंबंधीं पंतप्रधानांनीं घोषणा कराव्यात हें अनुचित आहे. मुंबईच्या गोळीबाराची चौकशी केल्यानें भावना अधिक चिघळतील हा पंतप्रधानांचा मुद्दा टिकाऊ नाहीं. सत्य कदापि कटुता निर्माण करीत नाहीं. गोळीबाराची चौकशी करण्याची माझी विनंति धुडकावण्याचें पंतप्रधानांचें आणि गृहमंत्र्यांचें कृत्य अरेरावीचें आणि सौजन्यहीनतेचें आहे. मुंबईच्या गोळीबाराची चौकशी नाकारणाऱ्या सत्ताधारी पक्षाच्या मनांत महाराष्ट्राबद्दल वैरभाव आहे असें मला वाटतें." उभ्या हयातींत नेहरूंच्या तोंडावर शेकडों लोकांच्या समक्ष कोणी त्यांना असें सांगितलें नव्हतें कीं, "मंत्रिमंडळाची सत्ता बळकावणारे तुम्ही हुकूमशहा आहांत" म्हणून! आणि महाराष्ट्राबद्दल सत्ताधारी पक्षाच्या मनांत वैरभाव (animus) आहे असें सांगून तर संयुक्त महाराष्ट्राबाबत पहिल्यापासून नेहरूंनीं एकसारखी विरोधाची भूमिका कां घेतली ह्याचें सारें बिंगच देशमुखांनीं बाहेर फोडलें!

देशमुखांच्या आरोपाला उत्तर देतांना नेहरूंनीं जें मिनतवारीचें आणि सामोपचाराचें नाटक केलें तें मोठें नमुनेदार आहे. ते म्हणाले, "मुंबई जर महाराष्ट्रांत गेली तर मला निरतिशय सौख्य होईल असें माझ्यापुरतें तरी मी सांगतों. मुंबई महाराष्ट्रांत जावी ह्याविरुद्ध मला असण्याचें कांहींच कारण नाहीं. उलट मी असें म्हणतों कीं, मुंबई महाराष्ट्रांत जावी ह्या बाजूचा युक्तिवाद समर्पक आणि उत्तम आहे. विरुद्ध बाजूलाहि तशींच समर्पक कारणें आहेत. शांतता प्रस्थापित

एकती

झाली कीं महाराष्ट्राच्या वतीनें ह्याबाबत दुसऱ्यापाशीं वकिली करण्याला देखील मी सिद्ध आहें. महाराष्ट्राला मुंबई द्यावयाची तर ती योग्य तऱ्हेनें द्यावी. त्या योगानें महाराष्ट्राचें कल्याण होईल, मुंबईचें कल्याण होईल, देशाचें कल्याण होईल!" महाद्विभाषिक राज्य महाराष्ट्रावर लादण्याची आंतून संपूर्ण सिद्धता झाल्यानंतर नेहरूंच्या तोंडांतून ही भाषा निघते आहे हें पाहिलें म्हणजे नेहरूंचा स्वभाव किती 'गहन' आहे ह्याची कल्पना येते.

हें तर कांहींच नाहीं. पण १ ऑगस्ट १९५६ रोजीं लोकमान्य टिळकांचें स्मरण करण्यासाठीं म्हणून नेहरू पुण्याला आले. त्या प्रसंगींच्या आपल्या भाषणांत महाराष्ट्रीय जनतेला खूष करण्याचा पुन्हा त्यांनीं प्रयत्न केला. ते म्हणाले, "मुंबई शहर हें पांच वर्षें केंद्रशासित व्हावें अशी मीं जी घोषणा केली तिचा हेतु मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत होण्याच्या मार्गांत अडथळा उत्पन्न व्हावा हा नव्हता. पांच वर्षें म्हणजे अक्षरशः पांच वर्षें नव्हेत. पुढल्या पांच वर्षांत मुंबई शहर कांहीं कुठें पळून जाणार नाहीं. किंवा भारतहि कुठें पळून जाणार नाहीं. मराठी माणसें जर योग्य मार्गांनीं गेलीं तर त्यांचें उद्दिष्ट तीं साध्य करूं शकतील!" नेहरूंचें हें भाषण ऐकल्यावर मुंबईसह महाराष्ट्राचें आपलें स्वप्न आज ना उद्यां साकार झाल्यावांचून राहणार नाहीं अशी मराठी जनतेची खात्री होऊन चुकली. अशा रीतीनें मुंबई शहर महाराष्ट्राला मिळण्याच्या बाबतींत आपला मुळींच अडथळा नाहीं. उलट, योग्य वेळीं तें महाराष्ट्राला मिळून देण्याची आपण अवश्य खटपट करूं अशा तऱ्हेचें आमिष मराठी लोकांना दाखवून नेहरूंनीं त्यांना शेवटपर्यंत झुलवीत ठेविलें. पुढें कोणतें ताट समोर वाढून येतें आहे ह्याचा अखेरपर्यंत त्यांनीं महाराष्ट्राला सुगावा लागूं दिला नाहीं.

निरभ्र आभाळांत एकादें वादळ अकस्मात् उठावें आणि मेघांचा प्रचंड गडगडाट होऊन त्यांतून विजेचा पृथ्वीतलावर वर्षाव व्हावा, त्याप्रमाणें कोणाच्या ध्यानीं मनीं नसतां चार ऑगस्ट रोजीं महाद्विभाषिकाचा पर्याय एकाएकीं लोकसभेपुढें उमटला आणि सात ऑगस्ट रोजीं त्याचा कायदा होऊन तो महाराष्ट्राच्या आणि गुजरातच्या पांच कोटी लोकांच्या डोक्यावर आकाशाच्या कुऱ्हाडीप्रमाणें एकदम येऊन आदळला. नेहरूंनीं तर आपण जणुं त्या गांवचेच नाहींत असें नाटक केलें. आश्चर्याचा अगदीं अनपेक्षित पण गोड धक्का बसावा अशी मुद्रा करून नेहरू उद्गारले, "खरोखर ह्या आकस्मिक घटनेच्या मागें एकादी 'अदृश्य

शक्ति ' असावी असें मला वाटतें. खचित हें महाद्विभाषिक म्हणजे राष्ट्राला मिळालेली बहुमोल देणगी आहे. " गृहमंत्री गोविंद वल्लभ पंत म्हणाले, " हा खरोखर राष्ट्रीय तोडगाच आहे ! " लोकसभेमधील काँग्रेसचे सर्व खासदार तर ' लोकशाहीचा प्रचंड विजय झाला ! ' अशा हर्षातिरेकानें किंकाळ्या मारूं लागले. महाद्विभाषिकाची ही सर्व कल्पना लोकसभेच्या कित्येक खासदारांच्या स्वयंस्फूर्तीमधून निघालेली आहे किंवा तो केवळ परमेश्वरी चमत्कारच होय, हें सारें नाटक नेहरूंनीं आणि त्यांच्या हस्तकांनीं इतकें हुबेहूब वठविलें कीं खरोखरच त्यांच्या अंगामधल्या ' नाट्यगुणां'बद्दल त्यांची जेवढी तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. महाद्विभाषिकाचा कायदा हा परस्पर लोकसभेच्या सभासदांनीं केला, त्याला गुजरातच्या आणि महाराष्ट्राच्या खासदार प्रतिनिधींनीं संमति दिली, आपला त्या गोष्टीशीं काडीमात्र संबंध नाहीं, आपण काय जो कायदा होईल त्याची तामिली करण्यास बांधलेलों आहोंत, असें ह्यानंतर सांगायला नेहरू पुन्हा आपले मोकळे ते मोकळेच !

मात्र महाद्विभाषिकाची योजना ही आतां कायम स्वरूपाची योजना आहे असें अगदीं प्रारंभापासून कटाक्षानें सांगायला नेहरू विसरले नाहींत. एवढेंच नव्हे तर ' लोकशाही घटनेमध्यें टीका करण्याचा जो अधिकार असतो त्याच्या पलिकडे जाऊन महाद्विभाषिकाचा कोणालाहि धिक्कार करतां येणार नाहीं ' अशी धमकी त्यांनीं गोविंद वल्लभ पंतांच्या तोंडून देवविली. त्या धमकींत ' जे कोणी या योजनेविरुद्ध दुर्वर्तन करतील त्यांना अद्दल घडेल ! ' असें मोरारजींनीं आणखी घासलेट ओतलें. महाद्विभाषिकाचा निर्णय अपरिवर्तनीय आहे हें गुजरातच्या विद्यार्थ्यांच्या मनावर ठसविण्यासाठीं तर नेहरूंनीं एखाद्या हुकूमशहाला शोभेल अशी भाषा वापरली. ते म्हणाले, " लोकसभेच्या या निर्णयाला कोणालाहि आव्हान देतां येणार नाहीं. लोकसभा ही देशाची सार्वभौम शक्ति आहे. ह्या देशांत किंवा ह्या देशाबाहेर अशी कोणतीहि शक्ति नाहीं कीं जी हा निर्णय बदलूं शकेल. लोकसभेचा निर्णय माझ्या इच्छेप्रमाणें आणि मर्जीप्रमाणें बदलायला मी कांहीं राजा नाहीं. राज्यपुनर्रचनेचा कायदा दुरुस्त केला जाईल ही कल्पनाच मुळीं मूर्खपणाची आहे ! " महागुजरातवाद्यांनीं किंवा संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांनीं आपल्या मागणीच्या न्याय्यतेबाबत इतर देशाची खात्री केली तर कदाचित् पांच-दहा वर्षांनीं लोकसभा महाद्विभाषिकाच्या निर्णयाचा फेरविचार करणें शक्य आहे असें नेहरू अधून मधून मधाचें बोट लावतात खरें. पण ती त्यांची निव्वळ हातचलाखी

आहे. त्यांना हें पुरतें ठाऊक आहे कीं लोकसभेंत संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांचें किंवा महागुजरातवाद्यांचें बहुमत होणें कालत्रयीं शक्य नाहीं. आणि तसें जोंपर्यंत होत नाहीं, तोंपर्यंत महाद्विभाषिकाचा निर्णय लोकसभेकडून बदलून घेण्याच्या कामीं त्यांना यश मिळणें अशक्य आहे.

महाद्विभाषिक राज्य हें महाराष्ट्राच्या आणि गुजरातच्या कल्याणाचें आहे, म्हणून उभयतांनीं त्याचा आनंदानें स्वीकार करावा असें नेहरू वारंवार सांगतात पण देशांतील इतर सर्व भाषिकांना भाषावार राज्यें कां आणि महाराष्ट्रावर नि गुजरातवर तेवढी द्विभाषिकाची सक्ति कां ह्याचें कारण मात्र आजपर्यंत नेहरूंनीं कधींहि कुठें सांगितलें नाहीं. त्यांनींच काय पण महाद्विभाषिकाचें तात्त्विक समर्थन कोणींहि काँग्रेस नेत्यांनीं आजतागायत केलेलें मला माहीत नाहीं. महाराष्ट्राचें कल्याण व्हावें म्हणून द्विभाषिक राज्य मुद्दाम त्याला देण्यांत आलें असें कोणीं कितीहि आक्रोश करून सांगितलें तरी त्यावर मराठी माणूस विश्वास ठेवणार नाहीं. अठ्ठेचाळीस सालापासून तों छपन्न सालापर्यंत सतत आठ वर्षे संयुक्त महाराष्ट्राबाबत नेहरूंनीं जो पद्धतशीर विरोध आणि पक्षपात दाखवला आहे आणि महाराष्ट्राचा अनन्वित छळ केला आहे त्याचा साद्यंत आणि सुसंगत इतिहास येथपर्यंत मीं सांगितला आहे. तो काळजीपूर्वक वाचल्यानंतर व्यक्तिशः नेहरूंना महाराष्ट्राबद्दल जो द्वेष वाटतो, त्या द्वेषामधूनच या महाराष्ट्रघातकी महाद्विभाषिकाचा उगम झाला आहे ही गोष्ट सूर्यप्रकाशासारखी स्वच्छ होईल.

मुंबई महाराष्ट्राला देण्याबाबत नेहरूंनीं इतकीं उलटीं सुलटीं विधानें केलीं आहेत कीं त्यांची संगति लावणेंच मुळीं अशक्य आहे. मुंबई कुठेंहि गेली तरी मला काय त्याचें ? मुंबईबद्दल महाराष्ट्राचा दावा मजबूत आहे. मुंबई महाराष्ट्राला मिळाली तर मला अतिशय आनंद होईल. मुंबई महाराष्ट्राला मिळावी म्हणून मी त्यांची वकिली करीन. येथपासून तों भाषिक महाराष्ट्रांत मुंबईचा समावेश कधींहि होणार नाहीं किंवा मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत होऊं नये ह्याबद्दल पूर्वी एक कारण असेल तर आतां दहा लक्ष कारणें आहेत येथपर्यंत, नेहरू जसा प्रसंग पडेल तसें बोलले आहेत. तीं त्यांचीं सर्व विधानें एकामागून एक वाचल्यानंतर मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण होऊं नये म्हणून त्यांनीं केवढा प्रकट आणि अप्रकट प्रयत्न केला आहे त्याचें भयानक चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें.

नेहरूंच्या ऐवजीं दुसरा कोणीहि माणूस या राष्ट्राचा पंतप्रधान असता तर

मराठी भाषिकांना संयुक्त महाराष्ट्र केव्हांच मिळाला असता. नेहरूंनीं आतां तो आपल्या इभ्रतीचा आणि प्रतिष्ठेचा प्रश्न केला आहे. त्यामुळें नेहरू जोंपर्यंत अधिकारावर आहेत तोंपर्यंत मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण होणें जवळ जवळ अशक्यच आहे हें सांगण्याचीहि अवश्यकता नाहीं. तसे नेहरू फार क्रूर आणि खुनशी आहेत. भाषिक आंध्रासाठीं ज्यांनीं आपल्या प्राणांचें बलिदान केलें त्या श्री पोट्टी रामलूबद्दल आदराचें किंवा गौरवाचें एक अक्षर सुद्धां नेहरूंनीं आपल्या तोंडानें आजपर्यंत काढलेलें नाहीं. गोळीबाराचा आपल्याला अत्यंत तिरस्कार वाटतो असें नेहरू परवां म्हणाले खरे. पण गोळीबारांत मुंबईमधलीं आणि महाराष्ट्रांतलीं एवढीं माणसें मेलीं पण त्यांच्या नातेवाइकांना सांत्वनाचा किंवा सहानुभूतीचा बोटभर संदेश सुद्धां त्यांनीं कधीं पाठविलेला नाहीं. हें महापुरुषाचें खचित लक्षण नव्हें.

औरंगजेबानंतर महाराष्ट्राचा एवढा द्वेष आणि छळ कोणीं केला नसेल. त्यांच्या रोषाला आणि त्वेषाला पात्र होण्यासारखा कोणताहि नेहरूंचा गुन्हा महाराष्ट्रानें केलेला नाहीं. गोडश्यांनीं केलेल्या पातकाबद्दल साऱ्या महाराष्ट्राला फांशीं द्यावयाचें हा शुद्ध जुलूम आणि माथेफिरूपणा आहे. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची तीन कोटी लोकांची न्याय्य मागणी बंदुकीच्या गोळ्यांनीं ठार मारून आणि लोकसभेंतील बहुमताच्या जोरावर महाद्विभाषिक राज्य महाराष्ट्रावर बलात्कारानें लादून नेहरूंनीं महाराष्ट्राचा जो महान् अपराध केला आहे त्याला महाराष्ट्र कालत्रयीं क्षमा करणार नाहीं.

मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न हा नुसत्या भूगोलानें किंवा गणितानें सुटणार नाहीं असा नेहरूंनीं मागें एका प्रसंगीं टोमणा मारलेला आहे. नेहरूंचें म्हणणें अगदीं बरोबर आहे. संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न हा इतिहासाच्याच मार्गानें सुटला तर सुटेल. भारतांत महाराष्ट्र हा असा एकच प्रदेश आहे कीं त्याच्या पाठीमागें एक हजार वर्षांचा तेजस्वी आणि ज्वलन्त इतिहास एकाद्या पर्वतासारखा उभा आहे. मराठी माणसांच्या धमन्यांतून लाव्हा रसासारखा इतिहास वाहतो आहे. मंत्रिमंडळाला किंवा लोकसभेला न विचारतां मुंबईबाबतचा निर्णय आपण कां दिला ह्याचें समर्थन करतांना नेहरू म्हणाले होते कीं, "मी कांहीं ह्या देशाचा नुसताच प्रधान नाहीं. त्यापेक्षां कांहींतरी जास्त आहें. मी क्रांतीचें अपत्य आहें (I am the child of revolution)." महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं झालेल्या

तीस वर्षांच्या लढ्यांत कारागृहांत जाण्यापलिकडे किंवा उत्तम इंग्रजींत वा हिंदींत व्याख्यानें देण्यापलिकडे नेहरूंनीं काय क्रांति केली हें त्यांचें त्यांना माहित. केवळ एका ऐतिहासिक योगायोगानें नेहरूंना हें आजचें स्थान प्राप्त झालें आहे. नेहरूंचें चरित्र ज्यांनीं काळजीपूर्वक वाचलें असेल त्यांना भारतीय राजकारणांतला नेहरू हा एक 'अकर्मक कर्मणि प्रयोग' आहे असेंच म्हणावें लागेल. असें असूनहि आपण 'क्रांतीचें अपत्य' आहोंत असा ज्यांना अभिमान वाटतो, त्यांना कोणीहि मराठी माणूस मान ताठ आणि छाती वर करून सांगेल की भारतांत सर्वांत मोठी क्रांति ज्यांनीं केली, त्या छत्रपति शिवाजी महाराजांचीं आम्ही अपत्यें आहोंत. क्रांतीचा आणि इतिहासाचा वारसा आमच्याहि रक्तामधून वाहतो आहे. अन्यायाला शरण जावयाचें नाहीं आणि जुलमाचा प्रतिकार करतांना मरण आलें तरी त्याला भ्यावयाचें नाहीं हा संदेश अगदीं उपजतच इतिहासानें आमच्या देहपिंडावर शिक्कामोर्तब करून ठेवला आहे.

तेव्हां मुंबईसह, बेळगांवसह, बेदरसह संयुक्त महाराष्ट्राचें आम्हां मराठ्यांचें भव्य आणि दिव्य स्वप्न कसें साकार करावयाचें, तें आमचा इतिहास जशी आम्हांला प्रेरणा देईल त्या मार्गानें जाऊन आम्ही करूं. आमच्या इतिहासाला जबरदस्त आव्हान देऊन महाराष्ट्रांतील तीन कोटी लोकांना नेहरूंनीं हडसून खडसून जागें केलें आहे हे त्यांचे आमच्यावर उपकारच होत. नवा महाराष्ट्र घडविण्याचें महान् कार्य इतिहासानें सुरूच केलेलें आहे. त्यांतच आमच्या यशाचें आणि आशेचें बीज आहे.

टिळक पुण्यतिथि, १९५७

**प्रल्हाद केशव अत्रे**

# ‘दार कमिशन’चा संतापजनक निर्णय

‘दार कमिशन’नें भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाला अगदीं निर्लज्जपणें हरताळ फासल्यापासून ‘संयुक्त महाराष्ट्रा’च्या प्रश्नाबाबत महाराष्ट्रीय जनतेला अतिशय चिंता वाटूं लागली आहे. कारण ‘संयुक्त महाराष्ट्र’ हा आतां महाराष्ट्राच्या जीवनमरणाचा प्रश्न होऊन बसलेला आहे. भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वाप्रमाणें संयुक्त महाराष्ट्राची ताबडतोब निर्मिति व्हावयाला पाहिजे; एवढेंच नव्हे तर मुंबईचा अंतर्भाव संयुक्त महाराष्ट्रांत व्हावयाला पाहिजे. या प्रश्नाबाबत महाराष्ट्राचा आतां अगदीं एकमतानें निर्धार झालेला आहे. त्याबद्दल त्याच्या अंतःकरणांत कसलीहि शंका राहिलेली नाहीं. एवढेंच नव्हे तर या मागणीमध्यें तो कसल्याहि प्रकारची तडजोड करायला किंवा तिला यत्किंचितहि मुरड घालायला तयार नाहीं. असें असतां भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाच्या अगदीं मुळावरच घाव घालून दार कमिशननें महाराष्ट्राला फारच मोठें आव्हान दिलें आहे! ‘दार कमिशन’मुळें महाराष्ट्रीय जनतेच्या संतापाचा पारा आतां एवढा चढून गेला आहे कीं मध्यवर्ती सरकारच्या सद्धेतूबद्दल महाराष्ट्रांत सध्यां संशयाचें वातावरण पसरून राहिलें आहे. आधींच मध्यवर्ती सरकारच्या हातून महाराष्ट्रीयांच्या बाबतींत जाणूनबुजून अन्याय केला जातो अशी, खरी असो वा खोटी असो, महाराष्ट्राची समजूत झालेली आहे. तीमध्यें या ‘दार कमिशन’नें फार मोठी भर घातलेली आहे. किंबहुना केवळ महाराष्ट्राचा तेजोभंग करण्यासाठींच हें ‘दार कमिशन’ नेमलें गेलें होतें अशी उघड उघड भाषा महाराष्ट्रांत बोलली जात आहे.

‘दार कमिशन’चा निर्णय जयपूर कॉँग्रेसनें मान्य केला नाहीं. उलट भाषावार प्रांतरचनेचा विचार करण्यासाठीं तीन पुढाऱ्यांची एक समिति जयपूर कॉँग्रेसनें नेमून ‘दार कमिशन’वर अप्रत्यक्षपणें अविश्वासच प्रकट केला आहे, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट आहे. पंडित नेहरू, सरदार पटेल आणि डॉ. पट्टाभि यांची जयपूर कॉँग्रेसनें नेमलेली समिति भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नावर काय मत

देते आहे इकडे साऱ्या महाराष्ट्राचे डोळे लागून राहिलेले आहेत. भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाबाबत नेहरू आणि पटेल यांना विशेष आपुलकी वाटत नाहीं. कारण त्यांच्या डोक्यांत फार मोठ्या मोठ्या प्रश्नांचा विचार सध्यां चालू आहे. तथापि, या समितीमध्यें डॉ. पट्टाभींसारखे भाषावार प्रांतरचनेचे कट्टे पुरस्कर्ते आहेत ही एकच गोष्ट आशादायक आहे. दार कमिशनच्या निर्णयाला ते केराची टोपली दाखवल्यावांचून राहणार नाहींत याविषयीं आम्हांला मुळींच शंका नाहीं. तथापि, मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीला डॉ. पट्टाभींचाहि पाठिंबा नाहीं. कारण 'मुंबई शहर हें स्वतंत्र ठेवलें पाहिजे' असें नुकतेंच त्यांनीं आपलें मत व्यक्त केलें आहे. त्यावरून जयपूर कॉंग्रेसनें नेमलेल्या या समितीचा निर्णयदेखील महाराष्ट्राच्या कितपत पसंतीला उतरेल याबाबत भय व्यक्त केलें जात आहे, आणि तें भय खोटें आहे असें आम्हांला मुळींच वाटत नाहीं. अशा परिस्थितींत 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या प्रश्नाबाबत महाराष्ट्रानें काय करावें? संयुक्त महाराष्ट्राची चळवळ महाराष्ट्रानें पूर्वीप्रमाणेंच निकरानें पुढें चालवावी का नशिबावर हवाला ठेवून ती बंद करावी आणि स्वस्थ घरीं बसावें? याबाबत आज महाराष्ट्रांत निरनिराळे विचारप्रवाह चालू आहेत, त्यांचा आढावा घेणें जरूर आहे.

महाराष्ट्र कॉंग्रेस कमिटीनें 'दार कमिशन'च्या खोडसाळ निर्णयाचा अगदीं कडक शब्दांत निषेध केलेला असून मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र प्रांत ताबडतोब बनविण्यांत यावा असा जोरदार ठराव मंजूर केला आहे. एवढेंच नव्हे तर जयपूर कॉंग्रेसमध्यें नेमलेल्या समितीनें भाषावार प्रांतरचनेची निश्चित तारीख जाहीर करावी अशीहि पण महाराष्ट्र कॉंग्रेस समितीनें त्यांना विनंति केली आहे. तथापि, संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाबाबत अधिक अडथळे उत्पन्न झाले तर ते दूर करण्यासाठीं जनतेंत कोणत्या प्रकारची जागृति करावी याबाबत महाराष्ट्र कॉंग्रेस कमिटीनें मार्गदर्शन करून ठेवलेलें नाहीं. त्या दृष्टीनें 'दार कमिशन'मधले एक सहकारी सभासद श्री. हरिभाऊ पाटसकर यांनीं पुण्यांत जी एक मुलाखत दिली ती अतिशय महत्त्वाची आहे. 'दार कमिशन'कडे जे प्रश्न सोपविण्यांत आले होते त्यांकडे दुर्लक्ष करून कमिशननें अधिकारातिक्रम कसें केलें यावर हरिभाऊंनीं उत्तम प्रकाश टाकलेला आहे. घटना, मसुदा आणि घटना समितीचे निर्णय यांबाबतदेखील 'दार कमिशन' इतकें अनभिज्ञ असावें याबद्दल हरिभाऊंनीं आश्चर्य प्रकट केलें आहे. 'महाराष्ट्रांतून मुंबई अलग करावी' ही डॉ. पट्टाभींची विचारसरणी किती

चुकीची आहे, हें या मुलाखतींत हरिभाऊंनीं दाखवून दिलें. या वेळीं महाराष्ट्रांतील सर्व जनतेनें आपापसांतले मतभेद विसरून संघटित झालें पाहिजे व संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेकरितां एक संयुक्त फळी उभारली पाहिजे असें हरिभाऊंनीं आपलें मत व्यक्त केलें तें कोणालाहि मान्य होण्यासारखें आहे. याच सुमारास कॉंग्रेसचे सरचिटणीस श्री. शंकरराव देव यांनींहि एका मुलाखतींत आपला जो अभिप्राय व्यक्त केला आहे तो अत्यंत महत्त्वाचा आहे. ते म्हणाले, "भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व कॉंग्रेसनें मान्य केलें असून त्यासाठीं तिनें गेलीं तीस वर्षें कार्य केलें आहे. महात्मा गांधी यांनींच या तत्त्वाचा कॉंग्रेसमध्यें प्रथम पुरस्कार केला. हिंदुस्थानच्या घटनेंत भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वाला मान्यता देण्यांत आली नाहीं तर जनतेचें खरेंखुरें राज्य स्थापन होणार नाहीं!"

'दार कमिशन'च्या निर्णयानें महाराष्ट्रीय मनाचा संताप किती अनावर झालेला आहे, तो मुंबई येथें पत्रकारांच्या एका चर्चासभेंत उत्तम तऱ्हेनें व्यक्त झाला. या सभेंत 'लोकमान्या'चे संपादक श्री. पां. वा. गाडगीळ यांनीं जें भाषण केलें त्यामध्यें 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या चळवळीबाबत पुढें काय करावें याबद्दल त्यांनीं आपलें मत व्यक्त केलें. ते म्हणाले, "दार कमिशननें संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचें जें मध्यमवर्गीय नेतृत्व होतें त्याचा मुडदा पाडला. यापुढें संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही महाराष्ट्रांतले भांडवलदार, कंत्राटदार किंवा मध्यमवर्गीय विद्वान् यांच्या हातून होणार नाहीं. वास्तविक या प्रश्नावर मुंबई विधिमंडळांतील सर्व महाराष्ट्रीय आमदारांनीं राजिनामे देऊन बाहेर पडायला पाहिजे होतें. पण तसें करण्याचें त्यांना धैर्य नाहीं. आतां या चळवळीचें नेतृत्व शेतकरी-कामकऱ्यांकडेच गेलें पाहिजे. समाजवादी चळवळीनें संयुक्त महाराष्ट्र मिळेल." थोड्या दिवसांपूर्वी पुण्यांत महाराष्ट्र समाजवादी पक्षाची जी बैठक भरली होती तिच्यांतहि 'दार कमिशन'चा अहवाल प्रतिगामी आणि खोडसाळ स्वरूपाचा आहे असा त्या कमिशनच्या निर्णयाचा स्पष्ट शब्दांत निषेध करण्यांत आला. एवढेंच नव्हे तर भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न अधिक कालावधीवर न टाकतां मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र ताबडतोब स्थापन करण्यांत यावा असा समाजवादी पक्षानें आपला अभिप्राय व्यक्त केला. आणि संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीसाठीं होणाऱ्या सर्व रास्त प्रयत्नांना पाठिंबा देण्याचें पक्षानें ठरविलें.

'संयुक्त महाराष्ट्रा'मध्यें काय वाटेल तें झालें तरी मुंबईचा अंतर्भाव केला जाऊं

नये एवढ्यासाठीं मुंबईतल्या गुजराती आणि पार्शी भांडवलदारांनीं फार निकराचे प्रयत्न चालविलेले आहेत ही गोष्ट आतां पुष्कळांना माहीत झालेली आहे. या संयुक्त महाराष्ट्राच्या विरोधकांच्या आघाडीचें नेतृत्व श्री. के. एम्. मुनशी यांनीं अलीकडे मोठ्या हिरिरीनें स्वीकारलेलें दिसतें. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचा पाणउतारा करणारा 'दार कमिशन'च्या अहवालांतला बहुतेक सर्व भाग श्री. मुनशी यांच्याच देखरेखीखालीं लिहिला गेला आहे असा पुष्कळांचा तर्क आहे. मुंबईवर पाणी सोडावयाला महाराष्ट्रीय तयार झाले तर एका क्षणांत त्यांना 'संयुक्त महाराष्ट्र' मिळेल असें अधिकारी गोटांतील माणसें खाजगी भाषणांत बोलत असतात. पण मुंबई मिळणार नसेल, तर बेहत्तर आहे 'संयुक्त महाराष्ट्र' न निर्माण झाला तरी, असा महाराष्ट्रीयांचा तर कडवा निर्धार आहे. अशा परिस्थितींत महाराष्ट्रीयांच्या पदरांत मुंबई न पडेल याबद्दल काय काय कारवाया करतां येतील याबद्दल डोकें खाजवून खाजवून मुनशी यांनीं अलीकडे एक नवीनच युक्ति शोधून काढली आहे. वास्तविक मूळचे ते भाषावार प्रांतरचनेचे पुरस्कर्ते. महागुजराथचा एक स्वतंत्र प्रांत हवा असें मोठमोठ्या व्यासपीठांवरून त्यांनीं कित्येक वेळां तरी गर्जून सांगितलें आहे. पण त्या बाबतींत अलीकडे त्यांनीं आपली पगडी साफ फिरवून स्वतंत्र महागुजराथ नको असें सांगावयास सुरुवात केली आहे. बडोदें आणि सौराष्ट्र यांचा मिळून झालेला महागुजराथ सध्यांच्या मुंबई प्रांतांत समाविष्ट करण्यांत यावा आणि भाषावार तत्त्वावर मुंबई इलाख्याचे विभाग न पाडतां तो बहुभाषिक प्रांतच ठेवावा असें ते आतां म्हणूं लागले आहेत. अशा रीतीनें संयुक्त महाराष्ट्राला एकसारखा विरोध करीत राहिलें म्हणजे शेवटीं महाराष्ट्रीय लोक कंटाळून मुंबईवर पाणी सोडावयाला तयार होतील, अशी मुनशी प्रभृतींची कल्पना असावी.

'संयुक्त महाराष्ट्रा'च्या प्रश्नाबाबत शेतकरी-कामगार पक्षाचे सरचिटणीस श्री. शंकरराव मोरे यांनीं गेल्या आठवड्यांत एक महत्त्वाचें पत्रक प्रसिद्ध केलें आहे. त्यांत ते म्हणतात कीं, "मुंबई इलाख्यांत सौराष्ट्र आणि बडोदा हे प्रदेश विलीन करण्याच्या मागें गुजराती भांडवलदारांचा महाराष्ट्रविरोधी फार मोठा डाव आहे. आज मुंबई प्रांतांत मराठी बोलणारांचे अकरा जिल्हे आहेत. आणि गुजरात्यांचे पांच जिल्हे आहेत. आज कायदेमंडळांत गुजरातच्या वांट्याला पंचाहत्तर जागा आहेत. उद्यां मुंबई इलाख्यांत सौराष्ट्र आणि बडोदा सामील झाले तर

कायदेमंडळांत महाराष्ट्राचा गुजरात्यांवर वरपगडा राहणार नाहीं." संयुक्त महाराष्ट्राच्या पूर्तीसाठीं शंकरराव मोरे यांचें असें म्हणणें आहे कीं, कायदेमंडळांतील मराठी सभासदांनीं आणि मंत्र्यांनीं राजीनामे द्यावेत आणि भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वावर पुन्हा निवडणुकी लढवाव्यात. महाराष्ट्रांतील जनतेनें करबंदीची चळवळ ताबडतोब सुरू करावी, एक दिवस हरताळ पाळावा किंवा अन्य प्रकारें सत्याग्रह करावा. समाजवादी पक्षाचे चिटणीस श्री. ना. ग. गोरे यांच्याहि मतें बडोदें आणि सौराष्ट्र हीं दोन्ही मुंबई प्रांतांत अंतर्भूत करण्याच्या मागें मुंबई प्रांतांत गुजराथी बोलणाऱ्यांची संख्या मराठी बोलणाऱ्यांच्या संख्येइतकी करावी व संयुक्त महाराष्ट्राची मागणी खची करावी असेंच कारस्थान असावें. या बाबतींत सरकारवर लोकमताचा कांहीं तरी दाब पडला पाहिजे असें गोरे यांचें मत आहे. तथापि महाराष्ट्रीय आमदारांनीं विधिमंडळाचा राजिनामा द्यावा किंवा महाराष्ट्रांत करबंदीची चळवळ करावी ही मोरे यांची सूचना गोरे यांना पसंत नाहीं. फक्त अंदाजपत्रकाची जेव्हां मुंबईच्या कायदेमंडळांत चर्चा होईल तेव्हां तिजवर महाराष्ट्रीय आमदारांनीं बहिष्कार टाकावा असें गोरे यांनीं सुचविलें आहे. एवढेंच नव्हे तर संयुक्त महाराष्ट्राकरितां जर महाराष्ट्रांत एखादा लढा सुरू झाला तर त्याची जबाबदारी सर्वस्वीं सरकारवर आहे असें गोरे यांनीं सरकारला बजावून सांगितलें आहे. एकंदरींत संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न धसाला लावण्यासाठीं कांहीं तरी संघटित चळवळ महाराष्ट्रांत नेटानें आणि ताबडतोब सुरू करावयाला पाहिजे असेंच बहुतेक विचारवंतांचें मत आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेकरितां एक संयुक्त फळी स्थापन करावयाला पाहिजे हें श्री. हरिभाऊ पाटसकर यांचें मत श्री. पांडोबा गाडगीळ यांच्याखेरीज बहुतेक सर्वांना मान्य होईल याबद्दल आम्हांला मुळींच संशय नाहीं. पण अशी संयुक्त फळी जर स्थापन झाली तर तिनें सरकारवर दडपण आणण्यासाठीं कोणत्या साधनांचा अवलंब करावा याबाबत मात्र पुष्कळच मतभेद होईल. स्थानिक व प्रांतिक स्वराज्य संस्थांचे राजिनामे देऊन पुन्हा निवडणुकी लढवाव्यात किंवा करबंदीची आणि सत्याग्रहाची चळवळ सुरू करावी, या शंकरराव मोरे यांनीं केलेल्या सूचना मात्र कोणालाहि फारशा मान्य होतील असें आम्हांला वाटत नाहीं. संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न लढवतांना कोणत्याहि पक्षानें स्वतःचें राजकारण लढवूं नये अशी आमची अपेक्षा आहे. प्रश्न केवळ तात्त्विक पातळीवरच लढवला जावा आणि ज्यामुळें शांततेचा भंग होणार नाहीं अशाच केवळ कायदेशीर साधनांचा अवलंब करूनच

हा प्रश्न सोडवला जावा असें आम्हांला वाटतें. महाराष्ट्राच्या हाडींमासीं हिंसा भरलेली आहे, त्याचें प्रत्यंतर गेल्या वर्षी भरपूर आलेलें आहे. पुन्हा त्या भयंकर नाटकाचे प्रयोग बघावयाला नकोत. पांडोबा गाडगीळ म्हणतात त्याप्रमाणें महाराष्ट्रांतल्या शेतकरी व कामगार यांनीं संयुक्त महाराष्ट्राची चळवळ जर हातीं घेतली आणि शंकरराव मोरे सांगतात त्याप्रमाणें त्यांनीं करबंदीचें शस्त्र जर उपसलें तर महाराष्ट्र 'संयुक्त' व्हावयाचे ऐवजीं त्याचीं सहस्रशः शकलें होऊन जातील! संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न हा कांहीं उगाच डोकें फिरवून घेऊन किंवा एकांतिक उपायांचा अवलंब करून सुटण्यासारखा प्रश्न नाहीं. पण त्याचबरोबर संयुक्त महाराष्ट्राच्या विरोधकांच्या आपण असेंहि निदर्शनाला आणून दिलें पाहिजे कीं विरोधाची पराकाष्ठा तुम्हीं कितीहि केलीत तरी मुंबईसह 'संयुक्त महाराष्ट्र' निर्माण व्हावयाला पाहिजे, या आमच्या मागणींत आम्ही तसूभरहि तडजोड करावयाला तयार नाहीं! संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न हा धीरानें आणि धैर्यानेंच सुटेल.

६-२-१९४०

# कॉँग्रेसचें महाराष्ट्राला आव्हान

भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाचा कॉँग्रेसनें अगदीं विचकाच करून टाकावयाचें ठरविलें आहे असें दिसतें. भाषावार प्रांतरचना ही राष्ट्राला घातक आहे, तेव्हां त्या तत्त्वाला कायमची मूठमाती देण्यांत यावी असा 'दार समिती'नें कांहीं महिन्यांपूर्वीं निर्णय दिला. जयपूर कॉँग्रेसनें तो निर्णय त्या स्वरूपांत न स्वीकारतां त्याबाबत नेहरू, पटेल आणि पट्टाभि या तिघांची एक समिति नेमली. दार समितीपेक्षां कांहीं तरी अधिक शहाणपणाचा निर्णय या नेहरू समितीकडून मिळेल अशी साहजिकच देशाची अपेक्षा होती. पण या अपेक्षेला गेल्या मंगळवारीं दिल्ली येथें हरताळ फासला गेला. दार समितीनें भाषावार प्रांतरचनेच्या कल्पनेचा सपशेलच मुडदा पाडून ठेवला होता. नेहरू समितीनें या मुडद्याला एक लहानसें इंजेक्शन देऊन त्याच्यांत थोडीशी धुगधुगी उत्पन्न केली. पण त्याला उठवून न बसवितां कांहीं काळपर्यंत त्याला तसेंच पेटींत ठेवून द्यावें असा आपला अभिप्राय दिला. कॉँग्रेस कार्यकारिणीनें या अभिप्रायावर आपल्या मंजुरीचा शिक्का-मोर्तब केला. आणि तो मध्यवर्ती सरकारकडे आणि घटना समितीकडे 'पुढील व्यवस्थे'साठीं रवाना करून दिला. घटना समिति या प्रश्नाची काय संभावना करील याबाबत शंका बाळगण्याचें आतां मुळीं कारणच नाहीं. दार समितीनें जी कल्पना राष्ट्रहिताचा घात करणारी आहे असें ठरविलें आणि नेहरू-पटेलांनीं जी योजना देशाच्या राजकीय प्रगतीमध्यें भयंकर अडथळे उत्पन्न करील असा निर्णय दिला, त्या भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाबाबत यापुढें घटना समितीकडून कांहीं तरी निराळा अभिप्राय मिळेल अशी आशा करणें व्यर्थ आहे. देशाला स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीं एकसारखीं सत्तावीस वर्षें कॉँग्रेस आपले बाहू उभारून ज्या तत्त्वाची घोषणा करीत होती त्या तत्त्वाला स्वातंत्र्य प्राप्त होतांच त्याच हातांनीं मूठमाती द्यावयाला कॉँग्रेसनें तयार व्हावें हें आश्चर्य नव्हे काय? भाषावार प्रांत रचनेच्या प्रश्नाबाबत पूर्वींच्या आपल्या सर्व आश्वासनांना हरताळ फासून कॉँग्रेस-

नेत्यांनीं जनतेचा धडधडीत विश्वासघात केला आहे असेंच आम्ही म्हणतों.

भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाबाबत 'दार समिती' नें जी भूमिका स्वीकारली ती कितीहि मूर्खपणाची असली तरी तिच्यांत एक गुण होता. भाषावार तत्त्वाला 'दार समिती' नें अगदीं उघडपणें विरोध केलेला होता. ही भूमिका कोणालाहि समजण्यासारखी आहे. पण भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाबाबत नेहरू समितीनें जी भूमिका स्वीकारली आहे ती मात्र कळणें कठिण आहे. भाषावार तत्त्वाला नुसती ओठांनीं वरकरणी मान्यता द्यावयाची आणि आंतून त्या योजनेचें तळपट करण्याची कारवाई करावयाची, अशी दुटप्पी स्वरूपाची ढोंगी भूमिका नेहरू समितीनें स्वीकारलेली आहे. भाषावार तत्त्वावर प्रांतांची पुनर्रचना करणें सध्यांच्या परिस्थितींत देशाच्या हिताचें नाहीं, असें नेहरू समितीचें प्रामाणिक मत आहे ना? मग तेवढ्याचपुरती चर्चा करून त्यांनीं गप्प बसावयाला नको होतें का? इतर आलतूफालतू गोष्टींची चर्चा करण्याचें काय कारण होतें? पण त्यांनीं तसें केलेलें नाहीं. उलट सध्यांच्या परिस्थितींत ज्या गोष्टींचा उल्लेख करणें देशाच्या मुळींच हिताचें नव्हतें अशा अनेक नाजुक बाबी नेहरू समितीनें निष्कारण डिवचून आपली नाचक्की करून घेतलेली आहे. मुंबईच्या बाबतींत त्यांनीं दिलेला निर्णय म्हणजे तर गैरमुत्सद्देगिरीचा अगदीं कळसच होय! स्वतंत्र महाराष्ट्राचा प्रश्न आतां नको, पुढें बघूं, असें एका तोंडानें म्हणायचें; पण स्वतंत्र महाराष्ट्रांत मुंबईचा मात्र समावेश होणार नाहीं असें त्याच वेळीं दुसऱ्या तोंडानें सांगून टाकावयाचें असल्या मुत्सद्देगिरीची आम्ही नेहरू-पटेलांकडून तरी अपेक्षा केली नव्हती.

नेहरू समितीचा हा निर्णय अनेक विसंगतींनीं आणि चुकांच्या कोटिक्रमांनीं भरलेला आहे. भाषावार प्रांतरचनेसंबंधीं सामान्यतः जे आक्षेप घेतले जातात त्या आक्षेपांचें खंडन अनेक अधिकारी पुरुषांनीं यापूर्वी अनेक वेळां आणि अनेक ठिकाणीं करून विरोधकांना निरुत्तर करून टाकलेलें आहे. पण या गोष्टीकडे नेहरू समितीनें संपूर्णपणें दुर्लक्ष करून त्याच मामुली आक्षेपांची पुन्हा पोरकट पुनरावृत्ति करून स्वतःचें अज्ञान मात्र उघडकीस आणलेलें आहे. वास्तविक, भाषावार प्रांतरचनेची चळवळ ही देशाच्या विघटनेची चळवळ नसून ती शास्त्रीय पायावर देशाची अधिक बलिष्ठ अशी संघटना करण्याची चळवळ आहे एवढी साधी गोष्ट देखील नेहरू-पटेलांसारख्या नाणावलेल्या मुत्सद्द्यांच्या लक्षांत येऊं नये हें आश्चर्य

नव्हे काय? असें असतांना "संस्थानें विसर्जन करून देशांत ऐक्य निर्माण करण्याची जी पुरोगामी चळवळ देशांत सुरू झाली आहे तिला भाषावार प्रांतरचनेमुळें बाध येणार आहे," असलें विकृत विधान नेहरू-पटेलांसारख्या नाणावलेल्या पुढाऱ्यांनीं करावें हें आश्चर्य नव्हे काय? एवढेंच म्हणून ते थांबत नाहींत, तर "नवीन प्रांत बनविण्याची ही वेळ नाहीं. त्यामुळें आपल्या पदरांत पडलेले मोठमोठे राजकीय फायदे आपल्याला पचवितां यावयाचे नाहींत. भलत्याच गोष्टीकडे आपलें लक्ष जाईल. देशाची राज्यव्यवस्था आणि अर्थव्यवस्था कोसळून पडेल. देशांत फुटीरपणाची आणि विघटनेची वृत्ति बळावेल आणि आत्यंतिक त्याग करून आपण मिळवलेलें स्वातंत्र्य गमावण्याची आपल्यावर पाळी येईल!" अशीहि त्यांनीं भाषावार प्रांतरचनेच्या पुरस्कर्त्यांना भीति दाखवून ठेवलेली आहे! भाषावार प्रांतरचनेचा या वेळीं आग्रह धरला तर मिळालेलें स्वातंत्र्य गमावण्याची पाळी येईल हा नेहरू-पटेलांचा कोटिक्रम जितका भोंगळ तितकाच हास्यास्पद आहे.

'स्वातंत्र्य' हें या काँग्रेस पुढाऱ्यांच्या हातामधलें जणुं कांहीं एक कोलीतच होऊन बसलें आहे. स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी हे आम्हांला एकसारखे दम देऊन राहिले होते कीं, "बघा, तुम्ही अमुक अमुक कराल तर देशाला स्वातंत्र्य मिळणार नाहीं!" आतां स्वातंत्र्य मिळाल्यानंतर पुन्हा तेंच ते सांगत आहेत कीं, "लक्षांत ठेवा, तुम्ही अमुक अमुक कराल तर देशाला मिळालेलें स्वातंत्र्य गमावून बसाल!" आपण म्हणूं तसें दुसऱ्याला वागावयाला लावावयाची 'स्वातंत्र्य' ही या पुढाऱ्यांना एक उत्तम सबब सांपडलेली आहे. दुसरें काय? आम्ही ह्यांना विचारतों कीं स्वातंत्र्य मिळाल्यानंतर प्रांतांची भाषावार तत्त्वावर रचना केली जाईल अशीं सत्तावीस वर्षें काँग्रेसच्या व्यासपीठावरून लोकांना तुम्ही एकसारखीं आश्वासनें कां देत होतात? भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाकडे बघण्याच्या तुमच्या पूर्वीच्या आणि आतांच्या दृष्टिकोनामध्यें एवढा जमीनअस्मानाइतका फरक कां आढळून यावा हें आम्हांला कळत नाहीं! भाषावार प्रांतरचना करण्याच्या कामीं अनेक संकटें उत्पन्न होतील, सरहद्दी ठरवितांना अनेक कटकटी निर्माण होतील, त्यांतून कदाचित् दंगेधोपेहि उद्भवतील अशी धोक्याची सूचना अगदीं नवीन शोध लागावा अशा स्वरांत नेहरू-समितीनें जी देऊन ठेवली आहे तिच्यांत नवीन असें कांहीं नाहीं. भाषावार प्रांतरचनेच्या पुरस्कर्त्यांना या सर्व संकटांची पूर्ण कल्पना आहे, आणि त्या संकटांतून कसा मार्ग काढावयाला पाहिजे याचा त्यांनीं सांगोपांग विचारहि

पण करून ठेवलेला आहे. पण ज्यांना तें जाणण्याची इच्छा आहे त्यांना तें सांगण्यांत फायदा! नेहरू-पटेलांना त्या गोष्टी मुळीं समजून घ्यावयाच्याच नाहींत. त्यांना त्या सांगून काय उपयोग? आणि ज्या संकटाचें नेहरू-पटेलांना आतां एवढें भय वाटतें तीं संकटें पुढें कांहीं काळानें नष्ट होतील अशी त्यांची कल्पना आहे काय? नेहरू-समिति म्हणते, "देशांत पुढें जेव्हां स्थिरता निर्माण होईल आणि लोकांचीं मनें जेव्हां अधिक शांत होतील तेव्हां सरहद्दी ठरविण्याचें आणि नवीन प्रांत बनविण्याचें काम पुष्कळच सोपें होईल!" ज्यांना सध्यांच्या जागतिक राजकारणाची थोडीतरी माहिती आहे त्यांना हें सांगावयाला नको कीं या देशांत स्थिरता निर्माण होण्याचा आणि लोकांचीं मनें शांत होण्याचा संभव पुढील पन्नास वर्षांत तरी येणें अशक्य आहे! नेहरू-पटेलांना हें माहीत नाहीं असें थोडेंच आहे! भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न शांततेच्या आणि स्थिरतेच्या काळापर्यंत तहकूब करणें म्हणजे कायमचाच तो तहकूब करण्यासारखें आहे! उलट यावर भाषावार प्रांतरचनेच्या पुरस्कर्त्यांचें असें म्हणणें आहे कीं, भाषावार प्रांतरचना केल्यावांचून देशांत स्थिरता आणि शांतता निर्माण होणेंच मुळीं अशक्य आहे!

भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न सध्यां तरी तहकूब केला पाहिजे असा सरधोपट निर्णय देणाऱ्या या नेहरू-समितीनें आंध्र प्रांताच्या बाबतींत मात्र अपवाद केलेला आहे ही सगळ्यांत मौज आहे. नेहरू समिति म्हणते कीं दुसऱ्या कोणत्याहि प्रांताचा प्रश्न विचारांत घेण्यापूर्वी आंध्र प्रांत स्वतंत्र करण्याचा प्रश्न हातीं घेतला पाहिजे. स्वतंत्र आंध्र हा सातआठ महिन्यांच्या अवधींत अस्तित्वांत येईल असें म्हणतात. आंध्र प्रांताच्या बाबतींत नेहरू समितीनें हा जो पक्षपात दाखविला याचें कारण त्या समितीमध्यें डॉ. पट्टाभि हे आंध्र पुढारी होते म्हणून असें आम्ही मुळींच म्हणत नाहीं. आमचें म्हणणें एवढेंच, नेहरू समितीच्या विचारांत आणि निर्णयांत कसल्याहि तऱ्हेची सुसंगति नाहीं. स्वतंत्र आंध्राची मागणी ही संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीपेक्षां जास्त जुनी असली तरी ती तिच्यापेक्षां अधिक जोरदार आहे अशी नेहरू समितीची कल्पना असेल तर ती चुकीची आहे! नेहरू समितीच्या निर्णयाचें सगळ्यांत आम्हांला आश्चर्य वाटतें तें हें कीं, भाषावार प्रांत-रचनेचा प्रश्न सध्यांच्या परिस्थितींत तहकूब केला पाहिजे असा तिनें निर्णय देऊन त्याचबरोबर "एकाद्या विभागानें भाषावार तत्त्वावर आपली रचना केली पाहिजे अशी जोरदार आणि व्यापक मागणी केली तर लोकशाही सरकारला ती मागणी

मान्य करणें भागच आहे." असा त्या निर्णयावर बोळाहि पण फिरवून टाकला आहे! म्हणजे भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व ज्या प्रांतांना लागू करण्यास नेहरू-समितीनें सध्यां नकार दिला आहे त्या प्रांतांनीं आपली मागणी अधिक जोरदार आणि निकराची करावी अशी जणुं कांहीं नेहरू समितीनें त्यांना चिथावणीच देऊन ठेविली आहे! याचा परिणाम असा होणार आहे कीं भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न तहकूब होण्याऐवजीं तो दिवसेंदिवस जास्त निकडीचा आणि निकराचा होणार आहे! म्हणजे जीं संकटें देशावर सध्यां येऊं नयेत अशी नेहरू-समितीची इच्छा आहे तीं संकटें जास्त वेगानें आणि अधिक भीषण स्वरूपांत देशाच्या डोक्यावर कोसळल्याखेरीज राहणार नाहींत! नेहरू-पटेलांसारख्या अव्वल दर्जाच्या पुढाऱ्यांनीं मुत्सद्देगिरीचा एवढा केविलवाणा अभाव दाखवावा याचें आम्हांला वाईट वाटतें.

भाषावार प्रांतरचनेची मागणी तुम्हीं अधिक जोरदार केल्यावांचून तुम्हांला स्वतंत्र महाराष्ट्र मिळणार नाहीं असें सांगून नेहरू समितीनें महाराष्ट्राला नुसतें चिडवलेंच नाहीं तर स्वतंत्र महाराष्ट्राची तुमची मागणी आम्हीं पुढें मान्य केली तरी मुंबई शहर तुम्हांला मिळणार नाहीं, तें राजकीय दृष्ट्या स्वतंत्रच राहील असें म्हणून त्या संतापाच्या आगींत तिनें तेलहि ओतून ठेवलें आहे. मुंबई हा तर मुळीं महाराष्ट्राचा जीव कीं प्राण आहे. तो गमावायला महाराष्ट्र कालत्रयींहि तयार होणार नाहीं. मुंबईवरचा हक्क महाराष्ट्र जर सोडावयाला तयार झाला तर पटेल आणि नेहरू महाराष्ट्राचें स्वातंत्र्य मान्य करावयाला या क्षणीं तयार आहेत हें अगदीं 'उघडें गुपित' आहे! पण मुंबई शहर भांडवलवाल्यांच्या घशांत घालून महाराष्ट्र आपलें स्वातंत्र्य विकत घेऊं इच्छीत नाहीं. मुंबई हें महाराष्ट्राच्या कपाळाचें कुंकू आहे. वैधव्य पत्करल्यावांचून जर महाराष्ट्राला स्वातंत्र्य मिळणार नसेल तर तसलें अमंगल स्वातंत्र्य पाहिजे आहे कुणाला? मुंबई शहराचा महाराष्ट्रांत कां अंतर्भाव करतां येत नाहीं याबाबत नेहरू-समितीचा कोटिक्रम असा आहे कीं, "मुंबई शहर हें संमिश्र आणि बहुभाषिक असल्यानें तें कोणत्याहि एका भाषेच्या गटांत येऊं शकत नाहीं. तसें केल्यास आजचें त्याचें महत्त्व नष्ट होईल!" हीच कसोटी जर लावली तर हिंदुस्थानांतील बहुतेक मोठमोठ्या शहरांना आपल्या प्रांतामधून फुटून स्वतंत्र होतां येईल. कारण बहुतेक मोठीं शहरें हीं संमिश्र आणि बहुभाषिकच आहेत. याच हिशेबानें मग कलकत्ता आणि मद्रास ह्यांना आपल्या प्रांतांमधून कां विभक्त करण्यांत येऊं नये बरें? पण

तसें सुचविण्याची नेहरू-समितीची छाती नाहीं. एकाद्या प्रांतांतील शहरांत निरनिराळ्या भाषा बोलणारे लोक व्यापारधंद्याच्या निमित्तानें जमा झाले आणि त्यामुळें त्या शहराचें स्वरूप संमिश्र बनलें तर त्या शहराचा अंतर्भाव त्या प्रांतांत करतां येत नाहीं हा पटेल-नेहरूंचा कोटिक्रम लहान पोरालादेखील शोभण्यासारखा नाहीं. बंगालमध्यें कलकत्याचा समावेश झाला म्हणून कलकत्याचें महत्त्व कमी झालें अशी तक्रार आजपर्यंत तरी कोणीं केलेली नाहीं. मग ही आवई मुंबईच्या बाबतींत नेहरू-पटेलांनीं कां उठवावी बरें? मुंबईचा अंतर्भाव काय वाटेल तें झालें तरी महाराष्ट्रांत न होऊं देण्याचा भांडवलवाल्यांचा डाव आहे! त्यांना यथेच्छ आणि मुबलक चरावयाला मुंबईचें कुरण मोकळें पाहिजे आहे. मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रांत करतां येत नाहीं हा नेहरू-समितीचा निर्णय नसून तो नेहरू-पटेलांच्या तोंडांनीं बोलणाऱ्या भांडवलवाल्यांचा निर्णय आहे हें न समजण्याइतका महाराष्ट्र मूर्ख नाहीं! स्वतंत्र महाराष्ट्रांत मुंबईचा अंतर्भाव करतां येत नाहीं असें सांगून नेहरू-समितीनें महाराष्ट्राला जें आव्हान दिलें आहे त्याचा स्वीकार छातीठोकपणें केल्यावांचून महाराष्ट्र आतां राहणार नाहीं! मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीला महाराष्ट्रांतल्या सर्व पक्षांचा एकमतानें पाठिंबा मिळालेला आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला कॉंग्रेसविरोधी चळवळीचें स्वरूप येऊं नये अशी आमची पहिल्यापासून इच्छा आहे. पण आमची इच्छा असून काय उपयोग? संयुक्त महाराष्ट्राच्या बाबतींत कॉंग्रेसश्रेष्ठींनीं आतां जें गैरमुत्सद्देगिरीचें आडमुठें धोरण स्वीकारलें आहे त्यामुळें महाराष्ट्रांतलें कॉंग्रेसचें वर्चस्व लौकरच संपुष्टांत येईल. एवढेंच नव्हे तर महाराष्ट्रांत अशांततेचा आणि अत्याचाराचा वणवा पुन्हा एकदां भडकल्यावांचून राहणार नाहीं असेंच आम्हांला भय वाटतें. सं।०

१०-४-४९

# नेहरूदेवांना बळी पाहिजे !

हैदराबाद येथें भरत असलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनापुढें 'भाषावार प्रांतरचने'चा प्रश्न प्रामुख्यानें आलेला आहे. पोत्तु श्रीरामलु ह्या आंध्र नेत्याच्या बलिदानानें ह्या प्रश्नाकडे गेल्या महिन्यापासून सर्वदेशाचें लक्ष वेधलेलें आहे. स्वतंत्र-आंध्र-निर्मितीसाठीं श्रीरामलु ह्यांनीं १९ आक्टोबर १९५२ रोजीं आपल्या प्राणांतिक उपोषणाला प्रारंभ केला. उपोषणाच्या काळांत पंडित नेहरूंनीं श्रीरामलूंना बजावून सांगितलें कीं, असल्या जबरदस्तीच्या उपायांचा अवलंब करून हा प्रश्न सुटणार नाहीं. तथापि, अठ्ठावन्न दिवसांच्या उपोषणानंतर जेव्हां श्रीरामलु १५ डिसेंबर रोजीं मरण पावले, तेव्हां देशांत प्रचंड प्रक्षोभ झाला. अन् खुद्द आंध्रामध्यें दंगेधोपे होऊन तीन कोटी रुपयांची नासधूस झाली, तेव्हां १९ डिसेंबर रोजीं लोकसभेंत पंडित नेहरूंनीं स्वतंत्र-आंध्रप्रांत-निर्मितीची घोषणा केली आणि ह्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याबाबतच्या प्रश्नांची चौकशी करण्यासाठीं राजस्थानचे न्यायमूर्ति वांचू ह्यांची नेमणूक केली. म्हणजे स्वतंत्र आंध्र प्रांताच्या निर्मितीसाठीं पोत्तु श्रीरामलु ह्यांना आपले प्राण खर्चीं घालावे लागले, तेव्हां श्री नेहरूदेव कोठें शेवटीं प्रसन्न झाले. नेहरूदेवांनीं प्रसन्न होऊन जो स्वतंत्र आंध्र प्रांतनिर्मितीचा 'वर' दिला त्यानें पोत्तु श्रीरामलु ह्यांच्या आत्म्याला कांहीं विशेष शांति मिळेल असें वाटत नाहीं. कारण जो आंध्र प्रांत दिल्याचा पंडित नेहरू आतां आव आणीत आहेत तो मद्रास शहर आणि रायलसीमा वजा करूनचा 'स्वतंत्र आंध्र' पंडितजींनीं मागेंच देऊं केलेला होता. तो पोत्तु श्रीरामलु ह्यांना मान्य नव्हता. म्हणून तर त्यांनीं प्राणांतिक उपोषण केलें, आणि त्या उपोषणांत श्रीरामलु ह्यांचे प्राण खर्चीं पडल्यानंतर आतां पंडित नेहरू औदार्याचें सोंग आणून त्यांना काय देतात, तर जो आंध्र त्यांना जिवंतपणीं अमान्य होता तोच. एका महान् हुतात्म्याच्या बलिदानाचें असें हास्यास्पद विडंबन व्हावें आणि तें देखील पंडित नेहरूंच्या हातून ह्याचें आम्हांला अत्यंत दुःख वाटतें. कशा कां स्वरूपांत होईना, पण स्वतंत्र

आंध्र प्रांत आतां निर्मितीच्या वाटेवर आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. आंध्र-प्रांतनिर्मितीच्या मुहूर्तावर देशांतील इतर भाषिक प्रांतांची निर्मिति होईल अशी भोळी आशा भाषावार प्रांतरचनेच्या पुरस्कर्त्यांच्या अंतःकरणांत साहजिकच उत्पन्न झाली. कॉंग्रेसमध्येंहि ह्या प्रश्नानें पुन्हा जोराची उचल खाल्ली. आणि त्याचाच परिणाम म्हणून कीं काय, हैदराबाद येथें भरत असलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशना-समोर हा प्रश्न आतां प्रामुख्यानें आलेला आहे. भाषावार प्रांतरचनेचा हा प्रश्न हैदराबादचें कॉंग्रेस अधिवेशन सोडवील काय? हा एकच प्रश्न देशाच्या समोर आज तीव्रतेनें उभा आहे. आंध्राचा प्रश्न सुटला. आतां आमचें काय, असा विचार महाराष्ट्रीयांच्या आणि कन्नडिगांच्या डोळ्यांसमोर प्रामुख्यानें उभा आहे. काय वाटेल तें झालें, तरी हा प्रश्न आपण हैदराबादच्या अधिवेशनामध्यें धसाला लावूं अशी महाराष्ट्रांतल्या आणि कर्नाटकांतल्या कॉंग्रेस प्रतिनिधींनीं प्रतिज्ञा केलेली आहे असें म्हणतात. कर्नाटकप्रांत-निर्मितीच्या प्रश्नाबाबत सरकारनें जी दिरंगाई चालविलेली आहे, तिचा निषेध करण्यासाठीं म्हणून आमदार दोडमेट्टी ह्यांनीं गेल्या बुधवारपासून चौदा दिवसांच्या उपोषणाला प्रारंभहि केला आहे. अशा रीतीनें भाषिक प्रांताच्या प्रश्नाला कॉंग्रेसमध्यें आणि देशामध्यें अत्यंत गंभीर स्वरूप प्राप्त झालें आहे. आणि स्वतंत्र-आंध्रप्रांत-निर्मितीपूर्वीच्या सर्व भयानक इतिहासाची अधिक गंभीर पुनरावृत्ति इतरत्र होऊं नये, असें कॉंग्रेस-श्रेष्ठींना जर वाटत असेल, तर त्यांनीं हा प्रश्न शक्य तितक्या लवकरच निकालांत काढणें शहाणपणाचें होईल! पण एवढा शहाणपणा कॉंग्रेसश्रेष्ठींना सुचेल काय? कोणतीहि गोष्ट वेळेवर करण्याबाबत ह्यांचा विशेष लौकिक नाहीं.

त्यांतून हैदराबाद कॉंग्रेसच्या अधिवेशनाचे अध्यक्ष पडले पंडित जवाहरलाल नेहरू. आज देशांत भाषावार प्रांतरचनेचे सर्वांत मोठे शत्रु जर कोणी असतील तर ते पंडितजी. भाषावार प्रांतरचनेसारख्या शास्त्रीय, गंभीर आणि लोकशाही राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाच्या असलेल्या ह्या प्रश्नाचा सर्वांत जास्त खेळखंडोबा कोणीं केला असेल तर तो त्यांनीं. लोककल्याणाच्या अगदीं उघड उघड गोष्टी ज्याप्रमाणें इंग्रज राज्यकर्त्यांना दिसत नसत, त्याप्रमाणें लोकहिताच्या कांहीं मूलभूत गोष्टींचें पंडित नेहरूंना मुळीं आकलनच होऊं शकत नाहीं. भाषिक प्रांतरचनेच्या घोषणा गेलीं तीस वर्षें कॉंग्रेस करते आहे. पण पंडित नेहरूंच्या जणुं कांहीं तें गांवींहि नाहीं. ह्या प्रश्नासंबंधीं त्यांना यत्किंचितहि

आस्था वाटत नाहीं. उलट त्याबद्दल जास्तींत जास्त गैरसमज त्यांनीं आपल्या डोक्यामध्यें भरवून घेतलेले आहेत. आणि हे आपले गैरसमज आपल्या प्रत्येक वक्तव्यांत जनतेच्या माथीं मारून तिचा बुद्धिभेद करण्याचा ते प्रयत्न करीत असतात. भाषिक प्रांतरचनेबाबतची पंडितजींची भूमिका प्रामाणिकपणाची नसून कपटाची आहे, असें विधान करावयास आम्हांस यत्किंचितहि भय वाटत नाहीं. ह्या प्रश्नाच्या नरडीला नख लावण्याचा अगदीं प्रारंभापासून त्यांनीं आणि सरदार पटेल ह्यांनीं पद्धतशीर प्रयत्न केलेला आहे. 'दार कमिशन' हें भाषिक प्रांतरचनेविरुद्ध नेहरू-पटेल ह्यांनीं रचलेलें सर्वांत मोठें कारस्थान होय. पुष्कळशा भोळ्याभाबड्यांना वाटलें कीं, भाषिक प्रांतरचनेचा प्रश्न सोडविण्यासाठीं म्हणून 'दार कमिशन'ची नेमणूक झाली. पण भाषिक प्रांतरचनेमुळें देशाच्या ऐक्याचे तुकडे होतील आणि देशांत फुटीरपणाची प्रवृत्ति बळावेल, या असत्य आणि खोडसाळ सिद्धांताचा उंदीर जेव्हां तेरा महिने डोंगर पोखरून 'दार कमिशन'नें बाहेर काढला, तेव्हां भाषिक प्रांतरचनेचा प्रश्न 'सोडविण्या'ऐवजीं तो कायमचा 'बुडविण्या'साठीं म्हणून सदर कमिशनची नेमणूक झाली होती ह्याबद्दल लोकांची अगदीं खात्री पटली. दार कमिशन ही पटेल-नेहरूंनीं जनतेच्या डोळ्यांत टाकलेली निव्वळ धूळ होती. जनतेच्या विश्वस्त पुढाऱ्यांनीं तिची अशी धादांत फसवणूक करावी ही सर्वांत अत्यंत निंद्य गोष्ट होती. भाषावार प्रांतरचनेमुळें देशांत फुटीरपणा वाढेल, हा 'दार कमिशन'चा अप्रामाणिक अपसिद्धांतच नेहरूंच्या ह्या प्रश्नावरील त्यानंतरच्या सर्व वक्तव्यांचें ध्रुपद होऊन बसला आहे. भाषिक प्रांतरचनेची चळवळ ही विघटनेची चळवळ नसून सुघटनेची चळवळ आहे, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ असतांना, भाषिक प्रांतरचनेमुळें राष्ट्राच्या ऐक्याचा घात होईल, हें धादांत असत्य नेहरूंसारख्या थोर आणि जबाबदार पुढाऱ्यांनीं पुन्हा पुन्हा बडबडत राहावें, ह्याला काय म्हणावें? 'सत्य हेंच आमचें ब्रीद आहे' असा बाहू उभारून उद्घोष करणाऱ्यांनीं जाणून-बुजून असत्य बोलत सुटावें ह्यापेक्षां सत्याची अधिक विटंबना या देशांत होऊं शकेल काय? भाषिक प्रांतरचनेनें देशांतला फुटीरपणा बळावेल असा आमच्या वर्गातला विद्यार्थी बोलला असता, तर त्याच्या ढुंगणावर आम्हीं चार छड्या लगावल्या असत्या; पण नेहरू पडले महापुरुष! ते जाणून बुजून खोटें बोलत असले तर त्यांच्या तोंडाला कोणीं हात लावावा? देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर

दहा वर्षेंपर्यंत भाषिक प्रांतरचनेचा आम्ही विचारच करणार नाहीं, असें प्रारंभींच नेहरूंनीं साऱ्या राष्ट्राला निक्षून एकदांचें सांगितलें असतें, म्हणजे मग कोणीं त्याबाबत 'ब्र' हि उच्चारला नसता. पण दर वेळेला भाषिक प्रांतरचनेचा प्रश्न आपण सोडवतों आहोंत, असा संभावितपणाचा आव आणावयाचा, लोकांच्या अपेक्षा जागृत करावयाच्या आणि सरतेशेवटीं कात्रा वर करून त्यांच्या तोंडाला पानें पुसावयाचीं, अशी पंडित नेहरूंनीं ह्या प्रश्नाबाबत जनतेची पद्धतशीरपणें ससेहोलपट चालविलेली आहे. 'दार समिती'ची नेमणूक ही दुसऱ्याच्या हातून 'साप' मारून घेण्याची नेहरू-पटेलांची युक्ति होती, दुसरें काय? दार समितीच्या खोडसाळ अहवालाचा सर्व देशांत जेव्हां धिक्कार झाला, तेव्हां 'जयपूर कॉंग्रेस'मध्यें पुन्हा त्या प्रश्नाचा विचार करणें कॉंग्रेसश्रेष्ठांना भागच पडलें. सरदार पटेल, नेहरू आणि पट्टाभि सीतारामय्या ह्या 'तीन धूर्तां'ची एक समिति नेमण्यांत आली. ह्या समितीनें भाषिक प्रांताच्या प्रश्नाचा आपण फार काळजीपूर्वक आणि सर्व बाजूंनीं विचार करतों आहोंत असा आव आणून शेवटीं तो प्रश्न पुन्हा निकालांत काढला. ह्या समितीनें एकोणपन्नास सालच्या एप्रिलमध्यें असा निर्णय दिला कीं, "देशांतील कांहीं अत्यंत महत्त्वाच्या गोष्टींकडे अवधान लागावें एवढ्याचसाठीं नवीन भाषावार प्रांत निर्माण करण्याचा हा प्रश्न कांहीं वर्षें तरी पुढें ढकलण्यांत यावा!" म्हणजे जयपूर कॉंग्रेसनें त्रिमूर्ति समिति नेमण्याचें नाटक करून शेवटीं केलें काय, तर 'दार कमिशन'नें जें केलें तेंच!

तथापि तेवढ्याहि गडबडींत महाराष्ट्राला एक गोष्ट बजावून सांगायला पंडित नेहरू मात्र विसरले नाहींत. ती गोष्ट ही कीं, काय वाटेल तें झालें तरी भाषिक महाराष्ट्रांत मुंबईचा अंतर्भाव होणार नाहीं! भाषिक प्रांतरचनेचा सर्व प्रश्नच्या प्रश्नच जर त्रिमूर्ति समितीनें पुढें ढकलला, तर भाषिक महाराष्ट्रांत मुंबईचा समावेश होऊं शकणार नाहीं हें आगाऊच छातीवर हात मारून एवढ्या विश्वासानें नेहरू कसें सांगू शकले बरें? भाषिक प्रांतांची घटना पुढें कधीं होईल, त्यांत कोणकोणत्या शहरांचा किंवा गांवांचा अंतर्भाव होईल हें त्या वेळीं ठरवणारे ठरवतील. त्यांचे हात ह्याच वेळेपासून बांधून ठेवण्याचा नेहरूंना काय अधिकार? म्हणजे याचा अर्थच असा कीं, नेहरू जें जें ठरवितील तेंच अखेरीस होणार. कमिशनें किंवा समित्या नेमणें हा सगळा दिखाऊ फार्स आहे. नेहरूंच्या राज्यांत लोकशाही ही अशा रीतीनें एक थट्टेची गोष्ट होऊन बसलेली आहे. पुढें सार्वत्रिक

निवडणुकांच्या वेळीं जेव्हां कॉंग्रेसचा जाहीरनामा निघाला त्यांत भाषिक प्रांताच्या प्रश्नाची मोठ्या खुबीनें वाट लावण्यांत आली. ती अशी : ह्या प्रश्नाबाबत त्या जाहीरनाम्यांत असें म्हटलें होतें कीं, "भाषिक प्रांतनिर्मितीचा प्रश्न हा सरतेशेवटीं त्या त्या भाषिकांच्या इच्छेवरच अवलंबून आहे. सांस्कृतिक दृष्ट्या भाषिक प्रांतांच्या प्रश्नाला कांहीं एक महत्त्व निःसंशय आहे. तथापि, त्या प्रश्नाला दुसऱ्याहि कांहीं महत्त्वाच्या बाजू आहेत. आर्थिक दृष्टीनें, राज्यकारभाराच्या दृष्टीनें आणि खर्चाच्या दृष्टीनेंहि ह्या प्रश्नाचा विचार केला पाहिजे. संबंधित लोकांचें एकमत होऊन भाषिक प्रांताची जर मागणी झाली तर सीमा समिति नेमून तिची अंमलबजावणी करण्याची तरतूद राज्यघटनेमध्यें करून ठेविलीच आहे." कॉंग्रेसच्या जाहीरनाम्यांतली ही भाषेची सर्व योजना उघड उघड नेहरूंची आहे हें सांगावयास पाहिजे काय? म्हणजे गंमत बघा. भाषिक प्रांतरचना ही देशाच्या ऐक्याला विघातक आहे, भाषिक प्रांतामुळें देशाचे तुकडे पडतील असेंहि एका तोंडानें म्हणावयाचें; आणि दुसऱ्या तोंडानें सांगावयाचें कीं, ज्यांना भाषिक प्रांत पाहिजे असतील, त्यांनीं आपापसांत ऐक्य घडवून आणावें आणि एकमुखानें त्याची मागणी करावी म्हणजे राज्यघटनाच त्यांच्या त्या मागणीची पूर्तता करील! भाषिक प्रांतरचनेसंबंधीं पंडित नेहरूंचा सध्यांचा पवित्रा असा दुतोंडी आहे. कांहीं महिन्यांपूर्वी लोकसभेंत हा प्रश्न जेव्हां उपस्थित झाला, तेव्हां नेहरूंनीं हीच भाषा वापरली. ते म्हणाले, "खरें विचाराल तर मला ह्या प्रश्नाबाबत मुळींच प्रेम वाटत नाहीं. उलट मी असेंच म्हणतों कीं, आजच्या परिस्थितींत भाषिक प्रांत हे राष्ट्राला घातकच ठरतील. पण तुम्हांला जर भाषिक प्रांत पाहिजेच असतील, तर तुम्ही आपापसांत मतैक्य घडवून आणा. याबाबत माझी समजूत कशी काढावयाची हा प्रश्न नसून तुम्हीं एकमेकांची समजूत कशी करावयाची हा मुख्य प्रश्न आहे." संबंधित लोकांचें ह्या प्रश्नावर एकमत होणें अशक्य आहे हें नेहरू पूर्णपणें ओळखून आहेत. प्रत्येक राज्याची राजधानी आणि त्यांच्या सीमा हे प्रश्न असे बिकट आहेत कीं त्याबाबत निरनिराळ्या भाषिकांचें संपूर्ण ऐक्य होणें अशक्य आहे. 'जनतेनें एकमतानें नि एकमुखानें मागणी करावी' ही इंग्रज राज्यकर्त्यांची भाषा सही सही पंडित नेहरूंनीं उचललेली आहे. देशाला स्वातंत्र्य मिळवण्याच्या मूलभूत प्रश्नावरसुद्धां जेथें जनतेचें एकमत होऊं शकलें नाहीं, तेथें तें भाषिक प्रांतासंबंधींच्या कांहीं गौण प्रश्नांबाबत कसें होऊं शकणार?

उदाहरणार्थ, मुंबईचा प्रश्न घ्या! मुंबई ही महाराष्ट्राशीं भौगोलिक आणि आर्थिकदृष्ट्या संलग्न आहे म्हणून ती स्वतंत्र महाराष्ट्राची साहजिकच राजधानी ठरते ही महाराष्ट्रीयांची भूमिका आहे. या भूमिकेला गुजराती किंवा इतर भाषिक ह्यांचा जो विरोध आहे तो केवळ विरोधासाठीं विरोध आहे. मुंबईत इतर भाषेचे अनेक लोक राहत असले म्हणून त्यांना ह्या प्रश्नाबाबत मत देण्याचा कायदेशीरदृष्ट्या काय अधिकार आहे? मग महाराष्ट्रीयांनीं एकमत कोणाशीं घडवून आणावयाचें? काय त्यांनीं गुजरात्यांची समजूत घालावयाची, का पार्श्यांची अन् सिंध्यांची मनधरणी करावयाची? ह्या प्रश्नाचा निर्णय लोक आपापसांत लावतील ही कल्पना व्यर्थ आहे. भाषिक प्रांताचा प्रश्न सोडविण्याची काँग्रेस सरकारला मनापासून जर खरोखरच इच्छा असेल, तर त्यांनीं सीमासमितीची प्रथम नेमणूक करून हे वादग्रस्त प्रश्न आधीं मिटवून घेतले पाहिजेत. त्याखेरीज त्यांचा निर्णय लागणार नाहीं. भाषिक प्रांतांच्या सरहद्दीचा प्रश्न ते ते भाषिक आपापसांत मिटवण्याचा जर प्रयत्न करतील, तर त्यांच्यांत मतैक्य निर्माण व्हावयाच्याऐवजीं अधिकच भांडणें लागतील आणि त्यांच्यांतला मतभेद अधिकच विकोपाला जाईल हें कांहीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. म्हणून वादग्रस्त प्रश्न जनतेवर न सोपवितां त्यांचा निकाल स्वतःला ‘जनतेचें सरकार’ म्हणविणाऱ्यांनीं त्या कामीं पुढाकार घेऊन लावावयाला पाहिजे. पण त्याबाबत तर काँग्रेसश्रेष्ठींनीं हेतुपुरःसर अंगचुकारपणा चालविलेला आहे. निःपक्षपातीपणाचा आव आणून ते स्वतः बाजूला राहतात. आणि त्या त्या भाषिकांनीं हा प्रश्न सोडवावा असें मोठ्या संभावितपणें सांगतात. त्याचाच अर्थ हा कीं, भाषिक प्रांताचा प्रश्न सुटूं नये अशी त्यांची मनापासूनची इच्छा आहे. म्हणून हैदराबादच्या अधिवेशनामध्यें त्या प्रश्नाचा कितीहि खल झाला तरी हा प्रश्न निकालांत निघेल असें आम्हांला वाटत नाहीं.

हैदराबाद येथून या प्रश्नासंबंधीं ज्या कांहीं बातम्या आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या आहेत, त्यांवरूनहि आमच्या ह्या कल्पनेला दुजोराच मिळतो. स्वतंत्र आंध्राखेरीज करून इतर प्रांतांच्या बाबतींत भाषावार रचनेचें तत्त्व अवलंबिण्याचा काँग्रेसचा इरादा नाहीं, अशी नेहरूंच्या निकटवर्ती गोटांतून आलेली एक बातमी परवांच प्रसिद्ध झालेली आहे. इतर भाषिक प्रांताच्या रचनेला तर स्वतः नेहरूंनीं म्हणे नकारच दिला आहे. आंध्राखेरीज भाषावार प्रांतरचनेची मागणी कोणींहि केली, तरी तिला नकार देण्याचेंच त्यांचें धोरण आहे असें म्हणतात. आंध्राचा प्रश्न हा

सर्वस्वीं निराळा आहे असा त्यांचा युक्तिवाद आहे. भारत प्रजासत्ताक झालें त्याच वेळीं स्वतंत्र आंध्र निर्माण झाला असता, पण कांहीं स्थानिक घटनांमुळें तसें होऊं शकलें नाहीं. आतां भारत सरकार आणि इतर राज्य सरकारें पंचवार्षिक योजनेच्या अंमलबजावणीला पहिलें महत्त्व देणार आहेत. म्हणून भाषावार प्रांत निर्माण करण्याच्या कार्याची आर्थिक आणि अंमलबजावणीविषयक जबाबदारी ते घेऊं शकणार नाहींत. कारण त्यामुळें पंचवार्षिक योजनेकडे दुर्लक्ष होईल ही नेहरू प्रभृति काँग्रेसश्रेष्ठींची ह्या घटकेची विचारसरणी आहे. महाराष्ट्रातर्फे काकासाहेब गाडगीळ अन् भाऊसाहेब हिरे आणि कर्नाटकातर्फे निजलिंगप्पा ह्यांनीं भाषावार प्रांतरचनेची बाजू मोठ्या हिरिरीनें मांडली असें म्हणतात. पण या प्रश्नाबाबत जें काय पाऊल टाकावयाचें तें अत्यंत सावधगिरीनें टाकलें पाहिजे, असें राजगोपाला-चारिअर ह्यांचें म्हणणें पडलें. तर पंडित नेहरूंचें म्हणणें असें पडलें कीं, "येत्या तीन वर्षांत आंध्र प्रांताच्या राज्यकारभाराचा अभ्यास करण्यास सवड मिळेल आणि त्यानंतर भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व लागू करावें कीं नाहीं हें ठरवितां येईल." हैदराबादची भाषावार विभागणी केल्याखेरीज भाषिक कर्नाटक आणि महाराष्ट्र हे प्रांत निर्माण होऊं शकणार नाहींत आणि हैदराबादच्या भाषावार विभागणीला तर नेहरूंचा कट्टर विरोध आहे. एकूण काय कीं, पंचवार्षिक योजनेची सबब पुढें करून हैदराबाद अधिवेशनांत भाषावार प्रांतरचनेला नेहरू-प्रभृति वाटाण्याच्या अक्षता लावणार हें भविष्य आम्हांला उघड उघड दिसत आहे. भाषिक प्रांतांमुळें पंचवार्षिक योजनेला फार मोठा अडथळा उत्पन्न होणार आहे हें नवीनच पिल्लूं अलीकडे काँग्रेसश्रेष्ठींनीं उत्पन्न केलेलें आहे. त्याला परवां विलेपार्लें येथील एका व्याख्यानांत भाऊसाहेब हिरे यांनीं ठणठणीत उत्तर दिलें आहे. श्री. हिरे म्हणाले, "महाराष्ट्राच्या दृष्टीनें विचार केला तर पंचवार्षिक योजनेमध्यें महा-राष्ट्राला उत्साह वाटण्यासारखें असें कांहींहि नाहीं!" म्हणजे ज्या भाषिक प्रांत-रचनेबद्दल महाराष्ट्राला एवढा उत्साह वाटतो ती योजना बाजूला सारली जाणार! अन् ज्या पंचवार्षिक योजनेमध्यें महाराष्ट्राला आपलेपणा वाटावा असें कांहींहि नाहीं ती त्याच्या बोकांडीं बसणार! अशी विचित्र परिस्थिति निर्माण झाली आहे. श्री. पांडोबा गाडगीळांसारखे धूर्त काँग्रेसवाले 'भाषिक प्रांतरचने'बाबत तयार झालेल्या ह्या दुष्ट वर्तुळामध्यें आणखीन् एक गुंतागुंत निर्माण करू बघत आहेत. ते म्हणतात, "मुंबईची मागणी सध्यां बाजूला सारून उरलेल्या अकरा जिल्ह्यांचा

महाराष्ट्र मागा म्हणजे तो तुम्हांला चटकन् मिळेल अन् मग पंचवार्षिक योजनेंत ज्या पाटबंधाऱ्यांच्या योजना मिळाल्या नाहींत त्या तुम्हांला चटकन् मिळवितां येतील." पांडोबांचा हा सल्ला इतका उघड उघड आत्मघातकीपणाचा आहे, कीं त्याकडे कोणीहि स्वाभिमानी महाराष्ट्रीय लक्ष देईल असें वाटत नाहीं. एवंच, हैदराबादच्या अधिवेशनांत भाषिक प्रांतरचनेचा प्रश्न मुत्सद्देगिरीनें वा शहाण-पणानें नेहरू मिटवतील असा आम्हांला कांहीं रंग दिसत नाहीं. आंध्र प्रांताप्रमाणें महाराष्ट्राकडून आणि कर्नाटकाकडून नेहरूदेवांना एक एक बळी पाहिजे असें दिसतें. त्याखेरीज त्यांचे डोळे कसे उघडतील?

१८-१-१९५३

# महाराष्ट्रद्रोही काका

हैदराबादला भरलेलें काँग्रेसचें अठ्ठावन्नावें अधिवेशन गेल्या आठवड्यांत संपलें! काँग्रेस हा आतां कांहीं आम जनतेचा पक्ष राहिला नाहीं. म्हणून सत्तारूढ सरकारच्या विरुद्ध जनतेच्या ज्या असंख्य तक्रारी आहेत, त्यांना काँग्रेसच्या अधिवेशनांत तोंड फुटेल अशी अपेक्षा करणें निरर्थक आहे. सर्व देशाचीं सूत्रें हातीं असतांना सुद्धां ज्या काँग्रेसनेत्यांना जनतेच्या कल्याणाचें एकहि घवघवीत काम गेल्या सहा वर्षांत करून दाखवतां आलें नाहीं, ते औपचारिक स्वरूपाच्या काँग्रेसच्या वार्षिक बैठकींत जनतेला नवीन दिशा त्या काय दाखविणार आणि जनतेच्या हृदयांत नवीन आशा त्या काय उत्पन्न करणार? काँग्रेसमधले पूर्वीचे मोठमोठे पुढारी काँग्रेसमधून बाहेर पडल्यामुळें काँग्रेसचें लोकशाही स्वरूप आतां नष्ट झालें आहे. नेहरू सांगतील तें धोरण आणि बांधतील तें तोरण अशी आज देशाची आणि काँग्रेसची स्थिति झाली आहे. देशाचे पंतप्रधान नेहरू आणि काँग्रेसचे अध्यक्षहि पण नेहरूच. नेहरू म्हणजे काँग्रेस आणि नेहरू म्हणजे सरकार अन् नेहरू म्हणजे राष्ट्र असा सारा देश नेहरूमय झालेला आहे! अंतर्गत मतभेदांनीं काँग्रेस आज पोखरलेली आहे. खुद्द नेहरूंनाहि काँग्रेसमध्यें कांहीं कमी विरोध नाहीं. पण नेहरूंच्या विरुद्ध उघडपणें मान वर करण्याचें कोणाहि काँग्रेस-वाल्याला धैर्य नाहीं. स्वार्थाच्या लोण्यावर टपून बसलेलीं सर्व लोभाचीं मांजरें! नेहरूंची अवकृपा ओढवून घेऊन स्वतःच्या पायावर कोण उगाच धोंडा पाडून घेतो? म्हणून नेहरूंच्या तोंडाभोंवतीं दिवे ओवाळावयाचे आणि त्यांच्या आरत्या गावयाच्या, एवढा एकच उद्योग सर्व काँग्रेसवाल्यांना आतां उरलेला आहे. आणि काँग्रेसच्या प्रत्येक अधिवेशनांत हेंच एक काम टोलेजंग थाटामध्यें प्रतिवर्षी होत असतें. अध्यक्षीय भाषणांत स्वतः नेहरू आपली यथेच्छ पाठ थोपटून घेत असतात आणि आपल्या विरोधकांना कोरड्या दमदाट्या देत असतात आणि मागाहून त्यांचे बगलबच्चे त्यांना डोक्यावर घेऊन नाचतात, हा काँग्रेस अधिवेशनाचा दर वर्षाचा

कार्यक्रम अगदीं ठरून गेल्यासारख्या झाला आहे. यंदा तेंच झालें. नेहरूंचें अध्यक्षीय भाषण म्हणजे त्यांच्या नेहमींच्या ठरलेल्या मुद्द्यांची तीच ती कंटाळवाणी रडकथा. नवीन सांगण्यासारखें आतां नेहरूंच्या जवळ कांहीं उरलें नाहीं, नुसता उपदेश आणि वल्गना एवढेंच त्यांच्या वक्तृत्वाचें आतां भांडवल आहे. पंचवार्षिक योजनेवर राष्ट्रानें आपलें शक्तिसर्वस्व एकत्रित करावें ह्यावर यंदाच्या अध्यक्षीय भाषणांत नेहरूंनीं विशेष भर दिला. म्हणून पंचवार्षिक योजना पूर्ण होईपर्यंत दुसऱ्या कोणत्याहि जनताकल्याणाच्या गोष्टीकडे लक्ष द्यावयाचें नाहीं असाच त्यांनीं जणुं कांहीं यापुढें निर्धार केलेला दिसतो आहे. तथापि, एवढ्या राष्ट्रीय महत्त्वाच्या पंचवार्षिक योजनेबद्दल जनतेला आकर्षण किंवा उत्साह वाटावा ह्यासाठीं काँग्रेसनें काय करावें ह्याचें विवेचन मात्र नेहरूंनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत कटाक्षानें टाळलें हें त्यांत विशेष आहे. गेल्या पांच वर्षांत काँग्रेस सरकारनें देशाची जी 'प्रचंड प्रगति' घडवून आणली ती पाहून परदेशांतले लोक थक्क होतात आणि आश्चर्यानें तोंडांत बोटें घालतात, असें पंडित नेहरूंनीं मोठ्या मिटक्या मारीत सांगितलें. काँग्रेसनें देशांत घडवून आणलेली ही एवढी मोठी प्रगति खुद्द ह्या देशांतल्या लोकांना मात्र कुठेंच दिसून येत नाहीं, आणि ती परदेशांतल्या पाहुण्यांच्या मात्र चटकन् नजरेंत भरते, ही खरोखरच आश्चर्याची गोष्ट आहे. साहेबांचें राज्य जरी देशांतून गेलें असलें, तरी साहेबांचें 'सर्टिफिकेट' दाखविण्याचा मोह नेहरूंसारख्या लोकांनासुद्धां अजून सुटत नाहीं ही मोठी मौज आहे. स्वतःच्या परराष्ट्रीय धोरणाची तोंड भरून स्तुति करून घेतल्यानंतर 'जातीयवादी, प्रांतीयवादी आणि हिंसावादी' लोकांना सणसणीत दम भरावयास नेहरूंनीं कमी केलें नाहीं. ते म्हणाले, "ज्यांचा हिंसेवर विश्वास आहे त्यांना आम्ही निकरानें विरोध करूं!" काँग्रेसमध्यें 'लांचलुचपत आणि चारित्र्यहीनता' वाढत चालली आहे त्याबाबत कडक उपाययोजना अंमलांत आणली जाईल असेंहि नेहरू कडाडून म्हणाले. नेहरूंच्या ह्या दमदाट्या आणि धमक्या आतां श्रोत्यांच्या इतक्या परिचयाच्या झाल्या आहेत कीं त्यांना पोरें सुद्धां आतां भीक घालणार नाहींत. 'भारताचें नवीन प्रजासत्ताक राज्य अधिक जाणिवेनें आणि व्यवस्थेनें घडलें जावें एवढ्यासाठीं राष्ट्राच्या भवितव्याकडे धैर्यानें चला!' अशीं पुष्कळशीं 'पुराणांतलीं मसालेदार वांगीं' हि नेहरूंनीं आपल्या भाषणामधून श्रोत्यांना अधूनमधून वाढलीं!

गेल्या महिन्यांत पोत्तु रामलु ह्यांच्या मृत्यूमुळें मध्यवर्ती सरकारला स्वतंत्र आंध्र प्रांताच्या निर्मितीला अकस्मात् मान्यता देणें भाग पडलें. त्यामुळें भाषावार प्रांतरचनेसंबंधीं काँग्रेस आतां सर्व देशाला लागू पडेल असें कोणतें व्यापक धोरण अंगिकारणार ह्या एकाच गोष्टीकडे सर्वांचें लक्ष होतें. त्यांतून काँग्रेसचें यंदाचें अधिवेशन हैदराबाद येथें भरत होतें, आणि हैदराबाद संस्थान हें .तर भाषावार प्रांतरचनेच्या मार्गातला सर्वांत मोठा अडथळा होऊन बसल्यानें, हैदराबाद संस्थान विसर्जित करून त्याची तीन भाषिक प्रांतांत विभागणी करण्यांत यावी अशी तेथील काँग्रेसचा पक्ष धरून सर्व राजकीय पक्षांनीं एकमुखानें आजपर्यंत मागणी केलेली आहे. म्हणून हैदराबादच्या अधिवेशनांत त्याच्या भवितव्याचा आणि पर्यायानें भाषावार प्रांतरचनेचा सर्वच प्रश्न निदान तात्त्विक दृष्ट्या जरी सुटला असता तरी तें सोन्याहूनहि पिवळें झालें असतें. हैदराबाद अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष स्वामी रामानंद तीर्थ ह्यांनींहि आपल्या प्रारंभींच्या भाषणांत ह्याच गोष्टीचा मोठ्या धैर्यानें आणि मुत्सद्दीपणानें उच्चार केला. ते म्हणाले, "लोकशाहीच्या ह्या युगांत राजप्रमुख ही संस्था कालक्रमदोष आहे. ती शक्य तितक्या लवकर रद्द करण्यांत यावी. ज्यांनीं जनतेच्या स्वातंत्र्यलढ्याला पूर्वी विरोध केला त्यांची राजप्रमुखपदीं स्थापना व्हावी ही गोष्ट जनतेला कधींहि मान्य होणार नाहीं. प्रौढ मताच्या आधारावर अस्तित्वांत आलेल्या लोकशाही राजवटींत राजप्रमुखांना स्थान नाहीं. भाषावार प्रांतरचना आज राष्ट्रीयदृष्ट्या फार महत्त्वाची आहे. काँग्रेसनें तिला पूर्वींच तात्त्विक मान्यता दिली आहे. देशाची भाषावार विभागणी करण्याचें कार्य सावधगिरीनें केलें पाहिजे हें खरें, पण तें अवश्य आणि अपरिहार्य आहे. देशाची आज जी कृत्रिम विभागणी झालेली दिसते आहे, ती नष्ट झाली पाहिजे. देशाच्या भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाशीं हैदराबादचा फारच निकट संबंध आहे. कारण त्यामधले आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक भाषिक आपापल्या भाषिक प्रांतांना लागून आहेत." राजप्रमुखपदावर मुक्काम करून बसलेल्या निझामाला आज सर्वांमध्यें जास्तींत जास्त पाठिंबा नेहरूंचा आहे. म्हणून हैदराबाद संस्थानाच्या भाषावार फाळणीला नेहरूंचा कडवा विरोध आहे. तेव्हां नेहरू काँग्रेसच्या अध्यक्षपदीं विराजमान असतां स्वामी रामानंद तीर्थांनीं त्यांच्या समोर पहिले छूट राजप्रमुखपद बरखास्त करण्याची भाषा काढावी ही गोष्ट खरोखरच कौतुक करण्यासारखी आहे. रामानंदांच्या ह्या मिरच्या नेहरूंना

झांबल्याखेरीज राहिल्या नाहींत. त्यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत हैदराबादची भाषावार फाळणी करण्याबाबतची आपली भूमिका आवेशानें मांडली. ते म्हणाले, "भाषावार प्रांतरचनेची मागणी पुष्कळशी सयुक्तिक आहे, तथापि केवळ भाषेच्या तत्त्वावर प्रांतांची रचना करणें योग्य होणार नाहीं. दुसऱ्या महत्त्वाच्या गोष्टी विचारांत घेतल्या पाहिजेत. भाषावार प्रांतरचना करावयाची म्हणजे आज देशापुढें जी आर्थिक समस्या आहे तिला लागणाऱ्या उत्साहामध्यें आणि साधनांमध्यें व्यत्यय उत्पन्न करावयाचा. ह्या भानगडीमध्यें आपण एकदां गुंतलों गेलों म्हणजे पंचवार्षिक योजनेचें काय होणार? आपण प्रौढ बुद्धीचे लोक आहोंत. भावनेच्या प्रवाहांत आपण वाहवत जाणें योग्य नाहीं. सर्व गोष्टींचा आपण नीट विचार केला पाहिजे. आंध्र प्रांत निर्माण करावयाचें सरकारनें ठरविलें आहे. त्याचा काय अनुभव येतो तो आपण बघूं या. तोंपर्यंत पंचवार्षिक योजनेवर आपण आपलें लक्ष केंद्रित करूं. ती पूर्ण झाल्यावर मग दुप्पट शक्तीनें आपण बाकीचे प्रश्न सोडवूं. हैदराबाद संस्थानची भाषावार फाळणी केली तर अनेक भानगडी उत्पन्न होतील आणि दक्षिण भारताचा तोलच ढळेल! ह्या गोष्टी फार सावकाशीनें आणि काळजीपूर्वक करावयाला हव्यात. ह्यापुढच्यां कांहीं वर्षें आपण देशाच्या आर्थिक प्रगतीकडे लक्ष देऊं या. युद्धाच्या कड्यावर आज जग उभें असतां आपण आपल्या देशाशीं असें खेळणें किंवा त्याला दुबळा करणें बरें नाहीं." स्वतःची भूमिका अशा रीतीनें नेहरूंनीं प्रारंभींच व्यक्त केल्यानंतर ह्या अधिवेशनांत ह्या प्रश्नाचा काय निर्णय लागणार हें अगदीं ठरूनच गेल्यासारखं झालें!

काँग्रेसच्या अधिवेशनापूर्वी भाषिक प्रांताच्या पुरस्काराच्या घोषणा अगदीं उच्च स्वरामध्यें ओरडण्यास काकासाहेब गाडगीळ अन् भाऊसाहेब हिरे ह्यांनीं सुरुवात केली होती. काय वाटेल तें झालें तरी यंदाच्या हैदराबादच्या अधिवेशनांत भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाचा ही मंडळी सोक्षमोक्ष लावून घेणार, मग त्यासाठीं काँग्रेसमध्यें बंड करावें लागलें तरी हरकत नाहीं, अशा तऱ्हेच्या बातम्या हैदराबादच्या तळावरून जशा उठूं लागल्या तसा महाराष्ट्रांतल्या जनतेच्या आशेचा पारा भराभर चढूं लागला. लोक म्हणूं लागले कीं, आतां ही आमची 'राम-लक्ष्मणांची जोडी' नेहरूंना महाराष्ट्राचें पाणी काय असतें तें दाखविल्याखेरीज राहणार नाहीं. पण कसचें काय अन् कसचें काय? भाषावार प्रांतरचनेविरुद्ध नेहरूंनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत एकदां डोळे वटारल्याबरोबर काकासाहेब

गाडगीळांची तर सर्वांत अधिक घाबरगुंडी उडाली. 'मानापमान' नाटकांतल्या लक्ष्मीधराप्रमाणें त्यांनीं 'अंगावरचे घ्या, पेटींतले घ्या!' अशा आरोळ्या ठोकीत नेहरूंच्या पायावर सपशेल लोटांगणच घातलें. उभ्या महाराष्ट्रांत काकासाहेब गाडगीळांसारखा भंपक आणि अवसानघातकी माणूस सांपडणार नाहीं, हें आमचें त्यांच्याबद्दलचें पहिल्यापासूनचेंच मत आहे. तें पुन्हा एकवार जाहीरपणें खरें ठरलें, एवढेंच काय तें. म्हणजे मौज बघा. भाषावार प्रांतरचनेचा लढा काँग्रेस-श्रेष्ठांशीं लढण्यासाठीं महाराष्ट्रांतल्या काँग्रेसवाल्यांनीं मोठ्या आशेनें आपलें नेतृत्व काकासाहेबांकडे सोंपविलें, पण ऐन वेळीं काकांनीं महाराष्ट्राशीं द्रोह केला. आणि स्वतःची आघाडी सोडून ते शत्रुपक्षामध्यें जाऊन सामील झाले. भाषावार प्रांतरचना सध्यांपुरती स्थगित करून टाकण्याचा आपला आवडता ठराव नेहरूंनीं विषयनियामक समितीमध्यें खुद्द काका गाडगीळांनाच मांडावयाला लावला. आणि अशा रीतीनें भाषावर प्रांतरचनेच्या नरड्याला त्याच्याच पुरस्कर्त्यांच्या हातून त्यांनीं नख लाविलें ह्याबद्दल नेहरूंच्या धूर्तपणाची तारीफ करावी का काकांच्या बेवकूफ-पणाची निर्भर्त्सना करावी तेंच कळत नाहीं. स्वयंवरासाठीं नटून थटून गेलेल्या एखाद्या भंपक 'नवरदेवा'नें अखेरशेवटीं 'पुरोहित' व्हावें आणि 'वधू'चें लग्न आपल्या प्रतिस्पर्ध्याशीं लावून मांडवांतून परतावें तशांतला हा लाजिरवाणा प्रकार झाला. 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' ह्या म्हणीप्रमाणें महाराष्ट्राच्या आशाआकांक्षांना काडी लावण्याचा द्रोह एका महाराष्ट्रीयानें केला ह्याचें आम्हांस सर्वांत अधिक दुःख होतें. काय वाटेल तें झालें तरी नेहरूंना खूष करावयाचें आणि आपलें गेलेलें मंत्रिपद परत मिळवायचें एवढ्यासाठीं काकासाहेबांचा जीव तडफडतो आहे. अशा लोभी आणि लोचट माणसाकडे वस्तुतः भाषावार प्रांतरचनेच्या लढ्याचें नेतृत्व महाराष्ट्रांतल्या काँग्रेसवाल्यांनीं मुळीं सोंपवावयाचेंच नव्हतें. काकासाहेब हा काय किंमतीचा माणूस आहे ह्याची महाराष्ट्रांतल्या लोकांना अद्याप ओळख पटूं नये ह्याचेंच आम्हांला राहून राहून आश्चर्य वाटतें. 'विषय-नियामक समिती'मध्यें भाषावार प्रांतरचनेचा नेहरूप्रणीत ठराव मांडतांना काकांनीं जे 'अकलेचे तारे' तोडले ते मासलेवाईक होते. ते म्हणाले, "पूर्वी दिलेल्या वचनांना काँग्रेसमधला कोणीहि जबाबदार माणूस हरताळ फासील असें मला वाटत नाहीं. आंध्र प्रांताची निर्मिति ही काँग्रेसच्या जाहीरनाम्यांतल्या धोरणा-प्रमाणेंच झाली. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाला फार महत्त्व

आलेलें आहे. एकवीस सालापासून कॉंग्रेस भाषिक प्रांतांचा पुरस्कार करते आहे. प्रस्तुतचा ठराव हा निष्क्रियतेचा द्योतक नसून तो अंमलबजावणीच्या क्रियाशील कार्यक्रमाचाच एक भाग आहे. तथापि, भाषिक प्रांत निर्माण करतांना राष्ट्राचें ऐक्य, सुरक्षितता आणि संरक्षण ह्या गोष्टींकडेहि आपण लक्ष दिलें पाहिजे, नाहीं तर देशावर फार मोठें संकट कोसळेल. म्हणून ह्या बाबतींत आपण आपलीं पावलें हळूहळू आणि सावधगिरीनें टाकलीं पाहिजेत. आंध्र प्रांताची निर्मिति स्थिर होईपर्यंत भाषिक प्रांतांचा प्रश्न तहकूब केला जाईल ह्याचा अर्थ त्याला कायमचा पूर्णविराम घातला जाईल असा नव्हे. पण यथाकाल परिस्थिति जशी अनुकूल होईल तसा तो प्रश्न पुन्हा हातीं घेतला जाईल. आंध्र प्रांत स्थिर करण्याचा, आंध्राचे नेते योग्य तो प्रयत्न करतीलच. इतर भाषिक प्रांत होऊंच नयेत, म्हणून आंध्राचा प्रयोग फसावा असें का नेहरूंना वाटतें? भाषिक प्रांतांचा विचार करतांना पंचवार्षिक योजनेकडे दुर्लक्ष करून भागणार नाहीं. पंचवार्षिक योजनेच्या यशापयशावर कॉंग्रेसचें भवितव्य अवलंबून आहे!" काकासाहेबांच्या ह्या भाषणांतलें प्रत्येक अक्षर अन् अक्षर असत्य आणि अप्रामाणिकपणाचें आहे. त्यांच्या प्रत्येक विधानाच्या अक्षरशः चिंधड्या उडवितां येतील. मंत्रिपद मिळविण्याच्या आशेनें काकासाहेबांनीं नेहरूंची एवढी किळसवाणी लाचारी पत्करावी ह्याचें आम्हांला सर्वांत दुःख होतें. भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाचा काकासाहेबांनीं अशा रीतीनें विश्वासघात केल्यानंतर त्याची अब्रू सांभाळण्याचें काम म्हैसूरचे मुख्य प्रधान श्री. हनुमंतय्या ह्यांना करावें लागलें. हनुमंतय्यांनीं मात्र नेहरूंवर असा कडकडून हल्ला चढविला कीं विचारूंच नका. ते म्हणाले, "संबंधित भाषिकांनीं आपापसांत तडजोड घडवून आणून भाषिक प्रांतांची मागणी करावी हें नेहरूंचें म्हणणें वेव्हेल आणि लिनलिथगो ह्यांना शोभण्यासारखें आहे. भाषिक प्रांतांचा प्रश्न आपणाला 'माऊंटबॅटन'च्या तंत्राप्रमाणेंच सोडवला पाहिजे. सध्यांची भारताची प्रांतरचना अत्यंत चुकीची आहे. आज कूर्ग आणि अजमेरसारखे अत्यंत छोटे प्रांत भारतांत आहेत, तर उत्तरप्रदेश आणि बिहारसारखे प्रचंड प्रांतहि येथें आहेत. म्हणून सीमा समितीची नेमणूक करण्यांत येऊन प्रत्येक प्रांताच्या हद्दी ताबडतोब निश्चित करण्यांत आल्या पाहिजेत." हनुमंतय्यांप्रमाणेंच म्हैसूरच्या कॉंग्रेसवाल्यांनीं भाषावार प्रांतरचनेचा आवेशानें पुरस्कार केला, त्यामुळें नेहरू खूपच चिडले. आणि "संयुक्त कर्नाटकाला म्हैसूरच्या कायदेमंडळाचा विरोध आहे!" असा त्यांनीं

त्यांच्यावर बॉम्बगोळा टाकला. मौलाना आझाद आणि राजगोपालचारियर ह्यांनीं ठरावाच्या बाजूनें भाषणें केलीं. आझाद म्हणाले, "भाषिक प्रांतरचनेचें तत्त्व कॉंग्रेसनें मान्य केलें आहे हें काय कमी आहे? आतां ह्या बाबतींत व्यावहारिक अडचणी अनेक आहेत. उगाच डोकें फिरवून घेण्यांत अर्थ नाहीं!...भाषेच्या तत्त्वावर देशाची विभागणी करणें ही घोडचूक आहे, एवढेंच नव्हे तर 'भाषावार प्रांतरचने'ची कल्पना शुद्ध 'जंगली' (Tribal) आहे! हें तत्त्व कॉंग्रेसनें पूर्वी मान्य केलेलें आहे असा युक्तिवाद करण्यांत काय अर्थ आहे? पूर्वी आपण चुका केल्या असल्या तर त्या आतां सुधारल्या पाहिजेत!" नेहरूंना खूष करण्याच्या शर्यतींत अशा रीतीनें राजाजींनीं काकाजींच्यावर मात केली! त्यांनीं भाषिक प्रांतरचनेची कल्पना सरांस 'जंगली' ठरवून टाकली! काका गाडगीळांचें खाजगी नांव 'जंगल्या गाडगीळ' आहे खरें; पण भाषावार प्रांतरचनेची बदनामी करण्याचा हा 'जंगली' विचार त्यांच्या डोक्यांत सुद्धां आला नाहीं!

विषयनियामक समितींत भाषिक प्रांताच्या प्रश्नाबाबत काकासाहेबांनीं असा अवसानघात केला म्हणून बहुसंख्य कॉंग्रेसवाले त्यांच्यावर खूपच चिडले. म्हणून उघड अधिवेशनांत हा ठराव पुन्हा मांडण्याची त्यांची छाती झाली नाहीं. तें काम मौलाना आझाद ह्यांनाच करावें लागलें. त्यांना फक्त पाठिंबा देण्याचें काम काका गाडगीळांनीं केलें. आपल्या मुख्य भाषणांत भाषिक प्रांतांच्या प्रश्नाला आझादांनीं कडाडून विरोध केला. ते म्हणाले, "भाषिक प्रांतांचा प्रश्न दीर्घकालपर्यंत किंवा कायमचा स्थगित करणें इष्ट नाहीं हें तत्त्व कॉंग्रेसनें मान्य केलें आहे. पण पुढील चार किंवा पांच वर्षें आतां इतर भाषिक प्रांतांच्या निर्मितीचा प्रश्न हातीं घ्यावयाचा नाहीं, असें आम्हीं ठरविलें आहे. म्हणून तशा तऱ्हेची मागणी आतां कोणी करील तर त्याला आम्ही निकरानें विरोध करूं. 'मार्गदर्शक समिती'मध्यें ह्या एका प्रश्नाचा आम्हीं जास्तींत जास्त विचार केला आहे. आमच्यांतले कांहीं लोक म्हणतात कीं, आंध्र प्रांताची निर्मिति झाल्यानंतर आतां हा भाषिक प्रांतांचा प्रश्न कायमचा स्थगित करून टाका, तर कांहींचें म्हणणें असें आहे कीं, अशा तऱ्हेनें या प्रश्नाची वासलात लावणें बरोबर होणार नाहीं. शेवटीं असें ठरलें कीं, आंध्र प्रांताचा प्रयोग कसा काय यशस्वी होतो आहे, तें पाहून मग बाकीच्या भाषिक प्रांतांचा प्रश्न हातीं घेण्यांत यावा. मद्रास शहराचा वाद निर्माण झाला नसता तर आंध्र प्रांताची निर्मिति दोनतीन वर्षांपूर्वींच झाली असती.

संबंधित भाषिकांनीं एकमुखानें भाषिक प्रांताची मागणी करायला हवी; ह्याखेरीज देशाचें ऐक्य, सुरक्षितता आणि संरक्षण ह्यांचाहि विचार व्हावयालाच हवा. शिवाय नवीन प्रांतांचा खर्च कसा भागवावयाचा ह्याचीहि सोय करावयाला हवी. सध्यांच्या परिस्थितींत भाषिक प्रांतांचा विचार करणें हें मुळींच देशहिताचें नाहीं, असें आमचें निश्चित मत आहे. लोकांचें जीवनमान कसें सुधारावयाचें, दारिद्र्य आणि बेकारी कशी नष्ट करावयाची हे प्रश्न आज प्रामुख्यानें आपल्यापुढें आहेत. पंचवार्षिक योजना तेवढ्यासाठींच तयार केली आहे. तेव्हां ती योजना पूर्ण करण्याच्या कामीं देशानें आपली सर्व शक्ति खर्च केली पाहिजे; अशा परिस्थितींत भाषिक प्रांताचा वाद घालीत बसणें राष्ट्रघातकीपणाचें आहे, म्हणून भाषिक प्रांताचा लढा जर ह्या वेळीं कोणीं निर्माण केला तर त्याला आम्ही तत्काळ प्रतिबंध केल्यावांचून राहणार नाहीं. ह्या प्रश्नाचा भावनेनें विचार करून चालणार नाहीं, बुद्धीनें विचार केला पाहिजे. आपल्याला नवीन राष्ट्र घडवावयाचें आहे! भाषिक प्रांताची निर्मिति हा आजचा निकडीचा प्रश्न नाहीं!" मौलानांना दुजोरा देतांना शहाणपणाचा आणखीन् आव आणून काका गाडगीळ म्हणाले, "देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर देशांत ऐक्याची भावना निर्माण करणें ही सर्वांत जास्त महत्त्वाची गोष्ट आहे. संस्थानें नष्ट करून सर्व देशाला एक कायदा, एक निशाण अन् एक नाणें देण्यांत आलें. इतिहासाच्या दृष्टीनें ही अपूर्व गोष्ट झाली. कोणी म्हणतात, हा आमचा ठराव म्हणजे एक 'फार्स' आहे. मी सांगतों, हा 'फार्स' नाहीं—हा पुढील मार्ग दाखविणारा फलक आहे. दूरदृष्टीनें आपण वागलें पाहिजे. विचारपूर्वक धोका पत्करला पाहिजे. अनेकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेनें ह्या देशाची फाळणी करूं पाहणाऱ्यांचें कारस्थान आपण हाणून पाडलें पाहिजे." भाषिक प्रांताचे पुरस्कर्ते हे ह्या देशामधले अनेक राष्ट्रीयत्वांच्या कल्पनेचा पुरस्कार करून देशाच्या ऐक्याचें वाटोळें करण्यासाठीं टपून बसलेले आहेत, असें त्यांचें वर्णन करून काकासाहेबांनीं त्यांची आतां अधिक बदनामी करायचें कांहींएक बाकी ठेवलेलें नाहीं. भाषिक प्रांतांच्या कल्पनेची विटंबना करण्याच्या कामीं शेवटीं शेवटीं कॉंग्रेसश्रेष्ठींमध्यें एवढी चढाओढ लागली कीं जें सुचेल तें त्यांनीं ह्या पर्वणींत बोलून घेतलें आणि नेहरूदेवांना प्रसन्न करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. अशा रीतीनें हैदराबादच्या कॉंग्रेस अधिवेशनांत भाषिक प्रांतरचनेचा मुद्दा पुढील पांच वर्षेपर्यंत तरी खड्डयांत गाडून सर्व कॉंग्रेसवाले कृतकृत्य होऊन घरोघर परतले. हैदराबादचें भाषिक

विसर्जन करण्याच्या प्रश्नाला तर स्पर्श करण्याचेंहि धैर्य त्यांना झालें नाहीं. देशाचें ऐक्य, सुरक्षितता आणि संरक्षण ह्यांचा भलताच बागुलबुवा करून कॉंग्रेसनें जनतेच्या लोकशाही हक्काला सपशेल हरताळ फासला. जनतेमधलीं जातीय भांडणें पेटवत ठेवून स्वतःचें आसन स्थिर राखणें हा जसा ब्रिटिश राज्यकर्त्यांचा उद्योग होता, त्याप्रमाणें देशांतले भाषिक आणि सांस्कृतिक मतभेद विकोपास नेऊन सर्व सत्तेचीं सूत्रें स्वतःच्या हातीं राहावींत म्हणून मिश्रभाषिक प्रांत आहेत तसेच कायम ठेवणें हें कॉंग्रेसश्रेष्ठांना आपल्या फायद्याचें वाटतें हें उघड आहे. पंचवार्षिक योजनेवर राष्ट्राची शक्ति केंद्रित व्हावी म्हणून भाषिक प्रांतांचा प्रश्न बाजूला सारण्याचें कॉंग्रेसचें धोरण शुद्ध आत्मघातकीपणाचें आहे. कारण जनतेची भाषिक प्रांतांची मागणी कॉंग्रेसनें मान्य केल्याखेरीज पंचवार्षिक योजनेबाबत तिला काडीचेंहि आकर्षण वाटणार नाहीं, हें सत्य आहे. केवळ सत्तेच्या आणि दिखाऊ लोकप्रियतेच्या जोरावर जनतेची लोकशाही मागणी खुशाल लाथाडून देण्याचें जें घोर पातक पंडित नेहरू आणि त्यांचे सहकारी आज करीत आहेत, त्याचें प्रायश्चित्त यथाकाल इतिहासाकडून त्यांना मिळाल्यावांचून राहणार नाहीं ही काळ्या दगडावरची रेघ आहे. भाषिक प्रांताच्या मागणीला ह्यापुढें आतां असा कांहीं जोर चढणार आहे कीं, त्याला प्रतिबंध करण्याच्या कोरड्या धमक्या देणारे सर्व थेरडे कॉंग्रेसश्रेष्ठ कोठल्या कोठें भुसकटासारखे हवेंत उडून गेल्यावांचून राहणार नाहींत! आम्हांला गंमत वाटते ती महाराष्ट्रांतल्या पुढाऱ्यांची. खुद्द कॉंग्रेसच्या अधिवेशनांत तोंडाला पलिस्तर मारून गप्प बसलेले हिरे हैदराबादहून परत आल्यानंतर नाक वर करून मोठ्या दिमाखानें सांगूं लागले आहेत कीं, "भाषिक प्रांतांचा लढा ह्यापुढें अधिक जोरानें चालणार!" ही घोषणा ऐकून हसावें कीं रडावें हेंच मुळीं कळत नाहीं! काका गाडगीळांनीं तर ह्या सर्व प्रकरणांत जी 'कामगिरी' बजावली आहे ती 'अविस्मरणीय' आहे! एवंच कॉंग्रेसश्रेष्ठांनीं भाषावार प्रांतरचनेला निकराचा विरोध करावयाचें ठरविल्यानें आणि त्यांच्याशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य आमच्या कचखाऊ आणि अवसानघातकी 'महाराष्ट्रीय' कॉंग्रेस पुढाऱ्यांच्या अंगीं मुळींच नसल्यानें भाषावार प्रांतरचनेचा लढा ह्यापुढें महाराष्ट्रांतल्या कॉंग्रेसेतर पक्षांनींच संघटित होऊन लढवण्याचा निश्चय केला पाहिजे, हा हैदराबादच्या कॉंग्रेस अधिवेशनाचा थोडक्यांत निष्कर्ष आहे.

२५-१-१९५३

# वाटाणे आणि मूग !

महाराष्ट्राच्या दुष्काळग्रस्त विभागाची प्रत्यक्ष पाहणी करण्यासाठीं पंतप्रधान पंडित नेहरू हे गेल्या मंगळवारीं बेळगांव येथें येऊन प्रथम दाखल झाले. आपल्या ह्या दौऱ्याचा प्रारंभ बेळगांवपासून पंडित नेहरूंनीं जो केला, त्याचें विशेष कारण हें कीं, कर्नाटकांतील भाषिक प्रांतरचनेच्या पुरस्कर्त्यांनीं गेल्या महिन्यांत 'संयुक्त कर्नाटका'च्या चळवळीला जें प्रखर आणि गंभीर स्वरूप दिलें कीं ज्याचे भीषण पडसाद हुबळी येथें उमटले, त्यावर 'संयुक्त कर्नाटका'च्या निर्मितीसंबंधीं एखाद्या थंडगार घोषणेचें जलसिंचन करून महाराष्ट्रांत जातां जातां कन्नडिगांचा संताप तरी शांत करावा. ज्या बेळगांवसंबंधीं महाराष्ट्र आणि कर्नाटक ह्यांच्यामध्यें वाद आहे, तीच विवाद्यभूमि 'संयुक्त कर्नाटक'-निर्मितीबाबत घोषणा करण्यासाठीं नेहरूंनीं निवडावी ह्यांतहि कांहीं दुसरें एकादें राजकारण नसेल असें निश्चितपणें आम्ही सांगूं शकणार नाहीं. म्हणून बेळगांवला आल्यानंतर नेहरूंनीं पहिलें जें काम केलें तें हें कीं, त्यांनीं कर्नाटक प्रदेश कॉंग्रेस समितीच्या शिष्टमंडळाला मुलाखत दिली. 'संयुक्त कर्नाटक' निर्मितीबाबत ह्या शिष्टमंडळानें पंडित नेहरूंना एक लेखी निवेदन सादर केलें. स्वतंत्र आंध्र प्रांतांत संपूर्ण बेल्लारी जिल्ह्याचा जो समावेश करण्यांत आलेला आहे, तो ताबडतोब रद्द करण्याची जोरदार मागणी ह्या निवेदनांत कन्नडिग कॉंग्रेसवक्त्यांनीं केली. ते म्हणाले, "बेल्लारी हा निर्विवादपणें कर्नाटकाचा भाग आहे. म्हणून त्याबाबत चौकशी करण्यासाठीं मध्यवर्ती सरकारनें न्यायमूर्ति मिश्र ह्यांची जी नेमणूक केली आहे, ती अनावश्यक आहे. सरकारनें ती ताबडतोब मागें घ्यावी. सबंध बेल्लारी जिल्हा आंध्रामधून वगळण्याची सरकारची तयारी नसेल तर अदोनी, अलूर आणि रायदुर्ग ह्या तीनच वादग्रस्त तालुक्यांची चौकशी करण्यास न्या. मिश्र ह्यांना सांगण्यांत यावें. कन्नडिगांच्या हितसंबंधांना बळी देऊन आंध्र लोकांना खूष करण्याचें सरकारचें हें धोरण पाहून आमचा धीर

खचून गेला आहे. आंध्र लोक मोठे धूर्त आणि धोरणी आहेत. तुंगभद्रा योजनेमुळें सुपीक आणि समृद्ध होणारा बेल्लारी जिल्ह्याचा भाग गिळंकृत करण्यासाठीं त्यांचें हें कारस्थान आहे." ह्या शिष्टमंडळाला उत्तर देतांना नेहरू म्हणाले, "तुम्ही आपलें हें म्हणणें न्यायमूर्ति मिश्र ह्यांच्यापुढें मांडूं शकतां. केवळ बेल्लारी तालुक्याची चौकशी करण्यासाठीं जरी न्या. मिश्र ह्यांची नेमणूक झालेली असली, तरी इतर तीन विवाद्य तालुक्यांबाबत आपलें जें कांहीं म्हणणें असेल तें त्यांच्यापुढें मांडण्याला कन्नडिगांना कोणताहि प्रत्यवाय नाहीं. संयुक्त कर्नाटकाचा हा सर्वच प्रश्न दक्षिण भारताच्या राजकीय पार्श्वभूमीवरून तपासला पाहिजे." बेल्लारी तालुक्यासंबंधीं चौकशी करण्याबाबत न्या. मिश्र ह्यांची नेमणूकच मुळीं ज्या शिष्टमंडळाला अजिबात मान्य नव्हती, त्याला आपलें म्हणणें त्याच न्या. मिश्र ह्यांच्यापुढें मांडावयाला पंडित नेहरूंनीं सांगावें ही आम्हांला तरी एक मोठी अद्भुत आणि विनोदी घटना वाटते आणि केवळ बेल्लारी तालुक्याबद्दल चौकशी करण्याचाच ज्या न्या. मिश्र ह्यांना अधिकार देण्यांत आला आहे त्यांच्यापुढें त्या तालुक्याखेरीज इतर तीन विवाद्य तालुक्यांसंबंधींचें आपलें म्हणणें मांडावयाला नेहरूंनीं कन्नडिगांना सांगावें हें तर त्याहिपेक्षां अधिक हास्यास्पद आहे. नेहरू काय बोलतात हें त्यांचें त्यांनाच ठाऊक. तथापि, नेहरू कांहींहि बोलले तरी न्यायमूर्ति मिश्रांना कायद्याप्रमाणेंच वागावें लागेल. आपल्या अधिकाराच्या कक्षेबाहेर त्यांना सुतराम्‌हि जातां येणार नाहीं!

शिष्टमंडळाला दिलेल्या उत्तरावर अधिक तपशीलवार भाष्य पंडित नेहरूंनीं बेळगांवच्या आपल्या जाहीर भाषणांत केलें. ते म्हणाले, "भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वाला कॉंग्रेसनें आधींच मान्यता दिलेली आहे. पण काय वाटेल तें झालें तरी भारताचें ऐक्य अभंग राखलें पाहिजे. अंतःस्थ कलह आणि अलगपणाची प्रवृत्ति हा भूतकाळांत ह्या भारताचा शाप आहे. जनतेनें इतिहासापासून धडा शिकला पाहिजे. आणि आपापसांतील भांडणें थांबविलीं पाहिजेत. भांडणांमुळें राष्ट्राचें सामर्थ्य घटतें. हुबळी येथें परवां दंगल झाली. त्याबाबत मला हें सांगावयाचें आहे कीं, दंग्यांनीं आणि जबरदस्तीनें कांहीं राजकीय प्रश्न सुटणार नाहीं. कोणत्याहि प्रश्नाबाबतचा आपला निर्णय भारत सरकार उपासानें आणि हरताळानें बदलूं शकेल, अशी समजूत करून घेणें योग्य नाहीं. भाषिक प्रांतनिर्मितीच्या प्रश्नाला कोणाचाच मुळीं विरोध नाहीं. संयुक्त कर्नाटकांत दाखल होण्याबाबत म्हैसूरच्या जनतेचाच मूळ

विरोध होता. आतां नुकतीच त्यांनीं त्याबाबत मान्यता दिली आहे. म्हैसूरचे लोक जर तयार नाहींत, तर संयुक्त कर्नाटक काय त्यांच्यावर जबरदस्तीनें लादावयाचा ? भाषिक प्रांत बनवितांना लगतच्या प्रदेशावर त्याचे परिणाम होतात. अन् लोकांची तयारी नसतांना त्यांजवर निर्णय लादले तर त्याचे दुष्परिणाम होतात. परस्परांच्या मतैक्यानें आणि समजुतीनेंच हे प्रश्न सोडविले पाहिजेत. श्री पोट्टी रामलूंच्या मृत्यूमुळें आंध्रनिर्मितीला भारत सरकारनें मान्यता दिली ही समजूत खोटी आहे. त्यांच्या मृत्यूपूर्वीच तसें करावयाचें सरकारनें ठरविलें होतें. श्री. रामलूंच्या मरणामुळें आम्हीं घाबरून आंध्र निर्माण केला असें ज्यांना वाटतें त्यांना मी सांगतों, एवढें कांहीं आमचें राजकारण 'पोरकट' नाहीं. आमचें राजकारण 'पक्क' आहे, ही गोष्ट साऱ्या जगानें मान्य केली आहे. आपले प्रांतिक भेद विसरून लोकांनीं संपूर्ण राष्ट्राच्या विकासावर आपली बुद्धि आणि शक्ति केंद्रित करावी. पंचवार्षिक योजना यशस्वी करण्यासाठीं मला सर्व जनतेचें साहाय्य हवें आहे." एवढें सांगून झाल्यानंतर, 'संयुक्त कर्नाटका'बाबत पंडित नेहरूंनीं पुढीलप्रमाणें 'घोषणा' केली. ते म्हणाले, "आंध्र प्रांत निर्माण होऊन त्याचा कारभार निदान एक वर्षभर तरी नीट चालतो आहे कीं नाहीं, तें नीट पाहिल्यानंतर भाषावार प्रांतनिर्मितीबाबत एक 'सर्वशक्तिमान् मंडळ' नेमण्यांत येईल ! भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वावर प्रांतांची पुनर्रचना करण्याची शक्याशक्यता अजमावण्याचें आणि भाषिक प्रांत आर्थिकदृष्ट्या बळकट होतील कीं नाहीं हें पाहण्याचें काम ह्या कमिशनकडे सोंपविण्यांत येईल. अशा रीतीनें भाषिक प्रांतरचनेच्या प्रश्नाचा सर्वांगीण विचार करून त्याबाबत सदर कमिशन आपल्या शिफारसी सरकारला सादर करील. पण सरकार त्यासंबंधीं एक बिल तयार करील अन् लोकमत अजमावण्यासाठीं तें जाहीर करील !" भारताचे पंतप्रधान पंडित नेहरू ह्यांच्या तोंडून संयुक्त कर्नाटकासंबंधीं निश्चित अन् आशादायक घोषणा ऐकण्यासाठीं बेळगांवला आतुरतेनें जमलेल्या हजारों कन्नडिगांचीं तोंडें पंडित नेहरूंची ही ऐसपैस अन् पोकळ घोषणा ऐकून कशीं झालीं असतील ह्याची केवळ कल्पनाच केलेली बरी !

जलबिंदूसाठीं आतुरतेनें आभाळाकडे चोंची उघडून बसलेल्या तृषित चातकाच्या तोंडांत पर्जन्यधारा पडण्याऐवजीं त्याच्या डोक्यावर गारांची तडाखेबंद वृष्टि व्हावी, तशी नेहरूंच्या ह्या निवेदनानें स्थिति झाली असेल. आंध्र प्रांत ह्या वर्षाच्या अखेरीस अस्तित्वांत येणार. त्यानंतर एका वर्षानें म्हणजे चौपन्न सालच्य

अखेरीस सरकार 'भाषावार राज्य कमिशन' नेमणार. हें कमिशन चौकशी करावयास निदान दीड वर्ष तरी घेईल. त्यानंतर त्याच्या शिफारशींचा विचार करून बिल तयार करण्यास अन् त्या बिलावरील लोकमत अजमावून अन् त्याप्रमाणें त्यामध्यें दुरुस्त्या करून त्याचा कायदा होण्यास आणखी दोन-अडीच वर्षें तरी लागणार! म्हणजे संयुक्त कर्नाटक किंवा इतर भाषिक प्रांत निर्माण होण्यास कमींत कमी आणखी पांच वर्षें तरी लागतील! 'संयुक्त कर्नाटक' एका वर्षाच्या आंत निर्माण झाला पाहिजे अशा अहमहमिकेनें कंबरा बांधून बसलेल्या प्रक्षुब्ध कन्नडिगांना तर हा नेहरूंचा पांच वर्षांचा वायदा ऐकून हसावें कीं रडावें हेंच कळेनासें झालें असेल!

आम्हांला नेहरूंच्या ह्या घोषणेचें यत्किंचित्‌हि आश्चर्य वाटत नाहीं. भाषिक प्रांतरचनेबाबत हैदराबाद काँग्रेसच्या अधिवेशनांत त्यांनीं जी भूमिका घेतली होती, तिचीच त्यांनीं बेळगांवला जाहीरपणें पुनरुक्ति केली. दुसरें काय? भाषिक प्रांतरचनेमुळें पंचवार्षिक योजनेच्या प्रगतीमध्यें अडथळे उत्पन्न होतील, म्हणून पंचवार्षिक योजना सत्यसृष्टींत येईपर्यंत भाषिक प्रांतनिर्मितीचा हा प्रश्न सपशेल स्थगित केला जाईल असें नेहरूंनीं हैदराबाद येथें स्पष्टपणें सांगितलें होतें. तेंच पालुपद निराळ्या रागांत अन् निराळ्या तालावर त्यांनीं बेळगांव येथें गाऊन दाखविलें. दुसरें काय? स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भाषिक प्रांतरचनेबद्दल काँग्रेसची जी अधिकृत भूमिका होती ती पंडित नेहरूंनीं सोडून दिली आणि शुद्ध विरोधाची भूमिका पत्करली हें सत्य कितीहि अप्रिय असलें तरी तें मान्य करण्यावांचून गत्यंतरच नाहीं. भाषिक प्रांतांविरुद्ध पंडितजींचें मन कलुषित करण्यांत वल्लभभाई पटेल आणि श्री. कन्हय्यालाल मुनशी ह्यांचा फार मोठा भाग आहे हेंहि तितकेंच सत्य आहे. 'दार समिती'च्या अहवालांत काँग्रेसश्रेष्ठींच्या ह्या भाषिक प्रांतविरोधाचें स्पष्ट प्रतिबिंब पाहावयाला सांपडतें. जयपूर काँग्रेसपासून तों हैदराबाद काँग्रेसपर्यंत काय वाटेल तें झालें तरी भाषिक प्रांत होऊं द्यावयाचे नाहींत असेंच एक धोरण काँग्रेसश्रेष्ठांनीं अगदीं कटाक्षानें पत्करलेलें दिसतें. पोट्टी रामलूंच्या मृत्यूनें घाबरून जाऊन कांहीं आम्ही भाषिक आंध्राची निर्मिति केली नाहीं, असा जो खुलासा पंडित नेहरूंनीं बेळगांवच्या भाषणांत केला आहे तो शुद्ध कांगावखोरपणाचा आहे. स्वतंत्र आंध्र म्हणजे रामलूंच्या आत्म्याला काँग्रेसनें दिलेलें पिंडदानच होय ह्या डॉ. आंबेडकरांच्या टीकेला उत्तर देण्याचा नेहरूंनीं प्रयत्न केला आहे. 'स्वतंत्र

आंध्र ' निर्माण करण्याचा निर्णय जर भारत सरकारनें रामलूंच्या मृत्यूच्या अगोदर घेतला होता तर त्यावेळींच तो जाहीर करण्याचा शहाणपणा त्यांनीं कां दाखविला नाहीं? रामलूंच्या मृत्यूनंतर जेव्हां आंध्रांतील जनता प्रक्षुब्ध झाली तेव्हां स्वतंत्र आंध्राची घोषणा करण्याची अन् त्यासाठीं न्या. वांछू ह्यांची नेमणूक करण्याची घिसाडघाई पंडित नेहरूंनीं कां केली? वाघ पाहिल्यानंतर धोतर पिवळें झालेल्या माणसानें आज आपण सकाळीं जुलाब घेतला होता असें सांगितलें, तर त्यावर कोणाचा विश्वास बसेल? तसं नेहरूंचें हें निवेदन आहे. उपोषणांनीं, हरताळांनीं किंवा दंगलींनीं आपल्या निर्णयावर कांहींहि परिणाम होऊं शकणार नाहीं, ही नेहरूंची घमेंडहि पोकळ आहे. दंगलीला अन् अत्याचारांना नेहरू अन् कॉंग्रेसश्रेष्ठी घाबरतात अन् मग दंगखोरांना कमरेचें सोडून सुद्धां देतात, असा आतांपर्यंतचा इतिहास आहे. मुस्लीम लीगनें नुसत्या धमक्यांच्या अन् अत्याचारांच्या जोरावर कॉंग्रेसश्रेष्ठींकडून पाकिस्तानला मान्यता मिळविली. रामलूंच्या बलिदानानें अन् त्यानंतर आंध्रांत उडालेल्या भडक्यानें कॉंग्रेस सरकारची जेव्हां अब्रूच जाण्याची वेळ आली, तेव्हां ती वांचविण्यासाठीं नेहरूंना स्वतंत्र आंध्राची घोषणा करणें भागच पडलें! दंगे अन् अत्याचार केले कीं कॉंग्रेस सरकारकडून काय वाटेल तें उपटतां येतें ही गोष्ट आतां इतकी जगजाहीर झाली आहे कीं, नेहरूंनीं आतां त्याबद्दल कितीहि मखलाशी केली तरी त्याचा कांहींहि उपयोग होणार नाहीं. हुबळीला जी दंगल झाली ती ह्याच भावनेनें झाली. बाकी गांधीजीप्रणीत उपोषणांच्या अन् हरताळांच्या मार्गानें ज्या भारताला स्वातंत्र्य मिळालें, त्या स्वतंत्र भारताच्या पंतप्रधानानें उपोषणांचा अन् हरताळांचा आपल्या सरकारवर कांहींएक परिणाम होणार नाहीं असें आतां संभावितपणें सांगणें ह्यापेक्षां गांधीजींच्या अहिंसात्मक तत्त्वज्ञानाची अधिक विटंबना होणें शक्य आहे काय? भाषिक प्रांतामुळें भारताच्या ऐक्याला बाध येण्याचें भय आहे, हा नेहरूंचा आवडता सिद्धांत म्हणजे एक धादांत असत्य आहे. त्याला उत्तर देण्याच्या देखील तो लायकीचा नाहीं. कोणताहि भाषिक प्रांत जनतेच्या इच्छेविरुद्ध तिजवर लादणें हें घातक आहे हें नेहरूंचें म्हणणें ढोंगीपणाचें आहे. एका प्रदेशांतील लक्षावधि भाषिक भाषावार तत्त्वावर आमच्या प्रांताची पुनर्रचना करा अशी सरकारजवळ मागणी करीत असतांना तिजकडे दुर्लक्ष करून सीमाविभागां-तील इतर कांहीं अल्पसंख्य भाषिकांचा त्या मागणीला विरोध आहे एवढ्या एका

कारणावर ती धुडकावून लावावयाची हा कांहीं प्रामाणिकपणा नव्हे! ह्या बाबतींत 'फोडा आणि झोडा' ह्याच कुटिल नीतीचा पंडित नेहरू अंगीकार करीत आहेत असें आम्ही स्पष्टपणें म्हणतों!

त्रेपन्न सालच्या ऑक्टोबरांत स्वतंत्र कर्नाटकाची घोषणा व्हावयाला पाहिजे अन् चौपन्न सालच्या ऑक्टोबरांत स्वतंत्र कर्नाटक अस्तित्वांत आला पाहिजे, अशी कर्नाटक कॉंग्रेसनें मध्यवर्ती सरकारला ताकीद दिलेली होती. तिला नेहरूंनीं बेळगांवच्या भाषणांत अशा रीतीनें सरळ वाटाण्याच्या अक्षता लावल्या. नेहरूंच्या ह्या भाषणानें कन्नडिग अत्यंत नाखुष झालेले आहेत आणि त्यांची प्रतिक्रिया येत्या आठवड्यांतच दिसून आल्यावेरीज राहणार नाहीं. स्वतंत्र आंध्रप्रांत निर्माण झाल्यापासून 'संयुक्त कर्नाटका'च्या चळवळीला विलक्षण जोर चढलेला आहे. आणि येत्या ऑक्टोबरमध्यें 'स्वतंत्र आंध्र' अस्तित्वांत आल्यानंतर मग निराश झालेल्या कन्नडिगांच्या संतापाला तर सीमाच राहणार नाहीं! आंध्राच्या पावलावर पाऊल टाकून 'संयुक्त कर्नाटक' मिळविण्याचा कन्नडिगांनीं मुळीं निश्चयच केला आहे. आंध्रांत एक रामलू निर्माण झाला; पण संयुक्त कर्नाटकासाठीं बलिदान करण्याची पांचसहा कानडी 'रामलू'नीं तरी तयारी करून ठेवल्याचें आम्हीं ऐकलेलें आहे. अशा रीतीनें प्राणांतिक उपोषणें, हरताळ अन् कॉंग्रेसचे राजिनामे ह्यांचा एकसारखा भडिमार कर्नाटकानें उडवून दिल्यानंतर त्यापुढें पंडित नेहरूंचा किती टिकाव लागतो हें पाहावयाला पाहिजे! संयुक्त कर्नाटकाच्या निर्मितीसाठीं कन्नडिगांच्या आकांक्षांचा अन् प्रयत्नांचा पारा एवढा उंच चढला असतां 'स्वतंत्र महाराष्ट्रा'ची चळवळ मात्र महाराष्ट्रामध्यें गोठून 'हिमबिंदू'च्या खालीं जाऊन बसली ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. महाराष्ट्राचें हें पाणी नेहरूंनीं कधींच ओळखलें आहे. म्हणून महाराष्ट्रांत येऊनहि त्यांनीं 'संयुक्त कर्नाटका'चा उल्लेख केला, पण 'संयुक्त महाराष्ट्रा'बद्दल त्यांनीं अक्षरसुद्धां उच्चारलें नाहीं. वस्तुतः महाराष्ट्रांत नेहरू जे आले आहेत ते महाराष्ट्रांतल्या दुष्काळी भागाची पाहणी करण्यासाठीं; पण ह्या सहासात दिवसांच्या आंत फुलांचा, हारांचा अन् सत्कारांचा लक्षावधि महाराष्ट्रीयांनीं नेहरूंवर जो अमाप वर्षाव केला, त्यामुळें महाराष्ट्रामध्यें भयंकर दुष्काळ पडला आहे ह्याची नेहरूंना जाणीवसुद्धां होणार नाहीं. आपल्याला पाहण्यासाठीं अन् आपली पूजा करण्यासाठीं लक्षावधि महाराष्ट्रीय तासन् तास रस्त्याच्या कडेला उभे राहतात किंवा

कडक उन्हामध्यें बसतात हें पाहिल्यानंतर महाराष्ट्रांतले लोक सुखी अन् संतुष्ट आहेत अशी नेहरूंची कल्पना झाल्याखेरीज राहणार नाहीं. सबंध दौऱ्यांत 'संयुक्त महाराष्ट्र 'संबंधीं एक अक्षरहि नेहरूंच्या कानावर पडूं नये अशी व्यवस्था करण्यांत आलेली आहे. त्यामुळें भाषिक प्रांतरचनेबाबत महाराष्ट्राला यत्किंचित्‌हि उत्सुकता वाटत नाहीं अशीच समजूत करून घेऊन नेहरू दिल्लीला जातील! महाराष्ट्राचें दुःख आणि दैन्य समजावून घेण्यासाठीं आलेल्या भारताच्या पंतप्रधानाला महाराष्ट्राच्या हृदयाची ओळखसुद्धां पटणार नाहीं ह्या कल्पनेनें आमचें अंतःकरण शतशः विदीर्ण होत आहे. एवंच, एवढा सहा दिवसांचा तुफानी दौरा काढून नेहरूंनीं काय केलें, तर कर्नाटकाला वाटाणे अन् महाराष्ट्राच्या हातांत मूग ठेवले!

३-५-१९५३

# नेहरू आले कशाला ?

दुष्काळग्रस्त महाराष्ट्राची प्रत्यक्ष पाहणी करण्यासाठीं भारताचे पंतप्रधान पंडित नेहरू हे महाराष्ट्रामध्यें सहा दिवसांचा झंझावाती दौरा काढून गेले. ह्या सहा दिवसांत निरनिराळ्या ठिकाणीं नेहरूंनीं काय काय भाषणें केलीं याचा सुसंगत आणि क्रमवार वृत्तांत आम्हीं पंधरा दिवसांपूर्वी आमच्या वाचकांपुढें ठेवलेला होता. नेहरूंचें दर्शन घेण्यासाठीं आणि त्यांचा सत्कार करण्यासाठीं महाराष्ट्रांतल्या भोळ्या आणि अजागळ लोकांनीं त्यांच्याभोंवतीं ह्या सहा दिवसांत एवढी गर्दी करून ठेवली कीं, नेहरू महाराष्ट्रांत कशासाठीं आले आहेत या गोष्टीचा महाराष्ट्रीय जनतेला तर विसर पडलाच, पण खुद्द नेहरूंनाच त्या गोष्टीची कितपत आठवण राहिली असेल ह्याची शंका आहे. विभूतिपूजा ही भारतीय जनतेच्या रक्तामधूनच मुळीं वाहते आहे. त्यामुळें विचार करण्याचा वकूबच तिच्या बुद्धीमध्यें निर्माण होऊं शकत नाहीं. नेहरूंच्या या दौऱ्यांत महाराष्ट्रीय जनतेनें विभूतिपूजनाचा अतिरेक करून आपल्या बौद्धिक दुर्बलतेचें अत्यंत केविलवाणें प्रदर्शन केलें. ह्याचा परिणाम नेहरूंच्या मनावर व्हावयाचा तोच झाला. त्यांनीं आपल्या दौऱ्याचा उपसंहार जळगांव येथें करतांना महाराष्ट्रांतल्या दुष्काळाबद्दलचा आपला अभिप्राय स्पष्टपणें व्यक्त केला कीं, "भारतामधल्या इतर दुष्काळी प्रदेशाच्या मानानें महाराष्ट्रांतल्या दुष्काळी प्रदेशामधल्या लोकांची स्थिति पुष्कळच चांगली आहे." नेहरूंच्या ह्या सहा दिवसांच्या दौऱ्यांत एकहि 'अस्थिपंजर' माणूस त्यांना दुष्काळग्रस्त महाराष्ट्रांत आढळून आला नाहीं. कसा आढळून येईल बरें ? नेहरूंचे कृपाकटाक्ष आपल्यावर पडावेत आणि आपण कृतार्थ व्हावें अशा हेतूनें जर शेकडों आशाळ भूतें त्यांच्याभोंवतीं एकसारखा गराडा धरून नाचत होतीं तर भुकेनें आणि टंचाईनें आसन्नमरण झालेलीं दुर्दैवी माणसें अन् जनावरें त्यांच्या दृष्टिपथांत यावींत कोठून ? महाराष्ट्रांत एवढा दुष्काळ पडला असतांना तो विसरून जाऊन आणि सणासुदीचे पोषाख अंगावर चढवून जर हजारों मराठे शेतकरी

नेहरूंच्या दर्शनाला येऊं शकतात, 'तर महाराष्ट्रांतले लोक मोठे रुबाबदार असून, संकटाला न डगमगतां धैर्यानें तोंड देण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं आहे' असा नेहरूंचा त्यांच्याबद्दल समज व्हावा हें साहजिकच आहे. घरांत आपली आई आसन्नमरण असतांना तिची प्रकृति पाहण्यासाठीं आपण डॉक्टराला तातडीनें बोलावणें पाठवावें आणि डॉक्टर घरांत आले असतांना त्यांना आईच्या बिछान्याकडे न जाऊं देतां बाहेर दिवाणखान्यांत बसवून आपण त्यांच्यावर आपल्या आतिथ्याचा यथेच्छ भडिमार करावा, म्हणजे आपल्या आईच्या प्रकृतीबद्दल डॉक्टरांची जी समजूत होईल, तशीच नेहरूंची दुष्काळांनीं पीडलेल्या महाराष्ट्रांतल्या जनतेबद्दल समजूत झाली असल्यास नवल नाहीं. फुलांचा आणि जयजयकारांचा महाराष्ट्रांत एवढा सुकाळ माजलेला पाहिल्यानंतर नेहरूंना महाराष्ट्रांतल्या दुष्काळाचा तडाखा विशेष जाणवूं नये यांत आश्चर्य तें काय?

सध्यां महाराष्ट्रांत पडलेल्या दुष्काळाकडे दोन तऱ्हेनें बघतां येण्यासारखें आहे. पहिली दृष्टि ही कीं चालू असलेल्या दुष्काळाला तोंड कसें द्यावयाचें आणि त्याच्या तडाख्यांत सांपडलेल्या जनतेला कसें वांचवावयाचें. आणि दुसरी दृष्टि ही कीं अशी दुष्काळी परिस्थिति पुन्हा महाराष्ट्रांत उद्भवूं नये यासाठीं कायम स्वरूपाची काय उपाययोजना करून ठेवावयाची? पहिल्या दृष्टिकोनामधून महाराष्ट्रांतल्या दुष्काळाकडे नेहरूंनीं बघण्याचेंच मुळीं नाकारलें. महाराष्ट्रामधल्या दुष्काळाचें स्वरूप तितकेंसें तीव्र नाहीं असें प्रथम त्यांचें मत पडलें आणि या दुष्काळनिवारणाबाबत मुंबई सरकारनें आतांपर्यंत जे उपाय योजले, ते त्यांना संपूर्णतया समाधानकारक वाटले. म्हणजे त्यांच्या दृष्टीनें महाराष्ट्रांतल्या चालू दुष्काळाचा प्रश्न मुळीं निकालांतच निघाला. एका दृष्टीनें तें बरोबरच आहे. भारताच्या पंतप्रधानानें घटक राज्यांतल्या दुष्काळाचा विचार काय म्हणून करावा? तो तेथल्या सरकारचा प्रश्न आहे. मग असें जर होतें तर महाराष्ट्रांतल्या दुष्काळी परिस्थितीची पाहणी करण्यासाठीं येथल्या सरकारनें नेहरूंना मुद्दाम पाचारण कां केलें? दुष्काळग्रस्त विभागांना भेटी देऊन नेहरू तेथें असें विशेष काय करणार होते कीं जें येथल्या सरकारला करतां येण्यासारखें नव्हतें? असा बारकाईनें विचार केल्यानंतर मग कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें आहे कीं महाराष्ट्रामधली दुष्काळी परिस्थिति पाहण्याच्या निमित्तानें नेहरूंना महाराष्ट्रांत बोलावण्याच्या मागें येथील सरकारचें कांहीं तरी विशिष्ट राजकारण असलें पाहिजे. दुष्काळनिवारणाबाबत

मुंबई सरकारनें योजलेले उपाय असमाधानकारक आहेत असें आमचें मुळींच म्हणणें नाहीं. ज्या तातडीनें आणि झपाट्यानें तें उपाय योजावयाला हवे होते त्या तऱ्हेनें त्यांची योजना सरकारनें केली नाहीं एवढा एकच महत्त्वाचा आक्षेप सरकारविरुद्ध घेण्यांत आला आणि त्याचाच गवगवा महाराष्ट्रांत विशेष झाला. महाराष्ट्रांतल्या दुष्काळानें अधिकारारूढ सरकार जनतेमध्यें विशेष अप्रिय झालें असाहि कांहीं भाग नव्हता. हा दुष्काळ पडण्याच्यापूर्वी आपल्या जनताविरोधी धोरणामुळें मुंबई सरकारनें स्वतःची भरपूर बदनामी करून घेतलेली आहे. तेव्हां दुष्काळी परिस्थितीची पाहणी करण्यासाठीं नेहरूंना महाराष्ट्रांत जर तातडीनें बोलावलें नाहीं तर मुंबई सरकारवर जनतेचा फार मोठा रोष ओढवेल अशी कांहीं खरोखर वस्तुस्थिति नव्हती. सर्वसामान्य तऱ्हेनें बोलावयाचें झाल्यास महाराष्ट्रांत काँग्रेसची प्रतिष्ठा दिवसेंदिवस ढासळत चाललेली आहे एवढेंच म्हणतां येईल. गेल्या निवडणुकींत महाराष्ट्रामध्यें काँग्रेसचा विजय झाला असला तरी पंचवार्षिक योजनेंत महाराष्ट्राला विशेष स्थान न मिळाल्यामुळें आणि 'संयुक्त महाराष्ट्र'-बद्दलची मराठी जनतेची एकमुखी मागणी काँग्रेसश्रेष्ठींनीं आजपर्यंत पद्धतशीरपणें डावलल्यामुळें, काँग्रेसला निवडणुकींत मतें देऊनहि तिच्याबद्दल सर्वसामान्य महाराष्ट्रीय जनतेचें मत कलुषित झालें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. महाराष्ट्राच्या मनामधली काँग्रेसबद्दलची ही खळमळ आमूलाग्र धुवून टाकण्यासाठीं म्हणूनच नेहरूंना पाचारण करण्यांत आलें असावें.

महाराष्ट्रांतल्या दौऱ्यामध्यें नेहरूंनीं जीं भाषणें केलीं त्यांत महाराष्ट्रामधल्या दुष्काळाचा मधून मधून ते उल्लेख करीत होते, नाहीं असें नाहीं. पण महाराष्ट्रांतल्या दुष्काळाकडे पाहण्याचा नेहरूंचा दृष्टिकोन तात्त्विक होता. पश्चिम खानदेशामध्यें भाषण करतांना ते म्हणाले, "दुष्काळी कामावर काम करणाऱ्यांनीं आपण नवभारताच्या उभारणीचें काम करीत आहोंत, अशा भावनेनें काम करावें. उद्यांची पिढी सुखानें जगावी म्हणून आजच्या दुष्काळाच्या आपत्काळांतहि तुम्ही जें काम करीत आहांत, तशा कठोर परिश्रमाच्या कामानेंच भारताचें भवितव्य उजळणार आहे. दुष्काळाच्या संकटाचा कायमचा नाश व्हावा या हेतूनें पंचवार्षिक योजना आंखलेली आहे. ही योजना हाच दुष्काळ टाळण्याचा खरा मार्ग होय!" देशांतील दुष्काळ नाहींसा व्हावा असें जर जनतेला वाटत असेल तर तिनें 'पंचवार्षिक योजने'ला पाठिंबा द्यावा हा नेहरूंच्या सर्व भाषणामधला मुख्य स्वर

होता. बेळगांव येथें बोलतांना नेहरू म्हणाले, “देशांत कांहीं ठिकाणीं दुष्काळी स्थिति आहे. तात्पुरत्या कामावर पैसा खर्च करण्यांत अर्थ नाहीं. भविष्यकाळीं दुष्काळ येऊं नयेत म्हणून आपण त्यासाठीं कायमचे इलाज केले पाहिजेत. पंचवार्षिक योजनेंत धान्योत्पादनास अग्रस्थान दिलें आहे. धरणाच्या आणि पाटबंधाऱ्यांच्या अनेक योजना त्यांत आहेत. त्या आपण आधीं पूर्ण केल्या पाहिजेत.” महाराष्ट्रांतला दुष्काळ कायमचा नेस्तनाबूत व्हावा म्हणून येथें ज्या धरणांच्या आणि पाटबंधाऱ्यांच्या योजना अंमलांत आणणें सर्वांना अगत्याचें वाटतें त्यांचा नेहरूंनीं आपल्या भाषणांत कुठेंहि उल्लेख केला नाहीं. महाराष्ट्रामधल्या ह्या योजनांना ‘पंचवार्षिक योजने’मध्यें कुठेंहि स्थान नाहीं, याची नेहरूंना जाणीव नसावी असें दिसतें. महाराष्ट्रांत दुष्काळ पडल्यानंतर आतां येथल्या विद्युदुत्पादनाच्या योजना कांहीं काळ बाजूला पडल्या तरी हरकत नाहीं. पण पाटबंधाऱ्यांच्या आणि पाणीपुरवठ्याच्या योजनांची आधीं अंमलबजावणी व्हावयाला पाहिजे हें मत येथें प्रभावी झालेलें आहे. त्या दृष्टीनें ‘पंचवार्षिक योजने’मध्यें महाराष्ट्राच्या पाटबंधाऱ्यांच्या आणि पाणीपुरवठ्याच्या योजनांना महत्त्वाचें स्थान मिळावयाला हवें होतें. बुभुक्षित माणसाचें पोट जसें काव्यरसानें भरत नाहीं, त्याचप्रमाणें ‘पंचवार्षिक योजने’चें महाकाव्य नेहरूंनीं कितीहि आळवून आळवून महाराष्ट्रामधल्या भुकेबंगाल लोकांपुढें गायिलें तरी त्यानें त्यांचें समाधान कसें होणार? नेहरू नुसते शाब्दिक सिद्धांत बोलत असतात. “मला दारिद्र्याविरुद्ध आणि निरक्षरतेविरुद्ध युद्ध हवें आहे. मला प्राचीन भारतामधून आधुनिक भारत निर्माण करावयाचा आहे. सर्व लोकांना विकासाची समान संधि मिळवून देणें हें आपलें पहिलें उद्दिष्ट आहे. देशांतील प्रत्येक आबालवृद्ध स्त्रीपुरुषांची स्थिति सुधारल्याखेरीज मी स्वस्थ बसणार नाहीं.” ह्या नेहरूंच्या एकाहिपेक्षां एक उदात्त आणि गगनचुंबी घोषणा ऐकल्यानंतर भाविक श्रोत्यांच्या अंगांवर त्या वेळीं तरी रोमांच उभे राहतात हें आम्हांला मान्य आहे. पण आशांची आणि आकांक्षांची नुसती देदीप्यमान आतषबाजी दाखवून कांहीं राज्यकारभार चालत नाहीं. नुसत्या बोलाच्या कढीनें जनतेचें पोट कसें भरणार? आम्ही असें लिहितों खरें; पण या देशांतले लोकहि मोठे विचित्र आहेत. नुसत्या शब्दांनीं सुद्धां त्यांचीं पोटें भरतात. दुष्काळग्रस्त महाराष्ट्रावर केवळ व्याख्यानांची वृष्टि करून नेहरू निघून गेले! पण तेवढ्यानेंच महाराष्ट्र बेहद्द खूष होऊन गेला आणि दुष्काळाचें संकट विसरून गेला.

'पंचवार्षिक योजने'चा नेहरूंनीं आपल्या दौऱ्यांत ज्याप्रमाणें पुरस्कार केला, त्याप्रमाणें भाषिक प्रांतरचनेविरुद्धहि नेहरूंनीं ठिकठिकाणच्या भाषणांमध्यें कांहीं कमी वक्तव्य केलें नाहीं. रत्नागिरीच्या भाषणांत ते म्हणाले, "ह्याच रत्नागिरी जिल्ह्यानें मोठमोठे नेते निर्माण केले. अखिल देशासाठीं त्यांनीं आयुष्य वेचलें. प्रांतासाठीं किंवा जिल्ह्यासाठीं त्यांनीं संकुचित कार्य केलें नाहीं. देशाच्या प्रगतींतच आपल्या जिल्ह्याची प्रगति आहे हें लक्षांत ठेवा. फुटीर वृत्तींत राष्ट्राचा नाश आहे." कोल्हापूरच्या व्याख्यानांत ते म्हणाले, "जातीयतेप्रमाणें प्रांतीयताहि आपल्या देशाला हानिकारक आहे." सोलापूरच्या भाषणांत तर भाषिक प्रांतावर त्यांनीं कडकडून हल्ला चढविला. ते म्हणाले, "प्रांतवादी मनोवृत्तीनें अनेकांना पछाडलेलें आहे. ते भाषावार राज्यांचें तुणतुणें वाजवीत असतात. देशामध्यें अनेक महत्त्वाचे प्रश्न 'आ' वासून उभे असतांना, असल्या गोष्टी बोलण्याचें लोकांना सुचतें तरी कसें? भाषावादावर आधारलेल्या असल्या मागण्या व्यापक देशहिताच्या नसतील, तर मुळींच मिळावयाच्या नाहींत." नगरच्या भाषणांत ते म्हणाले, "प्रादेशिकतेची भाषा मूर्खपणाची आणि आपली प्रगति खुंटविणारी आहे. आपलीं मनें विशाल, उदार, सहिष्णु आणि दयामय असलीं पाहिजेत!" चाळिसगांव येथें ते म्हणाले, "जिल्हा, तालुका किंवा प्रदेश ह्यापुरता संकुचित दृष्टिकोन भारतीयांनीं सोडून द्यावा." आपल्या दौऱ्यामध्यें पंडित नेहरू हे दुष्काळापेक्षां 'भाषिक प्रांतरचने'च्या विरुद्धच जास्त बोलले असें दिसून येईल. तें पाहिल्यानंतर नेहरू हे महाराष्ट्रांतल्या दुष्काळी विभागाची पाहणी करण्यासाठीं आले होते कीं 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या विरुद्ध प्रचार करण्यासाठीं आले होते, असा कोणालाहि भ्रम पडल्यावांचून राहणार नाहीं. 'संयुक्त महाराष्ट्रा'बाबत सर्व महाराष्ट्रीयांचें एक मत आहे. भाषिक महाराष्ट्राच्या निर्मितीला या महाराष्ट्रांत तरी कोणाचा विरोध नाहीं. असें असतां भाषिक प्रांत हा राष्ट्रघातकी फुटीरपणा आहे, प्रांतवादी मनोवृत्ति ही देशहितास विघातक आहे, असा असत्य आणि भ्रामक प्रचार महाराष्ट्रीय जनतेपुढें करण्याचें नेहरूंना काय कारण होतें बरें? भाषिक प्रांताबाबत नेहरूंची विचारसरणी एक अत्यंत गोंधळाची तरी असावी, नाहीं तर त्याविरुद्ध ते जाणूनबुजून विकृत प्रचार करून लोकमत कलुषित करण्याचा पद्धतशीर प्रयत्न तरी करीत असावेत. भाषिक प्रांतांची मागणी ही राष्ट्रीय ऐक्याची आणि लोकशाही सामर्थ्यवान् करण्याची मागणी आहे. ती

राष्ट्रघातकी फुटीरपणाची नाहीं ही गोष्ट नेहरूंच्या पुढें डोकें फोडून का त्यांना कोणीं समजावून द्यावयास हवी? नेहरूंचा हा ठराविक युक्तिवाद वारंवार ऐकून आमचें तर डोकें फिरून जातें. पण आमचें एकट्याचें डोकें फिरून काय उपयोग? नेहरूंनीं आपल्या दौऱ्यांत भाषिक प्रांतांविरुद्ध जो प्रचार केला तो ऐकून महाराष्ट्रांत तरी कोणाचें डोकें फिरल्याचें आमच्या ऐकिवांत नाहीं. उलट लोक नेहरूंचीं भाषणें मिटक्या मारीत ऐकत होते. आणि तीं ऐकतांना हर्षानें टाळ्या पिटीत होते. आंध्रांत किंवा कर्नाटकांत नेहरूंनीं जर असा दौरा काढला असता आणि त्या दौऱ्यांत भाषिक प्रांताविरुद्ध त्यांनीं जर असा प्रचार केला असता, तर जनतेची त्या ठिकाणीं काय प्रतिक्रिया झाली असती हें आम्हीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. आम्हांला नवल वाटतें तें आमच्या महाराष्ट्राचें. महाराष्ट्र आपलें तेज आणि स्वाभिमान पार विसरून गेला कीं काय? उभ्या महाराष्ट्रांत असा एकहि मर्द मराठा निघाला नाहीं कीं ज्यानें ताडकन् उठून नेहरूंना असें बजावलें नाहीं कीं भाषिक महाराष्ट्राची आमची मागणी राष्ट्रघातकी फुटीरपणाची नाहीं, तर उलट भारताचें स्वातंत्र्य बळकट व्हावें म्हणूनच आम्हांला भाषिक महाराष्ट्र हवा आहे! नेहरूंच्या या महाराष्ट्रांतल्या दौऱ्यानें भाषिक महाराष्ट्राच्या आमच्या लोकप्रिय चळवळीला सुरुंग तर लागला नाहीं ना, असें आम्हांस भय वाटतें. म्हणून 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या सर्व पुरस्कर्त्यांनीं आतां संघटित होऊन भाषिक महाराष्ट्राबाबत लोकमत जागृत करण्याच्या उद्योगाला जोरानें लागलें पाहिजे.

२४-७-१९५३

# महागुजरातवाद्यांचा प्रचार

कांहीं दिवसांपूर्वी अहमदाबादच्या ‘ गुजरात समाचार ’ नें मुंबईत राहणाऱ्या मराठी जनतेची जी अमानुष आणि बीभत्स टवाळी केली तिची बातमी सर्व महाराष्ट्राला आम्हीं प्रथम दिली. त्यावरून कांहीं ‘ बावळट बुद्धिसागरां ’ नीं आपली अशी कल्पना करून घेतली आहे कीं हें जें भांडण आहे तें केवळ वर्तमानपत्रामधलें आहे. म्हणून त्यांनीं आम्हांलाच शहाजोगपणें उपदेश केला आहे कीं ही ‘ लेखणीची लढाई ’ आम्हीं थांबवावी. नाहीं तर त्यामुळें गुजराती आणि मराठी समाजाचा सलोखा बिघडेल. ‘ गुजरात समाचार ’ मध्यें मराठी लोकांची बदनामी करणारें जसें निंद्य लिखाण प्रसिद्ध झालें आहे, अशा तऱ्हेचें गुजराती लोकांची निंदा करणारें लिखाण कोणत्याहि मराठी पत्रामध्यें आजपर्यंत प्रसिद्ध झालेलें नाहीं. आम्ही स्वतः तर गुजराती भाषा, साहित्य आणि संस्कृति ह्यांचे उपासक आहोंत. ‘ गुजराती लोकांपासून आपण कोणते गुण घ्यावयाला पाहिजेत ? ’ ह्यासंबंधीं एक लेख अवघ्या महिन्यापूर्वीच आम्हींच आमच्या ‘ नवयुग ’ मध्यें छापलेला होता. म्हणून गुजराती समाजाच्या भावना दुखवण्यासारखें लेखन आम्हीं करूं नये असला चोंबड-पणाचा उपदेश आम्हांला करण्याच्या कोणीं भानगडींत पडूं नये. ‘ गुजरात समाचार ’ मध्यें महाराष्ट्रविरोधी जो मजकूर आला तो कांहीं उगाच टवाळखोरपणानें त्यांनीं लिहिलेला नाहीं. शिवीगाळ करण्याची वृत्तपत्रीय हौस भागवण्यासाठीं म्हणून कांहीं त्यांनीं तें लिखाण केलेलें नाहीं. मुंबईमधल्या कांहीं गुजराती भांडवलवाल्यांनीं कांहीं राजकीय नेत्यांना आणि विद्वानांना हातीं धरून ‘ संयुक्त महाराष्ट्रां ’त मुंबईचा अंतर्भाव होऊं नये एवढ्यासाठीं जें एक भयंकर कारस्थान रचलेलें आहे, तें समजावून घेतल्यावांचून ‘ गुजरात समाचार ’मधील त्या गलिच्छ लिखाणाचा बोध होणार नाहीं. महाराष्ट्राविरुद्ध एक फार मोठें ‘ राजकारण ’ गुजरातमध्यें कित्येक वर्षांपासून शिजत आहे. ‘ मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा ’ च्या मागणीला जसा जसा अलीकडे जोर चढूं लागला आहे, तसें तसें ‘ महाराष्ट्रविरोधी महागुजराती ’

जास्त जागृत आणि संघटित होऊन महाराष्ट्राची ही मागणी हाणून पाडण्यासाठीं नाना तऱ्हेच्या युक्त्याप्रयुक्त्यांचा अवलंब करूं लागले आहेत. मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रांत होऊं नये ह्या एका हेतूनें 'मुंबई ही महाराष्ट्राची नसून गुजरातची आहे' अशी एक नवीनच आरोळी 'महागुजरात परिषदे'नें आतां उठवण्यास सुरुवात केली आहे. ह्या आरोळीच्या मागचें राजकारण अगदीं उघड आहे. मुंबई ही महाराष्ट्राची आहे का गुजरातची आहे ह्या मुद्द्यावर खूप आरडाओरड आणि रणधुमाळी माजवली कीं, मग 'न तुला न मला, घाल कुत्र्याला!' ह्या न्यायानें मुंबई ही महाराष्ट्रांत किंवा गुजरातमध्यें न घातली जातां शेवटीं ती स्वतंत्रच ठेवावी असा निर्णय होईल. हा सर्व इतिहास आणि हें सर्व राजकारण समजून न घेतां 'ह्या वादानें गुजराती नि मराठी समाजांतील सलोखा बिघडतो आहे. भारताच्या ऐक्याला तडे पडताहेत!' असें महाराष्ट्राचे कांहीं अजागळ 'हित-चिंतक' सद्धेतूचा आव आणून ओरडत सुटले आहेत. त्यांना काय म्हणावें? हा वाद गुजराती आणि मराठी जनतेमधला नाहीं. हा वाद गुजराती व मराठी वृत्तपत्रांमधलाहि नाहीं. हा वाद गुजराती धनिक आणि मुंबईमधली श्रमजीवी मराठी जनता ह्यांच्यामधला आहे. मुंबईमध्यें ज्यांनीं लक्षावधि रुपये ओतले त्यांच्या मालकीची मुंबई आहे, का मुंबईमध्यें ज्यांनीं आपलें रक्त ओतलें अन् घाम गाळला त्या लक्षावधि मराठी मजुरांची मुंबई आहे, हें खरें भांडण आहे! देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारत सरकारनें न्या. दार ह्यांच्या अध्यक्षतेखालीं 'भाषावार प्रांत कमिशन' नेमलें. 'दार कमिशन' ह्या नांवानें हें सर्वांच्या परिचयाचें आहे. तीन ठिकाणीं विभागल्या गेलेल्या महाराष्ट्रासारख्या भारता-मधल्या एका सामर्थ्यवान् भाषिक समूहाची भाषावर तत्त्वावर कशी पुनर्रचना करतां येईल, ह्याचा विधायक पद्धतीनें विचार करण्याचें सोडून 'दार कमिशन'नें 'संयुक्त महाराष्ट्रा'लाच सुरुंग लावून ठेवला. किंबहुना 'संयुक्त महाराष्ट्रां'तील निरनिराळे घटक एकत्र येऊं नयेत आणि महाराष्ट्राचें एकीकरण होऊं नये असाच प्रयत्न 'दार कमिशन'नें केला. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या मागणीबाबत 'दार कमिशन'नें काढलेलीं हीं मुक्ताफळेंच पाहा. "संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही अगदीं अलिकडची आहे. ती सर्व मराठी जनतेची चळवळ आहे असें सामर्थ्य अद्याप तिला प्राप्त झालेलें नाहीं. किंवा सर्व जनतेचा त्या मागणीला पाठिंबा आहे असेंहि पण म्हणतां येणार नाहीं. 'संयुक्त महाराष्ट्रां'तल्या निरनिराळ्या घटकांपैकीं

पहिल्यानें मागणी 'महाविदर्भा'नें केली. आपला स्वतंत्रच प्रांत असावा अशी त्याची इच्छा आहे. महाराष्ट्राच्या एकीकरणामध्यें कोंकणाचा तर सर्वांत मोठा अडथळा आहे." एवढेंच म्हणून 'दार कमिशन' थांबलें नाहीं, तर 'संयुक्त महाराष्ट्राची मागणी ही भारतद्रोही पुणेरी विचारसरणीमधून निर्माण झाली आहे' असा धादांत खोटा आणि खोडसाळपणाचा आरोप करून त्यानें तीन कोटी मराठी जनतेचा बेधडक उपमर्द केलेला आहे. "भारताच्या भवितव्यासंबंधीं किंवा राष्ट्राच्या उत्क्रांतीमध्यें घटकराज्याचें काय स्थान असावें ह्यासंबंधीं देशांतील बहुसंख्य जनतेचें आणि 'पुणेरी पंथा'चें दुर्दैवानें एकमत नाहीं," अशा तऱ्हेची भाषा अधिकृत प्रतिवृत्तांत लिहावयाला न्या. दारसारख्या जबाबदार माणसाला शरम वाटायला पाहिजे होती. पण न्यायमूर्ति दार ह्यांचा 'बोलविता' किंवा 'लिहविता धनी' दुसराच होता, हें सांगितलें म्हणजे मग त्यांच्या ह्या महाराष्ट्रद्वेष्ट्या लिखाणाचें आश्चर्य वाटणार नाहीं! 'संयुक्त महाराष्ट्रा'ची बदनामी करणारें हें सर्व लिखाण न्या. दार ह्यांच्या हातून लिहून घेण्याची कामगिरी सरदार वल्लभभाई पटेल ह्यांनीं केलेली आहे. ही गोष्ट अनेकांना ह्यापूर्वी माहीत आहेच, पण ती आज आम्ही जाहीरपणें सांगतों. न्या. दार ह्यांनीं ही जी बहुमोल वल्लभसेवा केली त्याचें इनाम म्हणून त्यांच्या चिरंजीवांना 'मध्यवर्ती सरकारां'त भारी पगाराची जागा देण्यांत आली आहे, हेंहि रहस्य त्याचबरोबर आम्ही येथें प्रकट करतों. 'दार कमिशन'च्या अहवालांतील ही पुणेरी द्वेषाची भाषा तीन वर्षांपूर्वी 'प्रतिबंधक स्थानबद्धतेचा कायदा' पास करून घेतांना खुद्द सरदार वल्लभभाईच्याच तोंडून बाहेर पडली होती हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. पंतप्रधान नेहरू ह्यांच्या खुनाचा कट हिंदुमहासभेंतल्या एका गटानें रचलेला आहे अशी अण्णासाहेब भोपटकरांच्या एका सहकाऱ्यानें बातमी दिल्यावरून त्यांना त्या वेळीं अटक करण्यांत आलेली होती. त्यासंबंधीं 'लोकसभे'त बोलत असतांना सरदार पटेल त्या वेळीं म्हणाले, "ह्या देशांत हिंदूंचें जातीय राज्य असावें, केवळ हिंदूंचेंच नव्हे पण विशिष्ट जातीच्या ब्राह्मणांचें राज्य असावें असें मानणारे क्रांतिकारक मुंबई प्रांतांत आहेत. भाषावार प्रांतरचनेला पाठिंबा द्यावयाचें सोंग करून हे लोक समाजाचा विध्वंस करूं पाहत आहेत." पुण्यांतील चित्पावनांना देशांत ब्राह्मणशाही स्थापन करावयाची आहे ह्या खोडसाळ कल्पनेचा मूळ जनक सर व्हॅलंटाइन चिरोल हा आहे. सरदार वल्लभभाई पटेल ह्यांनीं त्याच युक्तिवादाचा उपयोग 'प्रतिबंधक स्थानबद्धतेचा

कायदा' पास करतांना जसा केला, त्याप्रमाणेंच 'संयुक्त महाराष्ट्र'ची बदनामी करण्यासाठीं त्या युक्तिवादाची योजना न्या. दार ह्यांच्या तोंडीं सुद्धां त्यांनींच मोठ्या कौशल्यानें आणि धूर्तपणानें केली, ह्यांत तिळमात्र संशय नाहीं. आणि 'महागुजरात चळवळी'चे कार्यकर्तेहि 'संयुक्त महाराष्ट्रा'ला विरोध करतांना वल्लभभाईच्या महाराष्ट्रद्वेष्ट्या मेंदूमधून निघालेला हाच विषारी कोटिक्रम आज वापरीत आहेत हें आम्ही दाखवणारच आहोंत.

'भाषिक प्रांतरचने'च्या प्रश्नासंबंधीं पंडित नेहरू आणि भारत सरकार ह्यांनीं जें आडमुठेपणाचें आणि दुराग्रहाचें धोरण स्वीकारलेलें आहे, त्याचेंहि कारण सरदार वल्लभभाई पटेल हेच होत. वस्तुतः पंडित नेहरू हे कांहीं मूळपासून भाषिक प्रांताचे विरोधक नव्हते. सत्तावीस सालीं मद्रास कॉंग्रेसनें 'भाषिक प्रांत निर्माण करण्याची वेळ समीप आली आहे' असा जेव्हां ठराव पास केला, तेव्हां तें एक बिनतोड तत्त्व (sound principle) आहे असा पंडित नेहरूंनीं त्यासंबंधीं आपला अभिप्राय व्यक्त केला होता. पण तेंच नेहरू आज 'भाषावार प्रांतरचना ही भारताच्या ऐक्यभावनेला विघातक आहे' असें म्हणूं लागले आहेत ह्याचें कारण काय? गेल्या वर्षी श्री. तुषार चतर्जी यांनीं 'भाषिक तत्त्वावर प्रांतांची तावडतोब पुनर्रचना करण्यांत यावी' असा ठराव लोकसभेंत आणला होता. त्या वेळीं 'भाषिक तत्त्वावर देशाचे तुकडे पाडण्यास सरकारची मुळींच तयारी नाहीं!' असें नेहरूंनीं स्पष्टच उत्तर दिलें होतें. भाषिक प्रांत निर्माण करणें म्हणजे देशाचे तुकडे करण्यासारखें आहे, हें विक्षिप्त मत प्रथम 'दार कमिशन'नें मांडलें. 'दार कमिशन'चें मत म्हणजे सरदार वल्लभभाई पटेलांचें मत आणि तेंच नेमकें मत पंडित नेहरूंच्या भाषणांमधूनहि उच्चारलें जात आहे ह्याचा अर्थ काय? संयुक्त महाराष्ट्र होवो वा न होवो, पण मुंबईचा अंतर्भाव संयुक्त महाराष्ट्रांत होणार नाहीं अशी घोषणा वस्तुतः नेहरूंना करण्याचें मुळींच कारण नव्हतें. पण केवळ सरदार पटेल ह्यांच्या आग्रहास्तव त्यांनीं ती केली. ह्या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या निर्मितीला आणि मुंबईचा अंतर्भाव 'संयुक्त महाराष्ट्रां'त करण्याला नेहरूंचा नि मध्यवर्ती सरकारचा आज जो विरोध आहे त्याचे जनक सरदार वल्लभभाई पटेल हेच असावेत हें उघड आहे. ह्या बाबतींत आणखीहि एक निराळा पुरावा देतां येईल. तो असा कीं, श्री. स. का. पाटील हे मुंबईचे कॉंग्रेस पुढारी वल्लभभाईंचे

पट्टशिष्य होत. मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रांत न होतां ती स्वतंत्र राहावी ह्या पक्षाचा सर्वांत मोठा पुरस्कार करणारा महाराष्ट्रद्रोही माणूस जर कोणी असेल तर ते म्हणजे श्री. स. का. पाटील होत. मुंबईच्या आजूबाजूचे महाराष्ट्राच्या प्रदेशांतले लचके तोडून 'महामुंबई' मध्यें त्यांचा समावेश करावयाचा आणि अशा तऱ्हेनें एक स्वतंत्र राज्य होऊं शकेल एवढा 'महामुंबई'चा विस्तार वाढवावयाचा, हें धूर्त महाराष्ट्रघातकी कारस्थान मुंबई कॉर्पोरेशनचे मेयर असतांना श्री. स. का. पाटील ह्यांनीं जें रचलें तें सरदार पटेल ह्यांच्याच प्रेरणेनें ह्यांत काय संशय? सारांश, 'संयुक्त महाराष्ट्रा' मध्यें मुंबईचा समावेश न होऊं देण्याचा जो प्रचंड व्यूह मुंबईतील गुजराती भांडवलवाल्यांच्या हितासाठीं सरदार वल्लभभाई पटेल ह्यांनीं रचून ठेवला आहे, त्याचाच वारसा मध्यवर्ती सरकारनें आणि 'महागुजरात चळवळी'च्या पुरस्कर्त्यांनीं आज पुढें चालविलेला आहे. 'संयुक्त महाराष्ट्रा' च्या प्रचारांत गुजरातच्या द्वेषाचें वा विरोधाचें अक्षरहि कोणी उच्चारीत नाहीं. असें असतां 'महागुजरात' च्या पुरस्कर्त्यांनीं आपल्या भाषिक प्रांताच्या प्रयत्नांत मात्र महाराष्ट्रासंबंधीं जाणूनबुजून अप्रचार कां करावा बरें? 'शिवाजीनें सुरतेवर जशी स्वारी केली तशी आम्हांलाहि गुजरातेवर करावी लागेल!' असें पुण्याच्या एका सभेंत काकासाहेब गाडगीळ विनोदानें म्हणाले होते. त्याचा 'महागुजरात'च्या कार्यकर्त्यांनीं हेतुपुःसर विपर्यास केला आणि महाराष्ट्रद्वेषाची चांगलीच आग गुजराती जनतेच्या अंतःकरणांत भडकावून दिली!

'संयुक्त महाराष्ट्रा' विरुद्ध 'महागुजरात' वाले काय कारस्थानें रचीत आहेत ह्याची महाराष्ट्रांत कोणालाहि माहिती नाहीं. कारण, गुजराती भाषा जाणणारे मराठी लोक महाराष्ट्रांत थोडे आहेत. 'महागुजरात परिषदे'चें पहिलें अधिवेशन होऊन एक वर्षसुद्धां झालेलें नाहीं. हें अधिवेशन बोलावणारे प्रमुख आमंत्रक श्री. अमृत पंड्या ह्यांनीं आपल्या आमंत्रणांत महाराष्ट्राविरुद्ध जें भयंकर विष ओकलें आहे तें पाहण्यासारखें आहे. त्यांत ते म्हणतात, "मुंबई कायदेमंडळांत एकंदर ३१५ सभासद आहेत. त्यांत १४१ मराठी, ८९ गुजराती आणि ४५ कानडी आहेत. मुंबई राज्यांत अशा तऱ्हेनें महाराष्ट्राचें बहुमत असल्यानें, गुजरातला 'संयुक्त महाराष्ट्र' वादी 'मराठाशाही'च्या वर्चस्वाखालीं आज नांदावें लागत आहे. मुंबई राज्याच्या वार्षिक उत्पन्नांत गुजरातकडून सव्वातीन कोटींचा फायदा मिळतो, तर महाराष्ट्रामध्यें अडीच कोटी रुपयांची तूट येते. मुंबई राज्यांतल्या मोठमोठ्या

अधिकाऱ्यांमध्यें आणि नोकरांमध्येंहि महाराष्ट्रीयांचें बहुमत असल्यानें सर्व फायदे महाराष्ट्र उपटून बसतो. म्हणजे बिचाऱ्या गुजरातचें उत्पन्न गुजराती लोकांच्या इच्छेविरुद्ध महाराष्ट्राच्या विकासासाठीं खर्च होतें. गुजरातमधील नद्यांवरच्या धरणयोजना बाजूला सारून महाराष्ट्रीय नेत्यांनीं आपली 'कोयना योजना' मंजूर करून घेतली. गुजरात हा वाढीचा प्रदेश आहे आणि महाराष्ट्र हा तुटीचा प्रदेश आहे, हें लक्षांत घेतलें म्हणजे गुजरातमधल्या गरीब रयतेच्या कमाईवरच 'कोयना योजना' पूर्ण होणार आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. सत्तेच्या जोरावर महाराष्ट्रीय लोक गुजरातमधले कालवे आणि रस्ते मुळीं होऊंच देत नाहींत. म्हणून दुसऱ्याच्या जिवावर जगणाऱ्या ह्या महाराष्ट्राचें जोखड गुजरातच्या मानगुटीवरून जेव्हां सुटेल तेव्हांच गुजरातचा सांस्कृतिक आणि आर्थिक विकास होईल. गुजरातकडून होणाऱ्या फायद्यावर महाराष्ट्राचा आर्थिक आणि सांस्कृतिक विकास होत राहिला आहे. आणि असें असतां 'चोरानें कोतवालालाच दम द्यावा' त्याप्रमाणें हे महाराष्ट्रीय नेते उलट गुजरात आणि गुजराती ह्यांच्याविरुद्धच विषारी प्रचार करीत सुटतात ह्याला काय म्हणावें ? 'संयुक्त महाराष्ट्रा'चे एक नेते काकासाहेब गाडगीळ ह्यांनीं शिवाजीचें अनुकरण करून गुजराती लोकांची लूटमार केली पाहिजे असे जे उद्गार काढले आहेत तो ह्या प्रचाराचा अगदीं ताजा दाखला आहे. कायदेमंडळांतल्या व सरकारी नोकरींतल्या मराठी लोकांनीं आपल्या बहुमताच्या जोरावर गुजरातची गळचेपी करण्याची आणखी एक खास योजना आंखलेली आहे. ती अशी कीं, 'दक्षिण गुजरात'मधल्या कित्येक भागांना 'उत्तर विभागां'तून दमदाटी करून बाहेर फोडावयाचें अन् तेथून गुजराती भाषेचें उच्चाटन करून तेथल्या रहिवाशांच्या इच्छेविरुद्ध त्या ठिकाणीं सरकारी किंवा शिक्षणाची भाषा म्हणून मराठी भाषा लादावयाची. हेतु हा कीं, पुढें 'संयुक्त महाराष्ट्र' निर्माण करावयाच्या वेळीं हा भाग त्यांत दडपतां यावा. डांग आणि साल्हेर हे प्रदेश त्या धोरणाचीं उदाहरणें होत." अशा तऱ्हेनें महाराष्ट्र आणि मराठी लोक ह्यांच्याविरुद्ध धादांत खोटा आणि खोडसाळ प्रचार करून 'महागुजरात परिषदे'चें पहिलें अधिवेशन खेडा जिल्ह्यांत 'वल्लभविद्यानगर' येथें गेल्या नोव्हेंबरांत भरविण्यांत आलें. त्यानंतर 'महागुजरात परिषदे'च्या कार्यकर्त्यांची 'संयुक्त महाराष्ट्रा' विरुद्ध गुजरातमध्यें एक मोठी आघाडी उघडलेली आहे. आणि निरनिराळ्या सभा भरवून, पत्रकें काढून

आणि पुस्तकें छापून मुंबई, ठाणें जिल्हा आणि पश्चिम खानदेश हे महाराष्ट्राचे नसून 'महागुजरात'चे आहेत असा त्यांनीं पद्धतशीर प्रचार चालविलेला आहे.

'पश्चिम खानदेश'च्या जनतेला उद्देशून 'महागुजरात'च्या कार्यकर्त्यांनीं जें एक मासलेवाईक पत्रक काढलेलें आहे, तें प्रत्येक महाराष्ट्रीयानें वाचण्यासारखें आहे. तें असें: "खानदेशी बंधूंनो, भाषावार तत्त्वावर 'संयुक्त महाराष्ट्रा'ची निर्मिति करावयास मराठी मंडळी बाहेर पडली आहेत. म्हणून 'संयुक्त महाराष्ट्रां'त आपला समावेश होऊं शकत नाहीं ह्या गोष्टीकडे आम्ही आपलें मुद्दाम लक्ष वेधतों. खानदेशची लोकभाषा मराठी नाहीं. इंग्रज सरकारनें खानदेशांत सरकारी कामकाजाची भाषा म्हणून मराठी सुरू केली, ती मराठी अधिकाऱ्यांच्या नि नोकरांच्या सोयीसाठीं. त्याचा अर्थ असा नाहीं कीं, मराठी ही तेथल्या जनतेची भाषा आहे. खानदेशाची लोकभाषा अहिराणी आहे. आणि अहिराणी ही गुजराती भाषेची एक बोली आहे असें मोटमोठ्या भाषापंडितांनीं मान्य केलें आहे. जगप्रसिद्ध भाषाशास्त्री सर जॉर्ज ग्रिअरसन ह्यांचेंहि हेंच मत आहे कीं, 'भिल्ल आणि खानदेशचे रहिवासी गुजराती भाषेचीच बोली बोलतात.' भाषावार प्रांतरचना करतांना राज्यकारभाराची भाषा कोणती ह्या गोष्टीचा विचार केला जात नाहीं. जनता कोणती भाषा बोलते तिचा विचार करण्यांत येतो. ह्या दृष्टीनें खानदेशचें स्थान 'महागुजरात'मध्येंच आहे, हें सूर्यप्रकाशासारखें स्वच्छ आहे. अमळनेरला जी 'महाराष्ट्र साहित्य परिषद' भरली, त्या ठिकाणीं मराठी साहित्यिकांना देखील हीच चिंता पडली कीं, 'खानदेशी' ही गुजरातची एक बोली असतांना खानदेशाचा अंतर्भाव 'संयुक्त महाराष्ट्रां'त कसा करतां येईल? 'संयुक्त महाराष्ट्र' वाद्यांपुढें दुसरीहि चिंता आहे कीं, त्यांच्याच म्हणण्याप्रमाणें (संयुक्त महाराष्ट्र, पान ३९) पश्चिम खानदेशांत मराठी बोलणाऱ्यांची संख्या अवघी वीस टक्के आहे. असें असतां हा भाग 'भाषिक महाराष्ट्रां'त कसा येऊं शकेल? आतां 'महागुजरात' मध्यें जर 'पश्चिम खानदेश' आला, तर त्याला काय फायदा होईल हें आम्ही सांगतों. 'दार कमिशन'नेंच सांगितलें आहे कीं, 'संयुक्त महाराष्ट्र' निर्माण झाला तर त्याला वर्षाची चार कोटी रुपये तूट येईल. पुण्यांत बसल्या बसल्या 'संयुक्त महाराष्ट्रा'चा राज्यकारभार चालवणारे 'ब्राह्मण मंत्री' ही एवढी तूट कशी बरें भरून काढतील? खुद्द महाराष्ट्राच्या प्रजेकडून त्यांना कांहींहि मिळवतां यावयाचें नाहीं. म्हणून खानदेश अन् ठाणें अशा

सीमाविभागांतील जिल्ह्यांमधल्या जनतेवर कर लादून ही तुटीची रक्कम ते भरून काढतील. म्हणून 'संयुक्त महाराष्ट्र' मध्यें जाणें म्हणजे खानदेशी लोकांचें मरण आहे. ह्याच्या उलट 'महागुजरात' मध्यें दर वर्षी चार कोट रुपयांची शिल्लक राहील असें 'दार कमिशन' नेंच म्हटलें आहे. म्हणून 'महागुजरात' मध्यें आल्यास खानदेशाची जनता आर्थिक दृष्टया सुखी आणि समृद्ध होईल हें उघडच आहे. त्याखेरीज खानदेशाचा सांस्कृतिक आणि ऐतिहासिक संबंध गुजरातशींच होता. इंग्रज येण्यापूर्वी खानदेशाचा समावेश मराठी प्रदेशांत कधींच होत नव्हता. मुसल्मानी अंमलांत खानदेश हा गुजरातचाच भाग समजला जात होता. म्हणून खानदेशी बंधूंनीं भाषिक प्रांतरचनेच्या वेळीं 'महागुजरात' मध्येंच येण्याचा आग्रह धरावा अशी आमची त्यांना विनंति आहे." 'पश्चिम खानदेश'च्या लोकांचीं मनें कलुषित करण्यासाठीं असलें खोडसाळ पत्रक काढूनच 'महागुजरात'वाले थांबले नाहींत, तर नवापूर, नंदुरबार, तळोदें, शहादें येथें 'महागुजरातप्रवृत्ती'चा प्रचार करण्याचा आणि त्यासाठीं निधि जमविण्याचाहि त्यांनीं प्रयत्न चालविलेला आहे.

पण 'महागुजरात'वाल्यांचा सगळ्यांत मोठा प्रचार 'मुंबई'बाबत आहे. 'मुंबई गुजरातनुंज छे!' (मुंबई ही गुजरातचीच आहे.) असें चाळीस पानांचें एक चोपडें 'महागुजरात' परिषदेचे महामंत्री श्री. अमृत पंड्या ह्यांनीं नुकतेंच छापून प्रसिद्ध केलें आहे. त्यांत इतिहास, भूगोल, भाषा, संस्कृति, उद्योग आणि अर्थकारण ह्या दृष्टीनें विचार करतां अगदीं प्रारंभापासून मुंबई ही गुजरातचीच आहे असें सिद्ध करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. एवढेंच नव्हे तर 'महागुजरात' मध्यें मुंबईपर्यंत गुजराती भाषेचा सलग प्रदेश कसा पसरला आहे त्याचा नकाशासुद्धां काढून त्यांनीं त्यांत छापला आहे. मुंबई महाराष्ट्राची नाहीं हें दाखविण्यासाठीं त्यांत पुढील कारणें दिलीं आहेत:

(१) मुंबई आणि महाराष्ट्र ह्यांच्यामध्यें निसर्गानेंच पश्चिम घाटाची भिंत उभी करून ठेवली आहे. १८६३ मध्यें जी. आय. पी. रेल्वेनें घाटांत बोगदे पाडले म्हणूनच महाराष्ट्राचा मुंबईशीं संबंध आला.

(२) मुंबई आणि गुजरातमध्यें कोणताहि असा नैसर्गिक अडथळा नाहीं. उभयतांमध्यें जमिनीवरून अन् समुद्रावरून फार प्राचीन काळापासून दळणवळण आहे.

(३) मुंबई शहर आणि ठाणें जिल्हा ह्यांचा महाराष्ट्राशीं संबंध असता तर त्यांचा अंतर्भाव इंग्रज सरकारनें पुण्याप्रमाणें 'मध्यभागा' मध्यें केला असता.

पण अहमदाबाद ज्याची राजधानी आहे, त्या 'उत्तर विभागां'त ज्या अर्थी त्यांचा समावेश केला त्या अर्थी त्यांचा भौगोलिक दृष्ट्या गुजरातशींच संबंध आहे हें उघड होतें.

(४) जंजिरा आणि जव्हार हीं मुंबईनजीकचीं संस्थानेंसुद्धां इंग्रज सरकारनें 'सदर्न मराठा स्टेट्स् एजन्सी'मध्यें न टाकतां 'गुजरात स्टेट्स् एजन्सी'मध्यें टाकलीं ह्याचा अर्थ काय?

(५) सर रामकृष्ण भांडारकरांसारख्या विद्वानांनीं सुद्धां 'दक्षिणेच्या इतिहासां'त कोंकण, खानदेश आणि वऱ्हाड हे प्रदेश महाराष्ट्रापासून संपूर्ण निराळे होते असेंच म्हटलें आहे.

(६) मुंबईची मूळ स्थापना गुजरात्यांनींच केली. मुंबादेवी ही गुजरातची देवी आहे. ह्या नांवाची देवी महाराष्ट्रांत कुठेंहि नाहीं.

(७) कोंकणांतले अन् ठाणें जिल्ह्यांतले 'प्रभु' हे मूळचे गुजरातमधले कायस्थ होत. त्याप्रमाणें चित्पावन ब्राह्मण हेसुद्धां गुजरातमधूनच कोंकणांत गेलेले आहेत. म्हणून कोंकणांतले प्रभु आणि चित्पावन घरामध्यें जी भाषा बोलतात ती गुजराती आणि कोंकणी यांचें मिश्रण आहे.

(८) कोंकणी भाषा ही महाराष्ट्री प्राकृतामधून उद्भवलेली भाषा नसून ज्या भाषेंतून गुजराती आणि राजस्थानी भाषा उद्भवल्या त्या शौरसेनी प्राकृतामधूनच तिचा उद्भव झालेला आहे.

(९) १८६५ मध्यें रेल्वे सुरू झाल्यानंतर नोकरीसाठीं आणि मजुरीसाठीं मराठी भाषिक लोक घाटावरून खालीं उतरून मुंबईमध्यें येऊं लागले. म्हणजे मराठी लोक मुंबईमध्यें सर्वांच्या मागून आले. आणि आतां सर्वांच्या आधीं मुंबईवर आपला हक्क सांगूं लागले आहेत!

(१०) गुजराती लोकांच्या प्रयत्नानें आणि त्यागानेंच मुंबईची प्रचंड वाढ झाली आणि भारताचें तें महाद्वार झालें. म्हणून 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या पदरांत जर मुंबई पडली तर त्यानें गुजराती लोकांचा आणि गोमंतकासह सर्व कोंकणी लोकांचा नाश झाल्यावांचून राहणार नाहीं.

मुंबई ही 'महागुजरात'ची आहे हें सिद्ध करण्यासाठीं एवढें अकांडतांडव करून शेवटीं ह्या 'महागुजरातवाल्यां'चा निर्णय असा आहे: "मुंबईसंबंधीं महागुजरातवाद्यांचें धोरण हें आहे कीं मुंबई शहर हें स्वतंत्र राज्य म्हणून राहणार

असेल, तर त्याला आपला मुळींच विरोध नाहीं. पण जर तें कोणत्याहि भाषिक प्रांतांत जाणार असेल तर मात्र तें 'महागुजरात'लाच मिळालें पाहिजे. त्यावर गुजरातशिवाय कोणत्याहि प्रांताचा हक्क नाहीं!" मुंबई नसेल तर 'संयुक्त महाराष्ट्र'-सुद्धां नको असें म्हणणाऱ्या महाराष्ट्रीयांची जातिवंत प्रामाणिकपणाची भूमिका कुठें आणि 'मुंबई' कापून बाजूला काढली तर आपली मुळींच हरकत नाहीं ही दुसऱ्याच्या अन्नांत विष कालवणारी 'महागुजरात' वाल्यांची विघ्नसंतोषी भूमिका कुणीकडे? 'मुंबई गुजरातनुंज छे' ह्या चोपड्यामधला 'उपसंहार' सर्वांत भयंकर अधिक आहे. तो वाचल्यानंतर सरदार वल्लभभाई पटेलांची 'संयुक्त महाराष्ट्रा' संबंधीं जी खोडसाळ आणि विषारी विचारसरणी होती, तिचा प्रसार करण्याचा महागुजरातवाले कसा प्रयत्न करतात तें दिसून येईल. हा उपसंहार असा : "भाषिक प्रांताच्या नांवावर पेशवाई साम्राज्याची पुन्हा स्थापना करण्याच्या 'संयुक्त महाराष्ट्र'वाल्यांच्या ह्या प्रयत्नांचा जर तावडतोब प्रतिकार झाला नाहीं, तर भारताच्या राष्ट्रीय ऐक्याचा नाश करून हे लोक भारताला कायमचे विनाशाच्या अंधाऱ्या दरींत फेंकून देतील! म्हणून गुजरात, खानदेश, ठाणें, मुंबई आणि कोंकण येथील जनतेनें राष्ट्रीय ऐक्याच्या संरक्षणासाठीं एकत्र येऊन भयावह होत चाललेल्या या 'भुतावळी'ला तावडतोब पायबंद घातला पाहिजे." 'महागुजरात'ची चळवळ ही 'भाषिक गुजरात'ची चळवळ नसून सरदार वल्लभभाई पटेल ह्यांच्या प्रेरणेनें आणि गुजराती भांडवलवाल्यांच्या पैशानें सुरू झालेली मराठी जनतेमध्यें फूट पाडण्याची आणि तिच्या न्याय्य हक्कांवर आक्रमण करण्याची एक द्वेषमूलक चळवळ आहे हें ह्यावरून सिद्ध होतें. 'संयुक्त महाराष्ट्रा'ची चळवळ ही पुण्यामध्यें 'ब्राह्मणशाही' स्थापन करण्याची आणि देशाचें वाटोळें करण्याची चळवळ आहे, असा तीन कोटी मराठी जनतेचा अपमान करणारा हा हीन वृत्तीचा खोटा, खोडसाळ आणि जातीय द्वेषाचा प्रचार जर यापुढें 'महागुजरात'वाल्या भांडवलशाहीनें थांबविला नाहीं, तर त्याचे फार वाईट परिणाम होतील हें त्यांना आणि मुंबई सरकारला याच वेळीं आम्ही बजावून सांगतों.

१६–८–१९५३

# नागपूरचा ऐतिहासिक निर्णय

महाराष्ट्रीय जनतेच्या वतीनें संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीसंबंधीं एक फार महत्त्वाचा निर्णय गेल्या सोमवारीं नागपूर येथें घेण्यांत आला. तीन दिवसांपूर्वींच 'भाषिक आंध्र' अस्तित्वांत आला. ह्यानंतर भाषिक प्रांताबाबत अखेरची व्यवस्था करण्यासाठीं निर्णायक अधिकार असलेलें एक 'महामंडळ' लौकरच 'मध्यवर्ती सरकारा'मार्फत नेमण्यांत येणार आहे. तेव्हां ह्या 'महामंडळा'पुढें भाषिक प्रांतांची मागणी करणाऱ्या सर्व घटकांनीं आपापल्या कैफियती एकमुखानें आणि एकजुटीनें सादर करणें आवश्यक आहे. 'संयुक्त कर्नाटका'च्या पुरस्कर्त्यांनीं आपल्या चळवळीची धार चांगलीच तिखट केलेली आहे. 'महागुजरात'वाले आतां जागे झालेले आहेत. पण 'भाषिक गुजरात' मागण्यापेक्षां मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रांत होऊं नये, ह्यावरच त्यांच्या भाषिक चळवळीचा जोर जास्त आहे. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या मागणीबाबत मराठी जनतेमध्यें ऐक्य नाहीं, असें भासविण्याचा कांहीं मतलबी माणसें अलीकडे प्रयत्न करीत आहेत. उदाहरणार्थ, मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत होऊं नये आणि ती स्वतंत्र व्हावी अशी मोहीम सरदार वल्लभभाई पटेलांचे शिष्य आणि मुंबईच्या भांडवलवाल्यांचे हस्तक श्री. स. का. पाटील ह्यांनीं जोरांत सुरू केली आहे. त्याप्रमाणें 'महाविदर्भा'चा समावेश संयुक्त महाराष्ट्रांत न होतां, तो स्वतंत्र भाषिक प्रांत व्हावा असा प्रयत्न 'मध्यप्रदेश'चे अर्थमंत्री ना. ब्रिजलाल बियाणी ह्यांनीं चालविलेला आहे. अशा परिस्थितींत महाराष्ट्र, महाविदर्भ आणि मराठवाडा ह्या भागांतील जबाबदार नेत्यांनीं 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा'ची निःसंदिग्ध आणि एकमुखी घोषणा जाहीरपणें करणें जरूर होतें. ह्या दृष्टीनें गेल्या सोमवारीं नागपूर येथें झालेला 'संयुक्त महाराष्ट्रा'चा करार आम्हांला अतिशय महत्त्वाचा वाटतो. एवढेंच नव्हे, तर ह्या करारानें मुंबई आणि महाविदर्भाच्या स्वतंत्र मागणीला आतां विधिपूर्वक मूठमाती मिळालेली असून 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा'ची त्यानें पायाभरणी केलेली

आहे, असें आम्हांला निश्चितपणें वाटतें. म्हणून आम्ही ह्या ऐतिहासिक कराराचें सहर्ष स्वागत करतों. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या कोनाकोपऱ्यांत हा करार झाल्याबद्दल अभिनंदनाच्या सभा भरण्यांत याव्यात असें आम्ही सर्व मराठी भाषिकांना सुचवितों.

ह्या करारावर एकंदर बारा जणांच्या सह्या आहेत. 'महाराष्ट्रा'तर्फे श्री. भाऊसाहेब हिरे, यशवंतराव चव्हाण, नानासाहेब कुंटे आणि देवकीनंदन नारायण. 'महाविदर्भा'तर्फे श्री. रा. कृ. पाटील, श्री. पी. के. देशमुख, डॉ. गोपाळराव खेडकर, रामराव देशमुख आणि बॅ. वानखेडे आणि 'मराठवाड्या'तर्फे श्री देवीसिंग चौहाण. त्याखेरीज एल. एस. भाटकर आणि सौ. प्रभावतीदेवी जकातदार ह्यांनींहि ह्या करारावर सह्या केलेल्या आहेत. डॉ. पंजाबराव देशमुख आणि श्री. काकासाहेब गाडगीळ ह्यांनीं ह्या एकमताच्या निर्णयाला आपला संपूर्ण पाठिंबा आहे असें कळविलें आहे. शंकरराव देव, स्वामी रामानंद तीर्थ, मध्यप्रदेशाचे उपमंत्री श्री. वसंतराव नाईक ह्यांनींहि ह्या निर्णयाच्या चर्चेंत भाग घेऊन त्याला आपली मान्यता दिली आहे. सारांश, महाराष्ट्र, महाविदर्भ आणि हैदराबादमधील प्रमुख कॉंग्रसनेत्यांनीं भाषिक महाराष्ट्राच्या सर्व प्रश्नांचा सविस्तर विचार करून हा निर्णय घेतला असल्यानें आतां त्याला प्रातिनिधिक आणि जबाबदार स्वरूप प्राप्त झालेलें आहे. इतर प्रमुख राजकीय पक्षांचाहि ह्या निर्णयाला संपूर्ण पाठिंबा मिळेल ह्याविषयीं आम्हांला यत्किंचित् शंका वाटत नाहीं. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या आजपर्यंतच्या चळवळीच्या इतिहासामधील ही सर्वांत महत्त्वाची घटना आहे, असें आम्ही समजतों. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या ह्या सर्वसंमत कराराचीं कलमें येणेंप्रमाणें आहेत :

(१) भारतांतील घटक राज्यांची पुनर्घटना आणि फेरव्यवस्था करण्यासाठीं आतां निर्णायक महामंडळ ज्याअर्थीं नेमलें जाणार आहे त्याअर्थीं मराठी भाषा बोलणाऱ्या विविध विभागांतील आम्हीं लोकांनीं या भागांचें एकभाषिक राज्य बनविण्याच्या दृष्टीनें पुढीलप्रमाणें निर्णय घेतलेले आहेत.

(२) सध्यांची मुंबई, मध्यप्रदेश आणि हैद्राबाद या राज्यांतील मराठी भाषिकांच्या सलग प्रदेशांचें मिळून हें राज्य बनविण्यांत यावें. ह्या राज्याच्या हद्दींत आणि कक्षेंत कोणतेहि निराळे गट असू नयेत. ह्याला महाराष्ट्र वा मराठी प्रदेश असें म्हणण्यांत यावें. आणि त्याची राजधानी मुंबई ही असावी.

(३) ह्या राज्याच्या विकासाच्या आणि कारभाराच्या दृष्टीनें महाविदर्भ, मराठवाडा आणि इतर राज्य असे तीन गट असावेत.

(४) एकसूत्री राज्यकारभाराच्या निकडीव्यतिरिक्त निरनिराळ्या गटांच्या खर्चाच्या रकमांची विभागणी तेथल्या लोकसंख्येच्या प्रमाणांत करण्यांत यावी. तथापि, मराठवाडा हा मागासलेला विभाग असल्यानें त्याची सर्वांगीण उन्नति करण्याच्या दृष्टीनें त्याजकडे विशेष लक्ष देण्यांत यावें. त्याचें प्रतिवृत्त दर वर्षी राज्यकायदेमंडळापुढें ठेवण्यांत यावें.

(५) गटांच्या लोकसंख्येचें प्रमाण मंत्रिमंडळांत राखण्यांत यावें.

(६) सर्व शैक्षणिक संस्थांमध्यें, व्यावसायिक, शास्त्रीय वा विशेष शिक्षणाच्या संस्थेंत प्रवेश देतांना लोकसंख्येच्या प्रमाणांत त्या सवलती देण्यांत याव्या.

(७) राज्याचें हायकोर्ट मुंबई येथें असावें, त्याचें दुसरें ठिकाण नागपूर येथें असावें. नागपूरच्या हायकोर्टानें महाविदर्भाचें काम पाहावें. हायकोर्टामधील न्यायाधीशाच्या नेमणुका करतांना महाविदर्भामधील वरिष्ठ नोकर आणि वकील ह्यांना योग्य त्या प्रमाणांत प्रतिनिधित्व मिळेल अशी काळजी घेण्यांत यावी. मराठवाड्याच्या बाबतींतहि हें कलम लावण्यांत यावें.

(८) सरकारी आणि सरकारनियंत्रित नोकऱ्यांत नेमणुका करतांनाहि निरनिराळ्या गटांतील लोकसंख्येचें प्रमाण लक्षांत घेण्यांत यावें.

(९) विविध गटांतील जनतेचा राज्यकारभाराशीं संबंध येण्याच्या दृष्टीनें सत्तेचें विकेंद्रीकरण हें एक प्रभावी साधन आहे असा आमचा विश्वास आहे.

(१०) नागपूर ही अनेक वर्षांपासून महाविदर्भाची राजधानी आहे आणि तिजपासून त्याला अनेक फायदे झालेले आहेत हें आम्ही ओळखून आहोंत. एकसूत्री राज्याच्या गरजा लक्षांत घेऊनहि ह्या विशिष्ट फायद्याचें रक्षण करण्यांत यावें असें आम्हांला वाटतें. ह्या दृष्टीनें योग्य ते उपाय तज्ज्ञांच्या सल्ल्यानें घेण्यांत यावेत. कांहीं विवक्षित काळ राज्यसरकार नागपूर येथें जाईल आणि कायदेमंडळाची एक बैठक प्रत्येक वर्षी नागपूर येथें भरेल.

(११) खेडें हें परिमाण धरून ताज्या लोकसंख्येच्या आंकड्यावरून जिल्ह्याच्या मर्यादा अशा रीतीनें ठरविण्यांत येतील कीं सर्व सलग मराठी भाषिक प्रदेश या नवीन राज्यांत समाविष्ट होईल.

संयुक्त महाराष्ट्रामध्यें सध्यांचा महाराष्ट्र, महाविदर्भ आणि मराठवाडा असे जे

तीन घटक समाविष्ट होणार आहेत त्या तिन्ही घटकांना सत्तेच्या, खर्चाच्या, नोकरीच्या आणि प्रतिनिधित्वाच्या दृष्टीनें ह्या करारानें न्याय दिलेला असल्यानें ह्या विभागांतील सर्व जनतेचें त्या योगानें संपूर्ण समाधान होईल अशी आमची खात्री आहे. 'संयुक्त महाराष्ट्रा' ची राजधानी मुंबई असली तरी मुंबईच्या खालोखाल नागपूरला महत्त्व येणार असल्यानें आणि दर वर्षी राज्यसरकारचा मुक्काम आणि कायदेमंडळाची बैठक नागपूर येथें भरणार असल्यानें आजपर्यंत एकमेकापासून विलग झालेल्या महाराष्ट्राच्या आणि महाविदर्भाच्या जनतेंत अभूतपूर्व एकजूट घडून येईल, हें ह्या कराराचें सर्वांत महत्त्वाचें वैशिष्ट्य आहे. स्वतंत्र महाविदर्भाच्या पुरस्कर्त्यांचीं तर तोंडेंच ह्या करारानें बंद होतील. 'संयुक्त महाराष्ट्रा'त महाविदर्भाच्या जनतेला बरोबरीचा वांटा मिळणार असल्यानें पुण्या-मुंबईचे लोक महाविदर्भांतील जनतेच्या डोळ्यांत धूळ टाकतील आणि तिची फसवणूक करतील असा जो खोडसाळ प्रचार स्वतंत्र महाविदर्भाचे प्रणेते आजपर्यंत करीत आहेत त्याचें सपशेल बूडच उडून जाईल. 'संयुक्त महाराष्ट्रा'ची राजधानी मुंबई आहे ह्या मागणीला महाराष्ट्र, महाविदर्भ आणि मराठवाडा ह्या भागांतील पावणेतीन कोटी जनतेचा प्रचंड आणि एकमुखी पाठिंबा असल्यानें मुंबई महाराष्ट्रांतून फोडून स्वतंत्र करूं पाहणाऱ्या भांडवलशाहीच्या भाडोत्री बगलबच्यांच्या तोंडाला यापुढें पलिस्तर बसल्याखेरीज राहणार नाहीं. 'संयुक्त महाराष्ट्रा' च्या मागणीला जनतेचा एकमुखी पाठिंबा नाहीं, त्याबाबत जनतेंत अनेक मतभेद आहेत, म्हणून हे सर्व मिटेतोंपर्यंत भाषिक महाराष्ट्राची निर्मिति अशक्य आहे अशा तऱ्हेचा युक्तिवाद 'मध्यवर्ती सरकार'मधील कांहीं जबाबदार नेते आजपर्यंत करीत असत. ह्या युक्तिवादाच्या तंगड्याच ह्या करारानें तोडून टाकल्या आहेत. कलह आणि फाटाफूट हे दुर्गुण महाराष्ट्राच्या पाचवीला पुजलेले आहेत. ह्यामुळें महाराष्ट्राचें सामर्थ्य कितीहि बलाढ्य असलें तरी भारतीय राजकारणाच्या आघाडीवर तो प्रभावानें तळपूं शकत नाहीं. 'संयुक्त महाराष्ट्रा' च्या बाबतींतहि आजपर्यंत मराठी भाषिकांचा संघटित आणि प्रातिनिधिक आवाज उमटूं शकला नाहीं, म्हणून त्यांच्या मागणीची मध्यवर्ती सरकारनें आजपर्यंत उपेक्षा केली. अशा परिस्थितींत महाराष्ट्रांतल्या कांहीं जबाबदार नेत्यांनीं काळाचीं चिन्हें ओळखून आणि ऐक्याची निकड लक्षांत आणून 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा'चा एक सर्वसंमत मसुदा तयार केला ह्याबद्दल त्यांचें जेवढें अभिनंदन करतां येईल तेवढें थोडेंच आहे. नागपूर

येथें झालेल्या ह्या अकराकलमी 'संयुक्त महाराष्ट्रा' च्या करारामागें आम मराठी जनता जर उभी राहिली, तर 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा' चें विशाल आणि विलोभनीय स्वप्न साकार होण्यास यत्किंचित्‌हि विलंब लागणार नाहीं हें काय आम्हीं सांगावयास हवें?

नागपूर येथें मुंबईसह 'संयुक्त महाराष्ट्रा' चा हा जो ऐतिहासिक करार झाला, त्याचें श्रेय गेल्या गुरुवारीं ह्याच अर्थाचा एक ठराव श्री. यशवंतराव मोहिते ह्यांनीं मुंबई कायदेमंडळांत आणला असतां त्याजवर भाषण करतांना श्री. भाऊसाहेब हिरे ह्यांनीं 'महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस' ला जरी दिलें असलें, तरी ह्या थोर यशाचे खरे मानकरी स्वतः श्री. भाऊसाहेब हिरे आहेत हें सूर्यप्रकाशासारखें स्वच्छ आहे. भाषावार प्रांतरचनेच्या मार्गामधलीं पंडित नेहरू आणि मोरारजी देसाई हीं दोन प्रचंड संकटें आहेत. काँग्रेसवाल्यांना त्यांचा वचक आणि धाक केवढा आहे हें का सांगावयाला हवें? अशा परिस्थितींत 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा' च्या प्रश्नाचा एकसारखा पिच्छा पुरवून त्याजवर महाराष्ट्रीय काँग्रेसजनांमध्यें एकमत घडवून आणावयाचें हें फार धैर्याचें काम होतें. तें धैर्य श्री. भाऊसाहेब हिरे ह्यांनीं दाखविल्याबद्दल त्यांचें जेवढें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे. 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा' चा ठराव मुंबई कायदेमंडळांत आला असतां मोरारजी देसाई ह्यांनीं तो बिनमुदत पुढें ढकलण्याची कारवाई केली. नाहीं तरी मोरारजी-भाईकडून दुसऱ्या कोणत्या गोष्टीची महाराष्ट्रानें अपेक्षा करावयाची? ही कारवाई करतांना मोरारजी म्हणाले, "ह्या ठरावामुळें कायदेमंडळांत आणि बाहेर वाद निर्माण होईल. आणि ह्या वादामुळें राज्यकारभाराचा समतोलपणा ढळेल!" भाषिक प्रांतांच्या तत्त्वाला भारत सरकारनें जर आधींच मान्यता दिलेली आहे, तर त्यासंबंधींच्या ठरावांतून असा कोणता भयंकर वाद निर्माण होईल असें मोरारजींना भय वाटतें? 'संयुक्त महाराष्ट्रा' चें त्यांना भय वाटत नाहीं. पण त्या 'संयुक्त महाराष्ट्रा' ची राजधानी 'मुंबई' व्हावी ह्या गोष्टीचा मोरारजींच्या छातींत धसका बसतो आहे! म्हणून त्यांना त्या गोष्टीवर चर्चा नको आहे. पण म्हातारीनें कोंबडें कितीहि झांकून ठेवलें तरी सूर्योदय होण्याचें जसें थांबत नाहीं त्याप्रमाणें मुंबई ही महाराष्ट्राची राजधानी होण्यास मोरारजींनीं मनामधून वा बाहेरून कितीहि विरोध केला तरी मुंबई ही 'संयुक्त महाराष्ट्रा' ची राजधानी झाल्यावांचून आतां राहत नाहीं ही काळ्या दगडावरची रेघ आहे. मोरारजी

तोंडानें कितीहि म्हणत असले कीं ‘गांधींच्या मार्गानें जा’ तरी ते स्वतः ‘सरदार वल्लभभाई पटेलांच्या मार्गानें’ जाणारे आहेत. त्यांच्या पुण्याच्या कचेरींत महात्मा गांधींचें चित्र नाहीं. पण सरदार वल्लभभाईंचें एक मोठें तैलचित्र भिंतीवर टांगलें आहे. मुंबईचा समावेश ‘संयुक्त महाराष्ट्रां’त न होतां ती स्वतंत्र व्हावी ही सरदार वल्लभभाईंची कल्पित होती. संयुक्त महाराष्ट्राचे सर्वांत मोठे शत्रु म्हणजे सरदार पटेल. ‘दार कमिशन’ मधलें महाराष्ट्राविरुद्धचें सर्व गरळ हें सरदार पटेलांच्या मेंदूमधूनच निर्माण झालेलें आहे. त्या सरदारांचे ‘कल्याण-शिष्य’ मोरारजीभाई आहेत. तेव्हां ‘मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा’च्या ठरावावर चर्चा करण्याला त्यांनीं विरोध करावा हें साहजिकच आहे. तरी देखील त्यांच्या समक्ष ‘मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा’ची घोषणा श्री. भाऊसाहेब हिरे ह्यांनीं छातीठोकपणें केली ह्याबद्दल मराठी जनतेच्या वतीनें आम्ही भाऊसाहेबांना धन्यवाद देतों.

१-१०-१९५३

# ‘स्वतंत्र मुंबई’ चें कारस्थान

ह्या महाराष्ट्राचें दुर्दैव असें आहे कीं त्याच्या स्वातंत्र्यासाठीं आणि वैभवासाठीं प्राण अर्पण करणारे महान् देशभक्त जसे त्याच्या पोटीं जन्माला आले, त्याप्रमाणें त्याच्या नरडीला नख लावणारे कुलांगार कुलकलंकहि त्याच्या पोटीं निपजले. शिवाजीमहाराजांपासून तों विनोबांपर्यंत विश्ववंद्य नररत्नें जशी ‘नरनारी-रत्नांच्या आकर’ अशा ह्या महाराष्ट्र देशांत सतत निर्माण होत आलीं, त्याप्रमाणें जावळीच्या चंद्रराव मोऱ्यांपासून तों मुंबईच्या सदोबा पाटलांपर्यंत महाराष्ट्रद्रोही महारोग्यांची परंपराहि अद्यापि महाराष्ट्रांत अखंड आहे. महाराष्ट्र, महाविदर्भ आणि मराठवाडा ह्यांचा मुंबईसह अखंड नि प्रचंड ‘संयुक्त महाराष्ट्र’ निर्माण करण्याचा ऐतिहासिक करार नागपूर येथें घडवून आणण्याचा दिग्विजय करून आमचे भाऊसाहेब ‘हिरे’ पुण्याला कुठें परत येताहेत, तोंच गुजराती भांडवलवाल्यांच्या पैशावर स्वतःचें पोट जाळणारा आमचे सदोबा ‘कोळशे’ ह्यांनीं मुंबईचा समावेश भाषिक महाराष्ट्रांत होण्यास आपला विरोध आहे असा अमंगळ घूत्कार काढून ‘संयुक्त महाराष्ट्रा’च्या ह्या महन्मंगल कार्याला पहिलाछूट अपशकुन केला आहे. सदोबा ‘कोळशे’ (ह्यांना आम्ही आतां ह्यापुढें सदोबा कोळशेच म्हणणार. ह्यापेक्षां अधिक लायक आडनांव त्यांना मराठी भाषेंत दुसरें आढळणार नाहीं!) सदोबा कोळशे हे मुंबईतल्या भांडवलवाल्यांचे ‘भाडोत्री’ आहेत, ही गोष्ट महशूर आहे. ‘संयुक्त महाराष्ट्रा’ ची चळवळ राष्ट्रद्रोही पुणेरी मेंदूमधून निघाली आहे, हें विष ‘दार कमिशन’ च्या रिपोर्टांत कौशल्यानें ओतणाऱ्या सरदार वल्लभभाई पटेलांचे ते ‘डावे’ हात आहेत. कोणतेंहि घाण कृत्य करावयाचें झाल्यास सरदार पटेल नेहमीं ह्याच ‘डाव्या’ हाताचा उपयोग करीत असत. मुंबई कॉर्पोरेशनचे अध्यक्ष असतांना ‘महामुंबई’ निर्माण करून ‘संयुक्त महाराष्ट्रा’ ला सुरुंग लावण्याचें कपट-कारस्थान ह्याच सदोबा कोळश्यानें केलें. महाराष्ट्रांतून मुंबई फोडून काढण्याचा सदोबा कोळश्याचा उद्योग कांहीं नवा नाहीं. मुंबईच्या भांडवल-

वाल्यांनीं सदोबा कोळश्याला ह्या कामासाठीं बरोबर हुडकून काढलेलें आहे. कुऱ्हाडीचा दांडा हाच नेहमीं आपल्या गोताचा काळ ठरतो. त्याप्रमाणें ज्ञानेश्वरांच्या आणि छत्रपतींच्या महाराष्ट्राचें तोंड काळें करावयाला त्यांचीच भाषा बोलणारा आणि त्यांच्याच रक्तामांसाचा एकादा 'कोळसा' योजला पाहिजे हें रहस्य भांडवलवाल्यांनीं नेमकें ओळखलें. महाराष्ट्राची जो बदनामी करतो त्याला नेहरू सरकारांत फार मोठा मान मिळतो. शिवछत्रपतींची आणि लोकमान्य टिळकांची विटंबना करणारा एक मातृद्रोही महाराष्ट्रीय आज जगामधील एका महान् राष्ट्राचा भारतीय वकील होऊन बसला आहे. नेहरूंच्या दरबारांत सदोबा कोळश्याला कवडीचाहि मान नाहीं. मुंबईतल्या गुंडांच्या आणि हातभट्टीवाल्यांच्या मदतीनें सदोबा कोळश्यानें सार्वत्रिक निवडणुकींत मुंबई शहरामध्यें कॉंग्रेसला अभूतपूर्व यश मिळवून दिलें. पण एवढी कॉंग्रेससेवा करून 'नेहरूदेव' कांहीं सदोबा कोळश्यावर प्रसन्न झाले नाहींत आणि त्यांनीं आपल्या मंत्रिमंडळांत त्यांचा समावेश केला नाहीं. म्हणून महाराष्ट्राची 'मुंडी' जी मुंबई तीच कापून नेहरूदेवांच्या चरणीं अर्पण केली म्हणजे ते प्रसन्न होतील अन् सदोबा कोळश्यांना 'वर' देतील म्हणजे 'दिल्ली सरकारां'त घेऊन जातील अशी सदोबांची अपेक्षा आहे. महाराष्ट्रांतून मुंबई कापून निराळी करण्यामागें एका धोंड्यानें दोन पक्षी मारण्याचा सदोबांचा खोल डाव आहे. त्यांना भांडवलवाल्यांनाहि खूष करावयाचें आहे आणि नेहरूदेवांनाहि प्रसन्न करावयाचें आहे. हा कोळसा बाहेरून जेवढा काळा आहे, त्यापेक्षां आंतमध्यें तो अतिशयच काळा आहे. भयंकर काळा आहे. जितका उगाळावा तितका तो काळाच आहे. उलट उगाळणाराचेंच हात काळे व्हावयाचे.

नागपूरच्या ऐतिहासिक करारावर महाराष्ट्र, महाविदर्भ आणि मराठवाडा येथील नामवंत पुढाऱ्यांच्या सह्या झाल्यानंतर सदोबा कोळश्यांनीं त्याजवर जें गरळ ओकलें तें असें : "महाराष्ट्र राज्यस्थापनेसंबंधीं घेण्यांत आलेले निर्णय दुःखद आणि आपल्या लोकशाहीच्या सर्व संकेतांचा पूर्ण नाश करणारे आहेत. त्यांतहि मंत्रिमंडळापासून तों न्यायखात्यापर्यंत लायकीनुसार नव्हे तर प्रादेशिकतेनुसार माणसें निवडण्यांत यावींत यासारखा विषारी निर्णय लोकशाहींत दुसरा कोणताहि असूं शकणार नाहीं. केवळ नव्या राज्याच्या दृष्टीनेंच नव्हे तर अखिल राष्ट्राच्या दृष्टीनें या निर्णयाचा फेरविचार करणें हितावह आहे. भाषावार राज्यरचनेस मी बऱ्याच वर्षांपासून विरोध करीत आलों आहें. सत्तेचाळीस सालीं देश स्वतंत्र

झाला, त्या वेळीं आपल्या पुढाऱ्यांनीं कांहीं लोकांना चुचकारण्याच्या ऐवजीं या बाबतींत जरा कडक धोरण स्वीकारलें असतें तर भाषावार राज्यरचनेचा हा कट इतका पुढें वाढला नसता. खुद्द लोकसभेंतहि आज पुष्कळ सभासद भाषावार राज्यरचनेविरुद्धच्च आहेत. जोंवर देश सुस्थिर आणि आर्थिक दृष्ट्या मजबूत नाहीं, तोंवर देशाचे आणखी तुकडे न पाडण्याचें धोरण पत्करलें तर ते त्याला पाठिंबा देतील. कमींत कमी येतीं दहा वर्षें तरी देशाचे आणखी तुकडे पाडण्यास रोकडा नकार देण्यांत आला, तर देश अनेक अडचणींतून बाहेर पडेल. महाराष्ट्र राज्याची राजधानी मुंबई ठरविण्यांत आली आहे. पण मुंबई शहराबद्दल ही सूचना करण्यास कोणास आमंत्रण देण्यांत आलें नाहीं. यावरूनच या प्रकरणाचें खरें स्वरूप उघडें पडलें आहे. मुंबई शहराच्या भवितव्याच्या निर्णयाविषयीं मुंबई प्रदेश काँग्रेस समितीच्या अध्यक्षासहि बोलाविलें नाहीं, यावरून तेथें जमलेल्या लोकांची इच्छा, आपण आधीं ठरविलेले पक्के निर्णय निमूटपणें मान्य करणाऱ्या लोकांचेंच्च सहकार्य मिळविण्याची होती हें स्पष्ट दिसतें. अशा लोकांनीं घेतलेले निर्णय मुंबईला कधीं बंधनकारक होऊं शकणार नाहींत. गेलीं पस्तीस वर्षें मी मुंबईच्या लोकांबरोबर काम करीत आहें. मुंबईकरांचें मन उत्तम प्रकारें मला कळतें असा माझा दावा आहे. स्वतःचें वेगळें राज्य स्थापन करण्याची मुंबईच्या लोकांना भूक नाहीं. पण इतर लोक भाषावार राज्यरचनेचा गोंधळ घालून त्यांत मुंबईला ओढूं पाहतील तर मुंबईला स्वतःची वैशिष्ट्यपूर्ण रीतभात रक्षिण्यासाठीं जागरूक राहावें लागेल, आणि स्वतःचा आवाज ऐकवावा लागेल. कोणत्याहि भाषावार राज्यांत मुंबई स्वतःचें पंचरंगी व जातिधर्मभेदातीत मन सांभाळूं शकणार नाहीं, अशी मुंबईकरांना धास्ती वाटते. ब्रिटिशांनीं स्वतःला सोयिस्कर व्हावें म्हणून दीडशें वर्षांपूर्वीं निरनिराळे प्रांत बनविले. पण आज अशी परिस्थिति उद्भवली आहे कीं, हल्लींचे प्रांत भिन्न भिन्न करून नवीन प्रांत बनविण्यानें एकंदरींत परिस्थिति सुधारण्याऐवजीं अडचणीनें भरलेली होईल. मुंबई सरकारवर निरनिराळ्या व्यक्ति निरनिराळ्या दृष्टिकोनांतून वाटेल तेवढी टीका करोत. पण सर्व दृष्टींनीं पाहिल्यास मुंबईचें राज्यतंत्र उभ्या देशांत सर्वश्रेष्ठ आहे हें निर्विवाद आहे. हें माझें एकट्याचेंच्च मत नव्हे, तर इतर अधिकारी माणसांचेंहि मत आहे. महाराष्ट्रीय, गुजराती, पार्शी, ख्रिस्ती सर्वांनीं मिळून हें राज्यतंत्र रचलें आहे. दीडशें वर्षांची ही मेहनत धुळीस मिळविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. राज्यांच्या

पुनर्रचनेबाबत जी उच्चाधिकार समिति नेमण्यांत यावयाची आहे त्या समितीसमोर ह्या साऱ्या गोष्टी मांडण्यांत येतील तर अजूनहि देश या भयंकर आपत्तींतून वांचवितां येईल!"

गेल्या मंगळवारीं 'टाइम्स ऑफ इंडिया'ला मुलाखत देतांना सदोबा कोळशे ह्यांनीं असेच फूत्कार सोडले : "शुद्ध भाषिक तत्त्वावर मुंबई राज्याची फाळणी करणें ही एक महान् आपत्ति आहे. त्यामुळें राज्यकारभाराच्या आणि आर्थिक दृष्टीनें अनेक समस्या निर्माण होतील. ज्यांना निराळा भाषिक महाराष्ट्र हवा त्यांनीं मुंबईचा समावेश त्यांत करण्याचा आग्रह सोडून द्यावा. दुर्दैवानें हा आग्रह त्यांनीं सोडला नाहीं तर मुंबईला स्वतंत्र होण्याखेरीज दुसरा मार्गच राहत नाहीं. एक शतकाच्या अगणित नागरिकांच्या खडतर श्रमांनीं आणि अपरिमित सेवेनें मुंबईच्या नागरिकत्वाचा जो 'नमुना' निर्माण झाला आहे त्याचा विध्वंस करण्याचा कोणीं प्रयत्न करूं नये. आम्हां मुंबईकरांना स्वतंत्र राज्याची मुळींच उत्सुकता वाटत नाहीं. एका विशाल आणि संमिश्र राज्यांत राहून त्याच्या राजधानीचा जर आपल्याला फायदा घेतां येतो आहे तर स्वतंत्र राज्याची आकांक्षा बाळगणें मूर्खपणाचें आहे. प्रांताची भाषावार पुनर्रचना करण्यास कॉंग्रेस वा देश बांधलेला आहे, असें म्हणणें चुकीचें आहे. ऐतिहासिक दृष्ट्या हा आग्रह चुकीचा आहे. वीस सालीं कॉंग्रेस जनताभिमुख व्हावी म्हणून जी घटना करण्यांत आली तिच्यांत कॉंग्रेसचे प्रांत भाषातत्त्वावर करण्यांत आले. अडाणी माणसाला कॉंग्रेसच्या चळवळींत भाग घेतां यावा असा त्याचा उद्देश होता. त्या वेळीं देखील स्वतंत्र भारतांत त्याच तत्त्वावर प्रांतांची रचना करण्यांत येईल असें कोणींहि वचन दिलें नव्हतें. कॉंग्रेस घटनेंत मुंबई शहर हा स्वतंत्र प्रांत करण्यांत आलेला होता. मराठी व गुजराती ह्या त्यांच्या अधिकृत भाषा मानल्या होत्या. ह्या घटनेप्रमाणें मुंबई शहर हा द्विभाषी प्रांत ठरतो; संमिश्र राज्यांतील अल्पसंख्याकांच्या विफलतेच्या भावनेमधून भाषिक प्रांतांची मागणी निर्माण होते. आंध्राचेंच उदाहरण पाहा. पांच कोटी लोकसंख्येच्या राज्यांत एक चतुर्थांश तेलुगू भाषिक होते. तेलुगू बोलणाऱ्या जिल्ह्यांतून जमा केलेला महसुलाचा पैसा तेलुगू न बोलणाऱ्या विभागावर खर्च केला जातो ही तेलुगू लोकांची मुख्य तक्रार होती. तेलुगू लोकांना सापत्न वृत्तीनें वागविण्यांत येतें असें त्यांचें म्हणणें होतें. वृत्तपत्रांमधून आणि व्यासपीठांवरून अशा तऱ्हेचे जाहीर आरोप त्यांनीं

केले. ह्यावरून त्यांच्या तक्रारीचें स्वरूप भाषिक नसून आर्थिक होतें. आंध्रापेक्षां कर्नाटकाची मागणी अधिक न्यायाची आहे. कारण मुंबई, मद्रास आणि म्हैसूर अशा तीन राज्यांत कन्नडिगांची विभागणी झालेली आहे. मद्रास नि मुंबईमध्यें आपण उपेक्षणीय होण्याइतके अल्पसंख्य असल्यामुळें आपल्या हितसंबंधांकडे लक्ष दिलें जात नाहीं अशी त्यांची तक्रार आहे. ह्या तक्रारी देखील आर्थिक आहेत. भाषिक नाहींत. भाषिक महाराष्ट्राच्या मागणीची भूमिका यापेक्षां निराळी आहे. संस्थानें विलीन होण्यापूर्वी मुंबई राज्यांत पंचावन्न टक्के मराठी भाषिक होते. हें मताधिक्य निर्णायक आहे. संस्थानाच्या विलीनीकरणानंतर हें प्रमाण थोडें कमी झालें असेल, तरी देखील मराठी भाषिक ह्या राज्यांत बहुसंख्यच आहेत. संयुक्त कर्नाटक झाल्यानंतर मराठी भाषिकांचें प्रमाण साठ टक्के होईल. अशा परिस्थितींत मराठी भाषिकांवर जुलूम होईल किंवा त्यांना सापत्नभावानें वागवलें जाईल असें कोणी तरी शहाणा माणूस म्हणूं शकेल काय? साठ टक्के मराठी भाषिकांना जर मुंबई राज्य आपलें वाटत नसेल तर मग निरनिराळ्या भाषा बोलणारीं भारतांत दुसरीं जीं अनेक राज्यें आहेत आणि जेथले लोक जणुं कांहीं गंमत म्हणूनच स्वतंत्र प्रांत मागत आहेत त्यांच्याबद्दल काय म्हणावें बरें? मराठी भाषिकांचा स्वतंत्र प्रांत मागणाऱ्यांशींच माझें भांडण नाहीं. पण माझा युक्तिवाद असा आहे कीं तुम्हां मराठी भाषिकांचें ह्या राज्यांत साठ टक्के प्रमाण आहे. तुम्ही बहुसंख्य आहांत. तुम्ही स्वतंत्र राज्य कशाला मागतां? तुम्ही हें राज्य आपलें आहे असें माना, आणि राज्यकारभारावर तुमचा असा प्रभाव पाडा कीं अल्पभाषिक लोक तुमच्याशीं सद्भावनेनें वागतील व स्वतंत्र प्रांत मागणार नाहींत. दीडशें वर्षांपूर्वी इंग्रजांनीं आपल्या सोयीसाठीं वाटेल तसे प्रांत घडवले असतील. पण इतकीं वर्षें आपण जें एकत्र राहिलांत तें काय फुकट? आपल्यामध्यें समान नागरिकत्वाचे बंध निर्माण झालेले आहेत. म्हणून केवळ भाषेच्या तत्त्वावर आपण एकमेकांपासून विलग होणें हें अनर्थकारक आहे. काँग्रेसच्या घटनेंत मुंबई शहर हें तीस वर्षें स्वतंत्र म्हणून गणलें गेलें आहे. ह्या शहरांत अनेक धर्म आणि अनेक भाषा आहेत. तें स्वतंत्र राज्य होईल तरच ह्याचें संमिश्र स्वरूप आणि त्याचें रमणीय नागरिक जीवन सुरक्षित राहील. भाषिक तत्त्वावर ह्या राज्याची फाळणी करण्याचा किंवा मुंबई स्वतंत्र राज्य करण्याचा प्रश्न उपस्थित न होईल तर फार बरें!"

भाषिक प्रांतरचना आणि मुंबईचें स्थान ह्या विषयावरील सदोबा कोळशे ह्यांचे सर्व अमंगळ विचार ह्या दोन्ही वक्तव्यांमध्यें स्पष्टपणें प्रकट झालेले आहेत. असत्य विधानें आणि भ्रामक युक्तिवाद ह्यांची बेमालूम खिचडी बनविण्याचे कामीं सदोबा कोळश्यांचा हात धरतां येणार नाहीं. नागपूरचा करार करतांना मुंबईतर्फे मला कां बोलावण्यांत आलें नाहीं असा सदोबा कोळश्यांचा सवाल आहे. भाषावार प्रांतरचनेच्या जो पहिल्यापासून विरुद्ध आहे आणि मुंबई ही महाराष्ट्राची राजधानी नाहीं असें ज्याचें स्पष्ट मत आहे अशा महाराष्ट्रविरोधी माणसाला 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या वाटाघाटीच्या वेळीं कशाला बोलवायचें? मसाल्याचें दूध बनवतांना त्यामध्यें हा कोळसा कशाला? मुंबईकरांचें मत आपल्याला कळतें असा सदोबांचा दावा आहे. पण हा त्यांचा भ्रम आहे. भांडवलवाल्यांचीं मतें (आणि खिसे) सदोबा कोळश्यांना उत्तम कळतात ह्यांत मुळींच शंका नाहीं. पण मुंबईमधल्या पन्नास टक्के मराठी भाषिकांचीं मनें त्यांना सुतरामहि कळत नाहींत असें आम्ही त्यांच्या तोंडावर सांगूं. सदोबा कोळशे हे तीस वर्षें मुंबईत राहिले आणि तीन वेळां मुंबईचे मेयर झाले तरी मुंबईमधल्या बहुसंख्य मराठी जनतेचे ते प्रतिनिधि होऊं शकत नाहींत. म्हणून भाषिक महाराष्ट्राच्या कोणत्याहि चर्चेंत वा वाटाघाटींत त्यांना स्थान नाहीं. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भाषिक प्रांत देण्याचें अभिवचन काँग्रेसनें देशांना मुळींच दिलें नव्हतें हें सदोबा कोळश्यांचें विधान धादांत खोटें आहे. काँग्रेसचें राजकारण आतां सदोबा कोळश्यांना पहिल्यापासून पुन्हा शिकवायला पाहिजे. भाषिक प्रांतांच्या रचनेला नेहरू सरकारनें कितीहि विरोध केला किंवा खळखळ केली तरी भाषिक प्रांतरचनेच्या तत्त्वाला काँग्रेसनें आणि नेहरू सरकारनें निःसंदेह मान्यता दिलेली आहे. तेव्हां 'उच्चाधिकार मंडळा'पुढें भाषावार प्रांतरचनेच्या विरुद्ध कैफियत सादर करावयाची सदोबा कोळश्यांची कल्पना हास्यास्पद आहे. भाषावार प्रांत-रचनेचें घोडें आतां फार पुढें गेलें आहे. सदोबा कोळश्यांनीं आतां कितीहि आकाशपाताळ एक केलें तरी त्याला ते आतां मागें खेचूं शकणार नाहींत. नेहरू सरकारनेंच पहिल्यापासून फार मऊ धोरण पत्करलें म्हणून 'भाषावार राज्यरचनेचा कट' शिजत गेला हाहि सदोबा कोळश्यांचा युक्तिवाद खोटा आणि खोडसाळ आहे. भाषावार राज्यरचनेचा म्हणे हा कट! अरे वा रे वा सदोबा कोळशे! भाषावार राज्यरचना होऊं नये, विशेषतः 'संयुक्त महाराष्ट्र' होऊं नये हा खरा सरदार

वल्लभभाईंचा कट! 'दार कमिशन' चा अहवाल हा त्या कटाचा अधिकृत खलिता! त्या कटांतला सदोबा कोळशे हा म्होरक्या खलपुरुष! आणि तोच आम्हांला सांगतोय् कीं भाषावार राज्यरचना घडवून आणण्याचा देशांत कट झालाय् म्हणून! चोराच्या उलट्या बोंबा म्हणतात ना, त्या ह्या अशा. भाषिक प्रांतरचना म्हणजे 'देशाचे तुकडे पाडणें' ही भाषा सरदार पटेलांनीं 'दार कमिशन'च्या तोंडून वदविली. तीच भाषा आज नेहरू आणि सदोबा कोळशे वापरीत आहेत. भाषिक प्रांतरचनेचा हेतु देशाचें ऐक्य आणि सामर्थ्य वाढविणें हा आहे, देशाचे तुकडे करणें हा नव्हे. भाषिक प्रांत म्हणजे देशाचे तुकडे होत, असें जे पुढारी म्हणतात ते लुच्चे आहेत. भाषिक प्रांतांत मुंबई आली म्हणजे तिचें पंचरंगी आणि जाति-धर्मातीत स्वरूप वा रमणीय नागरिक जीवन नष्ट होईल ही सदोबा कोळश्यांनीं उठविलेली घबराट जशी कावेबाजपणाची आहे, तशी महाराष्ट्राची बदनामी करणारी आहे. महाराष्ट्रीय लोक हे तर सर्व भाषिकांपेक्षां अधिक रसिक आणि उदार (cosmopolitan) आहेत. मुंबईसारख्या आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या सुंदर शहरावर दारूबंदी लादून तिला हातभट्टीच्या नरकपुरीचें जसें भेसूर स्वरूप संमिश्र मुंबई सरकारनें दिलें आहे, तसें भाषिक महाराष्ट्रांत तिला मिळणार नाहीं. भाषिक महाराष्ट्रांत मुंबईचा समावेश झाल्यावर ह्या शहराच्या बहुभाषिक आणि बहुधार्मिक स्वरूपामध्यें यत्किंचित्‌हि बदल होणार नाहीं हें सदोबा कोळश्यांनीं लक्षांत धरावें. सध्यांच्या मुंबई राज्यांत मराठी भाषिक साठ टक्के आहेत, तेव्हां हें मराठी भाषिकांचेंच राज्य आहे हाहि सदोबा कोळश्यांचा युक्तिवाद कावेबाज-पणाचा आहे. आज मुंबई कायदेमंडळांत बहुसंख्य सभासद महाराष्ट्रीय आहेत. पण त्यांना संयुक्त महाराष्ट्राची साधी चर्चा करण्याचें सुद्धां स्वातंत्र्य नाहीं. महा-राष्ट्रीयेतर भांडवलवाले लोक पैशाच्या जोरावर महाराष्ट्रीयांत फूट पाडून सत्ता आणि संपत्ति ह्यांचा सर्व फायदा आपल्या पदरांत पाडून घेतात असा आतांपर्यंत अनुभव आहे. मुंबई राज्यांत साठ टक्के जर मराठी जनता आहे तर कोयना किंवा मुळाकुकडी ह्यांसारख्या महाराष्ट्राच्या कल्याणाच्या योजना कां फलद्रूप होत नाहींत? बहुसंख्य मराठी जनतेच्या ह्या मुंबई प्रांतांत महाराष्ट्राचीं कामें कां होत नाहींत? छत्रपति शिवाजीमहाराज आणि लोकमान्य टिळक ह्यांच्या साध्या सुट्या सुद्धां मिळत नाहींत इथें! सदोबा कोळशे काय सांगतो बोडखें! भाषिक प्रांतांतच मराठी भाषिकांचा विकास होऊं शकेल ही काळ्या दगडावरची रेघ आहे. सामान्य जनतेला

राज्यकारभार कळला पाहिजे आणि त्यांत भाग घेतां आला पाहिजे ही भाषिक प्रांताची खरी लोकशाही भूमिका आहे. म्हणून मुंबई राज्याची भाषिक विभागणी होऊं नये आणि झाल्यास मुंबई शहर स्वतंत्र राहावें, असा आग्रह धरणारे सदोबा कोळशी हे लोकशाहीचे आणि महाराष्ट्राचे कट्टर दुष्मन होत.

२१-१०-१९५३

## वज्राघात !

गेला रविवार हा महाराष्ट्राच्या इतिहासांत काळ्या अक्षरानें लिहावयाला पाहिजे. पानिपतच्या तिसऱ्या लढाईनंतर महाराष्ट्राचा एवढा पराभव, मानहानि आणि तेजोभंग कधींच झाला नसेल. दोन पाट काढून अन् तोंडाला काळें फासून महाराष्ट्राची जवळजवळ गाढवावरूनच धिंड काढण्यांत आलेली आहे. भारताच्या नकाशामधून महाराष्ट्राचें नांव अजिबात पुसून टाकण्याचाच हा भयानक प्रयत्न आहे. तीन कोटी मराठी भाषिकांची एकमुखी मागणी लाथाडण्यांत येऊन त्यांच्या भावनांचा आणि हक्कांचा अक्षरशः भडाग्नि करण्यांत आलेला आहे. ज्या भारताला स्वातंत्र्य मिळवून देण्यांत गेल्या शतकामध्यें महाराष्ट्रानें जास्तींत जास्त बलिदान आणि पराक्रम केला, त्याचें स्वतंत्र भारतामध्यें जाहीरपणें आज नाक कापण्यांत आलें आहे. साधुसंतांच्या, वीरांच्या, मुत्सद्द्यांच्या आणि कलावंतांच्या तेजस्वी परंपरा शतकानुशतकें ज्या महाराष्ट्रामधून अखंडपणें निर्माण होत आहेत, त्याचें ऐतिहासिक, वैचारिक आणि सांस्कृतिक जीवन गाडून नष्ट करण्याचा हा प्रयत्न आहे. ज्या महाराष्ट्र-भाषा-माउलीच्या कुशींतून ज्ञानोबांपासून तों विनोबांपर्यंत विचारसृष्टीचे आणि शब्दसृष्टीचे अनेक 'ईश्वर' जन्माला आले, त्या भाषेचें सर्व वैभव आणि सौभाग्य पुसून टाकण्याचें हें सारें कवटाळ आहे; दुसरें काय? स्वतंत्र भारताच्या लोकशाही राज्यांत केवळ महाराष्ट्राच्या बाबतींत एवढा भयाण पंक्तिप्रपंच आणि पक्षपात केला जावा या अन्यायाला कांहीं सीमा आहे का? ही विटंबना आणि अप्रतिष्ठा मानधन महाराष्ट्र मुकाट्यानें सहन करील अशी काँग्रेस श्रेष्ठींनीं आपली कल्पना करून घेतली असेल तर त्यांच्या अकलेची जेवढी तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. आज भारतांत महाराष्ट्राला जेवढे शत्रू असतील तेवढे दुसऱ्या भाषिकांना क्वचित्‌च असतील. ज्याच्या त्याच्या डोळ्यांत महाराष्ट्र सलतो. मराठी माणूस पाहिला कीं साऱ्यांच्या पोटांत दुखतें. महाराष्ट्राबद्दल इतरांना वाटणारें वैषम्य आजचें नाहीं. जुन्या काळापासून तें

चालत आलेलें आहे. आजहि देशाचीं सूत्रें ज्यांच्या हातीं आहेत, त्यांच्या काळजांत महाराष्ट्राबद्दल जबरदस्त ठणका आहे. म्हणून महाराष्ट्राला देशाच्या नकाशांत प्राधान्य मिळूं नये, मराठी भाषिकांचें राज्य निर्माण होऊं नये, मराठी माणसांची आणि भाषेची शक्ति वाढूं नये किंवा त्यांची भरभराट होऊं नये अशी 'दार कमिशन'च्या काळापासून आजच्या राज्यकर्त्यांची मुसंगत कारवाई आहे. त्या कमिशनच्या अहवालांत तर चक्क लिहिलें होतें कीं, 'संयुक्त महाराष्ट्रा'ची चळवळ ही 'राष्ट्रद्रोही पुणेरी पंथीयांची पेशवाई प्रतिष्ठापने'ची चळवळ आहे. त्यानंतर 'ज. व. प.' समितीचेंहि महाराष्ट्राबद्दलचें धोरण तेंच होतें. मुंबईवांचून 'संयुक्त महाराष्ट्र' होत नाहीं हें या समितीला माहीत होतें. म्हणून वाटेल तें झालें तरी मुंबईचा अंतर्भाव भाषिक महाराष्ट्रांत होतां कामा नये, असा त्या समितीनें स्पष्ट निर्णय दिला. दार कमिशन आणि ज. व. प. समिति ह्यांचीच धाकटी आणि नकटी बहीण ही 'फा. कुं. पा.' (फाजल अली–कुंझरू–पाणिक्कर) समिति. ह्या बयेनें तर संयुक्त महाराष्ट्राचे तीन तेरा करून टाकले. कारवार आणि बेळगांव हे त्याच्या पायाचे दोन चवडे तिनें कापले. विदर्भ हा त्याचा डावा ग्वांदा तिनें तोडून निराळा केला; त्याजवर महाराष्ट्राचें उत्तमांग जें मुंबई, त्याजवर 'महागुजरात'चा ढेरपोट्या शेटजी आणून बसवला. (नुसत्या गुजरातचें ओझें कमी पडलें असतें म्हणून कीं काय, त्यांत सौराष्ट्र आणि कच्छचा आणखी बोजा मिसळला.) 'फाकुंपा' समिति ही 'राज्यपुनर्रचना' करण्यासाठीं नेमली होती का 'राज्यपुनर्विवाह' लावून देण्यासाठीं नेमली होती? दार कमिशन, ज. व. प. समिति आणि 'फाकुंपा' समिति ह्या तिन्ही समितींचें महाराष्ट्राबद्दलचें धोरण अगदीं एक आहे. त्यांत अक्षराचाहि बदल नाहीं. हें प्रत्येक मराठी माणसानें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्या एकाच गोष्टीवरून स्वतंत्र भारताचीं राज्यसूत्रें आज ज्यांच्या हातीं आहेत, त्यांच्या पोटांत महाराष्ट्राबद्दल यत्किंचित्‌हि प्रेम नाहीं---किंबहुना, तें महाराष्ट्राचे प्रच्छन्न वा अप्रच्छन्न शत्रूच होत ही गोष्ट सूर्यप्रकाशाएवढी स्वच्छ आहे. म्हणूनच त्यांचा महाराष्ट्रद्वेष 'फाकुंपा' समितीच्या अहवालांतून एवढ्या भयानक स्वरूपामध्यें आज प्रकट झालेला दिसतो आहे.

'फाकुंपा' समितीचा अहवाल प्रसिद्ध होण्यापूर्वीं आमच्या राज्यकर्त्यांनीं जें एक विलक्षण हास्यास्पद नाटक करून दाखवलें त्यांत त्यांचें ढोंग तर प्रकट झालेंच, पण त्यांच्या महाराष्ट्रद्वेषाचें बेंडहि पण चांगलें फुटून बाहेर आलें! ह्या नाटकाचें 'मंगला-

चरण' महिन्या-दीड-महिन्यापूर्वी पंडित नेहरू यांनीं गायिलें. सोळा ऑगस्ट रोजीं गोव्याच्या अत्याचाराची मुंबईमध्यें जी प्रतिक्रिया झाली तिला उद्देशून नेहरू एका जाहीर सभेंत म्हणाले कीं, "राज्यपुनर्रचना समितीचा अहवाल प्रसिद्ध झाल्या-नंतर होणाऱ्या अत्याचाराची ही रंगीत तालीमच्च मुंबईत झाली म्हणायची!" यावरून फाकुंपा समितीच्या शिफारशींची सर्व बित्तंबातमी राज्यकर्त्यांना होती--असलीच्च पाहिजे. कारण त्यांच्याच प्रेरणेनें त्यांतली सगळी कारवाई झाली; पण त्यांनीं बाहेरून असें कांहीं सोंग आणलें कीं, त्यांतलें एक अक्षरसुद्धां जसें कांहीं ह्यांना माहीत नाहीं. कानावर हात ठेवून हे बगळे ज्याला त्याला सांगत सुटले कीं, "देवाशपथ या समितीच्या शिफारसींची गंधवार्तासुद्धां आम्हांला नाहीं." पण कर्मधर्मसंयोग असा कीं, ह्याच वेळीं ह्या समितीच्या शिफारसींच्या इत्थंभूत बातम्या वर्तमान-पत्रांमधून हळूहळू प्रसिद्ध होऊं लागल्या; आणि लोकांत खळबळ माजूं लागली. त्यावर ही बगळे मंडळी गंभीर चेहरे करून पुन्हा सांगूं लागली, "छे, छे, अशा शिफारसी असतील असें आम्हांला वाटत नाहीं. कारण अजून अहवाल मुळीं मध्यवर्ती सरकारकडे सादरच्च झाला नाहीं! समितीचा अहवाल कसाहि असला तरी डोकीं शांत ठेवा. माथीं भडकून देऊं नका. संयमानें वागा." अशीं पत्रकें काढण्याचा आणि संदेश देण्याचा धूर्त राज्यकर्त्यांनीं सपाटा लावला. त्याला त्यांच्या बगलबच्चा पत्रकर्त्यांनीं आणि लुंग्यासुंग्या पुढाऱ्यांनीं साथ दिली. 'डोकीं शांत ठेवा' ह्या उपदेशाच्या घागरीच्या घागरी जनतेच्या डोक्यावर उपड्या होत असतांनाच्च, मुंबईच्या मराठी वसतीमधून आणि महाराष्ट्राच्या प्रमुख शहरांतून हातांत बंदुकी घेऊन पोलिसांच्या मोठमोठ्या टोळ्या फिरूं लागल्या. हिंदु-मुसल-मानांच्या दंग्याच्या वेळींसुद्धां इतके हत्यारबंद पोलिस एवढ्या संख्येनें उघडपणें असे फिरलेले आम्हीं पाहिलेले नाहींत. 'फाकुंपा' समितीच्या अहवालांत जर महाराष्ट्राबद्दल काय शिफारसी केलेल्या आहेत हें तुम्हांला माहीत नव्हतें तर महाराष्ट्रांत एवढा पोलिसबंदोबस्त ठेवण्याचें काय कारण होतें तुम्हांला? आणि 'डोकीं शांत ठेवा, डोकीं शांत ठेवा' असा आक्रोश छाती पिटून मराठी जनते-समोर करण्याची आवश्यकता कां वाटली तुम्हांला?

'सत्यमेव जयते' ही पाटी गळ्यांत अडकवणाऱ्या राज्यकर्त्यांनीं एवढें ढोंगी, असत्य आणि कपटाचें वर्तन करावें हें बघून आम्हांला तर ह्या लोकांची शिसारीच्च आली. अहवालाच्या प्रती राज्यकर्त्यांच्या हातीं प्रत्यक्ष पडल्या तरी त्यांचें हें ढोंग

चालूच होतें. कोणी म्हणाले, "दोनशें-सदुसष्ट पानांमधलीं मीं पांचपन्नास पानें चाळलीं असतील नसतील इतकेंच काय तें." अशी इरसाल आणि कोडगी मंडळी जगांत कोटल्याहि देशांत नसतील! पुढें अहवाल प्रसिद्ध झाला. तो वाचल्यानंतर वर्तमानपत्रांमध्यें पूर्वी प्रसिद्ध झालेले अंदाज सर्वच्या सर्व खरे ठरले. यावरून 'फाकुंपा' समितीसारख्या महत्त्वाच्या समितीचा अहवाल केवढ्या 'गुप्त आणि रहस्यात्मक' वातावरणांत लिहिला गेला असला पाहिजे त्याची कल्पना येते. 'सरकारी रहस्य' म्हणून कांहीं या देशांत उरलें आहे का नाहीं? आमचे एक दीडशहाणे पत्रकार बंधु तर अहवालांतल्या बातम्या आधीं फुटल्या या गोष्टीवर बेहद्द खूष होऊन सरकारची पाठ थोपटूं लागले. ते म्हणाले, "केवढा हा मुत्सद्दीपणा! एकदम वाईट बातम्या ऐकून जनतेला केवढा धक्का बसला असता! म्हणून अहवालाच्या अनिष्ट बातम्या मुद्दाम आगाऊ प्रसिद्ध करून देऊन जनतेचीं मनें सरकारनें हळूहळू तयार केलीं!" आतां आमचे हे ढोंगी पुढारी आम्हांला सांगतात कीं, "हा अहवाल शांतपणें वाचा आणि त्याचा अभ्यास करा!" अभ्यास करण्यासारखें ह्या अहवालांत आहे काय डोसकें! हा अहवाल म्हणजे काय 'शांकरभाष्य' आहे का 'योगवासिष्ठ' आहे? महान् ध्येयांच्या आणि तत्त्वांच्या गंभीर विवेचनाचा मोठा आव आणून महाराष्ट्राच्या डोक्यांत घातलेला हा एक दोनशेंसदुसष्ट पानांचा हातोडा आहे झालें. हा म्हणे आम्हीं शांतपणें वाचावयाचा नि ह्याचा अभ्यास करावयाचा. आमची खात्री आहे कीं, महाराष्ट्रांतल्या स्वाभिमानी गृहिणी ह्या अहवालांतलें एकेक पान चुलींत टाकून दोनशेंसदुसष्ट दिवस स्वयंपाक करतील!

ह्या अहवालाचा जेवढा भाग इंग्रजी वृत्तपत्रांत विस्तारानें प्रसिद्ध झाला आहे तेवढा आम्हीं काळजीपूर्वक वाचला आहे आणि तेवढा वाचून आम्हीं असें छातीठोकपणें सांगतों कीं, या अहवालांत सत्य, न्याय, तर्क किंवा सुसंगति ह्या गोष्टी औषधापुरत्यासुद्धां आढळणार नाहींत. फाजलअलींबद्दल आम्हांस कांहीं माहिती नाहीं. पण पंडित हृदयनाथ कुंझरू आणि पाणिक्कर ह्यांच्याबद्दल आतांपर्यंत आम्हांला मोठा आदर वाटत होता. तो आदर आतां आमच्या मनांतून सपशेल नाहींसा झालेला आहे. स्वतःच्या बुद्धीनें विचार करण्याची ह्या दोघांमध्यें मुळींच शक्ति नाहीं. एखादें सत्य पटलें तर त्याप्रमाणें निर्णय देण्याचें धैर्यहि त्यांच्या अंगीं नाहीं. जवळजवळ दोन वर्षें ह्या 'फाकुंपा

समिती 'नें जनतेचे हजारों रुपये खर्च करून राष्ट्राची निष्कारण वंचना केली. कारण राज्यपुनर्रचनेबद्दल काय निर्णय द्यायचे हें अगोदरच त्यांना वरून सांगण्यांत आलेले होतें. त्याच दृष्टीनें सर्व साक्षीपुरावे त्यांनीं घेतले आणि आपला हा बनावट अहवाल तयार केला. ही गोष्ट ह्या अहवालांतल्या त्यांच्या अनेक भोंगळ आणि पोचट युक्तिवादांवरून सिद्ध करतां येण्यासारखी आहे. 'सर्व राज्यांची पुनर्रचना वस्तुनिष्ठ आणि निर्विकारपणें करावयाची कीं ज्या योगानें घटक राज्यांचें आणि भारताचें कल्याण होईल' या उद्देशानें सरकारनें ही समिति नेमली खरी. पण ह्या समितीनें राज्यपुनर्रचनेचा सर्वच प्रश्न वस्तुनिष्ठ आणि निर्विकार दृष्टीनें सोडविण्याचा प्रयत्न केलेला नाहीं; आणि 'संयुक्त महाराष्ट्र'चा प्रश्न तर केवळ व्यक्तिनिष्ठ आणि विकृत दृष्टिकोनानें त्यांनीं उधळून लावलेला आहे. राज्याची पुनर्रचना करतांना लोकांच्या इच्छा आधीं विचारांत घेतल्या पाहिजेत हा सिद्धान्त मोठ्या संभावितपणें समितीनें सांगितला आहे. पण तीन कोटी लोकांच्या इच्छा पायांखालीं तुडवतांना मात्र तिला एवढा देखील संकोच वाटला नाहीं. 'भाषा किंवा संस्कृति या एकाच कसोटीवर राज्याची पुनर्रचना करणें शक्य नाहीं वा इष्ट नाहीं.' असें ही समिति सांगते. त्याचप्रमाणें भाषिक ऐक्य हें राज्यकारभाराच्या दृष्टीनें महत्त्वाचें कारण असलें तरी 'एक भाषा, एक राज्य हें तत्त्व मान्य करावयाचें नाहीं. कारण, एकभाषिक राज्यानें प्रांतीयता वाढेल नि भारतीय राष्ट्रवादाचें नुकसान होईल' असें ही समिति शहाजोगपणें म्हणते. पण असें असूनहि सोळापैकीं चौदा राज्यें तिनें भाषिक आणि सांस्कृतिक तत्त्वावर निर्माण करण्याची शिफारस केलेली आहे. 'एक भाषा, एक राज्य' हें तत्त्व नको नको म्हणत तिनें नऊ भाषेचीं नऊ राज्यें निर्माण केलीं आहेत; आणि आंध्रामध्यें हैदराबादचें विसर्जन करण्याची शिफारस केलेली आहे. 'एक भाषा एक राज्य' नको 'ची अंमलबजावणी फक्त महाराष्ट्राच्या बाबतींत ! (हिंदी भाषिकांचीं दोन राज्यें होणें हें मुळीं अपरिहार्यच होतें! आणि सर्व हिंदी भाषिकांनीं एका राज्यांत येण्याची मुळीं मागणीच केलेली नव्हती.)

'हिंदुस्थानचा नवा राजकीय नकाशा बहुसंख्य जनतेला पसंत पडेल आणि पूर्वीच्या रचनेमध्यें स्पष्टपणें सुधारणा होईल अशा रीतीनें काढावयाचा' हें ह्या समितीनें ध्येय स्वीकारलें होतें. इतर राज्यांतल्या बहुसंख्य जनतेबद्दल आम्हांला कांहीं म्हणावयाचें नाहीं. पण 'संयुक्त महाराष्ट्रा 'बाबत तिनें जें पक्षपाती धोरण

स्वीकारून त्याची वाताहत केली आहे, तें कोणत्या बहुसंख्य जनतेला पसंत आहे आणि त्यानें पूर्वीच्या रचनेमध्यें अधिक स्पष्ट अशी कोणती सुधारणा झाली आहे हें समितीनें सांगावें! 'द्वैभाषिक राज्या'ची मागणी तर समितीनें आपल्या स्वतःच्या डोक्यांतूनच काढलेली दिसते. कोणाहि मराठी माणसानें 'द्वैभाषिक राज्यां'त आपण आनंदानें राहूं असें म्हटल्याचा पुरावा समितीनें दाखविलेला नाहीं. 'महागुजरात'वाल्यांनींहि 'द्वैभाषिक राज्या'ची मागणी कधीं केलेली नाहीं. तथापि समिति आपल्या अहवालांत म्हणते कीं, "बहुसंख्य गुजराती लोक सध्यांच्या संमिश्र मुंबई राज्यांत राहण्यास तयार आहेत. आणि 'गुजरात प्रदेश काँग्रेस समिति'नें आपल्याला अशी निःसंदिग्ध हमी दिली आहे कीं, गुजराती भाषिक लोक भारताच्या हितासाठीं आपल्या महाराष्ट्रीय बांधवांच्या हातांत हात घालून एका राज्यांत राहण्यास खूष आहेत." गुजरात्यांच्या बरोबर एका राज्यांत नांदायला मराठी लोक तयार आहेत काय असा प्रश्न सदर समितीनें महाराष्ट्रीय लोकांना मात्र विचारला नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तशा तऱ्हेची हमी महाराष्ट्र काँग्रेस समितीकडून तिनें कां घेतली नाहीं? सध्यांच्या काय किंवा नव्या काय मुंबई राज्यांत बहुसंख्य जनता महाराष्ट्रीयच आहे. ह्या बहुसंख्य जनतेच्या इच्छा काय आहेत त्याची परवा न करतां, किंबहुना जाणून बुजून त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांची सांगड गुजरात्यांशीं घालून समितीनें स्वतःच्या सिद्धांताशीं स्वतःच द्रोह केलेला आहे.

मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची मागणी अमान्य करतांना जें प्रदीर्घ विवेचन आणि जे विविध युक्तिवाद समितीनें केलेले आहेत ते सर्व कावेबाजपणाचे आणि कपटी-पणाचे आहेत. निःपक्षपाती न्यायाधीशाची भूमिका घेण्याऐवजीं समितीनें विरोधी पक्षाच्या वकिलाचा डगला अंगावर पांघरून महाराष्ट्राच्या बाजूचे सर्व मुद्दे खोडून टाकण्याचा प्रयत्न केलेला आहे. संकल्पित कर्नाटकासाठीं मुंबई राज्यामधले कानडी जिल्हे काढून घेतल्यावर 'आतां उरलेल्या राज्याची अधिक विघटना करून महाराष्ट्र आणि गुजरात हीं राज्यें स्थापन करायचीं का?' असा प्रश्न समितीनें विचारलेला आहे. त्यावरूनच तिच्या मनांतला पातकी डाव एकदम लक्षांत येतो. राज्यकारभाराच्या, शिक्षणाच्या आणि आर्थिक दृष्ट्या मुंबई राज्य सर्व भारतांत उत्कृष्ट आहे एवढेंच नव्हे, तर जमिनीबाबत नवीन कायदा केल्यानें तें आतां अत्यंत प्रागतिक राज्य झालें आहे अशीं स्तुतिसुमनें

मुंबई राज्यावर समितीनें अगदीं प्रारंभींच उधळलेलीं आहेत. एवढ्या चांगल्या राज्याची आतां आणखी विघटना कशी करायची हें समितीला मोठें संकट पडलें आहे. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ फार जुनी नसून अलीकडे तिचा जोर वाढलेला आहे, पण गुजराती लोकांची महागुजरातची चळवळ फारशा निकडीची नसून ते संमिश्र मुंबई राज्यांत राहावयाला तयार आहेत. तथापि, ह्या प्रश्नांशीं मराठवाडा, मध्यप्रदेशांतील आठ मराठी जिल्हे, मुंबई शहर, सौराष्ट्र आणि कच्छ हे प्रश्न गुंतलेले आहेत. म्हणून केवळ भाषिकदृष्ट्या हा प्रश्न सोडविण्याची आमची इच्छा नाहीं असें सांगून समिति आपल्या अहवालांत पुढें असें म्हणते कीं, संयुक्त महाराष्ट्राला विदर्भांतील बहुसंख्य जनतेचा पाठिंबा नाहीं. अशा तऱ्हेनें सुरुवातीलाच 'संयुक्त महाराष्ट्र'च्या गळ्याला नख लावून समिति मुंबई शहराच्या प्रश्नाकडे वळली आहे. समिति म्हणते, "मुंबईशहराबाबत पूर्वी दार कमिशन आणि ज. व. प. समितीनें जें विवेचन केलेलें आहे त्याकडे आपण दुर्लक्ष करूं शकत नाहीं. १९५३ च्या खानेसुमारीप्रमाणें मुंबईमध्यें महाराष्ट्रीय लोक अल्पसंख्य आहेत. त्यांचें प्रमाण ४३·६ टक्के आहे. कलकत्ता आणि मद्रासमध्यें बंगाली आणि तामीळ भाषिक ६६ टक्क्यांहून अधिक आहेत, म्हणून त्या शहरांशीं मुंबईची तुलना होऊंच शकत नाहीं. मुंबई शहराचें भविष्य त्या शहरांतील भिन्न भाषिकांच्या सहकार्यावर अवलंबून आहे. तथापि, मुंबईचें स्वतंत्र राज्य करणें बरोबर होणार नाहीं. कारण एका प्रगतिशील राज्याचें तें केंद्र आहे. तें त्यांतून बाहेर काढणें म्हणजे मागें पाऊल टाकण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें वीज आणि पाणी ह्या बाबतींत तें महाराष्ट्रावर अवलंबून आहे. बरें, मुंबई गुजरातपासून तोडून महाराष्ट्रांत घालावी तर मुंबईच्या वाढीला आणि विकासाला तें घातक ठरेल. गुजराती आणि इतर जमाती अत्यंत असंतुष्ट होतील आणि मुंबईच्या औद्योगिक अन् व्यापारी महत्त्वाला धक्का बसेल म्हणजे देशालाच धक्का बसेल. तो धोका कोण पत्करणार? त्याखेरीज महामुंबईची तीन वर्षांतील सरासरी शिल्लक बारा कोटी रुपये आहे. हिचा फायदा महाराष्ट्राला आणि गुजरातला मिळतो. म्हणून महाराष्ट्र किंवा गुजरात ह्यांच्यापासून मुंबई अलग करतां येत नाहीं, असा युक्तिवाद करून गुजराती-मराठी भाषिकांचें संमिश्र राज्य हें उभयतांच्या कल्याणाचें आहे असा समितीनें निष्कर्ष काढलेला आहे.

आतां ह्या मुंबई राज्यांत सौराष्ट्र आणि कच्छ कां घुसडावयाचे? तर सौराष्ट्रांतील

लोकांची तशी इच्छा आहे म्हणे! आणि गरीब बिचाऱ्या कच्छनें मुंबईराज्यांत यावयाचें नाहीं तर मग त्यानें कुठें जायचें? असा युक्तिवाद करून समितीनें सर्व 'महागुजरात' मुंबई राज्याच्या पोटांत मोठ्या कुशलतेनें ढकलून दिलेला आहे. ह्या दृष्टीनें पाहतां सारा 'संयुक्त महाराष्ट्र' तिनें मुंबई राज्यांत समाविष्ट करावयाला हवा होता. म्हणजे उभय भाषिकांना सारखा तरी न्याय मिळाला असता. मराठवाड्याचे पांच जिल्हे मुंबई राज्यांत आणले तें ठीक झालें. पण मध्य-प्रदेशांतील मराठी भाषिकांचे आठ जिल्हे तोडून त्यांचा 'स्वतंत्र विदर्भ' समितीनें निर्माण केला. हे आठ जिल्हे मुंबई राज्यांत घातले असते तर मराठी भाषिकांचें पारडें जड झालें असतें. म्हणून समितीनें त्याला नकार दिला. विदर्भ निराळा कां करायला पाहिजे याचीं कारणें देतांना त्याच्या चार जिल्ह्यांचा अगदीं शातवाहनापासून प्राचीन इतिहास समितीनें दिलेला आहे. ऐतिहासिक गोष्टींना महत्त्व द्यावयाचें नाहीं असा सुरुवातीला समितीनें निर्वाळा दिलेला आहे. त्याला विदर्भाच्या बाबतींत तिनेंच स्वतः हरताळ फासलेला आहे. मुंबईसह महाराष्ट्रांत विदर्भ जर घातला तर मुंबई शहरापुढें नागपूरच्या महत्त्वाचा संपूर्ण लोप होईल, एवढेंच नव्हे तर महाराष्ट्रांतला जातीयवाद विदर्भाच्या राजकारणांत शिरेल असें तेथील लोकांना भय वाटतें, असा एक हास्यास्पद आणि महाराष्ट्राची बदनामी करणारा युक्तिवाद समितीनें मांडलेला आहे. महाराष्ट्राचा जातीयवाद गुजरात्यांना दिसत नाहीं अन् विदर्भातल्या महाराष्ट्रीयांना दिसतो होय? सारांश काय कीं, महाराष्ट्राच्या विरुद्ध जिथें जिथें जो युक्तिवाद सुचेल तिथें तिथें त्याचा अवलंब समितीनें केलेला आहे. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या मस्तकांत धोंडा घालून त्याचा जीव घेतल्यानंतर त्याच्या प्रेतावर फुलें पसरतांना अखेर समिति म्हणते, "महाराष्ट्रीय लोक हे मोठे पराक्रमी आणि देशभक्त आहेत. आपल्या इतिहासाबद्दल त्यांना अभिमान असावा हें योग्यच आहे. भारताच्या इतिहासांत त्यांच्या पराक्रमाचें एक स्वतंत्र पर्वच आहे. त्यांच्या रास्त आकांक्षा सफल व्हाव्यात असें आम्हांला मनापासून वाटतें!" हॅम्लेट नाटकांतला खलपुरुष राजपुत्र हॅम्लेटचा चुलता जो राजा क्लॉडिअस त्यावरसुद्धां फा. कुं. पा. समितीनें कडी केलेली आहे.

बेळगांव शहर कर्नाटकांत घालून तर संयुक्त महाराष्ट्राचें काळीजच समितीनें कापून बाहेर काढलें आहे. समितीच्या ह्या निर्णयानें महाराष्ट्राच्या तळपायाची आग

मस्तकाला गेल्यावांचून राहणार नाहीं. खानापूर आणि बेळगांव तालुका ह्यांतील मराठी भाषिकांची लोकसंख्या अनुक्रमें ५३·९ आणि ५१·४ आहे असें समिति स्वतःच कबूल करते. बेळगांव शहरांत मराठी भाषिकांची प्रचंड बहुसंख्या असतांना त्या बाबतींत तिनें कानांवर हात ठेवले आहेत. ती म्हणते, 'ह्याबाबत स्पष्ट आंकडे गेल्या खानेसुमारींत मिळत नाहींत; आणि जरी भाषेच्या दृष्टीनें येथें कांहीं प्रमाणांत मराठी भाषिकांची बहुसंख्या असली तरी आर्थिक दृष्ट्या ह्या भागाचा महाराष्ट्राशीं संबंध नसल्यानें आणि राज्यकारभाराच्या दृष्टीनें बेळगांव हें बेळगांव जिल्ह्याचें ठाणें असल्यामुळें तें कर्नाटकांत जाणें योग्य आहे.' एखादा उन्मत्त हुकुमशहादेखील एवढा दंडेलीपणाचा युक्तिवाद करणार नाहीं. बेळगांव शहरांत मराठी भाषिक बहुसंख्याक असले तरी राज्यकारभाराच्या दृष्टीनें बेळगांव कर्नाटकांतच घालणें योग्य आहे ! हा काय युक्तिवाद ? ही काय सुसंगति ? नशापाणी करून तर हा अहवाल फा. कुं. पा. समितीनें लिहिला नाहीं ना ? बेळगांव महाराष्ट्रांत घातलें असतें तर बेळगांव जिल्ह्याचा कारभार जणुं कांहीं कोलमडूनच पडला असता ! सारांश हा कीं, गुजरातच्या म्हणण्याला अधिक महत्त्व द्यावयाचें, महाराष्ट्र आणि विदर्भ ह्यांच्या कलहांत विदर्भाचा कोटिक्रम उचलून धरावयाचा; कानडी आणि मराठी ह्यांच्या युक्तिवादांत कानडी पक्षाचें म्हणणें मान्य करावयाचें. अशा तऱ्हेनें महाराष्ट्राच्या विरुद्ध जेवढें म्हणून कांहीं करतां येईल तेवढें करावयाचें हें ह्या समितीचें निश्चित धोरण दिसून येतें. महाराष्ट्राला खची करण्याच्या बाबतींत मात्र समितीनें आरंभापासून अखेरपर्यंत प्रशंसनीय सुसंगति राखलेली दिसून येते. विदर्भात मराठी भाषिकांची ७५ टक्के संख्या आहे, नव्या मुंबई राज्यांत निम्म्याहून अधिक लोकसंख्या मराठी भाषिकांची आहे असें समितीनें महाराष्ट्राच्या तोंडाला मधाचें बोट लावलेलें आहे. पण त्यानें भुलून जाण्याचें कारण नाहीं. मुंबई राज्यांत मराठी भाषिक बहुसंख्य जरी असले तरी मराठी जनता दरिद्री आणि श्रमजीवी आहे. सर्व भांडवल, उद्योग आणि व्यापार गुजरात्यांच्या आणि मारवाड्यांच्या हातीं आहे. म्हणून द्वैभाषिक मुंबई राज्यांत मराठी भाषिकांची भयंकर पिळणूक झाल्यावांचून राहणार नाहीं. सत्तेचीं प्रधान सूत्रें हीं आतांप्रमाणेंच गुजरात्यांच्या हातीं राहतील हें सांगायलाच नको ! केवळ भांडवलशाहीच्या वजनाला आणि कारस्थानाला बळी पडल्यामुळें मुंबई शहर संयुक्त महाराष्ट्रांत समाविष्ट करायला फा. कुं. पा. समितीनें नकार दिला आहे. पण द्वैभाषिक मुंबई राज्य जर अस्तित्वांत

आलें तर भांडवलशाहीचें मुंबई शहरांतील सामर्थ्य आहे ह्यापेक्षां अनेक पटीनें अधिक वाढेल. महागुजरात मुंबई राज्याच्या पोटांत शिरल्यानंतर मुंबई शहरावरील गुजरात्यांचें आणि अन्य भाषिकांचें आक्रमण अधिक होईल. महामुंबईतील मराठी भाषिकांच्या संख्येचें प्रमाण दिवसेंदिवस कमी होत जाईल; आणि इतर भाषिकांचें प्रमाण झपाट्यानें वर जाईल. अशीं दहा वर्षे गेलीं तर मुंबईवर आपला हक्क सांगणें सुद्धां पुढें महाराष्ट्राला मुष्कील होऊन जाईल. म्हणून फा. कु. पा. समितीच्या शिफारसी स्वीकारणें म्हणजे आत्महत्या करून घेण्यासारखें आहे, ही खूणगांठ प्रत्येक मराठी माणसानें आपल्या मनाशीं बांधून ठेवावी. विदर्भाला महाराष्ट्रापासून अलग करणें, कच्छ-सौराष्ट्राला मुंबई राज्यांत घालणें, हैदराबादला आंध्रापासून वेगळें ठेवणें हें सगळें सध्यांच्या राज्यकर्त्यांचें सत्तेचें राजकारण आहे. जनतेच्या कल्याणाचा ह्यांत कांहींहि संबंध नाहीं. हैदराबादला निदान सहा वर्षांनीं आंध्रांत विलीन होण्याची तरी मुभा आहे. पण विदर्भ आणि महाराष्ट्र ह्यांना एकत्र येण्याची कायमचीच बंदी घालण्यांत आली आहे! तीन कोटी मराठी माणसें एकत्र आलीं तर तीं जणूं कांहीं भारताचीं सत्तासूत्रेंच बळकावतील म्हणून त्यांची फाळणी करण्यांत आलेली आहे; आणि महाराष्ट्राच्या गळ्यांत गुजराती भांडवल-शाहीचा खोडा अडकवून ठेवला आहे. यापेक्षां महाराष्ट्राची अधिक भयंकर बेअब्रू आणि बदनामी कोणती होऊं शकेल? शिवाजी महाराजांचा आणि टिळकांचा महाराष्ट्र हा अन्याय आणि अपमान कधींहि सहन करणार नाहीं. म्हणून फा. कु. पा. समितीच्या अहवालाचा महाराष्ट्रानें एकमुखानें धिक्कारच केला पाहिजे. हा अहवाल म्हणजे महाराष्ट्राचें मृत्युपत्र होय! ह्या अहवालाचा जो पुरस्कार करील तो महाराष्ट्राचा शत्रु आहे असें समजावें. सत्तेच्या आणि संपत्तीच्या जोरावर राज्यकर्ते ह्या अहवालांतल्या शिफारसी जबरदस्तीनें महाराष्ट्रावर लादण्याचा प्रयत्न करतील. म्हणून महाराष्ट्रानें यापुढें आपले धर्मभेद, जातिभेद आणि पक्षभेद विसरून एकजुटीनें ह्या दडपशाहीला तोंड दिलें पाहिजे. अन्यायाचा प्रतिकार करण्याचीं असहकार, बहिष्कार आणि सत्याग्रह हीं जीं प्रभावी अहिंसात्मक साधनें महात्मा गांधींनीं आपल्याला देऊन ठेवलीं आहेत त्यांचाच अवलंब ह्या झगड्यांत महाराष्ट्रानें केला पाहिजे. महाराष्ट्राच्या महान् कसोटीची हीच वेळ आहे. या कसोटीला महाराष्ट्र या वेळीं उतरला नाहीं तर त्याचा सत्यनाश होईल हें ब्रह्मवाक्य येथें लिहून ठेवतों. 'संयुक्त महाराष्ट्रा'ची मागणी

मागतांना महाराष्ट्रानें आपलें बळ जेवढें संघटित केलें होतें त्याच्या शतपटीनें आतां त्यानें आपली शक्ति एकवटली पाहिजे. कारण आतां तो त्याच्या जीवन-मरणाचा प्रश्न आहे. 'संयुक्त महाराष्ट्राला जमीनदोस्त करण्याचा भांडवलवाल्यांचा आणि राज्यकर्त्यांचा हा भयंकर कट तीन कोटी महाराष्ट्रीयांनीं 'संयुक्त महाराष्ट्रा'ची गगनभेदी गर्जना करून हाणून पाडला पाहिजे.

१६-१०-१९५५

# चौदा लाख मराठ्यांची मुंबई !

काँग्रेसश्रेष्ठी, त्यांचे बगलबच्चे आणि देशांतील कांहीं बिनबुडाचे त्रिशंकु कांहींहि म्हणोत, 'फा. कुं. पा.' समितीच्या राज्यपुनर्रचनेच्या प्रतिवृत्ताचा देशभर सर्वत्र धिक्कारच झालेला आहे, आणि ह्या धिक्काराचा गदारोळ प्रतिदिनीं आणि प्रतिक्षणीं वाढतोच आहे. राज्यपुनर्रचनेचा प्रश्न अत्यंत बिकट आहे म्हणून सर्वांचें समाधान होऊं शकेल अशी योजना तयार करणें अशक्य आहे असा फाकुंपा अहवालाचे समर्थक युक्तिवाद करतात. त्यांना आम्ही असें विचारतों कीं, सर्वांचें समाधान करतां येत नाहीं, म्हणून काय सर्वांचें जास्तींत जास्त असमाधान कसें करतां येईल ह्याचा हा इरसाल तोडगा तुम्हीं शोधून काढला आहे कीं काय? इतका विसंगत, तत्त्वशून्य आणि भोंगळ अहवाल आजपर्यंत ह्या देशांत कधीं कोणीं निर्माण केला नसेल! भाषावार राज्यरचना हाच खरा लोकशाहीचा पाया आहे. लोकांचें शिक्षण आणि राज्यकारभार हे त्यांच्या मातृभाषेंतूनच व्हावयाला पाहिजेत हीच खरी शास्त्रीय दृष्टि आहे. जगांतल्या सर्व राज्यशास्त्रकर्त्यांनीं हें तत्त्व मान्य केलेलें आहे. असें असतांना आणि खुद्द काँग्रेसनें भाषावार प्रांतरचनेचा गेलीं तीस वर्षे उद्घोष केला असतांनाहि आज या तत्त्वाला मूठमाती देण्याचें नाटक काँग्रेसश्रेष्ठी करूं पाहत आहेत, म्हणून ह्या अहवालाचा असा बट्ट्याबोळ झालेला आहे. 'नाटक' हा शब्द आम्हीं अशासाठीं वापरला कीं, भाषावार राज्यरचना नको नको म्हणत सोळापैकीं चौदा राज्यें फाकुंपा समितीनें भाषिक तत्त्वावर बनवलेलीं आहेत. पण महाराष्ट्र नि पंजाब ह्यांच्या बाबत मात्र आपल्या भाषाविरोधी सिद्धान्ताचें समितीनें अत्यंत निष्ठापूर्वक पालन केलें आहे. एखाद्या आंधळ्याला सुद्धां दिसूं शकेल एवढा हा धादांत अन्याय समितीनें केलेला असतांना ह्या अहवालाला 'डोळे मिटून पाठिंबा द्या' असें सांगणारे आचार्य कृपलानींसारखे महामूर्खशिरोमणि निघावेत ह्या कर्माला काय म्हणावें? देशांतील काँग्रेसचें वर्चस्व कसें कायम राखावें, देशाचीं राजकीय सूत्रें उत्तर भारतीयांच्या हातीं सदैव राहावीं

आणि देशाच्या राजकारणांतून महाराष्ट्राची कशी हकालपट्टी व्हावी या तीनच दृष्टींनीं फाकुंपा समितीनें राज्यपुनर्रचनेबाबत आपला हा खोडसाळ खर्डा तयार केलेला आहे.

गेल्या तीनशें वर्षांचा भारताचा इतिहास हा मराठ्यांच्या कर्तृत्वाचा आणि पराक्रमाचा इतिहास आहे ही गोष्ट जगजाहीर आहे. मोगलांना आणि इंग्रजांना बहुतेक सारे भारतीय शरण गेले. पण एकटे मराठे तेवढे शेवटपर्यंत लढत राहिले. मराठ्यांचा पराभव केला तेव्हांच इंग्रज ह्या देशाचे राजे होऊं शकले हें सत्य आहे. आणि इंग्रज सत्ता ह्या देशांतून नष्ट करण्यासाठीं तरी पहिल्यानें कोणीं दंड थोपटले? महाराष्ट्रानेंच ना? ज्या काँग्रेसनें देशाला स्वातंत्र्य मिळवून दिलें तिचा पहिला संकल्पसुद्धां महाराष्ट्रामध्यें आणि प्रामुख्यानें महाराष्ट्रीयांच्याच हातून सुटला ना? हा सर्व इतिहास सूर्यप्रकाशासारखा स्वच्छ आहे. तो कोणीं कितीहि दडपून टाकण्याचा प्रयत्न केला तरी दडपला जाणार नाहीं. महाराष्ट्रांत जातीयवाद निर्माण करून आणि त्याला राजकीय स्वरूप देऊन इंग्रजांनीं महाराष्ट्राला हतबल करून सोडलें. तर त्यांचे भारतीय वारसदार जे महाराष्ट्रद्वेष्टे काँग्रेसवाले ते आतां द्वैभाषिक राज्यांत महाराष्ट्राला ढकलून त्याला नामशेष करूं पाहत आहेत. पण परकीय शत्रूंची ज्या महाराष्ट्रानें दाणादाण उडवून दिली तो शौर्यसागर, तो धैर्यधुरंधर, तो बलविद्याशीलसंपन्न महाराष्ट्र स्वकीय शत्रूंच्या 'अहिंसक' कारवायांना थोडीच दाद देणार आहे? भारतांत ज्याला इतिहास आहे असें एकच राष्ट्र आहे आणि तें म्हणजे महाराष्ट्र. महाराष्ट्र म्हणजेच इतिहास. महाराष्ट्राला दडपणें म्हणजे इतिहासाला दडपण्यासारखें आहे. जे इतिहासाला नेस्तनाबूद करण्याचा प्रयत्न करतात, त्यांना इतिहास अखेर जमीनदोस्त करतो असा आतांपर्यंतचा इतिहास आहे. म्हणून फा. कुं. पा. समितीच्या अहवालाला महाराष्ट्रानें एवढ्या जोरानें लाथ मारली पाहिजे कीं, एखाद्या फुटबॉलप्रमाणें तो महाराष्ट्रामधून उडून दिल्लीला नेहरूंच्या पायापाशीं दाणकन् जाऊन आदळला पाहिजे.

फा. कुं. पा. समितीच्या प्रतिवृत्ताचा बेळगांवापासून तों मुंबईपर्यंत प्रचंड सभा भरून सर्वत्र निषेध होत आहे. मराठी जनतेचे मोटमोठे मोर्चे धिक्कारार्थ ठिकठिकाणीं निघत आहेत. ह्यावरून महाराष्ट्राच्या सर्वांगाचा ह्या प्रतिवृत्तामुळें कसा भडका उडालेला आहे हें साऱ्या भारताला कळून आलें आहे. ह्या द्वैभाषिक

राज्याच्या दुतोंडी गांडुळाची शेषशायी म्हणून जरी कोणीं किती भलामण केली, तरी मराठी माणूस आपल्या गांवठी पायताणाखालीं त्याला ठेंचून काढल्यावांचून राहणार नाहीं ही गोष्ट दिल्लीच्या बड्या धेंडांना कळून आली. आणि महाराष्ट्रानें फाकुंपा अहवाल ठोकरला म्हणजे भारतांत सर्वत्र त्याचें दिवाळें वाजल्याखेरीज राहणार नाहीं ही गोष्ट ते पुरेपूर ओळखून आहेत. म्हणून मोठ्या तांतडीनें त्यांनीं सर्वांच्या आधीं महाराष्ट्राच्या पुढाऱ्यांना बोलावून घेतलें आहे. (हा लेख लिहीत असतांना दिल्लीच्या वाटाघाटी चालू आहेत; आणि तो प्रसिद्ध होण्यापूर्वींच त्याचा निर्णय सर्वत्र जाहीर झालेला असेल!) फाकुंपा समितीच्या अहवालाची महाराष्ट्रानें पहिल्याच झटक्याला जी जाहीर पाद्यपूजा केली, तिचाच परिणाम होऊन महाराष्ट्राची समजूत काढण्याची दिल्लीच्या धेंडांना आवश्यकता वाटली. बेळगांव-पासून तों मुंबईपर्यंतच्या सर्व महाराष्ट्रांत मोरारजीचे पोलीस आज हातांत बंदुका घेऊन फिरत आहेत. पुण्यामध्यें चौकाचौकांत हत्यारबंद पोलिसांचे खास तंबू उभारण्यांत आले आहेत. बेळगांवांत तर पोलिसांनीं नुसता धुमाकूळ चालविलेला आहे. बंदूकवाले पोलीस महाराष्ट्राला दाखवले म्हणजे महाराष्ट्र घाबरून जाईल आणि मुकाट्यानें द्वैभाषिक राज्याचा स्वीकार करील असा मोरारजी आणि मंडळींचा भ्रम आहे. इंग्रजांच्या बंदुका ज्या महाराष्ट्रानें आपल्या छातीवर झेलल्या तो महाराष्ट्र मोरारजींच्या बंदुकांना भीक घालील अशी का त्यांची समजूत आहे? आम्ही मुंबईच्या मुख्य प्रधानांना एवढेंच बजावून सांगतों कीं, बंदूकवाल्या पोलिसांचा बागुलबोवा दाखवून त्यांनीं महाराष्ट्राचा जो भयंकर अपमान केला आहे तो महाराष्ट्र कधींच विसरणार नाहीं. पुणें नगरपालिकेनें मुंबई सरकारच्या ह्या दंडुकेशाहीचा जो जाहीर निषेध केला त्याबद्दल आम्ही त्या नगरपालिकेचें अभिनंदन करतों. महाराष्ट्रामध्यें इतरत्र मुंबई सरकारच्या या धोरणाचा असाच कडकडून निषेध व्हायला पाहिजे. द्वैभाषिक राज्याचा निषेध जेवढ्या प्रखर शब्दांत महाराष्ट्राला व्यक्त करतां येईल तेवढा त्यानें केला पाहिजे. 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र' या द्वादशाक्षरी महामंत्राच्या जेवढ्या गगनभेदी गर्जना महाराष्ट्राला उठवतां येतील तेवढ्या त्यानें उठवल्या पाहिजेत. संयुक्त महाराष्ट्राच्या ब्रीदाशीं द्रोह करणाऱ्या निमकहराम मराठी माणसावर प्रत्येक पाक मराठी माणसानें बहिष्कार घातला पाहिजे. पुण्याच्या 'सकाळ' पत्रानें फाकुंपा समितीचा अहवाल हा 'एकराष्ट्रीयत्वाचा विजय होय' असा त्याचा गौरव केला. त्याबरोबर 'सकाळ' पत्राच्या त्या अंकाच्या महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं

होळ्या झाल्या एवढेंच नव्हे तर कांहीं शहरांत ‘सकाळ’काराचा पुतळा करून तो सार्वजनिक रीतीनें जाळण्यांत आला. ‘संयुक्त महाराष्ट्रा’शीं द्रोह करणाऱ्यांची महाराष्ट्र कशी संभावना करतो हें या एका उदाहरणावरून कळून येण्यासारखें आहे. ‘संयुक्त महाराष्ट्रा’च्या बाबत तडजोड म्हणून नाहीं. अन् ‘संयुक्त महाराष्ट्रा’ च्या शत्रूंच्या बाबतींत क्षमा न् दया नाहीं. हें एकच धोरण अत्यंत कठोरपणें महाराष्ट्रानें सांभाळलें पाहिजे.

‘संयुक्त महाराष्ट्रा’चा सर्वांत जास्त अपराध जर कोणी केला असेल तर तो सदोबा पाटील ह्यांनीं. मानधन आणि इमानी महाराष्ट्राच्या इतिहासाला लागलेला सदोबा पाटील हा एक भला मोटा डाग आहे. सूर्याच्या पोटीं शनैश्चर, हिऱ्याच्या खाणींत कोळसा किंवा सोन्याच्या ताटांत शेण त्याप्रमाणें ज्ञानोबा, तुकोबा आणि विनोबांच्या महाराष्ट्रांत हा सदोबा जन्माला आलेला आहे. महाराष्ट्रापासून आपलें रक्षण व्हावें म्हणून मुंबईच्या महाराष्ट्रीयेतर भांडवलवाल्यांनीं सोन्याच्या सांखळीनें आपल्या दारांत बांधून ठेवलेला सदोबा हा एक भोंकऱ्या कुत्रा आहे. शहरांतल्या गुंडांना आणि दादांना हातांत धरून मुंबई काँग्रेसचीं सूत्रें हा गुंडेश्वर वर्षानुवर्षें बळकावून बसलेला आहे. सत्य, अहिंसा, नीति हे शब्दसुद्धां ह्या इसमाच्या शब्दकोशांत आढळणार नाहींत. मुंबईतल्या अत्यंत भयानक अशा वेश्येच्या वस्तींत काँग्रेस हाऊस बांधून हा माणूस तेथें राज्य करतो आहे, ह्यावरून त्याच्या भोंवतालच्या वातावरणाची कोणालाहि कल्पना येईल. महाराष्ट्रामधून मुंबई फोडून बाहेर काढावयाची हें सर्व कारस्थान ह्या एकाच माणसानें भांडवलवाल्यांच्या साहाय्यानें महाराष्ट्राविरुद्ध रचलें. हा कृष्ण-भुजंग महाराष्ट्राच्या काळजाला आजपर्यंत अनेक वेळां डसलेला आहे; आणि अजून तो डसतोच आहे. फा. कुं. पा. समितीचा अहवाल वाचून ह्याला एवढा ब्रह्मानंद झालेला आहे कीं, त्यानें कमरेचें सोडावयाचें काय तें बाकी ठेवलें आहे. ‘मुंबई प्रदेश काँग्रेस कमिटी’ची सभा घाईघाईनें बोलावून फाकुंपा अहवालावर तिच्या पसंतीचा शिक्का ह्यानें मोठ्या धूर्तपणानें मारून घेतला आहे. महाराष्ट्रीयेतर भांडवलवाल्यांचा मलिदा खाऊन खाऊन माजलेला हा पोळ आतां खुशाल महाराष्ट्राच्या अंगावर धावून जाऊन त्याच्या पोटांत शिंगं खुपसूं लागला आहे. ‘संयुक्त महाराष्ट्रा’ची चळवळ ही आम मराठी जनतेची चळवळ नसून मूठभर मराठी माणसांचा तो उपद्याप आहे असा धादांत खोटा आणि खोडसाळ आरोप तीन कोटी मराठी जनतेच्या

एका महन्मंगल ध्येयावर करावयास आतां हा दुष्ट माणूस प्रवृत्त झाला आहे. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या मंदिरावर द्वैभाषिक राज्याचें घेडगुजरी निशाण चढवणाऱ्या ह्या भांडवलशाहीच्या भाडोत्री हस्तकाचा—ह्या सवाई बाळाजीपंत नातूचा—महाराष्ट्रांत घरोघर निषेध झाला पाहिजे. कोणींहि पाक मराठी माणसानें रात्रीच्या वेळीं सदोबा पाटलाचें नांव उच्चारूं नये. त्याची नुसती आठवण झाली तरी 'आस्तिक आस्तिक' म्हणावें; आणि दिवसा त्याचें नांव चुकून तोंडांत आलें (म्हणजे शिवी देण्यासाठीं!) तर लगलेच तोंडांत चूळ भरून ती थुंकावी!

'संयुक्त महाराष्ट्रा'च्या चळवळीला आम मराठी जनतेचा पाठिंबा नाहीं असा आरोप करण्याची महाराष्ट्राच्या शत्रूंची देखील आजपर्यंत कधीं छाती झाली नाहीं—तो आरोप सदोबा 'पाटलांनीं करावा ह्यावरून त्यांच्या महाराष्ट्र–द्रोहाची मजल कोठपर्यंत गेली आहे ह्याची कल्पना येते. एवढेंच करून सदोबा थांबले म्हणतां का? दिल्लीच्या वाटाघाटीमध्यें मुंबई कॉंग्रेसतर्फे त्यांनीं जें एक शिष्टमंडळ पाठविलें त्याची रचना इतकी विलक्षण आहे कीं, सदोबा हा मूर्ख माणूस आहे का पाजी माणूस आहे ह्याचाच क्षणभर भ्रम पडतो. सात माणसांच्या ह्या शिष्टमंडळांत दोन गुजराती, दोन मुसलमान, दोन मराठी आणि एक तामीळ. मुंबईची लोकसंख्या अठ्ठावीस लाखांची. त्यांत चौदा लाख मराठी माणसें. पांच लाख गुजराती. अडीच लाख मुसलमान अन् पन्नास हजार तामीळ. असें असतां चौदा लाख मराठ्यांचे मुंबई कॉंग्रेसच्या शिष्टमंडळांत दोनच प्रतिनिधी आणि पांच लाख गुजरात्यांचे नि अडीच लाख मुसलमानांचेहि पण दोन दोनच प्रतिनिधी. आणि या शिष्टमंडळाचें अध्यक्षस्थान कोणाकडे तर एका गुजरात्याकडे. 'कॉस्मॉपॉलिटन्' मुंबईतर्फे सदोबांनीं दिल्लीला पाठविलेलें हें 'कॉस्मॉपॉलिटन्' मंडळ. तें मुंबईतल्या बहुसंख्य मराठी जनतेच्या भावना नेहरू-ढेबर यांच्यापुढें काय डोसकें व्यक्त करणार? पण सगळ्यांत सदोबांनीं केलेली कडी निराळीच आहे. ह्या मुंबई कॉंग्रेसच्या शिष्टमंडळांत जीं इनमीन दोन मराठी माणसें आहेत त्यांत एक आहेत दादा परुळेकर (म्हणजे कोण?) अन् दुसरे आहेत घोडपदेवचे 'सोडावॉटर बॉटल फेम' देशभक्त केशवराव बोरकर! नेहरू-ढेबर ह्यांच्यापुढें मुंबईच्या चौदा लाख मराठी जनतेची बाजू मांडावयाला सदोबांनीं केशवराव बोरकरांची रवानगी करावी ह्यापेक्षां मराठी जनतेची अधिक विटंबना होणें शक्य आहे काय? मुंबई कॉंग्रेसच्या या 'शिष्टमंडळा'चा मुंबईतील आम मराठी जनतेनें कडकडून निषेधच करायला हवा!

'संयुक्त महाराष्ट्र'संबंधीं वाटाघाटी करण्यास नेहरूंनीं एकट्या महाराष्ट्राच्या पुढाऱ्यांना बोलावलें नसून त्याजबरोबर गुजरात काँग्रेसच्या आणि मुंबई काँग्रेसच्याहि पुढाऱ्यांना बोलावलें आहे. विदर्भाच्या पुढाऱ्यांना त्यांनीं वस्तुतः बोलवायला हवें होतें. पण त्यांना बोलावण्यांत आलेलें नाहीं. 'द्वैभाषिक राज्याचा पांच वर्षें प्रयोग करून पाहा' असें काँग्रेसश्रेष्ठींनीं महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना वाटाघाटीच्या प्रारंभीं सुचविलें. पण ती सूचना त्यांनीं धुडकावून लावली. त्यानंतर मुंबईवरचा हक्क सोडा म्हणजे गुजरात आणि महाराष्ट्र हीं दोन स्वतंत्र भाषिक राज्यें ताबडतोब अस्तित्वांत येतील असें काँग्रेसश्रेष्ठींनीं सांगून पाहिलें. पण त्यालाहि महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं मान्यता दिली नाहीं. मुंबईचा अंतर्भाव संयुक्त महाराष्ट्रांत व्हावयाला पाहिजे हा जो संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीचा मुख्य गाभा, त्याच्या बाबतींत यत्किंचित्हि तडजोड करायला आपण तयार नाहीं, असें खणखणीत शब्दांत महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं काँग्रेसश्रेष्ठींना बजावून सांगितलें. वस्तुतः या दिल्लीच्या वाटाघाटींत गुजरात काँग्रेसच्या पुढाऱ्यांना कां बोलावलें हें समजत नाहीं. मुंबई-पासून गुजरात ऐंशीं मैल लांब आहे. मुंबई शहरांत पांच लक्ष वीस हजार गुजराती राहत असले किंवा मुंबई शहराच्या विकासांत गुजरात्यांनीं फार मोठा भाग घेतला असला म्हणून भौगोलिक, ऐतिहासिक आणि आर्थिक दृष्ट्या महाराष्ट्राशीं निगडित असलेल्या मुंबईवर गुजरातचा हक्क आहे असें सांगण्याचा त्यांना काय अधिकार आहे ? भारताच्या विकासासाठीं इंग्रजांनीं काय कमी श्रम केले आणि थोडा पैसा ओतला ? पण त्यांना देखील भारतावरचा आपला हक्क शेवटीं सोडून द्यावा लागला. फाकुंपा समितीनें आपल्या अहवालांत असें म्हटलें आहे कीं, बहुसंख्य गुजराती जनतेला द्वैभाषिक राज्यांत राहण्याची इच्छा आहे असें आपणांला आढळून आलें. पण फाकुंपा समितीचें हें म्हणणें सत्याला धरून नाहीं ही गोष्ट द्वैभाषिक राज्याचा जसा जसा आतां गुजरातेंत निषेध होऊं लागला आहे तशी तशी उघड होऊं लागली आहे.

गुजरात चेंबर ऑफ कॉमर्स आणि महागुजरात सीमा समिति ह्या दोन जबाबदार संस्थांनीं गुजरातचा अंतर्भाव द्वैभाषिक राज्यांत करून गुजरातवर राज्यपुनर्रचना समितीनें घोर अन्याय केला आहे, असें स्पष्टपणें आपलें मत व्यक्त केलें आहे. गुजरात कम्युनिस्ट पार्टी, अखिल भारतीय किसान सभा, गुजरात खेडूत सभा ह्यांनीं स्वतंत्र भाषिक गुजराती राज्याच्या स्थापनेची जोरदार मागणी

केलेली आहे. म्हणून बहुसंख्य गुजराती लोकांना द्वैभाषिक राज्यांत राहण्याची इच्छा आहे, असा जो फाकुंपा समितीनें आपला ग्रह करून घेतला आहे तो सपशेल खोटा आहे. मुंबई आणि महाराष्ट्राच्या वादांत काय व्हायचें असेल तें होईल, पण भाषिक गुजरातमध्यें मुंबईचा समावेश होण्याचा मुळीं प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. आतां मुंबई शहरांतून बारा कोटी रुपयांची जी बचत होते ती महाराष्ट्राला आणि गुजरातला द्वैभाषिक राज्यांत मिळूं शकते हें एक द्वैभाषिक राज्याच्या समर्थनाचें जें कारण फाकुंपा समितीनें दिलेलें आहे तेंहि अत्यंत भ्रामक आहे. मुंबई ही महाराष्ट्राशीं सर्वतोपरी संलग्न आहे. गुजरातेंत आणि मुंबईत ऐशीं मैलांचें अंतर आहे. मुंबईत पांच लाख गुजराती राहतात म्हणून मुंबईमधल्या फायद्याचा हिस्सा गुजरातला वांटून द्यायचा हा कुठल्या मुलखाचा न्याय? ह्या न्यायानें मुंबईत दोन लाख उत्तर भारतीय राहतात, साठ हजार तामीळ राहतात आणि बावन्न हजार कानडी राहतात म्हणून मुंबईत होणाऱ्या बचतीचा हिस्सा उत्तर भारत, मद्रास अन् कर्नाटक ह्यांनासुद्धां वांटून द्यावा लागेल! एवंच, गुजरातचा मुंबईवर काडीइतका हक्क नाहीं. स्वतःच्या फायद्यासाठीं भाषिक गुजरातचा बळी देऊन मुंबईच्या गुजराती आणि मारवाडी भांडवलवाल्यांनीं संयुक्त महाराष्ट्राच्या वाटेंत द्वैभाषिक राज्याचें हें निव्वळ भूत निर्माण केलें आहे, दुसरें कांहीं नाहीं!

मुंबईमधल्या महाराष्ट्रीय लोकसंख्येबाबतहि फाकुंपा समितीनें असाच गैरसमज पसरविलेला आहे. १९५१ च्या खानेसुमारीप्रमाणें मुंबईची एकंदर लोकसंख्या अठ्ठावीस लाख आहे. त्यांत बारा लाख तीस हजार मराठी लोक आहेत असें म्हटलें आहे. आणि एक लाख तीस हजार कोंकणी भाषिक निराळे दाखविण्यांत आले आहेत. कोंकणी ही मराठीचीच बोलीभाषा आहे. ती स्वतंत्र भाषा नाहीं ही गोष्ट अधिकारी तज्ज्ञांनीं सिद्ध केलेली आहे. कोंकणामधील कोंकणी बोलणाऱ्यांचा समावेश खानेसुमारीमध्यें मराठी भाषिकांत करण्यांत आलेला आहे. गोमंतकाच्या स्वातंत्र्यासाठीं जास्तींत जास्त त्याग महाराष्ट्रानें केला आहे, गुजरात्यांनीं नव्हे. यावरून कोंकणी भाषिकांबद्दल मराठी भाषिकांना जो जिव्हाळा आणि आपलेपणा वाटतो तो दिसून येईल. असें असतां मुंबईमधल्या एक लक्ष तीस हजार कोंकणी भाषिकांना मराठी भाषिकांपासून निराळें तोडून काढण्याच्यामागें महाराष्ट्रद्वेषाचें राजकारण शिजलेलें आहे हें उघड आहे. त्याखेरीज मुंबईत ७८००० तेलगू

आहेत. तीन शतकें ही तेलगू मंडळी महाराष्ट्रांत राहत आहेत. तेलगू भाषा फक्त ते घरांत बोलतात. बाहेर त्यांचा सर्व व्यवहार मराठीमधूनच चालतो. महाराष्ट्राशीं त्यांचे संबंध अत्यंत आत्मीयतेचे आहेत. मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत व्हावा ह्या संयुक्त महाराष्ट्रवाद्यांच्या भूमिकेला तेलगू मंडळींचा पाठिंबा आहे. मुंबईत दोन लक्ष ऐशीं हजार माणसें उर्दू बोलणारीं दाखविण्यांत आलेलीं आहेत. ह्यांपैकीं जवळजवळ पाऊण लाख मुसलमान कोंकणांतून मुंबईत आले आहेत. आणि त्यांची मातृभाषा मराठी आहे. ते केवळ मुसलमान असल्यानें त्यांची मातृभाषा उर्दू आहे असें खानेसुमारींत दाखविण्यांत आलेलें आहे. ह्या सर्व गोष्टी विचारांत घेतल्या म्हणजे मुंबईच्या अठ्ठावीस लाख लोकांपैकीं चौदा-पंधरा लाख लोक मराठी भाषिक आहेत. म्हणजे मुंबई शहरांत फाकुंपा समिति दाखविते त्याप्रमाणें मराठी भाषिकांचें प्रमाण त्रेचाळीस टक्के नसून पन्नास टक्क्यांच्यावर निश्चित आहे.

मुंबईमध्यें मराठी भाषिक अल्पसंख्याक आहेत हें फाकुंपा समितीचें विधान धादांत असत्य आणि लुच्चेगिरीचें आहे. मुंबईमध्यें बहुसंख्य वसति मराठी भाषिकांचीच आहे. म्हणून मुंबईचा समावेश महाराष्ट्रामध्येंच व्हावयाला पाहिजे ह्याखेरीज ह्या वादांतून दुसरा निष्कर्ष निघूं शकत नाहीं. असें असतांहि भांडवलवाल्यांच्या वर्चस्वाला बळी पडल्यामुळें मुंबई ही महाराष्ट्राची आहे ह्या सत्याला मान्यता देतांना कॉंग्रेसश्रेष्ठींचे प्राण अगदीं कंठाशीं आल्यावांचून राहावयाचे नाहींत. सत्तेपुढें शहाणपण नाहीं. सत्य, न्याय, तर्क, हक्क ह्या सर्व गोष्टी महाराष्ट्राच्या बाजूच्या आहेत. पण सत्ता आणि संपत्ति ह्या दोन महान् शक्ती महाराष्ट्राच्या हातीं नाहींत. म्हणून महाराष्ट्राच्या हक्कांची अशी राजरोस पायमल्ली होते आहे. आणि द्वैभाषिक राज्यामध्यें राहण्याला पांच वर्षें कां होईना पण जर महाराष्ट्रानें संमति दिली तर पांच वर्षांनीं महाराष्ट्राचे हाल कुत्रें देखील खाणार नाहीं. द्वैभाषिक राज्यांत महाराष्ट्र राहिला तर तो भांडवलवाल्यांचा दास होईल. आणि मुंबईवांचून महाराष्ट्र निर्माण झाला तर तो भुकेबंगाल होईल. म्हणून मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण झाल्यावांचून महाराष्ट्राला दुसरा तरणोपायच नाहीं. मुंबई हें महाराष्ट्राचें मायपोट आहे. मुंबईवांचून महाराष्ट्र जगूंच शकणार नाहीं. म्हणून मुंबईविना भाषिक महाराष्ट्र निर्माण होण्याच्या कल्पनेचा पाक मराठ्यानें अंतःकरणापासून धिक्कार केला पाहिजे. मुंबई महाराष्ट्रांत गेली तर

भारतांतलें पहिलें समाजवादी राज्य महाराष्ट्रामध्यें अस्तित्वांत येईल आणि मुंबई शहरांतून आपली हकालपट्टी होईल ह्याचें मुंबईच्या भांडवलवाल्यांना सर्वांत मोठें भय वाटतें, म्हणून महाराष्ट्रापासून मुंबई तोडून काढण्याची ते पराकाष्ठा केल्या-वांचून राहणार नाहींत. एवढ्यासाठीं मुंबईमधल्या चौदा लाख मराठ्यांनीं एका आवाजानें ओरडून काँग्रेसश्रेष्ठींना सांगितलें पाहिजे कीं, मुंबई ही महाराष्ट्राची आहे! मुंबईमधल्या चौदा लाख मराठ्यांनीं आपल्या शक्तीची ह्या वेळीं शिकस्त करून मुंबईसह महाराष्ट्राला अपशकुन करणाऱ्या भांडवलवाल्यांचा आणि त्यांच्या बाजूनें भुंकणाऱ्या सदोबासारख्या भाडोत्री कुत्र्यांचा विरोध ठेचून काढला तर मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत करण्यावांचून काँग्रेसश्रेष्ठींना गत्यंतरच राहणार नाहीं.

२३-१०-५५

## सहा नोव्हेंबर !

गेल्या आठवड्यांत 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या लढ्याला एक निराळेंच तोंड लागलें. आजपर्यंत महाराष्ट्रामधील काँग्रेस पुढाऱ्यांचा 'संयुक्त महाराष्ट्रा'ला जरी वैचारिक पाठिंबा होता आणि त्यांपैकीं कित्येकांनीं व्यक्तिशः 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या चळवळींत प्रामुख्यानें भाग जरी घेतला असला, तरी तीन कोटी महाराष्ट्रीयांचें 'संयुक्त महाराष्ट्रा'चें स्वप्न जर पुढेंमागें कधीं विफल होण्याची पाळी आली तर अशा वेळीं आपण काय भूमिका घ्यावयाची ह्याचा गंभीर आणि संघटित विचार महाराष्ट्रामधील काँग्रेसवाल्यांनीं आजपर्यंत कधीं केला नव्हता. काँग्रेसनिष्ठा कीं महाराष्ट्रनिष्ठा ह्या पेचांत महाराष्ट्रांतले बहुतेक सर्व काँग्रेसवाले सांपडल्यामुळें ते ह्या प्रश्नावर इतके दिवस मूग गिळून स्वस्थ बसलेले होते. पण फाकुंपा समितीनें 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या प्रश्नाला सुरुंग लावून आणि त्याला कायमचा नेस्तनाबूत करून महाराष्ट्रांतल्या काँग्रेसवाल्यांना जाहीर आव्हानच दिलें. ह्या आव्हानाचा निःसंदिग्धपणें स्वीकार करण्यावांचून त्यांना गत्यंतरच उरलें नाहीं. कारण, संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यामध्यें आतां जर उडी घेतली नाहीं तर संयुक्त महाराष्ट्राबरोबर आपणहि महाराष्ट्राच्या राजकीय आयुष्यामधून कायमचे नामशेष होऊं, हें त्यांना पुरतेपणीं कळून चुकलें आहे. संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न हा जसा सर्वच मराठी माणसांच्या जीवन-मरणाचा प्रश्न आहे तसा तो महाराष्ट्रामधल्या काँग्रेसवाल्यांच्याहि जीवनमरणाचा प्रश्न आहे. म्हणून संयुक्त महाराष्ट्राच्या निशाणाचें प्राणपणानें रक्षण करण्यासाठीं शंकरराव देवांच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्रामधले सर्व काँग्रेसवाले एकत्र झाले. मुंबईसह आणि विदर्भासह संयुक्त महाराष्ट्राच्या मूळच्या मागणींत तसूभरहि मुरड घातली तरी ती आपण मान्य करणार नाहीं आणि तशीच वेळ आली तर आपल्या अधिकारपदाचे आपण राजिनामे देऊन हा लढा लढूं असा महाराष्ट्रीय काँग्रेसनेत्यांनीं जेव्हां संकल्प केला, तेव्हां महाराष्ट्रामधील निराश आणि हताश वातावरणामध्यें एक नवीनच आवेश आणि उत्साह संचारला. ऐक्याचें आणि

निश्चयाचें एवढें प्रचंड, वैचारिक अन् भावनात्मक वातावरण कित्येक वर्षांत महाराष्ट्रांत कोणाला पाहावयास मिळालें नसेल. जागृत आणि प्रक्षुब्ध महाराष्ट्राचा घनगंभीर गडगडाट दिल्लीपर्यंत जाऊन पोहोंचला, म्हणून काँग्रेसश्रेष्ठींनीं शंकरराव देव प्रभृति महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना तातडीनें पाचारण केलें; आणि दिल्ली येथें काँग्रेस श्रेष्ठींच्या महाराष्ट्रीय काँग्रेस पुढाऱ्यांबरोबर ज्या वाटाघाटी आणि जो विचारविनिमय झाला त्यांतूनच 'संयुक्त महाराष्ट्र'चा एक अनपेक्षित अन् निराळाच पर्याय निर्माण झाला.

'संयुक्त महाराष्ट्र'च्या लढ्याचीं सूत्रें महाराष्ट्रांतील काँग्रेस नेत्यांनीं हातीं घेतल्यानंतर असा पर्याय निर्माण होणें अगदीं अपरिहार्यच होतें. ह्या प्रश्नावर महाराष्ट्रांतील इतर राजकीय पक्षांच्या नेत्यांनीं नेहरू-ढेबर ह्यांच्याशीं चर्चा करणें निराळें आणि देव-देवगिरीकर ह्यांनीं त्यांच्याशीं बोलणीं करणें निराळें. स्वतःची तात्त्विक बैठक न सोडण्याचा या आमच्या महाराष्ट्रीय काँग्रेसनेत्यांनीं स्वतःशीं जरी कितीहि ठाम निश्चय केला असला, तरी स्वपक्षाच्या श्रेष्ठांशीं सामोपचाराच्या आणि सहकार्याच्या भूमिकेवरून वाटाघाटी करावयाला एकदां बसल्यानंतर मग मूळ प्रश्न सोडविण्याचे अनेक पर्याय निर्माण होणें हें क्रमप्राप्तच होतें. फाकुंपा समितीनें संयुक्त महाराष्ट्राला पांगळा करून आणि त्याला द्वैभाषिक राज्यांत कोंबून सत्याचा, न्यायाचा, तर्काचा आणि सुसंगतीचा जो राजरोस खून केला, तो लक्षांत न येण्याइतके कांहीं नेहरू-ढेबर मतिमंद नाहींत. म्हणून महाराष्ट्राच्या बाबतींत फा. कुं. पा. समितीनें घोर अन्याय केला ही गोष्ट त्यांना पटवून द्यायला शंकरराव देवांना फारसा वेळ लागला नाहीं. तथापि, मुंबईच्या प्रश्नावर फा. कुं. पा. समितीप्रमाणेंच काँग्रेसश्रेष्ठींचेंहि घोडें अडून बसलें. त्यांनीं देवांना निक्षून विचारलें, "तुम्हांला मुंबई हवी का महाराष्ट्र हवा?" शंकरराव म्हणाले, "हा तुमचा प्रश्न शरीर हवें कीं आत्मा हवा अशासारखा आहे. मुंबईशिवाय संयुक्त महाराष्ट्राची मी कल्पनाच करूं शकत नाहीं." त्यावर काँग्रेसश्रेष्ठी म्हणाले, "हा प्रश्न आपण पांच वर्षें तहकूब करूं या. सध्यां महागुजरात, संयुक्त महाराष्ट्र (विदर्भ–मराठवाड्यासह) आणि मुंबई अशीं तीन वेगळीं राज्यें आपण निर्माण करूं या आणि मग पांच वर्षांनंतर मुंबई ही संयुक्त महाराष्ट्रांत सामील करावयाची किंवा नाहीं हें आपण ठरवूं या!" त्यावर शंकरराव ताडकन् उत्तरले, "अहो, पांच वर्षांची तर गोष्ट राहूं द्या, पण हृदय शरीरापासून पांच मिनिटें तरी वेगळें राहूं शकेल काय?" वाटाघाटीचें गाडें ह्या चिखलांत रुतून बसलें!

त्यावर पुन्हा द्वैभाषिक राज्याचा प्रश्न उपस्थित झाला. कॉंग्रेसश्रेष्ठींनीं विचारलें, "व्यापक देशहितासाठीं गुजराती लोक ज्याप्रमाणें द्वैभाषिक राज्यांत राहावयाला तयार आहेत त्याप्रमाणें तुम्ही मराठी मंडळी कां तयार नाहींत?" त्यावर शंकरराव म्हणाले, "व्यापक देशहितासाठीं गुजराती मंडळी द्वैभाषिक राज्यामध्यें राहावयास तयार झाली आहेत हें म्हणणें आम्हांला मान्य नाहीं. देशहितापेक्षां मुंबईवरील आपला ताबा अबाधित राहावा या एकाच दृष्टीनें ह्या लोकांनीं द्वैभाषिक राज्याला मान्यता दिलेली आहे. व्यापक देशहितासाठीं जर सर्व महागुजरात तुम्हीं द्वैभाषिक मुंबई राज्यांत कोंबलात, तर संयुक्त महाराष्ट्रांतून तुम्हीं मराठी भाषिक विदर्भ तेवढा कां बाजूला काढलात? द्वैभाषिक राज्यांत विदर्भाचा समावेश करून गुजरात्यांप्रमाणें सर्व मराठी भाषिकांना येऊं द्यात. हा प्रयोग आपण पांच वर्षें करून पाहूं. त्यानंतर जर महागुजरातला या द्वैभाषिक राज्यांतून बाहेर पडावें असें वाटलें तर त्यांना आपलें स्वतंत्र राज्य स्थापन करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य राहील!" शंकररावांच्या या युक्तिवादानें कॉंग्रेसश्रेष्ठी निरुत्तर झाले. कारण द्वैभाषिक राज्याचें तत्त्व एकदां मान्य केल्यानंतर सर्व गुजरात्यांप्रमाणें सर्व महाराष्ट्रीयांचा समावेश त्या राज्यांत केला जावा हें त्या तत्त्वाशीं सर्वस्वींच सुसंगत आहे. विदर्भाचा समावेश केल्यानें मराठी माणसांची संख्या वाढते या आक्षेपालाहि शंकररावांनीं बिनतोड उत्तर दिलें कीं, "गुजराती अन् मराठी यांनीं भाऊ भाऊ म्हणूनच एका घरांत राहावयाचें एकदां ठरविल्यानंतर मराठी भावांची संख्या जास्त झाली म्हणून गुजराती भावांनीं कां घाबरावें?" या कोटिक्रमाला कॉंग्रेसश्रेष्ठींजवळ उत्तर नव्हतें. नेहरू म्हणाले, "ठीक आहे. समजलें मला तुमचें म्हणणें. महाराष्ट्रांत विदर्भाचा समावेश करण्याबाबत मी माझ्या सहकाऱ्यांजवळ शब्द खर्च करतों." अशा रीतीनें मुंबईसह आणि विदर्भासह संयुक्त महाराष्ट्राची निःसंदिग्ध मागणी कॉंग्रेसश्रेष्ठींकडे मागण्यासाठीं गेलेलें महाराष्ट्रीय कॉंग्रेस नेत्यांचें शिष्टमंडळ फा. कुं. पा. समितीनें सुचविलेल्या नव्या मुंबई राज्यांत विदर्भाचा समावेश करून हा द्वैभाषिक राज्याचा प्रयोग पांच वर्षें करून पाहावा असा पर्याय सुचवून आणि स्वीकारून परत आलें.

त्यानंतर महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस समितीनेंहि ह्या पर्यायाचा पुरस्कार करणें हें क्रमप्राप्तच होतें. संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाला हें जें एकाएकीं निराळें स्वरूप प्राप्त झालें आहे त्याजबद्दल तर्ककुतर्कांचें आणि गैरसमजाचें पुष्कळच वादळ निर्माण झालेलें आहे. म्हणून त्याचें विश्लेषण करणें येथें आवश्यक आहे. संयुक्त

महाराष्ट्राचा हा जो पर्याय निर्माण झालेला आहे तो केवळ शंकरराव देवांच्या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्वामधून आणि नेतृत्त्वामधून निर्माण झालेला आहे ही गोष्ट प्रथम सर्वांनीं लक्षांत घेणें आवश्यक आहे. एका बाजूला पंडित नेहरूंबद्दल त्यांचा आदर आणि दुसऱ्या बाजूला संयुक्त महाराष्ट्राबद्दल निष्ठा ह्यांतून तडजोड म्हणून हा पर्याय निघालेला आहे. गांधीवादाच्या नि अहिंसेच्या तत्त्वांला तो सर्वस्वीं धरून आहे. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची तात्त्विक बाजू शंकररावांनीं कॉंग्रेस श्रेष्ठींना उत्तम तऱ्हेनें पटवून दिली आहे; आणि त्याचबरोबर मुंबईचें स्वतंत्र राज्य कोणत्याहि परितींत केलें जाणार नाहीं असें स्पष्ट आश्वासन त्यांनीं पं. नेहरूंकडून मिळविलें आहे. ह्यावरून संयुक्त महाराष्ट्राच्या मूळ तत्त्वापासून शंकरराव रेसभरहि ढळलेले नाहींत. आजच्या घटकेला मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रांत करावयाला नेहरूप्रभृतींना भीति वाटते. मुंबईमधील इतर भाषिकांच्या मनांत मराठी भाषिकांबद्दल कित्येक गैरसमज आहेत. म्हणून शंकररावांनीं कॉंग्रेसश्रेष्ठींना सांगितलें, "ठीक आहे. द्वैभाषिक राज्यांत आम्हां सर्व मराठी भाषिकांना पांच वर्षें राहूं द्या. मग तुमच्या मनांतील आमच्याबद्दलची भीति आणि गैरसमज नष्ट झाला म्हणजे मग आम्हांला मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र द्या!" नेहरू म्हणाले, "पांच वर्षांनतर मुंबईची तशी इच्छा असल्यास तसें करतां येईल!" शंकररावांनीं सुचविलेला विदर्भासह द्वैभाषिक मुंबई राज्याचा पर्याय जर कॉंग्रेसश्रेष्ठींनीं मान्य केला तर त्यांत महाराष्ट्राचें कांहींच नुकसान नाहीं. संयुक्त महाराष्ट्राचें सर्व बळ संघटित करून एखादा प्रयोग पांच वर्षेंपर्यंत करून पाहावयास काय हरकत आहे? गाजराची पुंगी आहे ही. वाजली नाहीं तर खाऊन टाकली. नाहीं द्वैभाषिक राज्याचा प्रयोग यशस्वी झाला, तरी 'संयुक्त महाराष्ट्र' कुठें जात नाहींच. तें हातांत राखूनच आपण हा प्रयोग करतों आहोंत! फाकुंपा समितीच्या शिफारसी आणि कॉंग्रेसश्रेष्ठींची आजची मनोवृत्ति यांचा विचार करतां मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची निर्मिति आज होऊं शकेल असें वाटत नाहीं. त्यासाठीं महाराष्ट्राला जबरदस्त लढा द्यावा लागेल आणि फार मोठें मोलहि द्यावें लागेल. त्याचे परिणाम काय होतील हें सांगतां येत नाहीं. म्हणून संभाव्य लढ्याचा हा बिकट आणि भयावह मार्ग टाळून आपलें ध्येय शांततेच्या आणि लोकशाहीच्या मार्गानें साध्य करून घेण्यासाठीं शंकररावांनीं हा पर्याय पुढें केलेला आहे. हा पर्याय हें संयुक्त महाराष्ट्राच्या ध्येयसिद्धीच्या मार्गावरचें एक सामर्थ्यवान् आणि विधायक पाऊल आहे. हा पर्याय सुचवून संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाला

शंकररावांनीं फार मोठी नैतिक प्रतिष्ठा प्राप्त करून दिलेली आहे हें कोणालाहि नाकबूल करतां येणार नाहीं.

हा पर्याय म्हणजे काँग्रेसश्रेष्ठींना कुंठित करण्यासाठीं किंवा गुजरात्यांवर मात करण्यासाठीं शंकररावांनीं टाकलेला एक राजनैतिक कुटिल डाव आहे अशी ज्यांनीं आपली समजूत करून घेतली असेल, त्यांच्या त्या गैरसमजाचें आतांपर्यंत यासंबंधीं आम्हीं केलेल्या विवेचनानें निराकरण होईल असा आम्हांला भरंवसा आहे. शंकरराव देव हे जितके आग्रही आहेत तितके आर्जवी आहेत. आंत एक आणि बाहेर दुसरें असा दुटप्पीपणा त्यांच्याजवळ नाहीं. आग्रहाच्या नि आर्जवाच्या समन्वयांतून हा तडजोडीचा पर्याय निर्माण झालेला आहे, मुत्सद्देगिरीच्या डावपेचामधून नव्हे. त्यांत राजकारण असलेंच तर एवढेंच आहे कीं, स्वतः वाकून दुसऱ्याला वाकवावयाचें त्यांत सामर्थ्य आहे. पण तें गांधीवादाशीं संपूर्णतया सुसंगत आहे. काँग्रेसश्रेष्ठींशीं सहकार्याची वृत्ति दाखवून, राज्यपुनर्रचना समितीनें महाराष्ट्राबाबत केलेल्या अन्यायाला तोंड फोडून अन् व्यापक देशहितासाठीं आणि लोकशाहीच्या आदरापोटीं आपला प्रश्न कांहीं काळ अनिर्णीत ठेवण्यास मान्यता देऊन शंकररावांनीं आपल्या नेतृत्वामध्यें फार मोठें सामर्थ्य निर्माण केलें आहे. जें नेतृत्व महाराष्ट्रांत नसल्यामुळें दिल्लीच्या राजकर्त्यांनीं महाराष्ट्राची आजपर्यंत अक्षम्य उपेक्षा केली, आणि ज्या नेतृत्वाच्या आधारावरच संयुक्त महाराष्ट्राचा शेवटला लढा अखेर जिंकला जाणार आहे तें नेतृत्व आज शंकररावांमध्यें निर्माण झालें आहे, एवढेंच नव्हें तर उत्पन्न होऊन तें वाढीस लागलें आहे हें जे महाराष्ट्रीय ओळखणार नाहींत त्यांच्या हातून महाराष्ट्राच्या हिताला फार मोठा धोका पोहोचण्याचा संभव आहे. शंकररावांचें नेतृत्व जेवढें विशाल आणि उत्तुंग करतां येईल तेवढें करण्यांतच महाराष्ट्राचा आतां तरणोपाय आहे. म्हणून 'संयुक्त महाराष्ट्र परिषदे'नें मुंबई शहरावरील आपला हक्क वा एकभाषिक राज्यावरील आपली श्रद्धा यत्किंचित्‌हि न सोडतां शंकररावांना जसे सर्वाधिकार देऊन टाकले त्याप्रमाणें सर्व मराठी भाषिकांनीं आपापल्या वसतीच्या गांवांत वा शहरांत सार्वजनिक सभा भरवून 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा'च्या ध्येयावरील आपली अढळ निष्ठा व्यक्त करून शंकररावांच्या नेतृत्वाचा पुरस्कार करावा आणि महाराष्ट्राच्या वतीनें त्यांना सर्वाधिकार देऊन टाकावेत.

हें सर्व कार्य नऊ नोव्हेंबरच्या आंत व्हावयाला पाहिजे. कारण त्या दिवशीं

काँग्रेसची कार्यकारिणी सभा शंकररावांनीं सुचविलेल्या पर्यायावर आपला निर्णय देणार आहे. ह्याचा अर्थ शंकररावांच्या पर्यायाचा सर्व महाराष्ट्रीयांनीं पुरस्कार केला पाहिजे असा नव्हे. किंबहुना, शंकररावांच्या पर्यायाला कोणींहि पाठिंबा दिला नाहीं तरी चालेल. शंकररावांचा पर्याय हा आतां महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसचा पर्याय आहे. एका बाजूस काँग्रेसश्रेष्ठी आणि दुसऱ्या बाजूला तीन कोटी मराठी माणसें यांच्यामध्यें तडजोड घडवून आणण्याचा शंकररावांचा किंवा महाराष्ट्र काँग्रेसचा हा प्रयत्न आहे. तीन कोटी मराठी माणसांचा संयुक्त महाराष्ट्रावरील विश्वास अढळ असून आपल्या वतीनें काँग्रेसश्रेष्ठींशीं शिष्टाई करण्याचा सर्वाधिकार त्यांनीं शंकररावांना दिलेला आहे एवढाच त्याचा अर्थ होईल. शंकररावांनीं सुचविलेला पर्याय जर काँग्रेसश्रेष्ठींनीं यावेळीं मान्य केला नाहीं तर पुढें त्याचे काय काय परिणाम होतील, मराठी जनता आपल्या ध्येयसिद्धीसाठीं मग कोणत्या प्रखर मार्गाचा अवलंब करील अन् शंकररावांची महाराष्ट्रनिष्ठा गांधीवादाला अनुसरून कोणतें उग्र स्वरूप धारण करील याचा धाक काँग्रेसश्रेष्ठींना आतां वाटायला हवा. रविवार तारीख सहा नोव्हेंबर हा दिवस 'संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीचा दिवस' म्हणून सर्व मराठी भाषिकांनीं पाळावा अशी जाहीर विनंति काँग्रेसव्यतिरिक्त इतर पक्षांच्या आणि संस्थांच्या मराठी पुढाऱ्यांनीं केलेली आहे, त्याच्या पाठीमागें हीच मुख्य भूमिका आहे. संयुक्त महाराष्ट्राची ही मागणी जितक्या प्रचंड आणि गगनभेदी आवाजांत गर्जून महाराष्ट्राला मागतां येईल, तितकी त्यानें मागावी. म्हणजे कमींत कमी शंकररावांचा पर्याय मान्य करण्याचें धारिष्ट तरी काँग्रेसश्रेष्ठींच्या अंगीं येईल.

ज्या लोकांना शंकररावांचा पर्याय ही संयुक्त महाराष्ट्राच्या तत्त्वाशीं प्रतारणा आहे असें वाटतें, त्या मंडळींनीं शंकररावांचा पर्यायसुद्धां काँग्रेसश्रेष्ठींनीं मान्य करूं नये म्हणून गुजरातेमधील आणि विदर्भामधील महाराष्ट्राचे हितशत्रू जे भांडवलशाहीचे हस्तक ते केवढें आकाशपाताळ एक करून राहिले आहेत त्याजकडे लक्ष द्यावें. गुजरात प्रदेश काँग्रेस कमिटीनें गल्या मंगळवारीं असा ठराव मंजूर केला कीं, "राज्यपुनर्रचना समितीच्या शिफारसी जशाच्या तशा स्वीकारण्याची महाराष्ट्रीय पुढाऱ्यांची तयारी नसेल तर संकल्पित मुंबई राज्याचीं महाराष्ट्र, गुजरात आणि मुंबई अशीं तीन राज्यें बनविणें हेंच सर्वांच्या हिताचें ठरेल. कारण आपली बहुसंख्या अधिक वाढावी याच हेतूनें विदर्भाच्या समावेशाची मागणी महाराष्ट्रानें केलेली आहे. तसेंच पांच वर्षांनीं वाटल्यास गुजरातनें मुंबई राज्यांतून बाहेर

पडावें, म्हणजे मुंबई शहर आपोआपच संयुक्त महाराष्ट्राला मिळतें असा हेतु या पर्यायांत आहे. महाराष्ट्रीय नेत्यांची ही वृत्ति पाहतां द्वैभाषिक राज्य चालणें अशक्य होईल. कोणत्याहि कारणासाठीं मुंबई शहर हें एकभाषी राज्याचा भाग होतां कामा नये. महाराष्ट्र कॉंग्रेसनें सुचविलेल्या पर्यायानें मुंबई राज्याचें स्वरूप संपूर्णपणें बदलून जाणार असल्यानें गुजरात कॉंग्रेस त्याला मान्यता देऊं शकत नाहीं." गुजरात प्रदेश कॉंग्रेसनें केलेल्या या ठरावाचे 'बोलविते धनी' मुंबई राज्याचे मुख्य प्रधान श्री. मोरारजी देसाई हे आहेत हें या प्रसंगानें आतां उघडकीस आलें आहे ही सर्वांत फार उत्तम गोष्ट झाली.

आजपर्यंत याबाबत मोरारजीभाई मोठ्या कटाक्षानें मौन धारण करून बसले होते. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण होऊं नये म्हणून कॉंग्रेसच्या राजकारणामध्यें आजपर्यंत जर कोणी अंतःस्थ कारवाया चालवीत आलें असेल, तर ते आमचे मोरारजीभाईच. वल्लभभाई हे महाराष्ट्राचे कट्टर शत्रु. दार कमिशनच्या अहवालामधील महाराष्ट्राची बदनामी करणारा सर्व खोडसाळ मजकूर वल्लभभाईंच्याच प्रेरणेनें लिहिला गेला. काय वाटेल तें झालें तरी मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रांत होतां कामा नये हें सर्व कारस्थान वल्लभभाईंचेंच. तो वल्लभभाईंचा विषारी वारसा त्यांच्या मृत्यूनंतर आतां ओघानेंच मोरारजीभाईंकडे चालत आलेला आहे. महाराष्ट्राबद्दलची सर्व 'कॉन्फिडेन्शल' माहिती पंडित नेहरूंना मोरारजीभाईच पुरवितात. महाराष्ट्राबद्दल आधींच बराचसा पूर्वग्रह पंडितजींच्या मनांत आहे, तो वाढविण्याचें कार्य मोरारजीभाईच करीत असतात. किंबहुना मोरारजीभाईंच्या भिंगा(Lens)-मधूनच पंडित नेहरू महाराष्ट्राकडे बघत असतात असें म्हटलें तरी चालेल. महाराष्ट्र कॉंग्रेसनें सुचविलेल्या पर्यायावर मोरारजीभाईंनीं आपलें प्रदीर्घ वक्तव्य खुल्या मनानें केलेलें आहे, यावरून 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या निर्मितीच्या मार्गामध्यें ते केवढा मोटा अडथळा आहेत हें लक्षांत येतें. संयुक्त महाराष्ट्रासंबंधीं मोरारजीभाईंच्या मनांतलें सर्व किल्मिष या निमित्तानें एकदांचें बाहेर आलें हें चांगलें झालें.

मोरारजीभाईंच्या वक्तव्यामधले मुख्य मुद्दे असे : (१) आतांपर्यंत एकभाषी राज्य हें महाराष्ट्रीयांचें 'नैतिक तत्त्व' होतें. पण आतां द्वैभाषिक राज्यावरील आपली निष्ठा जाहीर करून त्यांनीं आपल्या भूमिकेंत मौलिक बदल केला आहे. (२) महाराष्ट्रीयांना स्वतःचें मोठें संख्याधिक्य असलेलें द्वैभाषिक राज्य हवें आहे. (३) राज्यपुनर्रचना समितीच्या शिफारसींबद्दल मराठी नेत्यांनीं आपली प्रतिक्रिया

ज्या स्वरांत आणि ज्या भाषेंत व्यक्त केली त्यामुळें मुंबई शहरांतील आणि इतर ठिकाणच्या गुजराती भाषिकांत भीति उत्पन्न झाली आहे. (४) काँग्रेस-श्रेष्ठींवर आणि मध्यवर्ती सरकारवर गुजराती भाषिकांची संपूर्ण श्रद्धा आहे. मला जर त्यांनीं सांगितलें तर मी माझें डोकें कापून त्यांना देईन. (५) देशहिताच्या दृष्टीनें गुजरात प्रदेश काँग्रेस समितीनें मुंबई राज्य द्वैभाषिक करावें अशी पहिल्या-पासूनच मागणी केली होती. गुजरात हा नेहमींच धर्माच्या मार्गानें चालत आलेला आहे. गुजरातनें प्रत्येक बाबतींत समजूतदारपणा, संयम आणि सारासार विचार प्रकट केलेला आहे. (६) मुख्य वादाचा मुद्दा मुंबई शहर आहे. कलकत्ता आणि मद्रास येथें बंगाली आणि तामिळ भाषिक अनुक्रमें ऐशीं टक्क्यांच्यावर आहेत, म्हणून मुंबईशीं त्यांची तुलना होऊं शकत नाहीं. मुंबईत कोणत्याहि एका भाषिक गटाचें आधिक्य नाहीं. मुंबईचें संमिश्र स्वरूप हें भारताचें भूषण आहे. (७) भौगोलिक दृष्ट्या मुंबई हा महाराष्ट्राचा भाग आहे. पण तें शहर जर एकभाषिक राज्यांत गेलें तर मराठी आणि गुजराती या उभयतांचें नुकसान होईल. (८) महाराष्ट्र काँग्रेसनें संमिश्र राज्यांत विदर्भाचा समावेश करण्यांत यावा अशी आरंभापासून मागणी केलेली नाहीं. तशी केली असती तर मीं त्याला आक्षेप घेतला नसता. मराठी भाषिकांचें मताधिक्य वाढविण्यासाठीं आतां ही मागणी करण्यांत आलेली आहे. (९) महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसनें सुचविलेल्या पर्यायानें मुंबई राज्याचें सुचविलें गेलेलें स्वरूप आमूलाग्र बदललें जाईल म्हणून आम्हांला तें अमान्य आहे. राज्यपुनर्रचना समितीनें सुचविलेल्या द्विभाषिक राज्यांत जर गुजरात्याबरोबर सहजीवन जगणें महाराष्ट्रीयांना अशक्य असेल तर महाराष्ट्र, गुजरात आणि मुंबई अशीं तीन राज्यें निर्माण करण्याची मागणी गुजरात्यांना करावी लागेल.

मोरारजीभाईंचा हा सर्व संभावित आणि साळसूद युक्तिवाद एखाद्या ढोंगी बुवाला शोभण्यासारखा आहे. विदर्भाचा जर द्विभाषिक राज्यांत समावेश करण्यांत आला तर पांच वर्षेपर्यंत ह्या राज्यांत राहण्याचा प्रयोग आपण करून पाहूं असें महाराष्ट्र काँग्रेस आतां म्हणते याचा अर्थ एकभाषिक राज्यावरील महाराष्ट्राची श्रद्धा उडाली आणि ती आतां द्विभाषिक राज्यावर बसली असा जो मोरारजीभाईंनीं केला आहे तो शुद्ध खोडसाळपणाचा आहे. महाराष्ट्राची श्रद्धा आणि निष्ठा आहे तेथेंच अढळ आहे. मराठी वृत्तपत्रें वाचण्याचें मोरारजी-

भाईंनीं कधींपासून सोडून दिलें? उलट, द्विभाषिक राज्यांत विदर्भ आला तर आपण त्या राज्यांत राहावयाला तयार नाहीं असें म्हणणाऱ्या गुजरातची द्विभाषिक राज्यावरची तथाकथित श्रद्धा मात्र शुद्ध लुचेगिरीची आणि ढोंगीपणाची आहे हें आतां उघड झालें आहे. द्विभाषिक मुंबई राज्यांत विदर्भ आला तर या राज्याचें स्वरूप आमूलाग्र बदलतें हें मोरारजींचें विधानहि खोटें आहे. राज्यपुनर्रचना समितीनें सुचविलेल्या द्विभाषिक मुंबई राज्यांतहि महाराष्ट्रीयांचें संख्याधिक्य आहेच. तेव्हां स्वतःचें मताधिक्य वाढविण्यासाठीं विदर्भाची महाराष्ट्रानें आतां मागणी केलेली आहे हें म्हणणें योग्य नाहीं. महाराष्ट्रीय ५६ टक्के असले काय किंवा ७६ टक्के झाले काय गुजराती भाषिक आहे तेवढेच राहतील. त्यांच्यांत तर कांहीं घट होणार नाहीं? फार झालें तर त्यांनीं आपल्या हितसंरक्षणाची हमी मागावी. पण विदर्भ आलें म्हणून द्विभाषिक राज्याला नकार देण्याचें काय कारण? सर्व गुजराती भाषिक मुंबई राज्यांत जसे एक होत आहेत, तसे सर्व मराठी भाषिक एकत्र व्हावेत ह्या एकाच तर्कशुद्ध हेतूनें महाराष्ट्रानें मुंबई राज्यांत विदर्भाचा समावेश व्हावा अशी मागणी केली आहे. महाराष्ट्राच्या या हेतूची मोरारजीभाई जाणूनबुजून बदनामी करीत आहेत.

देशहिताच्या दृष्टीनें गुजरातनें पहिल्यापासून द्विभाषिक राज्याची मागणी केली हें मोरारजीभाईंचें विधानहि धादांत असत्य आहे. त्याच्या पाठीमागें फार मोठें कारस्थान आहे. बहुसंख्य गुजराती लोकांनीं महागुजरातची मागणी केलेली होती हें जगजाहीर आहे. पण महागुजरात निर्माण झालें तर मुंबईचा समावेश त्यांत होऊं शकणार नाहीं आणि मुंबई आपल्याला गमवावी लागेल, हें जेव्हां कांहीं धूर्त गुजराती नेत्यांच्या लक्षांत आलें, तेव्हां गुजरातमधील काँग्रेसवाल्यांनीं फा. कुं. पा. समितीशीं संगनमत करून 'द्विभाषिक राज्यांत राहावयाला बहुसंख्य गुजराती तयार असल्याचा' निर्वाळा समितीच्या पुराव्यांत दडपून सादर करून ठेवला. गुजराती काँग्रेसवाले आणि फा. कुं. पा. समिति यांनीं संगनमत केलें हें विधान आम्ही ठासून करतों. कारण बहुसंख्य गुजराती द्विभाषिक राज्यांत राहावयास तयार आहेत हें सपशेल खोटें आहे. बहुसंख्य गुजरात्यांना 'महागुजरात' पाहिजे होता. अजूनहि त्यांची तीच मागणी आहे. फाकुंपा समिति जर या बाबतींत प्रामाणिक असती तर द्विभाषिक राज्यामध्यें राहायला मराठी जनता तयार आहे काय असें तिनें महाराष्ट्रांतील काँग्रेस नेत्यांनाहि विचारलें असतें, पण तसें तिनें विचारलेलें नाहीं.

किंबहुना न विचारतांच महाराष्ट्राला त्याच्या मनाविरुद्ध दडपून द्विभाषिक राज्यांत तिनें दडपून टाकलें. फाकुंपा समितीनें गुजराती काँग्रेसवाल्यांशीं संगनमत करून महाराष्ट्राविरुद्ध हें द्विभाषिक राज्याचें कारस्थान रचलें असा जाहीर आरोप आम्ही त्या समितीविरुद्ध करतों. कलकत्ता आणि मद्रास येथें बंगाली नि तामिळी भाषिकांची संख्या ऐंशीं टक्के आहे, ही मोरारजीभाईंची शुद्ध लोणकढी थाप आहे. फाकुंपा समितीच्या अहवालांत ही संख्या सहासष्ट टक्के दिली आहे. ही चोदा टक्क्यांची भेसळ मोरारजीभाईंच्या गुजराती मेंदूंतून निर्माण झालेली दिसते. त्याचप्रमाणें मुंबई शहरांत पंधरा लाख लोक मराठी भाषिक आहे, म्हणजे मराठी भाषिक साडेत्रेपन्न टक्के आहेत. म्हणून मुंबईमध्यें कोणाहि एक भाषिक गटाचें मताधिक्य नाहीं हें मोरारजीभाईंचें म्हणणें सत्यास धरून नाहीं.

एवढ्याखेरीज मोरारजीभाईंचें बाकीचें निवेदन मनोरंजनाच्या दृष्टीनें फारच उपयुक्त आहे. विशेषतः, 'काँग्रेस श्रेष्ठींनीं मागितलें तर आपण आपलें डोकें सुद्धां कापून देऊं' आणि 'गुजरात हा नेहमींच धर्माच्या मार्गानें चालतो' हीं त्यांचीं विधानें वाचून शेकडों मराठी माणसांच्या हसून हसून मुरकुंड्या वळल्याखेरीज राहणार नाहींत. मोरारजीभाई हे एवढ्या अव्वल दर्जाचे विनोदपंडित असतील अशी आमची कल्पना नव्हती. मोरारजींचें डोकें काँग्रेस कशाला कापून मागील? उलट बल्साडच्या निवडणुकींत जनतेनें मोरारजींचें नाक मुळासकट कापलें होतें तें काँग्रेसनें 'प्लास्टिक सर्जरी' करून त्यांना पुन्हा बसवून दिलें! आज खरोखरच कापाकापी कुणाची चाललेली असेल तर ती महाराष्ट्राची. बेळगांव अन् कारवार हे महाराष्ट्राचे पाय कापले गेले. विदर्भ हा त्याचा डावा बाहू तोडण्यांत आला. आणि मुंबई हें जें त्याचें मस्तक तें त्याच्या धडापासून तोडून वेगळें केलें पाहिजे असें स्वतः मोरारजीभाईच बोलत आहेत आणि एवढेंहि करून 'मी माझें मस्तक तोडून द्यायला तयार आहें' हा मंत्र ते मुखानें जपत आहेत. असला 'राक्षसी विनोद' मोरारजीभाईवांचून दुसरा कोण करूं शकेल? गुजरात म्हणे आजपर्यंत धर्मानें चालत आलेला आहे! बरोबर आहे. याची साक्ष शेकडों गुजराती सटोडिये, शेअरबझारवाले, काळाबाजारवाले, कारखानदार, सावकार अन् व्यापारी देऊं शकतील! बगळ्यासारखा पांढरा पोषाक करावयाचा आणि पैशाच्या जोरावर गरिबांचे गळे कापून मुंग्यांना साखर घालावयाची हा बहुसंख्य गुजराती धनिकांचा धर्म आम्हांला माहीत नाहीं काय? महाराष्ट्राच्या रक्तामांसाची जी

मुंबई तिच्यावर सत्तेच्या नि संपत्तीच्या जोरावर आक्रमण करून गुजरात्यांनीं धर्माचा केवढा महान् आदर्श देशापुढें ठेवला आहे ! आणि ऊठपळ पोलिसांचें नि बंदुकांचें भय जनतेला दाखविणाऱ्या मोरारजीभाईंनीं तरी धर्माचा उच्चार तोंडानें करूं नये. भित्र्या माणसांनीं धर्माच्या गोष्टी कशाला कराव्यात ? आज मुंबई राज्यांतील मराठी मुलखामध्यें बंदूकवाल्या पोलिसांचे जे पहारे बसवले गेले आहेत ते केवळ मुंबई राज्यांचे मुख्य प्रधान गुजराती आहेत म्हणून ! आज या जागेवर जर मराठी माणूस विराजमान असता तर महाराष्ट्राचा असा उपमर्द करण्याची त्याला छाती झाली असती का ? आणि इतकेंहि करून हे राजेश्री फिरून आम्हांलाच धर्माच्या गोष्टी सुनावताहेत !

महाराष्ट्र काँग्रेसनें सुचविलेल्या पर्यायाच्या आणखी ज्या प्रतिक्रिया उठल्या आहेत, त्याहि बघण्यासारख्या आहेत. स्वतंत्र विदर्भाचे ज्वलंत पुरस्कर्ते ना. बापूजी अणे यांनीं महाराष्ट्र काँग्रेसच्या या नव्या भूमिकेचें मनःपूर्वक अभिनंदन केलें आहे. महाराष्ट्राचे नेते, स्वतंत्र विदर्भाचे पुरस्कर्ते आणि मुंबई राज्यांतील इतर घटक यांनीं प्रतिष्ठा न गमावतां सलोखा घडवून आणावा असें त्यांनीं जें सुचविलेलें आहे त्याचा काँग्रेसश्रेष्ठींवर अनुकूल परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं. मध्यवर्ती सरकारचे मंत्री आणि विदर्भाचे महान् पुढारी डॉ. पंजाबराव देशमुख ह्यांनीं तर विदर्भाचा अंतर्भाव संयुक्त महाराष्ट्रांतच केला पाहिजे असें ठणठणीत आवाजांत सांगितलें आहे. महाराष्ट्रद्रोही सदोबा पिसाळ पाटील ह्यांनाही महाराष्ट्र काँग्रेसच्या नव्या भूमिकेनें फार आनंद झाला आहे. पण हा लुच्चा माणूस म्हणतो काय कीं, विदर्भ येवो न येवो, राज्यपुनर्रचना समितीनें सुचविलेल्या द्विभाषी राज्यांत राहण्याचें महाराष्ट्रानें मात्र आतां कबूल करावें. भांडवलवाल्यांचें शेण खाऊन सदोबा पिसाळ इतका नादान आणि कोडगा झाला आहे कीं, विदर्भा-वाचूनच्या द्विभाषिक राज्यांत प्राण गेला तरी राहण्यास महाराष्ट्र कबूल होणार नाहीं एवढी साधी गोष्ट देखील त्याच्या बथ्थड मेंदूंत शिरेनाशी झाली आहे. आम्ही स्वतः विदर्भांत नुकतेच जाऊन आलों आहोंत. त्यामुळें विदर्भांतील जनतेची एकंदर काय प्रतिक्रिया आहे हें आम्हीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलें आहे. जे अस्सल विदर्भीय मराठी भाषिक आहेत त्यांना आठ जिल्ह्यांचा विदर्भ नको आहे. संयुक्त महा-राष्ट्रांतच त्यांचा समावेश व्हावा असें त्यांना मनापासून वाटतें. पण जे परप्रांतामधून विदर्भांत येऊन स्थायिक झाले आहेत आणि ज्यांची मातृभाषा मराठी नाहीं अशी

कांहीं मंडळी आणि विशेषतः धनिक मारवाडी मंडळी ह्यांना स्वतंत्र विदर्भ हवा आहे. संयुक्त महाराष्ट्रांत विदर्भाचा समावेश होण्यास त्यांचा विरोध आहे.

गुजरात्यांना जसें चरावयाला मुंबईचें स्वतंत्र कुरण हवें आहे, तसा मारवाड्यांनाहि मनसोक्त मराठी जनतेची आर्थिक पिळणूक करावयास स्वतंत्र विदर्भ हवा आहे. या गटाचे पुढारी ब्रिजलाल बियाणी आहेत. महाराष्ट्रांत विदर्भ जाऊं नये म्हणून त्यांनीं आपल्या जिवाचा मोठा आटापीटा चालविला आहे. ते म्हणतात, "द्विभाषिक राज्याला महाराष्ट्र काँग्रेसनें आतां पाठिंबा द्यावा हा मूळच्या एकभाषी राज्यनिष्ठेचा विश्वासघात आहे. महाराष्ट्र काँग्रेसचा नवा ठराव तत्त्वशून्य, तर्कदुष्ट आणि अन्यायमूलक आहे. विदर्भ आणि महाराष्ट्र यांमध्यें कसलेंहि नातें नाहीं ह्याचा 'नागपुर करार' हा पुरावा आहे. स्वतंत्र विदर्भ प्रांत लहान असला तरी स्वयंपूर्ण आणि समृद्ध होईल. मुंबईच्या द्विभाषिक राज्यांत विदर्भाचा प्याद्यासारखा आम्ही उपयोग होऊं देणार नाहीं!" बियाणी हे सदोबा पिसाळांचेच धाकटे भाऊ आहेत. विदर्भ आणि महाराष्ट्र ह्यांत कांहीं नातें नाहीं असलें विधान भांडवलवाल्यांच्या हस्तकाखेरीज कोणी करणार नाहीं. विदर्भानें मुंबई राज्यांतलें प्यादें होऊं नये असें जे म्हणतात त्यांना विदर्भांतील मराठी जनतेनें तेथल्या मारवाडी सावकारांचीं आणि मालगुजरांचीं प्यादीं व्हावें असें वाटतें, दुसरें काय? मुंबईच्या द्विभाषिक राज्यांत विदर्भाचा समावेश करावयाचा कीं नाहीं ही गोष्ट आतां विदर्भांतील लोकांच्या इच्छेवर अवलंबून नाहीं. सर्व मराठी भाषिक मुंबईच्या द्विभाषिक राज्यांत यावेत कीं न यावेत असें ह्या प्रश्नाला शुद्ध तात्त्विक स्वरूप प्राप्त झालें आहे. यावर नऊ नोव्हेंबर रोजीं काँग्रेसश्रेष्ठी आतां काय निर्णय देतील इकडे सर्वांचें लक्ष लागून राहिलें आहे.

राज्यपुनर्रचना समितीनें सुचविलेलें द्विभाषिक मुंबई राज्य महाराष्ट्राला मंजूर नाहीं; तर विदर्भाचा समावेश करून द्विभाषिक मुंबई राज्य बनवावें हा महाराष्ट्र काँग्रेसनें सुचविलेला पर्याय गुजरात्यांना मान्य नाहीं. गुजराती म्हणतात, "मग महाराष्ट्र, गुजरात अन् मुंबई अशीं तीन स्वतंत्र राज्यें करा." मुंबईचें स्वतंत्र राज्य करायला महाराष्ट्राचा प्रखर विरोध आहे. आणि तसें आपण करणार नाहीं असें पंडित नेहरूंनीं शंकररावांना स्पष्ट अभिवचन दिलें आहे. अशा विलक्षण पेंचप्रसंगाच्या परिस्थितीमध्यें शंकरराव देवांनीं सुचविलेला पर्याय मान्य करण्यावांचून काँग्रेसश्रेष्ठींना गत्यंतरच उरणार नाहीं असें

आमचें मत आहे. तथापि, कॉंग्रेसश्रेष्ठींमध्यें गुजरात्यांचें फार मोठें वर्चस्व आहे. मोरारजीभाई, खंडूभाई, नंदाभाई, ढेबरभाई ही सर्व 'भाई' मंडळी नेहरूंच्या भोंवतीं घट्ट कडें करून बसली आहेत. तेथें मराठी माणसाचा आवाज पोहचूंही शकत नाहीं. मुंबईचें स्वतंत्र राज्य बनविण्याची गुजरात्यांची मागणी नेहरूंच्या गळीं उतरविण्याचा ही भाई मंडळी आटोकाट प्रयत्न करतील. मग त्यांतून आणखी कांहीं पर्याय निघण्याचा संभव आहे. असें कीं, मुंबईवर मध्यवर्ती सरकारचें पांच वर्षेपर्यंत नियंत्रण असावें किंवा मुंबईचें राज्यांतर्गत राज्य बनवावें. महाराष्ट्राला सर्वतोपरी अनुकूल असा निकाल सध्यांच्या परिस्थितींत तरी कॉंग्रेसश्रेष्ठी देतील याची शक्यता दिसत नाहीं. असें असूनहि मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण करण्याच्या मार्गावरील एक फार मोठा टप्पा महाराष्ट्र कॉंग्रेसनें सुचविलेल्या ह्या पर्यायामुळें गांठला जाणार आहे, ह्या एकाच विश्वासानें 'सहा नोव्हेंबर' रोजीं 'संयुक्त महाराष्ट्राची' ची प्रचंड मागणी आम मराठी जनतेनें करून शंकरराव देवांच्या प्रभावी नेतृत्वावरील आपला विश्वास प्रकट करावा अशी आम्ही तिला कळकळीनें विनंति करतों.

३०-१०-१९५५

# भर दिवाळींत मुंबईचा खून !

अखेर शेवटीं जें व्हायचें तेंच झालें! महाराष्ट्राचें दैवच असें खडतर आहे कीं, त्यानें जें मागावें त्याच्या नेमकें उलटच त्याला मिळायचें. त्यानें लोटा मागितला कीं त्याला सोटा मिळायचा. त्यानें मोती मागितला तर त्याला मातीच मिळायची. मला सोनें द्या असें तो म्हणाला कीं त्याच्या हातावर शेणच पडायचें. तीन कोटी मराठी माणसांनीं एक मुखानें आणि एक स्वरानें मुंबई आणि विदर्भ यांच्यासह 'संयुक्त महाराष्ट्र' मागितला. सर्व मराठी भाषिकांचें एक राज्य करा अशी त्यांनीं मागणी केली, तर त्यांना मिळालें काय? द्विभाषिक राज्य! द्विभाषिक राज्य आम्हीं कधीं मागितलें नव्हतें. कोणींच मागितलें नव्हतें. तो शब्ददेखील आमच्या कानावर कधीं पडला नव्हता. ती कल्पनासुद्धां कधीं डोक्यांत पूर्वी आली नव्हती. दोन भाषिकांचें राज्य घेऊन आम्ही करणार काय? मग सध्यांचें आहे तें राज्य काय वाईट होतें? एकभाषिक राज्य हें एक तत्त्व आहे. लोकशाही राज्याचा तो मूलभूत सिद्धांत आहे. द्विभाषिक राज्य हें काय तत्त्व आहे? ती तत्त्वच्युति आहे. द्विभाषिक राज्य ही एक अनैसर्गिक गोष्ट आहे. तें एक बांडगूळ आहे. तें गांडूळ आहे. आम्हीं मागितला हापूसचा आंबा अन् तुम्ही आम्हांला बांडगूळ देतां? आम्हीं मागितला गरुड! अन् तुम्ही आमच्या हातांत गांडूळ ठेवतां?

बरें, द्विभाषिक राज्य जर द्यायचें तर तें तरी प्रामाणिकपणें द्या कीं! त्यांत लुच्चेगिरी कां? द्विभाषिक राज्यांत सगळे गुजराती तुम्ही एकत्रित करतां अन् आम्हां मराठी भाषिकांचे मात्र तुकडे करतां काय? कच्छ आणि सौराष्ट्र गुजरातमध्यें कोंबतां अन् आमचा विदर्भ आमच्यापासून कापून घेतां? बेळगांव कारवार हे घोटे तुम्ही आमच्या पायाचे तोडतां! म्हणे देशाच्या हितासाठीं आम्ही तुम्हांला द्विभाषिक राज्य देतों आहोंत! देशाचें म्हणजे गुजरात्यांचें हित होय? द्विभाषिक राज्यांत गुजरात्यांचें बाळसें वाढवावयाचें अन् महाराष्ट्राला

पांगळें करावयाचें हा यांचा डाव होता, दुसरें काय? हें द्विभाषिक गांढूळ आम्हीं त्याच क्षणीं काँग्रेसश्रेष्ठींच्या अंगावर परत कोलून दिलें. अन् सांगितलें कीं, द्विभाषिक राज्य जर तुम्हांला खरोखरच देशाच्या हितासाठीं आम्हीं पत्करावें असें वाटत असेल तर ह्या द्विभाषिक राज्यांत सगळे गुजराती आणि सगळे मराठी भाषिक ह्यांचा समावेश करा. त्याबरोबर ह्या गुजरात्यांचें ढोंग बाहेर पडलें. ते शंख करायला लागले, द्विभाषिक राज्यांत तुम्ही विदर्भाला घेणार असाल तर आम्हांला तें द्विभाषिक राज्य नको आहे. त्यापेक्षां आहे या राज्याचे गुजरात, मुंबई आणि महाराष्ट्र असे तीन तुकडे करा. मग महाराष्ट्र अन् विदर्भ ह्यांना एकत्र यायचें असेल तर खुशाल येऊं द्या. मुंबई हें महाराष्ट्राचें मस्तक आहे, मुंबई हा महाराष्ट्राचा प्राण आहे. हा महाराष्ट्रापासून तोडला तर याद राखा, असें महाराष्ट्रानें बजावून सांगितलें. पण महाराष्ट्रानें जें मागितलें आहे तें कधीं त्याला मिळालें आहे? गुजरातला महाराष्ट्रापासून मुंबई तोडून काढावयाची होती. त्यांचें तें म्हणणें मात्र मान्य झालें. महाराष्ट्राचें मागणें धुडकावलें गेलें. भर दिवाळीच्या सणांत कॉंग्रेस श्रेष्ठींनीं महाराष्ट्राचा खून केला. अन् त्याचें मुंडकें जी मुंबई ती कापून भांडवलशाहीच्या पायांवर अर्पण केली. भांडवलशाहीला प्रसन्न करण्यासाठीं कॉंग्रेसश्रेष्ठींनीं महाराष्ट्राचा अखेर बळी दिला.

कॉंग्रेसश्रेष्ठींच्या या निर्णयाला आतां महाराष्ट्रानें कसें उत्तर द्यायचें? मुंबईवांचून आम्ही एक क्षणभर देखील जगूं शकणार नाहीं असें शंकरराव देवांनीं नेहरूंना बजावून सांगितलें. तीन कोटी महाराष्ट्रीयांचा तोच दावा आहे. मग हा दावा आम्हीं खरा कसा करून दाखवणार? मुंबईवांचून आम्ही महाराष्ट्र स्वीकारणार काय? कॉंग्रेसचे अध्यक्ष जे ढेबर त्यांनीं महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस समितीचे अध्यक्ष देवगिरीकर यांना खाजगी पत्रानें कळविलें कीं, पांच वर्षांनंतर मुंबई राज्याच्या कायदेमंडळानें जर दोनतृतीयांश मतांनीं महाराष्ट्रांत विलीन होण्याचें ठरविलें तर मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत होऊं शकेल. पण ढेबरांनीं जरी देवगिरीकरांना असें सांगितलें असलें तरी कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें आपल्या निर्णयांत तसा खुलासा केलेला नाहीं. ढेबर आपलें लेखी वचन पांच वर्षांनीं पाळतील हें कशावरून? कॉंग्रेस-श्रेष्ठी आपलीं वचनें कधीं पाळींत नाहींत. मुंबईचें स्वतंत्र राज्य कधींहि मी करणार नाहीं असें पंडित नेहरूंनीं शंकरराव देवांना अवघ्या पंधरा दिवसांपूर्वींच दिलें होतें त्याचें काय झालें? नेहरूंसारख्या महापुरुषानें वचनभंगाचें पातक करावें,

याचें आम्हांस सर्वांत जास्त दुःख होतें. नेहरूंसारख्यांची ही स्थिति! तिथें ढेबरच्या काय पाड?

बरें, अजून विदर्भाच्या बाबतींतही निश्चित असें कांहीं नाहीं. ही तिभंगी योजना जर महाराष्ट्राला पसंत असेल तर महाराष्ट्रांत सामील होण्यासाठीं आम्ही विदर्भाच्या पुढाऱ्यांचें मन वळवूं असें कॅांग्रेसश्रेष्ठी म्हणतात. विदर्भ महाराष्ट्रांत यावयाला बहुतेक तयार होईल असें सारे म्हणतात. पण कशावरून? बियाणी-कन्नमवार आणि अणे-ब्रामणगांवकर या मंडळींच्या अजूनहि स्वतंत्र विदर्भासाठीं वाटाघाटी चालूच आहेत. सारांश हा कीं, विदर्भाची तरवार कॅांग्रेस श्रेष्ठींनीं अद्याप महाराष्ट्राच्या डोक्यावर अजून टांगून ठेवलेली आहे. स्वतंत्र मुंबई राज्याला मान्यता द्या आणि विदर्भ घ्या. विरोध कराल तर मुंबई जाईल अन् विदर्भहि जाईल. बेळगांव, कारवार, निपाणी यांचाहि निर्णय अजून संदिग्धच आहे. सारांश काय तर कॅांग्रेस श्रेष्ठींनीं महाराष्ट्राला साऱ्या बाजूंनीं खोड्यांत अडकविलें आहे. अशा परिस्थितींत खंडित आणि कुंठित झालेल्या महाराष्ट्राला अचूक आणि प्रभावी मार्गदर्शन करणारा रणधीर नेता हवा. शंकरराव देवांच्या अंगीं तें सामर्थ्य आहे. पण महाराष्ट्र प्रदेश कॅांग्रेस समितीनें अद्याप नव्या निर्णयाचा विचार केलेला नसल्यानें तोंपर्यंत शंकररावांनीं या निर्णयाबद्दचें आपलें मत प्रकट करण्याचें नाकारलें आहे. वस्तुतः, त्यांच्यासारख्या स्वतंत्रप्रज्ञ माणसानें महाराष्ट्र प्रदेश कॅांग्रेस समितीच्या निर्णयावर स्वतःचा अभिप्राय अवलंबून ठेवण्याचें कांहीं कारण नव्हतें. त्यांनीं ताडकन् सांगून टाकायला हवें होतें कीं, मुंबईवांचून महाराष्ट्राचा स्वीकार कालत्रयींहि आम्ही करणार नाहीं. मागें त्यांनीं जें सांगितलें तेंच पुन्हा सांगायचें. त्याला विलंब कशाला आणि मौन कां? मनुष्य गप्प असला म्हणजे त्याचें भय वाटतें. कांहीं कांहीं गोष्टी तडकाफडकींच व्हावयाला पाहिजेत. तथापि, शंकररावांचें आम्हांला भय वाटत नाहीं. शंकरराव फार दूरच्या गोष्टी बोलून बसले आहेत. आतां त्यांना अक्षराची सुद्धां माघार घेतां येत नाहीं.

पण बाकीच्या मराठी कॅांग्रेसवाल्यांची मात्र आतां आम्हांला चिंता वाटूं लागली आहे हें बरीक खरें. मुंबईवांचून महाराष्ट्राचा स्वीकार करायचा नाहीं असें महाराष्ट्र प्रदेश कॅांग्रेस समितीनें ठरविलें तर त्या सर्वांना कॅांग्रेसमधून उद्यां बाहेर पडावें लागेल. तसें करण्याची त्यांच्या मनाची अजून तयारी आहे काय? मुंबईचा ज्या अर्थी पांच वर्षांनीं फेरविचार व्हावयाचा आहे त्या अर्थी सध्यां आहे त्या स्वरूपांत

महाराष्ट्राचा स्वीकार करावयाला हरकत नाहीं असें महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस समितीनें ठरविलें तरी पुढच्या सार्वत्रिक निवडणुकींत महाराष्ट्रामधील काँग्रेस सपशेल कोलमडून पडते ही काळ्या दगडावरची रेघ आहे. कसाहि निर्णय घेतला तरी महाराष्ट्रीय काँग्रेसवाले फार काळ काँग्रेसमध्यें राहूंच शकत नाहींत. म्हणून आम्हांला आशा वाटतें कीं, इतर राजकीय पक्षाप्रमाणें तेहि मुंबईवांचून महाराष्ट्राचा स्वीकार करणार नाहींत. पण कोणीं सांगावें उद्यां काय होईल तें! मध्यवर्ती सरकारचे शेतकी मंत्री आणि संयुक्त महाराष्ट्राचे पुढारी डॉ. पंजाबराव देशमुख ह्यांनीं जो एक निराळाच सूर काढलेला आहे, त्यावरून आमच्या मनाची अशी अस्थिर स्थिति झालेली आहे. पंजाबराव म्हणतात कीं, "मुंबई हें महाराष्ट्राचें अविच्छेद्य अंग आहे हें खरें. काँग्रेस वर्किंग कमिटीचा ठराव आमच्या मागणीच्या दृष्टीनें कमी पडत असला तरी मी त्या ठरावाचें स्वागत करतों. दिलेल्या संयुक्त महाराष्ट्राचा स्वीकार करावा आणि चळवळीची भाषा सोडून सर्व महाराष्ट्रीयांनीं मुंबईचा महाराष्ट्र राज्यामध्यें प्रेमानें समावेश घडवून आणण्याचा प्रयत्न करावा." पंजाबरावांची भावना आम्हांला कळते. सर्वसामान्य परिस्थितींत त्यांच्या ह्या वृत्तीचें कोणींहि स्वागतच केलें असतें. पण मुंबईच्या बाबतींत काँग्रेश्रेसष्ठींनीं गुजराती आणि भांडवलवाले यांचा उघडाउघड पक्षपात करून महाराष्ट्राला आतांपर्यंत एवढें दुखवलें आहे आणि आतां तर मुंबई तोडून महाराष्ट्राचा असा कपाळमोक्ष केलेला आहे कीं, यापुढें त्यांच्या कोणत्याहि अन्यायी योजनेचा महाराष्ट्र हा नेहमीं धिक्कारच करील.

आम्हांला काँग्रेस श्रेष्ठींच्या मोहबतीची कांहीं जरुरी नाहीं. कोणाच्याच प्रेमाची आम्हांला आवश्यकता नाहीं. आम्हीं कोणाचें केव्हांहि नुकसान केलें नाहीं. भारताच्या स्वातंत्र्यासाठीं आणि संरक्षणासाठीं आम्हीं सर्वांपेक्षां जास्त बलिदान आणि जास्त पराक्रम केलेला आहे. आम्हीं कोणालाहि लुटलेलें नाहीं. इतरांनीं आम्हांला लुटलेलें आहे आणि आमच्या भोळेपणाचा फायदा घेतला आहे. असें असून सारे आमच्यावर जळतात. आम्हीं कांहीं न करतां जे आमच्याविरुद्ध आहेत त्यांचें प्रेम आम्ही कसें संपादन करणार? तेव्हां पांच वर्षांत मुंबईमधल्या महाराष्ट्रीयेतरांचें प्रेम आम्हीं आपल्या 'आदर्श वर्तना'नें संपादन करावें या पंजाबरावांच्या म्हणण्यांत कांहीं तथ्य नाहीं. मुंबईचें स्वतंत्र राज्य झालें म्हणजे पांच वर्षांमध्यें मुंबईचें वाटोळें होईल हें सूर्यप्रकाशाइतकें स्वच्छ आहे. अन् अशा रीतीनें मुंबईचें वाटोळें झाल्यानंतर मग तिचा महाराष्ट्रांत समावेश करून घेण्याची खटपट

करायची हा उपद्व्याप आम्हांला सांगितला आहे कोणीं? त्यापेक्षा मुंबईसाठीं आतांच आपण लढलों तर आपणांला मोठ्या अग्निदिव्यांतून जावें लागेल. पण मुंबईचा विनाश तरी टळेल! अशी आमची विचारसरणी आहे. तथापि, पंजाबरावांच्या या म्हणण्याचा महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस समितीच्या पुष्कळ सभासदांच्या मनांवर अनुकूल परिणाम होण्याचा फार मोठा संभव आहे. तसें झालें तर महाराष्ट्र काँग्रेसमध्यें मोठी फूट पडेल असें आम्हांस भय वाटतें.

मुंबईचें स्वतंत्र राज्य करण्याचा काँग्रेसश्रेष्ठींचा हा निर्णय अत्यंत असमाधान-कारक आहे असा मध्यवर्ती सरकारचे माजी मंत्री आणि स्टेट बँक ऑफ इंडियाचे अध्यक्ष डॉ. जॉन मथाई यांनीं ठणठणीत अभिप्राय दिला आहे. डॉ. मथाई म्हणतात, "सर्व गुजराती आणि मराठी भाषिकांचें एक मोठें द्विभाषिक राज्य निर्माण करण्याची महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस समितीची योजनाच उत्कृष्ट होती. मुंबईचें स्वतंत्र राज्य करविण्यांत मुंबईच्या भांडवलदारांनीं फार अदूरदर्शीपणा दाखविला आहे. ज्या मुंबई शहराच्या भवितव्यांत पांच वर्षांनीं बदल होण्याचा संभव आहे तेथील व्यापार स्थिरपणें कसा चालावयाचा? मुंबईतील कामगारवर्ग महाराष्ट्रीय आहे. त्याला मुंबईच्या स्वतंत्र राज्याबद्दल कधींहि प्रेम वाटणार नाहीं. बरें, मुंबई राज्याचीं सत्तासूत्रेंहि निवडणुकींत कामगारांच्या हातीं जाण्याचा संभव आहे. अशा परिस्थितींत कामगारांचा आणि सरकारचा व्यापाऱ्यांना नेहमींच विरोध होत राहील. मग असें स्वतंत्र मुंबई राज्य मागून मुंबईच्या व्यापाऱ्यांनीं आणि भांडवलवाल्यांनीं आपलें स्वतःचें काय हित साधलें? डॉ. जॉन मथाई यांचा हा अभिप्राय वाचून मुंबईच्या पुष्कळशा व्यापाऱ्यांचे डोळे पांढरे झाल्यावांचून राहणार नाहींत!

मुंबईचें स्वतंत्र राज्य झाल्यानंतर मुंबईचें काय नुकसान होईल याचा कांहीं कांहीं लोक विचार करूं लागले आहेत; आणि या संभाव्य नुकसानीच्या कल्पनेनें त्यांच्या अंगावर कांटा उभारलेला आहे. या पांच वर्षांमध्यें मुंबईची भव्यता, सौंदर्य आणि रुबाब कमालीचा कमी होईल. मोठमोठ्या सरकारी इमारती ओस पडतील. हजारों सरकारी नोकरांना स्थलांतर करावें लागेल. हायकोर्ट बंद होईल. शेकडों वकील, बॅरिस्टर अन् सॉलिसिटर देशोधडीला लागतील. एकंदर सात लाख लोकांना स्थलांतर करावें लागेल. उपनगरें ओस पडतील. जागेची टंचाई कमी होईल हें खरें; पण व्यापारधंदा येथला इतका खालावेल कीं त्यामुळें या शहरांत

विलक्षग मंदी येईल. बेकारी वाढेल. सारांश मुंबईचें आज जें अखिलभारतीय आणि आंतरराष्ट्रीय महत्त्व आहे तें पार कमी होईल. मुंबई महाराष्ट्राची राजधानी झाली तर व्यापारी आणि औद्योगिक दृष्ट्या मुंबईची पिछेहाट होईल, हा फा. कुं. पा. समितीनें जो आपला ग्रह करून घेतला आहे तो सर्वस्वीं खोटा आहे. उलट मुंबईचें स्वतंत्र राज्य झाल्यानेंच येथील व्यापारधंद्याचा सत्यनाश होईल हें अगदीं निश्चित आहे. महाराष्ट्रापासून वेगळी झाली कीं मुंबई अक्षरशः मरणार आहे. त्याचीं फळें येथल्या बहुसंख्य मराठी जनतेलाच शेवटीं भोगावीं लागणार आहेत. कारण मोठमोठे उद्योगपति अन् भांडवलवाले वेळ आली कीं आपलें सारें भांडवल अन यंत्रें घेऊन आपल्या 'देशा'ला पळून जातील. अन् आपग राहूं इथेंच! म्हणून मुंबईची नासाडी जर थांबवायची असेल तर स्वतंत्र मुंबईच्या राज्याला महाराष्ट्रानें प्राणपणानें विरोध केला पाहिजे.

असें जरी असलें तरी स्वतंत्र मुंबई राज्यांत येथील कामगारवर्गाची आणि श्रमजीवी जनतेची जास्तींत जास्त पिळणूक करून सर्व सत्तेचीं सूत्रें संपत्तीच्या जोरावर आपल्या हातीं ठेवण्याची मुंबईचा धनिक वर्ग जास्तींत जास्त पराकाष्ठा करील. आजहि मुंबई कॅांग्रेसचीं किंवा कॉर्पोरेशनचीं सूत्रें कोण हलवितो? सामान्य लोकांना वाटतें कीं, सदोबा. पण सदोबाचीं सूत्रें कोण हलवितो? मुंबईचे धनिक व्यापारी आणि उद्योगपति. सदोबा हा मुंबईच्या भांडवलदारांचा बगलबच्चा आहे. त्यांच्या पैशाच्या जोरावर तो मुंबईच्या बहुसंख्य मराठी जनतेला हवा तसा लाथाडूं शकतो. मुंबई प्रदेश कॅांग्रेस समितीची घटनाच मुळीं लोकशाही नाहीं. ती भांडवलवाल्यांच्याच केवळ फायद्याची आहे. आज मुंबई प्रदेश कॅांग्रेसमध्यें निवडून यायचें म्हणजे स्वतःच्या खिशांतले पैसे खर्च करून सभासद बनवायचे अन् त्यांच्या मतावर निवडून यायचें. म्हणून मुंबई कॅांग्रेसमधें गुजराती व्यापाऱ्यांचें आणि भांडवलवाल्यांचें वर्चस्व आहे; आणि त्यांच्या कलानें सदोबांना नाचावें लागतें; आणि सदोबा आज आहेत, कदाचित् उद्यां नसतील! त्यांच्यामागें मुंबई कॅांग्रेसचीं सूत्रें कोणाच्या हातीं जातील? के. के. शहा, बाबूभाई चिनॉय, रतिलाल गांधी, भवानजी खिमजी, देवजी रतनजी अन् नाथालाल पारेख ह्या धनपतींच्याच हातीं ना? मुंबईचें स्वतंत्र राज्य झालें म्हणजे ह्याच व्यापाऱ्यांच्या नि भांडवलवाल्यांच्या पैशावर शहरांतल्या गुंडांना आणि दादांना हातीं धरून हा सदोबा येथें भयंकर महाराष्ट्रविरोधी आघाडी उभारल्यावांचून राहणार नाहीं. तसें

झालें तर सर्व भारतांत मुंबई हें प्रतिगामी शहर होऊन त्याचाने नेहरूंच्या राजकारणा-वर प्रतिकूल परिणाम झाल्याखेरीज राहणार नाहीं.

मुंबईच्या बहुसंख्य व्यापाऱ्यांना नेहरूंचें परराष्ट्रीय राजकारण पसंत नाहीं. त्यांना वाटतें कीं, परकीय राष्ट्रांचा पैसा जेवढा मिळेल तेवढा भारतानें घ्यावा आणि आपला उद्धार करावा. हे मुंबईतले नेहरूविरोधी व्यापारी सदोबांच्या नेतृत्वाखालीं दिल्लीच्या राजकारणावर आक्रमण केल्यावांचून राहणार नाहींत. आजहि मुंबईचे हे भांडवलवाले दिल्लीच्या राज्यकर्त्यांच्या हातून आपल्याला हवें तसें राजकारण बदलून घेऊं शकतात. फाकुपा समितीचा मूळचा अहवाल नाहीं त्यांनीं बदलून घेतला? मूळच्या अहवालांत मुंबई ही संयुक्त महाराष्ट्राची राजधानी असावी असा फाकुपानें निर्णय दिला होता. ही गोष्ट स्वतः न्या. फाजलअल्ली यांनीं श्री. भाऊसाहेब हिरे, शंकरराव देव आणि डॉ. धनंजयराव गाडगीळ ह्यांच्या समक्ष सांगितली होती. आतां ते करूं द्यात वाटेल ते खुलासे. काँग्रेसश्रेष्ठींप्रमाणेंच त्यांच्या मेहरबानीवर अवलंबून असलेल्या ह्या मोठमोठ्या माणसांना प्रसंग पडेल तसें खोटें बोलायची मुळींच शरम वाटत नाहीं. मराठी माणसांना इतकं बेशरम व्हायला जमत नाहीं. पुष्कळांना जें वाटतें कीं स्वतंत्र मुंबईतील व्यापारधंद्यावर दिल्लीचें नियंत्रण राहील, तें खोटें आहे. मुंबईचे भांडवलवाले आणि उद्योगपति दिल्लीच्या राजकारणाचीं सूत्रें हलविण्याचा प्रयत्न करतील. तसें झालें म्हणजे कसलें आलें आहे समाजवादी ध्येय अन् कसलें काय? म्हणून मुंबई स्वतंत्र होण्यानें केवळ महाराष्ट्राचें नव्हे तर साऱ्या भारताचें नुकसान होण्याचा धोका आहे. म्हणून काय वाटेल तें झालें तरी मुंबईचें स्वतंत्र राज्य होण्यास प्रत्येक पाक मराठ्यानें हातांत प्राण घेऊन वाटेल तें बलिदान करावयास तयार झालें पाहिजे.

काँग्रेसश्रेष्ठींच्या नव्या निर्णयानें गुजरातला फार आनंद झालेला आहे. ते यंदाची दिवाळी अपूर्व थाटामाटानें साजरी करणार आहेत असें म्हणतात. स्वतःला महागुजरात मिळाल्यापेक्षां महाराष्ट्राला मुंबई मिळाली नाहीं याबद्दल त्यांना जास्त आनंद झाला आहे. सदोबांना म्हणे मुंबईचें स्वतंत्र राज्य होण्याच्या कल्पनेनें कांहीं आनंद झालेला नाहीं. ते म्हणाले, "फा. कुं. पा. नें सुचविलेलें द्विभाषिक राज्यच भव्य आणि भरभराटीचें झालें असतें." काय ढोंगी माणूस आहे सदोबा! मुंबई स्वतंत्र करण्याचें अगदीं पहिल्यापासून ह्या

एका माणसाचें कारस्थान. आणि हा आतां नक्राश्रू ढाळतो आहे! तथापि, सदोबा हा मराठी पिंडाचा माणूस नसून 'कॉस्मॉपॉलिटन' पिंडाचा माणूस आहे. आणि तो महाराष्ट्राचा कट्टर दुष्मन आहे ह्याची खूणगांठ प्रत्येक मराठी माणसानें आपल्या मनाशीं बांधून ठेवावी. मुंबई आणि महाराष्ट्र ह्यांची कॉंग्रेसश्रेष्ठींनीं फाळणी केलेली आहे म्हणून यंदा महाराष्ट्राला सुतक आहे. या सुतकांत कोणीहि आपल्या घरांत दिव्यांची आरास करूं नये किंवा गोडधोड खाऊं नये. आमचा प्राण जी मुंबई ती हिरावून घेणाऱ्या भांडवलशाही 'नरकासुरा'चा जेव्हां आम्ही विध्वंस करूं तेव्हांच तीन कोटी मराठी माणसें आपली खरी 'दिवाळी' साजरी करतील.

१३-११-१९५५

# विश्वासघातकी महाराष्ट्रकाँग्रेस

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारतामधील राज्यांची पुनर्रचना करणें हें सर्वांत पहिलें महत्त्वाचें काम होतें. कशासाठीं ही पुनर्रचना करावयाची? तर लोकशाही बळकट व्हावी म्हणून जनतेमधील एकजूट वाढविण्यासाठीं. भाषा हा जनतेच्या एकजुटीचा पाया आहे ही गोष्ट सूर्यप्रकाशासारखी स्वच्छ आहे. एका भाषेच्या लोकांमध्यें एकजूट ताबडतोब होते. कारण इतिहास, संस्कृति, परंपरा, आचार नि विचार ह्या दृष्टीनें त्यांच्यामध्यें जास्तींत जास्त साम्य असतें. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर पोटराज्यांची रचना भाषिक तत्त्वावर करावयाची हा जो पूर्वीच्या काँग्रेसनेत्यांनीं विचार ठरविला होता तो अगदीं शुद्ध शास्त्रीय स्वरूपाचा होता. लोकशाहीचा तो मुळीं मूलभूत सिद्धांतच आहे. रशियामधील सर्व पोट राज्यांची रचना भाषिक तत्त्वावरच झालेली आहे. असें जर आहे तर मग त्या बाबतींत नेहरूंनीं आतां एवढी खळबळ कां करावी हें कळत नाहीं! स्वातंत्र्य मिळाल्यानंतर नेहरूंनीं पहिल्याछूट जर सर्वांना सांगितलें असतें कीं, राज्यपुनर्रचनेच्या प्रश्नाचा आम्ही आणखी पंचवीस वर्षें विचार करणार नाहीं, तर हा प्रश्न त्याच वेळीं निकालांत निघाला असता. पण नेहरूंनीं खाजवून खरूज काढावी त्याप्रमाणें 'दार कमिशन' नेमलें. या कमिशननें झोपलेल्या लोकांना हलवून जागें केलें. भाषिक राज्यरचनेच्या प्रश्नाला जोराची चालना मिळाली. निरनिराळ्या भाषिकांच्या कल्पना आणि आकांक्षा प्रक्षुब्ध करून ठेवल्या. अन् एवढें करून शेवटीं दार कमिशननें काय केलें? तर सगळ्यांच्या टाळक्यावर नकाराचें भलें मोठें दांडकें मारलें. भाषिक राज्यानें म्हणे राष्ट्रीय फाटाफूट होईल. देशाचें नुकसान होईल.

दारसाहेबांचा तो अहवाल वाचून लोक अक्षरशः कोलमडले. त्यांना हें कळेना कीं, टिळक, गांधी, नेहरूंसारख्या पुढाऱ्यांनीं ज्या भाषिक तत्त्वाचे पूर्वी पोवाडे गायिले, ज्या भाषिक राज्यांचीं आश्वासनें काँग्रेस एकसारखी पंचवीस वर्षें राष्ट्राला देत होती, तें तत्त्व राष्ट्रघातकी आहे असें हा दीडशहाणा दार एका भल्या सकाळीं उठून साऱ्या

देशाला सांगतो आहे ही काय भानगड आहे? पण खरें सांगायचें म्हणजे ही भाषा दारसाहेबांची थोडीच होती? त्यांच्या तोंडामधून सरदार वल्लभभाई पटेल बोलत होते. तसें नसतें तर दारसाहेबांच्या रिपोर्टांत महाराष्ट्राला शिव्या आल्या नसत्या, कीं संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही पेशवाई पुन्हा स्थापन करण्याची चळवळ आहे म्हणून. दारसाहेबांचें अन् महाराष्ट्राचें वांकडें असण्याचें कांहीं कारण नाहीं. दारसाहेबांच्या रिपोर्टांतील ही मराठी द्वेषाची भाषा वल्लभभाईंची आहे. देशाची भाषिक तत्त्वावर पुनर्रचना झाली तर मुंबई ही महाराष्ट्रामध्यें जाते ही गोष्ट त्यावेळीं एकदम वल्लभभाईंच्या लक्षांत आली. वल्लभभाई हे तर मुंबईतल्या गुजराती भांडवलवाल्यांचे दोस्त आणि कैवारी. त्यांना मुंबई ही महाराष्ट्रांत जाण्याची कल्पना कशी सहन होणार? म्हणून त्यांनीं एकदम बाजूच बदलली आणि भाषिक राज्यामुळें देशाचें वाटोळें होईल असा नवा पांचजन्य दारसाहेबांच्या तोंडून फुंकविला! वल्लभभाईंचे सारे हितसंबंध मुंबईत गुंतलेले असल्यामुळें 'भाषिक राज्य नको' अशी त्यांनीं आरोळी मारल्यानंतर नेहरूंनींहि आपलें मत एकदम बदललें.

वस्तुतः नेहरू मूळचे भाषिक राज्याचे पुरस्कर्ते. पण वल्लभभाईंच्या पुढें नेहरूंचें काय चालणार? तेहि बोलूं लागले कीं, भाषिक राज्यामुळें देशाचे आणखी तुकडे पडतील! भाषिक राज्याची चळवळ ही जोडण्याची चळवळ आहे, तोडण्याची नव्हे. ही गोष्ट बे दुणें चार आणि चार दुणें आठ इतकी स्पष्ट आणि साधी असतां पटेल आणि नेहरू हे जाणून बुजून भाषिक राज्य तत्त्वाची निंदा करून देशांतील कोट्यवधि अडाणी जनतेचा बुद्धिभेद करूं लागले हें इतिहासाला पुढें नमूद करावें लागेल. तेव्हां सांगावयाचा मुख्य मुद्दा हा कीं, मुंबई ही महाराष्ट्रांत जाईल ह्या एका गोष्टीमुळें भाषिक राज्याबाबत सरदार वल्लभभाई पटेल यांच्या दुराग्रहामुळें कॉंग्रेस-श्रेष्ठींनीं जें एकदां धोरण पत्करून ठेवलें आहे, तें इतकीं वर्षे झालीं तरी आहे तसें कायम आहे. दार कमिशननंतर ज. व. प. (म्हणजे जवाहर-वल्लभ-पट्टाभि) समिति या प्रश्नावर नेमण्यांत आली. त्यांत पुन्हां वल्लभभाई होतेच. त्यांनीं भाषिक राज्यावर फेरनिर्णय द्यायचा याला कांहीं अर्थच नव्हता. चोराच्या हातांत जामदारखान्याच्या किल्ल्या! वल्लभभाई त्यावेळीं महागुजरातचीं स्वप्नें रचीत होते. अर्थात् महागुजरातमध्यें मुंबईचा अंतर्भाव होणें शक्यच नव्हतें. म्हणून मुंबईचें स्वतंत्र राज्य करण्याची कल्पना साहजिकच वल्लभभाईंना सुचली. आणि 'ज. व. प. समिती'नेंहि स्वतंत्र मुंबई राज्याची शिफारस केली.

पुण्यामध्यें एका जाहीर व्याख्यानांत त्यावेळीं नेहरू म्हणाले कीं, "भाषिक महाराष्ट्र आज ना उद्यां केव्हांतरी होईलच पण काय वाटेल तें झालें तरी मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रांत होणार नाहीं." मुंबई ही महाराष्ट्रांत कालत्रयीं जाऊं शकणार नाहीं असें एवढ्या पोटतिडिकेनें आणि जीव तोडून नेहरूंना त्यावेळीं बोलण्याचें काय कारण होतें बरें? नेहरूंचें महाराष्ट्राबद्दल चांगलें मत नाहीं ही जगजाहीर गोष्ट आहे. ज्यांना छत्रपति शिवाजी महाराज कळूंच शकले नाहींत त्यांना महाराष्ट्र कसा कळणार? तथापि, मुंबई महाराष्ट्रांत अगदीं जातांच कामा नये याबद्दल एवढा आकस मनांत बाळगण्याचें नेहरूंना कांहींच कारण नव्हतें. पण त्यावेळपर्यंत वल्लभभाईचें विष नेहरूंच्या डोक्यांत पूर्णपणें भिनलें होतें. नेहरूंच्या अंगांत वल्लभभाईच्या भांडवलशाही पक्षपाताचा भरपूर संचार झालेला होता. म्हणून मुंबईबाबत असे महाराष्ट्रविरोधी उद्गार त्यांच्या तोंडून निघाले. पुढें सरदार पटेल गेले! पण भाषिक राज्यांच्या मानगुटीवर आणि विशेषतः मुंबईच्या छाताडावर त्यांचें जें एकदां भूत बसलेलें आहे तें कांहीं केल्या उठत नाहीं. फा. कुं. पा. समितीनें तर मुंबईचा अंतर्भाव पहिल्याछूट संयुक्त महाराष्ट्रांत केलेलाच होता. फाजलअल्लींनीं ही गोष्ट स्वतःच्या तोंडानें हिरे, देव व गाडगीळ ह्यांना सांगितली. पण 'वल्लभभाईचें भूत' एका रात्रीं फाजलअल्लींच्या छातीवर बसल्याबरोबर त्यांनीं रातोरात तें प्रकरण बदलूनच टाकलें. तरी देखील फा. कुं. पा. समितीनें भौगोलिकदृष्ट्या मुंबई ही महाराष्ट्राचीच आहे असें स्वच्छ सांगितलें; एवढेंच नव्हे तर मुंबईचें स्वतंत्र राज्य करणें राष्ट्रहिताचें नाहीं असें सुद्धां आपलें मत दिलें. पण फा. कुं. पा. समितीच्या ह्या म्हणण्याला विचारतो कोण?

मुंबई ही महाराष्ट्रांत घालावयाची नाहीं ही वल्लभभाईच्या भुताची आज्ञा आणि मुंबईचें स्वतंत्र राज्य तर करावयाचें नाहीं ही बिचाऱ्या फा. कुं. पा. समितीची स्वतःची इच्छा! या कुतरओढींतून द्विभाषिक राज्याच्या बांडगुळा-खेरीज दुसरें काय निर्माण होणार? या द्विभाषिक राज्यांत विदर्भ घालण्यांत आला नाहीं हा पुन्हा वल्लभभाईच्या भुताचा खोडसाळपणा. कारण, महाराष्ट्र विदर्भाची मागणी करणार हें त्याला ठाऊक होतें. आणि त्यानें तशी मागणी केली कीं, गुजरातनें त्याला विरोध करावयाचा अन् मग काँग्रेसश्रेष्ठींनीं राजरोसपणें त्या राज्याचे तीन तुकडे करून मुळांत ठरल्याप्रमाणें मुंबई स्वतंत्र करावयाची, हा सगळा डाव अगदीं प्रारंभापासून वल्लभभाईच्या भुतानें जाणूनबुजून रचून

ठेवला होता. तसें झालें. भाषिक राज्यें वाईट म्हणत म्हणत फा. कुं. पा. समितीनें सोळापैकीं चौदा राज्यें भाषिक तत्त्वावर बनविलीं. सर्वांना न्याय दिला. पण महाराष्ट्राच्या बाबतींत मात्र घोर अन्याय केला. ह्याचें कारण महाराष्ट्रासंबंधींचा त्या समितीच्या अहवालामधला सारा भाग सरदार वल्लभभाई पटेलांच्या भुतानें लिहिला आहे. त्याखेरीज असा खुनशीपणाचा, आकसाचा आणि पागलपणाचा निवाडा फा. कुं. पा. समितीमधील विद्वान् आणि विचारवंत सभासदांनीं कसा दिला असता? त्या सबंध अहवालांत महाराष्ट्राच्या बाजूची एक गोष्ट आढळणार नाहीं. तीन कोटी मराठ्यांच्या मागणीमधील एक गोष्ट मान्य करण्यांत आलेली नाहीं. विदर्भ तोडला. बेळगांव कारवार कापले. आणि अशा लुळ्या पांगळ्या केलेल्या महाराष्ट्राच्या मानगुटीवर चुकता गुजरात आणून बसविला. असला सारा पाजीपणा सरदार वल्लभभाई पटेलांच्या भुतावांचून दुसरें कोण करणार?

मुंबई ही महाराष्ट्राची आहे असें सारें जग ओरडून सांगतें आहे. डोंगर, नद्या अन् वीज तशी ग्वाही देत आहेत. मुंबईमध्यें त्रेपन्न चौपन्न टक्के लोक मराठी भाषिक आहेत. मुंबईंत राहणारे लाखो उत्तर भारतीय आणि हजारों मल्याळी लोक देखील म्हणताहेत कीं, मुंबई महाराष्ट्राची आहे. पांच वर्षांनंतर दोन-तृतीयांश. मत झालें तर मुंबईंत महाराष्ट्रांत घाला असें काँग्रेसश्रेष्ठी देखील आतां कबूल करताहेत. स्वतंत्र मुंबई राज्य झालें तर.मुंबईतील व्यापाराचें नि उद्योगधंद्यांचें वाटोळें झालेंच म्हणून समजा असें डॉ. जॉन मथाईसुद्धां बजावून सांगताहेत. असें असूनहि मुंबईचा समावेश महाराष्ट्रामध्यें न करण्याचा काँग्रेसश्रेष्ठींचा दुराग्रह कां? नेहरूंसारख्यांना एवढी साधी गोष्ट उमजू नये एवढे का ते मतिमंद आहेत? मुंबई ही महाराष्ट्राची आहे असें तीन कोटी मराठी माणसें ओरडून म्हणत आहेत, मुंबईंत राहणारीं चौदा लाख मराठी माणसें जीव तोडून सांगत आहेत. तरी देखील त्यांचें म्हणणें नेहरूंना पटत नाहीं? मुंबईमध्यें पांच लाख गुजराती राहत आहेत. त्यांनीं कधींहि जाहीर सभा भरवून स्वतंत्र मुंबईची मागणी केलेली नाहीं. ही मागणी मोरारजी देसाई आणि सदोबा पाटील हे सरदार वल्लभभाई पटेल यांचे दोन वेताळ अन् मूठभर गुजराती भांडवलवाले यांची आहे. लक्षावधि मराठी लोकांच्या आक्रोशाकडे दुर्लक्ष करून पं. नेहरू हे भांडवलवाल्यांचे एजंट जे मेसर्स मोरारजी अँड सदोबा त्यांचें म्हणणें ऐकतात आणि मुंबई त्यांना खुशाल देऊन टाकतात ह्याला काय म्हणावें? नेहरू हे न्यायी, निःपक्षपाती आणि

उदार स्वभावाचे गृहस्थ आहेत असें ज्या खुशमस्कऱ्यांना आणि स्तुतिपाठकांना म्हणावयाचें असेल त्यांनीं खुशाल म्हणावें. आम्ही तसें म्हणूं शकणार नाहीं. पोट्टी श्रीरामलु यांनीं भाषिक आंध्रासाठीं प्राणांतिक उपोषण करून आत्मबलिदान केलें आणि मग मागाहून नेहरू यांनीं भाषिक आंध्र दिल्याचें जाहीर केलें. तथापि, तसें करतांना पोट्टी श्रीरामलूंचा एका शब्दानें त्यांनीं गौरव केला नाहीं. उलट ते म्हणाले, "पोट्टी श्रीरामलू मेले म्हणून आम्ही भाषिक आंध्र देत नाहीं, आम्हीं आधींच तो द्यायचें ठरविलें होतें!"

अरेरे, अशी हीन भावना नेहरूंसारख्यांनीं प्रकट करावी ह्याचें आम्हांस सर्वांत वाईट वाटतें. अशा माणसाकडून आम्हीं न्यायाची अपेक्षा कशी करावी? कदाचित् इतरांना नेहरू चांगले असतील. पण त्यांच्या चांगुलपणाचा अनुभव अजून महाराष्ट्राला कांहीं आलेला नाहीं. आणि आतां तर महाराष्ट्राच्या बाबतींत त्यांनीं भयंकरच अन्याय करून ठेवला आहे. कारण वल्लभभाईंचें भूत त्यांच्या देखील मानगुटीवर बसलेलें आहे, आणि तेंच त्यांच्या हातून महाराष्ट्राचा असा छळ करतें आहे. महाराष्ट्राविरुद्ध वल्लभभाईंचा आकस फार भयंकर होता. ते जिवंत होते तेव्हांपासून मराठी माणसांना हातीं धरून त्यांच्या हातून महाराष्ट्राला मारण्याचा डाव त्यांनीं रचला होता. बाळासाहेब खेर आणि सदोबा पाटील या दोन महाराष्ट्रद्रोही माणसांच्या हातून वल्लभभाईंनीं महाराष्ट्राच्या नरड्याला नख लावलें. शिवाजीमहाराज व लोकमान्य टिळक हे राष्ट्रपुरुषाच्या चौकटींत बसत नाहींत असे अधमपणाचे उद्गार काढण्याचें धारिष्ट केवळ वल्लभभाईंच्या प्रेरणेमुळें बाळासाहेब खेरांना झालें. अरेरे, त्याच वेळीं त्या बाळासाहेब खेराची जीभ झडून कां बरें गली नाहीं? बेळगांव कर्नाटकांत घालण्याचें कारस्थान सुद्धां बाळासाहेब खेरांचेंच! त्यांनीं बेळगांवचें राणी पार्वतीदेवी कॉलेज पुणें विश्वविद्यालयाला जोडून न देतां कर्नाटक विश्वविद्यालयाला जोडण्याची जबरदस्ती केली. महाराष्ट्राचा एवढा द्रोह करणाऱ्या या बाळासाहेब खेराचा सुखानें शेवट कसा होईल बरें? सदोबा पाटलाच्या आयुष्याची अखेर तर कशी होणार याची आम्हांला कल्पनाच करतां येत नाहीं. स्वार्थाच्या मोहानें आणि सत्तेच्या लालसेनें ह्या सदोबानें आपली 'आई' जी मुंबई ती भांडवलवाल्यांना विकली! अक्षरशः विकली! असल्या 'मातृगमनी' माणसाला परमेश्वर कसा क्षमा करील बरें?

मुंबईच्या मानगुटीवर बसलेलें 'वल्लभभाईचें भूत' अक्षरशः गाडल्यावांचून मुंबई ही महाराष्ट्राला मिळणार नाहीं ही काळ्या दगडावरची रेघ आहे. वल्लभभाईचें भूत

गाडणें हें कांहीं सामान्य माणसाचें काम नाहीं. त्याला जबरदस्त पंचाक्षरी हवा. शंकरराव देव हे पंचा नेसतात. तेव्हां ते ह्या पंचाक्षऱ्याचें काम करूं शकतील असें सर्वांना वाटलें. आम्हांलाहि तसेंच वाटलें. म्हणून 'संयुक्त महाराष्ट्र परिषदे'नें जेव्हां त्यांना सर्वाधिकार दिले तेव्हां त्यांचा आम्हीं पुरस्कार केला. पण मुंबईचें राज्य वेगळें करण्याचा निर्णय कॉंग्रेसश्रेष्ठींनीं दिल्यानंतर ज्या प्रखर आणि त्वरित मार्गदर्शनाची अपेक्षा महाराष्ट्रानें शंकररावांपासून केली तें त्यांच्याकडून अजून मिळालेलें नाहीं. गेल्या दहा दिवसांत मुंबईमधील मराठी जनतेमध्यें प्रक्षोभ माजून राहिला आहे! असा प्रक्षोभ स्वातंत्र्याच्या लढ्याच्या वेळीं देखील आम्हांला पाहावयास मिळालेला नाहीं. रोज मराठी माणसांच्या केवढ्या प्रचंड सभा मुंबईभर भरत आहेत. मुंबई-सह संयुक्त महाराष्ट्राची मागणी करणाऱ्या या सभांना आणि परिषदांना तर गेल्या आठवड्यांत महापूरच आला होता. सर्वांनीं मुंबई विधान सभेवर प्रचंड मोर्चा नेण्याची प्रतिज्ञा केली. पण या काळांत शंकरराव मात्र आपल्या तोंडाला अक्षरशः कुलूप लावून बसलेले होते. उलट 'संप करूं नका, मोर्चा नेऊं नका, नाहीं तर आपल्या कार्याचा घात होईल' असा ते उपदेश करीत सुटले.

संपाचा विचार आपल्या सांगण्यामुळें डाव्या पक्षांनीं सोडून दिला अशी जेव्हां धादांत खोटी थाप त्यांनीं उठवली तेव्हां मात्र आम्हांला त्यांची चीड आली. कारण संपाचें शस्त्र इतक्यांत उपसावयाचें नाहीं असें स्वतःच्या बुद्धीनें आणि धोरणानें ट्रेड युनियनच्या पुढाऱ्यांनीं अगोदरच ठरविलें होतें. त्या निर्णयाशीं शंकररावांचा कांहींच संबंध नव्हता. शिवाजी पार्कवर शंकरराव देवांच्या सभेला लाखीं लोक जमले याचा अर्थ हे लाखों लोक आपण सांगूं ते ऐकतील असा समज शंकररावांनीं केलेला दिसतो आहे. तसें असेल तर तो त्यांचा गैरसमज आहे. पूर्वीं शंकररावांच्या सभेला मुंबईत शंभर माणसेंसुद्धां जमत नव्हतीं. दीड लाख माणसें शंकररावांच्या सभेला जमलीं तीं शंकररावांसाठीं नव्हे. महाराष्ट्रावर झालेल्या अन्यायाला ते वाचा फोडतील अन् महाराष्ट्राला न्याय मिळवून देतील या एका श्रद्धेनें. पण भरंवशाच्या म्हशीला टोणगा व्हावा त्याप्रमाणें लोकप्रक्षोभाला प्रभावी नेतृत्व देण्याऐवजीं शंकरराव त्याला आपल्या पंचाचें धरण घालण्याचा हास्यास्पद प्रयत्न करूं लागले. त्याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. मोर्चा काढूं नका हा शंकररावांचा उपदेश लोकांनीं धाब्यावर बसविला. शंकररावांनीं आपल्या आयुष्यांतील एक महान् संधि गमावली असेंच आम्हांला वाटतें.

मुंबईचा गळा कापून सदोबा पाटील दिल्लीहून परत मुंबईला आले त्याच दिवशीं शंकरराव देव त्यांना भेटले. उभयतांच्या त्या भेटीबद्दल वार्ताहरांना मुलाखत देतांना सदोबा म्हणाले, "देव आणि मी पुष्कळ जवळ आलों आहोंत!" तें वाचून आम्हांला प्रथम धक्का बसला. दानव आणि देव ज्याअर्थी जवळ येत चालले त्या अर्थी आपण मानवांनीं आतां त्यांच्यापासून पळूनच जावयाला हवें, नाहीं का? महाराष्ट्र कॉंग्रेसचे अध्यक्ष देवगिरीकर तर सदोबांची तोंड भरून स्तुति करूं लागले. ते म्हणाले, "सदोबांसारखा व्यवहारचतुर आणि संघटनाकुशल माणूसच नाहीं!" स्वतंत्र मुंबई झाल्यावर मोरारजीभाईंनाहि अतिशय दुःख झाल्याचा देवगिरीकर निर्वाळा देऊं लागले. महाराष्ट्रापासून मुंबई तोडण्याचें सर्व पातक ज्या दोघांनीं केलें त्या मोरारजी आणि सदोबांबद्दल देव-देवगिरीकरांना जेव्हां प्रेमाचा प्रचंड उमाळा आलेला आम्हांला दिसला, त्याचवेळीं आम्ही स्वतःशीं म्हणालों कीं, "अरे, महाराष्ट्राला ज्या तऱ्हेचीं खंबीर माणसें आज पाहिजे आहेत तीं हीं नव्हेत रे हीं नव्हेत!" महाराष्ट्राचा इतिहास, पराक्रम, स्वाभिमान आणि शौर्य यांच्या तेजस्वी परंपरा ज्याच्या रोमारोमांत भिनलेल्या आहेत तोच पुढारी या आणीबाणीच्या संकटांतून महाराष्ट्राचा बचाव करूं शकेल! तें पुढारीपण शंकररावांत आहे काय? आम्हांला प्रारंभीं वाटलें, असेल म्हणून. पण आतां आमची निराशा झाली. शंकररावामध्यें दुसरे पुष्कळ गुण आहेत. पण 'तें नाहीं ग तें नाहीं!'

गगनाला गवसण्या घालणारे काका गाडगीळ देखील शंकरराव देवांप्रमाणें गेला आठवडाभर मूग गिळून गुपचूप बसले आहेत. आपलीं शस्त्रें आपण शमीच्या झाडावर ठेवल्याच्या ते गर्जना करीत होते. त्या शस्त्रांचें काय झालें? का तीं शस्त्रें त्यांनीं यमीच्या परकरांत दडवून ठेवलीं आहेत? सारांश, महाराष्ट्रांतल्या कॉंग्रेसवाल्यांकडून प्रभावी नेतृत्वाची अपेक्षा करण्यांत यापुढें अर्थ नाहीं. देवगिरीकर म्हणतात, कॉंग्रेस श्रेष्ठींनीं मुंबईबाबत दिलेला निर्णय अखेरचा नाहीं. कॉंग्रेसचे अध्यक्ष ढेबर म्हणतात, तो निर्णय अखेरचा आहे. याचा अर्थ हा कीं, महाराष्ट्र कॉंग्रेसनें काय वाटेल तें ठरविलें तरी कॉंग्रेसश्रेष्ठी मुंबईबाबतचा आपला निर्णय बदलणार नाहींत. हें लक्षांत घेऊनच कीं काय महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस समितीनें दोन दिवस डोकें खाजखाजवून एक अत्यंत बुळबुळीत, पुळपुळीत आणि गुळमुळीत ठराव केला आहे. तो इतक्यांतच आमच्या हातीं पडत आहे. तो

वाचून आम्हांला हसावें कीं रडावें हेंच कळत नाहीं. महाराष्ट्राचा प्राण जी मुंबई ती त्याच्यापासून काँग्रेसश्रेष्ठींनीं तोडून काढला याबद्दल महाराष्ट्र काँग्रेस समितीनें निषेधाचें एक अक्षर देखील उच्चारलें नाहीं. उलट काँग्रेसश्रेष्ठींच्या डोक्यावर स्तुतीचीं जेवढीं फुलें म्हणून त्यांना उधळायचीं होतीं तेवढीं त्यांनीं उधळून टाकलीं आहेत. एवढें झाल्यानंतर शिल्लक काय राहिलें, तर महाराष्ट्रांत मुंबईचा समावेश होऊं नये असें ज्यांना वाटतें त्यांची मनधरणी करून त्यांचा हृदयपालट करीत बसणें. हा काय ठराव आहे? हा डराव आहे.

महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस कमिटीमधील सगळीं मराठी माणसें इतकीं भ्याड अन् भागूबाई असतील अशी आम्हांला कल्पना नव्हती. आम्हांला तर त्याची लाज वाटते. आतां उद्यांपासून महाराष्ट्र काँग्रेसवाले मुंबईत मुक्काम ठोकून गुजराती भांडवलवाल्यांच्या नि गिरणीवाल्यांच्या घरोघर जाऊन त्यांचें हृदय-परिवर्तन करण्याची मोहीम काढतील. अन् मग शंकरराव काय करणार? ते कदाचित् सदोबा पाटलांच्या किंवा मोरारजी देसायांच्या घरासमोर बसून प्राणांतिक उपोषण आरंभतील एवढेंच. दुसरें काय? ह्या सगळ्यांत मौजेची गोष्ट ही कीं ज्यांनीं मुंबईची फाळणी केली ते काँग्रेसश्रेष्ठी सपशेल निर्दोषी म्हणून ह्यांतून सहीसलामत सुटत आहेत. म्हणजे यापुढें आतां त्यांना कोणी त्रास द्यायला नको. "तुम्ही मुंबईतील मराठी माणसें अन् भांडवलवाले, एकमेकांच्या उरावर बसा नाहीं तर काय वाटेल तें करा. आम्हांला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं!" असें ते आतां समाधानाचा सुस्कारा टाकून म्हणतील. मुंबईच्या प्रश्नावर महाराष्ट्र काँग्रेसचे मंत्री राजीनामा देतील अन् काँग्रेसश्रेष्ठींना धारेवर धरून मुंबईचा समावेश महाराष्ट्रामध्यें करण्यास भाग पाडतील अशी जी पूर्वी दाट आवई उठली होती ती आतां सपशेल खोटी ठरली आहे. तें धैर्य, तो त्याग, तो अभिमान आपल्यामध्यें नाहीं ही गोष्ट महाराष्ट्रीय काँग्रेसवाल्यांनीं आतां सिद्ध केलेली आहे. मुंबई मेली अन् महाराष्ट्र तडफडला तर त्याची त्यांना किंमत नाहीं. त्यांना आपली चमडी बचावायची आहे. शंकरराव देव आणि महाराष्ट्र काँग्रेसवाले यांच्याकडून यापुढें कोणत्याहि नेतृत्वाची आशा महाराष्ट्रानें करूं नये. कारण महाराष्ट्राच्या छाताडावर नाचणारें वल्लभभाईंचें भूत गाडण्याचें पौरुष त्यांच्यांत नाहीं. म्हणूनच आम्ही पुन्हा म्हणतों कीं ह्या मराठी काँग्रेसवाल्यांजवळ दुसरे कांहींहि गुण असले तरी "तें नाहीं ग तें नाहीं!"

२०-११-१९५५

# हत्याकांडाचा प्रारंभ

कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें शिफारसलेल्या त्रिराज्य योजनेला पाठिंबा देण्याचा ठराव गेल्या अठरा तारखेला मुख्य मंत्री मोरारजी देसाई ह्यांनीं मुंबईच्या विधान सभेंत आणला असतांना मुंबईतील बहुसंख्य मराठी जनतेचें मत त्यांना कळविण्यासाठीं एक प्रचंड मोर्चा नेण्याचें मुंबईमधील 'संयुक्त महाराष्ट्र कृतिसमिती'नें ठरविलें. ह्या मोर्चाचें नेतृत्व सेनापति बापटांसारख्या प्रातःस्मरणीय महापुरुषाकडे असल्यानें तो किती शांततापूर्ण आणि शिस्तशीर रीतीनें नेला जाईल हें सांगण्याचीहि आवश्यकता नव्हती. संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या छातीवर गेले दीड महिना मोरारजी बंदुका रोखून असतांनाहि आणि त्यांना चिडविण्याचा सरकारच्या आणि भांडवलवाल्यांच्या बगलबच्च्यांनीं नानातऱ्हेनें प्रयत्न केला असतांहि, संयुक्त-महाराष्ट्रवाद्यांनीं यत्किंचित्‌हि कुठें संयम सोडल्याचें उदाहरण कोणाला दाखवून देतां येणार नाहीं. म्हणून विधान सभेवरील मोर्चांत भयंकर कांहींतरी अत्याचार होतील आणि मोर्चेवाले विधानसभेचा ताबा घेऊन आपल्याला तेथून हाकलून देतील अशा अवास्तव आणि भडक कल्पना करून घेण्याचें मोरारजींना कारण नव्हतें. पण राज्यपुनर्रचना समितीचा अहवाल प्रसिद्ध होण्याच्या अगोदरपासूनच संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना नेस्तनाबूद करण्याचा मोरारजींनीं विडा उचलला आहे ही गोष्ट जगजाहीर आहे. ऑक्टोबर महिन्याच्या प्रारंभापासून मोरारजींचा मुळीं अवतारच बदलला आहे. हिटलर, मुसोलिनी किंवा सालाझार ह्यांचाच जणुं कांहीं संचार त्यांच्या अंगांत झालेला आहे.

मुंबई राज्याचें पर्यवसान त्यांनीं काळ्याकुट्ट 'पोलिसीराज्यां'त करून टाकलें आहे. अशा परिस्थितींत संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या शांततामय मोर्चाला विधान सभेपर्यंत मोरारजी येऊं देतील हें मुळीं शक्यच नव्हतें. नाना तऱ्हेचे बंदी हुकूम लादून आणि हजारों शस्त्रधारी पोलिसांचा भोंवती चक्रव्यूह उभा करून मुंबईच्या फोर्ट विभागाला मोरारजींनीं एकाद्या लष्करी छावणीचें स्वरूप देऊन टाकलें. तेव्हां

संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना सत्याग्रह करण्यावांचून गत्यंतरच उरलें नाहीं. पोलिसांच्या लाठ्यांना आणि अश्रुधुराला न जुमानतां आम्ही साडेचारशें सत्याग्रहींनीं मोरारजींच्या जुलमी कायद्यांचा अठरा तारखेला चेंदामेंदा करून टाकला. संयुक्तमहाराष्ट्र-वाद्यांना मारायला मोरारजींनीं मुद्दाम कच्छ आणि सौराष्ट्रचे 'होमगार्ड' आणवले होते. त्यांनीं आमच्यापैकीं कांहीं सत्याग्रह्यांना मारून रक्तबंबाळ केलें. तरी त्या दिवशींचीं सर्व निदर्शनें अत्यंत शांततामय झालीं. कोणत्याहि तऱ्हेचा अत्याचार शहरांत कोठेंहि घडला नाहीं. मुंबईमधील संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांचा अठरा तारखेला हा जो प्रचंड विजय झाला त्यानें मोरारजींच्या अंगाचा साहजिकच भडका उडाला. त्या भडक्यांत वीस तारखेला चौपाटीवर मुंबईच्या जनतेनें मोरारजी आणि सदोबा ह्या संयुक्त महाराष्ट्राच्या दोन दुष्मानांचा जो 'कॉस्मॉपॉलिटन' सत्कार केला त्यानें पेट्रोल ओतलें गेलें. त्यामुळें मोरारजींच्या सर्वांगाचा अगदीं जळफळाट झाला. म्हणून एकवीस तारखेला संयुक्त महाराष्ट्र कृतिसमितीनें आदेशिलेला आम मुंबईचा संप हाणून पाडून संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांवर राक्षसी सूड उगवण्याचें मोरारजींनीं ठरविलें.

ज्या फ्लोराफाउंटनच्या मैदानापासून त्या दिवशीं सत्याग्रही मोर्चा निघणार होता त्या ठिकाणीं आम्ही अकरा वाजेपासून साडेतीन वाजेपर्यंत वावरत होतों आणि सर्व गोष्टींचें अत्यंत बारकाईनें निरीक्षण करीत होतों. मुंबई युनिव्हर्सिटीसमोर बंदूकधारी पोलिसांची एक अखंड फळी उभी करण्यांत आली होती. साडेबाराच्या सुमारास कोटांतील निरनिराळ्या कचेऱ्यांतले लोकांचे थवेच्या थवे रस्त्याभोंवतीं जमा झाले. क्षणाक्षणाला ही गर्दी एकसारखी वाढत होती. त्यामध्यें केवळ मराठीच माणसें नव्हतीं. सर्व धर्मांचीं नि भाषेचीं माणसें होतीं. फ्लोराफाउंटनवर नजर लावून हजारों लोक शांतपणें उभे होते. एकच्या सुमारास सत्याग्रहाला जेव्हां प्रारंभ झाला, तेव्हां कांहीं मराठी माणसें 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या घोषणा करूं लागलीं. यापेक्षां कोणींहि कांहीं केलें नाहीं. त्यानें चिडून जाऊन पोलिसांनीं आणि होमगार्डांनीं ठिकठिकाणच्या कोपऱ्यांतील जमावावर दंडुक्यांनीं आणि लाठ्यांनीं हल्ला चढविला. तरी गर्दी हटेना. तेव्हां मग पोलिसांनीं अश्रुधुराचीं नळकांडीं फोडावयास सुरवात केली. हा अश्रुधूर नेहमींपेक्षां निराळा होता. त्याचा रंग पिवळा नि तांबडा होता. अश्रुधुराचे लोट जेव्हां निघूं लागले तेव्हां जमावाची पांगापांग होई. पण पुन्हा लोक आपापल्या जागीं येऊन उभे राहत. अश्रुधुराच्या पंचवीस नळकांड्यांचे बार

मीं स्वतः मोजले. शांतपणें उभ्या असलेल्या प्रचंड जनसमुदायावर कांहीं कारण नसतांना पोलिसांनीं लाठ्यांचे नि अश्रुधुराचे हल्ले चढवून आपल्या अत्याचारी प्रयत्नाची शिकस्त केली.

ही परिस्थिति क्षणाक्षणाला पोलीस अधिकारी मोरारजींना कळवीतच असले पाहिजेत. हें होतां होतां दोन-सव्वादोनचा सुमार झाला. सत्याग्रह्यांची संख्या त्या दिवशीं तशी फारच कमी होती. गर्दीतल्या वाटेल त्या लोकांना होमगार्ड आणि पोलीस पकडून नेत होते. तोंपर्यंत पोलिसांच्या अंगावर एखाददुसराच दगड किंवा चप्पल कोणीं भिरकावली असेल. पण गुंडगिरीचा एकहि प्रकार तेथें झाला नाहीं. कारण, सर्व जनसमुदाय सुशिक्षित आणि सुसंस्कृत नोकरमंडळीचा होता. तेथें गुंड आणि मवाली येणार कोठून? गर्दी जेव्हां हटेना, लाठ्याकाठ्यांना आणि अश्रुधुराला दाद देईना, उलट गर्दी अधिकाधिकच वाढूं लागली, तेव्हां पोलिसांनीं आणि होमगार्डांनीं बंदुकीच्या फैरी झाडावयाला सुरुवात केली. दूरदूरचीं माणसें जशीं गोळ्या लागून पडूं लागलीं तशी गर्दी अर्थातच पांगली. त्यानंतर दोन बसेसना आगी लावण्यांत आलेल्या आम्हांला लांबून दिसल्या. बसला आग लागल्यानंतर पोलिसांनीं गोळीबार केला हें सरकारी पत्रकांतील विधान साफ खोटें आहे. पोलिसांनीं गोळीबार करून माणसें मारल्यानंतर मग चिडून जाऊन कांहीं माणसांनीं बसेस जाळल्या ही खरी वस्तुस्थिति आहे. जनसमुदायावर गोळीबार करण्याचें पोलिसांना कांहीं कारण नव्हतें. कोणाहि पोलिसाचे प्राण धोक्यांत नव्हते. गोळीबारहि जो केला तो इतक्या मूर्खपणानें किंवा अडाणीपणानें करण्यांत आला कीं, भलत्यांनाच गोळ्या लागल्या. एकजण आपल्या ऑफिसच्या दारांत बसला होता. तेथें त्याला गोळी लागली. दुसरा तर तार ऑफिसच्या कंपाउंडच्या आंत उभा होता. तो गोळी लागून मेला. सुपारीबाग रोडवर आपल्या घराच्या गॅलरींत उभी असलेली मीनाक्षी नांवाची बारा वर्षांची मुलगी गोळी लागून मेली. ह्यावरून गोळीबार करणारे पोलीस काय लायकीचे होते हें दिसतें आहे. एकवीस तारखेच्या ह्या गोळीबारांत मोरारजीच्या पोलिसांनीं व होमगार्डांनीं एकंदर पंधरा निरपराधी माणसें ठार मारलीं. यांचा कसल्याहि गुंडगिरीशीं वा अत्याचाराशीं संबंध नव्हता. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीमधलींसुद्धां हीं माणसें नव्हतीं! सं. म. वाद्यांवर सूड उगविण्याच्या आकसानें आणि खुनशीपणानें ह्या निरपराधी पंधरा माणसांचा मोरारजींनीं बळी घेतला आहे असें आम्ही छातीठोकपणें म्हणतों. या पंधरा माणसांचें

रक्त मोरारजीच्या हाताला लागलें आहे. गोव्याच्या स्वातंत्र्यसंग्रामांतील निःशस्त्र सत्याग्रह्यांची कत्तल करणारा सालाझार आणि संयुक्तमहाराष्ट्रवादी सत्याग्रहाच्या निमित्तानें पंधरा माणसांचे प्राण घेणारा मोरारजी ह्या दोघांमध्यें आम्हांस कांहींहि फरक दिसत नाहीं. मुंबईच्या मुख्य प्रधानाच्या गादीवर असा खुनी माणूस एक क्षणभरहि यापुढें बसतां कामा नये. मुंबई राज्यांतील साऱ्या जनतेनें एकमुखानें मोरारजींच्या राजिनाम्याची मागणी केली पाहिजे !

मोरारजींनीं हे अत्याचार केले नसते तर संपूर्णतया यशस्वी झालेल्या एकवीस तारखेच्या संपाला इतर अत्याचारांचा डाग कदापि लागला नसता. त्या दिवशीं सार्वजनिक वाहनांवर कित्येक ठिकाणीं दगडफेक झाली. रस्त्यावरचे दिवे फोडण्यांत आले. एकदोन चौक्या जाळण्यांत आल्या. असे कित्येक अनिष्ट प्रकार झाले. त्यांचें कोणीहि समर्थन करणार नाहीं. पण याला जबाबदार कोण ? स्वातंत्र्यपूर्व काळांत कॉंग्रेसनें पूर्वी जेव्हां जेव्हां संप पुकारले तेव्हां तेव्हां असेच अत्याचार घडलेले आहेत. हें सर्व शिक्षण कॉंग्रेसवाल्यांनींच जनतेला दिलें आहे. म्हणून आतां या अत्याचारांचें खापर संयुक्त महाराष्ट्रवाद्यांच्या डोक्यावर फोडण्याचें कारण नाहीं. स्वातंत्र्याच्या चळवळींत आपण काय काय अत्याचार केले हें कॉंग्रेसवाले आतां विसरून गेले असले, तरी दुसरे विसरले नाहींत. जनतेचे न्याय्य हक्क आणि आकांक्षा जेव्हां जाणूनबुजून दडपल्या जातात, अन् सत्तेच्या नि कायद्याच्या जोरावर जनतेची जेव्हां मुस्कटदाबी केली जाते, तेव्हां कोणीं कितीहि काळजी घेतली तरी अत्याचार होणें अपरिहार्य असतें. त्याची जबाबदारी जनतेपेक्षां जनतेची छळणूक करणाऱ्या सरकारावर असते. सर्व भारतांत कोणावर अन्याय झालेला नाहीं एवढा महाराष्ट्रावर झालेला आहे; आणि या अन्यायानें झालेल्या अनंत जखमांमध्यें जुलमाचें मीठ आणि दडपशाहीचें तिखट ओतण्याचा मोरारजींनीं आणि सदोबासारख्या भांडवलशाहीच्या बगलबच्यांनीं सपाटा चालवला आहे. एवढें असूनहि महाराष्ट्र अत्यंत शांत आहे. अत्यंत थंड आहे. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ तर प्रारंभापासून शांततेच्या नि अनत्याचाराच्या मार्गानें चाललेली आहे. या चळवळीचे नेते आपल्या प्रत्येक भाषणांत आणि निवेदनांत जनतेला शांत आणि शिस्तबद्ध राहण्याचा उपदेश करीत असतात. अत्याचाराला उत्तेजन मिळेल असें वर्तन किंवा भाषण कोणत्याहि संयुक्तमहाराष्ट्रवाद्यानें केलें असल्यास सरकारनें तें दाखवून द्यावें. जनतेचें कोणतेंच म्हणणें जेव्हां सरकार ऐकत नाहीं

तेव्हां मोर्चा काढून किंवा संप पुकारून आपलें गाऱ्हाणें वेशीवर टांगणें हें कायद्याला नि लोकशाहीला धरून आहे. जनतेच्या हक्काची जर सरकार बेगुमानपणें पायमल्ली करूं लागलें आणि शांततामय सत्याग्रही मोर्चावर जर लाठ्या-अश्रुधूर आणि गोळ्या बेधडक झाडूं लागले तर सर्वसामान्य जनतेपैकीं कोणाचा तोल सुटून त्याच्या हातून जर अत्याचारी कृत्यें घडलीं तर त्याचा दोष त्या चळवळीकडे कसा येतो? जनता बोलूनचालून निःशस्त्र. तिच्या हातांत शस्त्रें काय? फार झालें तर दगड, जोडे आणि काड्याच्या पेट्या! पण सरकारच्या हातांत तर बंदुका, लाठ्या आणि अश्रुधूर आहे ना?

एकवीस तारखेला कांहीं लोकांनीं बसेस जाळल्या, दिवे फोडले किंवा दगड मारले. पण कोणाचा प्राण तर घेतलेला नाहीं, किंवा घेण्याचा प्रयत्न सुद्धां केला नाहीं. एकहि पोलीस दगावला नाहीं. पण मोरारजींनीं पंधरा माणसें--चांगलीं रक्तामांसाचीं जिवंत पंधरा माणसें--ठार केलीं ना? जाळलेली बस पुन्हा बांधतां येईल. फुटलेला दिवा पुन्हा बसवतां येईल. पण गेलेले प्राण पुन्हा कसे परत येतील? ज्यांनीं मालमत्तेविरुद्ध गुन्हे केले असतील त्यांना शिक्षा देतां येईल. पांच वर्षांची देतां येईल--दहा वर्षांची देतां येईल! पण ज्यांनीं पंधरा माणसांना ठार मारलें त्यांना फासावर कोण चढवणार आणि किती वेळां चढवणार? कायद्याच्या आणि सुव्यवस्थेच्या नांवावर मंत्रिपदावर बसून केलेले खून काय क्षम्य असतात? अन् एखाद्यानें बस जाळली किंवा दगड मारला तर त्याच्या पाठींत मात्र सर्वांनीं काठ्या चालवयाच्या काय? हें सर्व ढोंग आहे. काय वाटेल तें झालें तरी युद्ध पुकारायचें नाहीं (No War!) हें परराष्ट्रांशीं जसें पं. नेहरूंचें धोरण आहे, त्याप्रमाणें काय वाटेल तें झालें तरी जनतेवर बंदूक झाडायची नाहीं (No Firing) या धोरणाचा आग्रह पं. नेहरू स्वराष्ट्रामध्यें कां धरीत नाहींत! गांधी, सत्य, अहिंसा, अशोकचक्र हीं बिरुदें गळ्यांत धारण करणाऱ्या सोवळ्या राज्यकर्त्यांनीं बंदूक हातांत धरावी हें सगळ्यांत मोठें पावित्र्यविडंबन आहे. म्हणून एकवीस तारखेला जनतेच्या हातून संतापाच्या भरांत कांहीं अत्याचार घडलेले असतील त्यापेक्षां मोरारजींनीं पोलिसांच्या करवीं करविलेले पंधरा खून आम्हांस अधिक तिरस्करणीय वाटतात. काँग्रेस राज्यकर्ते स्वतःला जनतेचे प्रतिनिधि म्हणवतात, पण जनतेचा आवाज कांहीं त्यांना ऐकूं येत नाहीं. लोकांना जें हवें, तें न देणें किंवा दिलें तर लोकांचा प्राण गेल्यानंतर देणें हें काँग्रेस राज्यकर्त्यांचें धोरण अगदीं ठरून गेलेलें

आहे. प्राणांतिक उपोषण करून पोट्टी श्रीरामलु मेल्यानंतर आणि त्यामुळें संतापलेल्या जनतेनें अत्याचार करून कोट्यवधि रुपयांचें नुकसान केल्यानंतर मग नेहरूंनीं 'भाषिक आंध्र' दिल्याची घोषणा केली! त्याच चालीवर अनेकांचे जेव्हां प्राण जातील अन् कोट्यवधि रुपयांचें जेव्हां वाटोळें होईल तेव्हांच मुंबई महाराष्ट्राला दिल्याचें जाहीर करण्याचें नेहरूंनीं ठरविलें आहे कीं काय?

मुंबईमध्यें मराठी जनता बहुसंख्याक आहे आणि मुंबईचें राज्य स्वतंत्र करण्याच्या कल्पनेला ह्या जनतेचा कट्टर विरोध आहे ही गोष्ट जाहीर असतांना त्रिराज्य निर्मितीला पाठिंबा देण्यासाठीं मोरारजींना चौपाटीवर जाहीर सभा भरविण्याचा चांबडेपणा करावयाला कोणीं सांगितला होता? आणि या सभेला अध्यक्ष कोण तर प्रत्येक मराठी माणूस ज्याचा विषासारखा तिरस्कार करतो तो सदोबा सूर्याजी पिसाळ! मोरारजी मुख्य प्रधान असले अन् हजारों पोलिसांचें रक्षण असलें म्हणून बहुसंख्य लोकांना जें आवडत नाहीं तें जाहीरपणें त्यांनीं बोलावें कीं काय? अन् लोकांनीं तें शांतपणानें ऐकून घ्यावें कीं काय? मोरारजींच्या या सभेला जे दोन लाख लोक जमले होते, ते बहुसंख्य मराठी होते. या लोकांनीं मोरारजींचें भाषण शांतपणें ऐकून घेतलें असतें, तर स्वतंत्र मुंबईराज्याला जनतेचा पाठिंबा आहे असाच मोरारजींनीं जगभर डांगोरा पिटला असता. आपल्या सभेला बहुसंख्य लोक मराठीच येतील हें मोरारजींना चांगलें माहीत होतें. म्हणूनच त्यांना चिडवण्यासाठीं त्यांनीं सदोबा पिसाळांना अध्यक्षस्थान दिलें. आपले विचार मराठी लोकांनीं शांतपणें एकदां ऐकून घ्यावेत असें मोरारजींना जर प्रामाणिकपणानें वाटलें असतें तर त्यांनीं शंकरराव देव किंवा देवगिरीकर यांच्यासारख्यांना त्या सभेचें अध्यक्षस्थान दिलें असतें. पण मोरारजींच्या डोक्यांत सत्तेची आणि शहाणपणाची नेहमीं धुंदी चढलेली असते ना? ते लोकांची थोडीच परवा करणार!

सदोबा पिसाळ आणि अन् त्यांचे बॉडीगार्ड दादा बोरकर ही दुक्कल व्यासपीठावर पाहतांच लोक एकदम उसळले. सबंध जन्म सार्वजनिक आयुष्यांत काढून जाहीर सभेंत कसें बोलावें याची सामान्य अक्कल सदोबांना नसावी याचें आम्हांस आश्चर्य वाटतें. श्रोत्यांना त्यांच्या तोंडावर शिवीगाळ केल्यानंतर ते तुम्हांला जोडे मारतील नाहीं तर काय करतील! तोंडाचा संडास करून सदोबांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत मराठी माणसांवर गलिच्छ अपशब्दांचा अगदीं वर्षाव केला. "मराठी माणसांना अक्कल नाहीं. ते बेअकली आहेत. राज्य करण्याची

त्यांची लायकी नाहीं. तुमचा विदर्भ गेला तर तुम्ही काय विधवा व्हाल? तुम्ही गुंड आहांत! भ्याड आहांत! शिवाजी महाराजांचें नांव घेतां अन् हुल्लडबाजी करतां? तुमच्यांत मुत्सद्देगिरी नाहीं. धमक नाहीं. असती तर राज्यपुनर्रचना समितीनें दिलेलें द्विभाषिक राज्य तुम्हीं चालवून दाखवलें असतें. पांच वर्षांनीं मुंबई मिळणार म्हणून तुम्ही हुरळून गेलांत. पण पांच हजार वर्षांत मुंबई तुम्हांला मिळावयाची नाहीं!" असली मवालीगिरीची भाषा ऐकल्यानंतर लोक दगड अन् जोडे न फेकतील तरच नवल! मोरारजी म्हणाले, "या गुंडगिरीला योग्य वेळीं जबाब मिळेल. तुमच्या दंडेलीनें सरकार दबणार नाहीं. मुंबईच्या अन्य भाषिकांना मारहाण करतां? त्यांना तुमच्याकडे कसें यावेंसें वाटेल? काँग्रेस जिवंत आहे तोंपर्यंत मुंबईची जनता महाराष्ट्रांत येणार नाहीं!" असली उर्मटपणाची आणि मग्रूरीची भाषा कोण ऐकून घेणार?

मोरारजींच्या सभेंत हुल्लडबाजी आणि दगडफेक झाली ह्याचा सर्वांनीं गवगवा केला. पण सदोबा पाटलांच्या पाजी वक्तव्याची नि मोरारजींच्या मग्रूर मुक्ताफळांची कोणीं दखल घेतली नाहीं. शंकरराव देवांनीं लगेच दुसऱ्या दिवशीं 'हुल्लडबाजी'च्या प्रायश्चित्तादाखल पांच दिवसांचें उपोषण सुरू केलें. पाटील-मोरारजींची त्यांनीं क्षमा मागितली आणि लोकशाहींत दुसऱ्याचें म्हणणें ऐकून घेतलें पाहिजे असा उपदेश केला. लोकशाहीची आणि भाषणस्वातंत्र्याची गळचेपी कोणीं केली? लोकांनीं का सरकारनें? तीन कोटी मराठी माणसांचें म्हणणें जिथें सरकार ऐकून घेत नाहीं, आणि विधानसभेंतील मराठी सभासदांना भाषणाचें वा मताचें स्वातंत्र्य जिथें मोरारजी स्वतःच देत नाहींत तिथें त्यांचें म्हणणें लोकांनीं ऐकावें हा कोठला न्याय? लोक भाषण ऐकून घेतील; पण पाटलांच्या शिव्या नि मोरारजींची दमदाटी ते थोडीच ऐकून घेणार? चौपाटीवरच्या सभेंतील 'हुल्लडबाजी' ही संयुक्त महाराष्ट्राच्या नांवावर केली गेली हा मात्र शंकरराव देवांचा आक्रस्ताळेपणा होय! प्रत्येक मराठी माणूस हा संयुक्त महाराष्ट्रवादी आहे. त्याला कोण काय करणार? म्हणून त्यांच्या हातून घडलेल्या बऱ्यावाईट गोष्टींचें खापर 'संयुक्त महाराष्ट्र'च्या डोक्यावर फोडण्याचें काय कारण? शंकररावांच्या या आगंतुक उपासानें 'संयुक्त महाराष्ट्र'च्या विरोधकांना मोठेंच कोलीत मिळालें; आणि त्याच दिवशीं म्हणजे एकवीस तारखेला मुंबईमध्यें ज्या अनिष्ट घटना घडल्या त्याची सर्वच जबाबदारी ते राजरोसपणें 'संयुक्त महाराष्ट्र'वाद्यांच्या माथीं मारूं लागले.

अठरा तारखेच्या सत्याग्रही मोर्चाच्या वेळीं एकहि अत्याचार झालेला नाहीं ही सूर्यप्रकाशासारखी स्वच्छ गोष्ट आहे. मग एकवीस तारखेच्या संपाच्या वेळीं अत्याचार कां घडले? याचें कारण वीस तारखेला चौपाटीवर सभा भरवून सदोबांनीं जनतेला जी अद्वातद्वा शिवीगाळ केली ती होय असें आम्ही म्हणतों. 'पांच हजार वर्षांत तुम्हांला मुंबई मिळणार नाहीं—काँग्रेस जिवंत असेतोंपर्यंत मुंबई महाराष्ट्रांत येणार नाहीं!' ही काय जबाबदार पुढाऱ्यांची लोकशाहीच्या नीतीला शोभणारी भाषा होय? जनतेला आपण होऊन मुद्दाम चिडवावयाचें आणि जनता चिडली अन् तिचा संयम सुटला, तर पुन्हां आपणच तिच्या नांवानें शंख करीत सुटावयाचें हा कुठला न्याय? 'टाइम्स ऑफ इंडिया' या दैनिकानें संयुक्त-महाराष्ट्रवाद्यांना गुंड आणि ठग अशीं विशेषणें बहाल केलेलीं आहेत! कोट्यवधि रुपयांची अफरातफर करण्याचा आरोप ज्याच्यावर आलेला आहे असल्या एका भांडवलवाल्याच्या मालकीच्या पत्राकडून सत्य, सभ्यता आणि सौजन्य यांची अपेक्षा करणें व्यर्थ होय. मालकाच्या हातांत हातकड्या पडल्याची बातमी बारीक टाइपांत कोठें तरी एका कोपऱ्यांत देणाऱ्या या 'सत्यनिष्ठ' पत्रानें एकवीस तारखेच्या जाळपोळीचीं आणि अत्याचाराचीं भडक वर्णनें आणि चित्रें मात्र पानेंच्या पानें छापलेलीं आहेत, ही एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्राचीच री सर्व इंग्रजी पत्रांनीं ओढलेली आहे. त्याला आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. कारण संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना वेचिराख करण्यासाठीं तीं सगळीं हातांत विस्तवच घेऊन बसलेलीं आहेत!

पण 'संयुक्त महाराष्ट्रा'ची चळवळ ही डांग्यांच्या हातांत गेलेली असून एकवीस तारखेच्या अत्याचाराला आणि अनर्थाला संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या गोटांतले कम्युनिस्टच कारणीभूत आहेत अशा तऱ्हेची 'संयुक्त महाराष्ट्रा'ची खोटी आणि खोडसाळ बदनामी करण्यास लोकमान्यकार गाडगीळ यांनीं प्रवृत्त व्हावें याचें आम्हांला आश्चर्य वाटतें. त्यांच्याच पावलावर पाऊल टाकून 'इंटक'च्या आंबेकरांनीं 'संयुक्त महाराष्ट्र'वाद्यांना सवाल केला आहे कीं, "तुम्हांला देवांचें नेतृत्व हवें कीं डांग्यांचें? म्हणजे मुंबईचा प्रश्न हा वाटाघाटीनें सोडवायचा कीं दहशत व गुंडगिरी या मार्गानें?" जणुं कांहीं देवांचा मार्ग म्हणजे देवमार्ग आणि डांग्यांचा मार्ग म्हणजे दैत्यमार्ग! मुंबईतील संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचें नेतृत्व डांग्यांकडे गेलें आहे आणि त्यांच्याच प्रेरणेनें कम्युनिस्टांनीं एकवीस तारखेला अत्याचार केला या

आरोपांत अक्षराचेंहि सत्य नाहीं. मुंबईतील 'संयुक्त महाराष्ट्र'च्या चळवळीचें नेतृत्व 'संयुक्त महाराष्ट्र कृतिसमिती'कडे आहे. या समितींत सर्व डाव्या आणि पुरोगामी पक्षांचे नेते आहेत. त्यांच्याच सल्ल्यानें आणि निर्णयानें ह्या चळवळीचें प्रत्येक धोरण आंखलें जात आहे. ही चळवळ कम्युनिस्टांच्या हातांत गेलेली आहे असा खोटा ओरडा करून तिच्या कार्यकर्त्यांमध्यें फूट पाडावयाची हा गाडगीळ-आंबेकरांचा डाव न ओळखण्याइतके मुंबईतले संयुक्त महाराष्ट्रवादी मूर्ख आहेत कीं काय? असल्या लुच्चेगिरीच्या प्रचाराला कोणीहि सच्चा संयुक्तमहाराष्ट्रवादी धूप घालणार नाहीं. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीमध्यें एस्. एम्. जोशी यांच्याप्रमाणेंच डांगे हे एक प्रभावी नेते आहेत. संयुक्त महाराष्ट्राच्या प्रचारांत जोशी ज्याप्रमाणें प्रजासमाजवादी पक्षाचा पुरस्कार करीत नाहींत, त्याप्रमाणें डांगेहि आपल्या कम्युनिस्ट पक्षाचा पुरस्कार करीत नाहींत. संयुक्त महाराष्ट्राच्या प्रचारांत अत्याचाराची किंवा हिंसेची प्रेरणा डांगे देतात असें जे म्हणतात ते जाणून बुजून डांगे यांची बदनामी करीत आहेत. डांगे यांच्या जाहीर भाषणांमधून आपल्या म्हणण्याच्या पुराव्यादाखल एक अक्षर काढून दाखवावें असें गाडगीळ-आंबेकर यांना आम्ही जाहीर आव्हान देतों.

पण सगळयांत आम्हांला मौज वाटते भाऊसाहेब हिऱ्यांची! "चौपाटीच्या सभेमध्यें 'आमचे पूज्य पुढारी' सदोबा आणि मोरारजी ह्यांचा लोकांनीं अपमान केला" याबद्दल त्यांनीं खेद व्यक्त केला आहे. सदोबा आणि मोरारजी हे भाऊसाहेबांचे 'पूज्य' पुढारी! म्हणजे मग पुढें बोलणेंच संपलें! मोरारजींबद्दलचें भाऊसाहेबांचें प्रेम सुप्रसिद्धच आहे. बलसाडच्या निवडणुकींत जेव्हां मोरारजी चारीमुंडे चीत झाले तेव्हां याच भाऊसाहेबांनीं त्यांना पहिल्यांदा तार पाठविली कीं, "तुमच्यावांचून मुंबई राज्याचा कारभार चालणें अशक्य आहे!" वा रे मर्द मराठा! असले स्वाभिमानी आणि तेजस्वी 'मराठे' काँग्रेसमध्यें आहेत म्हणूनच 'संयुक्त महाराष्ट्र'चें हें 'असें' झालें आहे. एकवीस तारखेच्या दंगलीबद्दल भाऊसाहेबांनीं आतां निषेधाचें पत्रक काढलें आहे; पण दोन ऑक्टोबरपासून संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या छातीवर मोरारजींनीं जे बंदूकवाले पोलीस बसवले आहेत, त्याचा निषेध करण्याची बुद्धि कांहीं भाऊसाहेबांना पूर्वी झाली नाहीं. 'पांच हजार वर्षांत मुंबई तुम्हांला मिळणार नाहीं!' असें जेव्हां 'पूज्य' सदोबा बरळले तेव्हां त्यांची 'पाद्यपूजा' करण्याची तत्परता कांहीं भाऊसाहेबांनीं दाखविली नाहीं. एकवीस तारखेला

पोलिसांच्या गोळ्यांना जेव्हां निरपराधी माणसें बाहेर बळी पडत होतीं, तेव्हां त्या बंदुकांचे बार विधानसभेमध्यें 'पूज्य' मोरारजीसमोर मुंडी खालीं घालून बसलेल्या भाऊसाहेबांना ऐकूं आले नाहींत काय? त्यावेळीं काय हातांत त्यांनीं बांगड्या भरल्या होत्या? फ्लोराफाउंटनच्या चौकांत त्यावेळीं ते कां धावून आले नाहींत? कां नाहीं त्यावेळीं त्यांनीं लोकांना सांगितलें कीं, "मुंबईच्या स्वतंत्र राज्याला आम्ही कधींहि मान्यता देणार नाहीं" म्हणून? पोलिसांच्या बंदुकांना जो जमाव हटला नाहीं तो भाऊसाहेब हिऱ्यांच्या या एका वाक्यानें पांगला असता! आणि चार वाजतां जेव्हां एस. एम्. जोशी आणि नौशेर भरुचा हे फ्लोराफाउंटनच्या वर्तुळांत आले, तेव्हां त्यांच्या सांगण्यावरून हजारों लोक शांतपणें नाहीं का परत फिरले? हें श्रेय भाऊसाहेब हिऱ्यांनीं कां नाहीं घेतलें? लोकांचे बाहेर मुडदे पडत असतांना यांना विधानसभेंत स्वस्थ बसवलें तरी कसें? आणि आतां मोठा शिष्टपणाचा आव आणून दंगलीच्या निषेधाचीं पत्रकें ते काढताहेत!

बाकी एकट्या भाऊसाहेबांना तरी आम्हीं कां दोष द्यावा? विधानसभेंतील सगळेच मराठी काँग्रेसवाले एकाच माळेचे मणि. एकवीस तारखेला जीं पंधरा निरपराधी माणसें मृत्युमुखीं पडलीं त्याची प्रत्यक्ष जबाबदारी जरी मोरारजींवर येत असली, तरी त्या पातकाचा दोष अप्रत्यक्षपणें कां होईना पण आमच्या मराठी काँग्रेस आमदारांच्या डोक्यावर आल्याखेरीज राहत नाहीं! राजिनाम्यांची धमकी दाखवून मुंबई विधानसभेमध्यें मोरारजींनीं आणलेला त्रिराज्य पुरस्काराचा ठराव आपण पुढें ढकलला हें एक मोठें शतकृत्य केलें असें ह्या आमदारांना वाटतें! महाराष्ट्र काँग्रेसमधले फुटाफुटीचें एक गंडांतर टळलें म्हणून ह्यांना आभाळ ठेंगणें झाल्यासारखें वाटतें. पण मोरारजींच्या बंदुकांनीं पंधरा माणसांचे प्राण घेतले याबद्दल दुःखाचें अक्षर सुद्धां ह्यांच्यापैकीं एकानें काढलेलें नाहीं हें लक्षांत घेण्यासारखें आहे. फ्लोराफाउंटनच्या पटांगणांत जमलेली सर्व जनता शांततावादी होती. त्यामध्यें कोणीहि गुंड किंवा ठग नव्हते. एस्. एम्. जोशी आणि नौशेर भरुचा ह्यांनीं आदेश देतांना हजारों मंडळींचा मोर्चा अत्यंत शिस्तीनें चौपाटीकडे वळला. आणि चौपाटीच्या वाळवंटावर लोकमान्य टिळकांच्या पुतळ्यासमोर चार लाख संयुक्त महाराष्ट्र वाघांची जी विराट सभा झाली तिला तर मुंबईच्या इतिहासांत तोड नाहीं. दिवे नाहींत, ध्वनिक्षेपक नाहींत तरीहि जनतेचा हा प्रचंड महासागर जें ऐकूं येईल

तेवढ्यावरच समाधान मानीत दीड तास शांतपणें बसला होता. आणि सभा संपल्यावर तितक्याच शांतीनें आणि शिस्तीनें तो घरोघर परतला! संयुक्त महाराष्ट्राचे शत्रू कांहींही ओरडोत, मोरारजी-सदोबा कांहींहि कोकलोत, 'टाईम्स ऑफ इंडिया' सारखीं पत्रें कांहींहि बोंबलोत, अठरा ते एकवीस नोव्हेंबरच्या अवघ्या चार दिवसांत मुंबईमध्यें अक्षरशः 'महाभारत' घडलें ह्यांत कांहीं शंका नाहीं. या चार दिवसांत मुंबईची लढाई महाराष्ट्रानें जिंकली. मुंबई शहरांत मराठी जनता अल्पसंख्य आहे आणि मुंबई ही 'कॉस्मॉपॉलिटन' आहे अशी मुंबईची बदनामी करणाऱ्या सरकारी आणि भांडवलशाही प्रचाराला मुंबईच्या मराठी जनतेनें आपल्या विराट स्वरूपाचें आणि सामर्थ्याचें दर्शन घडवून मूठमाती दिली. सदोबा-मोरारजी या शनि-मंगळांनीं कारस्थानिलेल्या अमंगळ 'मुंबई-शहरराज्या'ला चौपाटीच्या वाळवंटावर भडाग्नि दिला. आणि मोरारजींनीं केलेल्या राक्षसी कत्तलीनें हतवीर्य न होतां लोकमान्य टिळकांच्या नि विठ्ठलभाई पटेलांच्या पुतळ्यांच्या साक्षीनें कोटिकोटि स्वरांनीं गर्जून सांगितलें कीं, 'मुंबई ही महाराष्ट्राची आहे!' मुंबईच्या युद्धांत ज्या निरपराधी जिवांची मोरारजींनीं निष्कारण हत्या केली त्यांना अत्यंत व्यथित हृदयानें आणि अश्रुपूर्ण लोचनांनीं आम्ही श्रद्धांजलि वाहतों. परमेश्वर त्यांना शांति देवो!

२७-११-१९५५

# मुंबईसाठीं मराठा प्राण देईल !

रशियाचे पंतप्रधान मार्शल बुल्गानिन यांनीं पुणें येथील सत्कारप्रसंगीं श्री छत्रपति शिवाजी महाराज आणि महाराष्ट्रीय यांच्या स्वातंत्र्यप्रेमाचा आणि पराक्रमाचा प्रचंड गौरव केला. ते म्हणाले, "राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा भारतांत प्रथम श्री शिवाजी महाराजांच्या नेतृत्वाखालीं सुरू झाला. वसाहतवाद आणि साम्राज्यवाद यांविरुद्ध त्यांचा लढा होता. आजहि भारतवर्ष जो स्वतंत्र झालेला आहे त्याचें श्रेय स्वातंत्र्यप्रेमी महाराष्ट्रीयांनाच दिलें पाहिजे. कारण स्वातंत्र्य लढ्याच्या अग्रभागीं तेच होते." महाराष्ट्रावर अन्याय आणि जुलूम करणाऱ्या उन्मत्त आणि बेगुमान काँग्रेस श्रेष्ठींच्या काळजांत मार्शल बुल्गालिन यांचे उद्गार एखाद्या विषारी कट्यारीसारखे घुसले असतील. छत्रपति शिवाजी महाराज म्हटलें कीं काँग्रेस श्रेष्ठींच्या मस्तकांत तिडीक उठते. आणि महाराष्ट्रीय म्हटलें कीं त्यांच्या काळजांत ठणका सुरू होतो. भारताचे पंतप्रधान पंडित नेहरू यांनीं शिवाजी महाराजांना 'वाट चुकलेले देशभक्त' असें म्हटलें होतें. मागून त्यांना ते शब्द परत घ्यावे लागले हें खरें, पण त्यानंतर उभ्या हयातींत त्यांनीं छत्रपतींचें नांव काढलेलें नाहीं. महाराष्ट्रामध्यें पं. नेहरूंनीं जेव्हां दौरा काढला तेव्हां सुद्धां छत्रपतींचा गौरवपर उल्लेख त्यांनीं आपल्या भाषणांत केलेला आम्हांला आठवत नाहीं. ह्यावरून शिवछत्रपतींबद्दल त्यांच्या मनांत फारसा आदर असावा असें वाटत नाहीं. ह्या दृष्टीनें मार्शल बुल्गानिन यांचे उद्गार अत्यंत संस्मरणीय आहेत. रशियाच्या पंतप्रधानांनीं येथें येऊन शिवछत्रपतींच्या लोकोत्तर पराक्रमाविषयीं आम्हांला सांगावें कीं स्वातंत्र्याचा लढा भारतांत पहिल्यानें श्री शिवाजीमहाराजांनीं सुरू केला आणि त्याच छत्रपतींच्या जयंतीची साधी सुट्टी सुद्धां या स्वतंत्र भारतांत नसावी ना? 'छत्रपति शिवाजी महाराज आणि लोकमान्य टिळक हे काँग्रेसच्या महापुरुषाच्या व्याख्येच्या चौकटींत बसूं शकत नाहींत!' असें पाजीपणाचे उद्गार कांहीं वर्षांपूर्वीं काढणाऱ्या बाळासाहेब खेरांचें थेरडें थोबाड

तर मार्शल बुल्गानिन यांचे हे उद्‌गार ऐकून पाहण्यासारखेंच झालें असेल.

ज्याला शिवछत्रपति कळूं शकत नाहींत त्याला महाराष्ट्र कळणार नाहीं हें ब्रह्मवाक्य आहे. काँग्रेसश्रेष्ठींना शिवाजी महाराज कळले नाहींत म्हणून त्यांना महाराष्ट्राच्या स्वरूपाचें आणि स्वभावाचें आकलन अद्यापपर्यंत झालेलें नाहीं. भारताच्या स्वातंत्र्य इतिहासांत श्रीशिवछत्रपति आणि मराठे यांचें काय स्थान आहे यासंबंधीं मार्शल बुल्गानिन ह्यांनीं मात्र अचूक निदान केलेलें आहे. होय, अगदीं बरोबर आहे. गेल्या हजार वर्षांचा भारताचा इतिहास पाहिला तर भारतावर आक्रमण करणाऱ्या परकीय शत्रूंशीं आणि सत्तेशीं एकट्या मराठ्यांखेरीज दुसरे कोणीहि लढलेले नाहींत. मोगली साम्राज्याचा लोंढा दक्षिणेंत मराठ्यांनीं अडवला आणि दिल्लीपर्यंत मागें रेटीत नेला. निजामाचीं हाडें मराठ्यांनीं खिळखिळीं केलीं. पोर्तुगीजांना हात मराठ्यांनीं दाखविला आणि आपलें सर्वस्व गमावीपर्यंत जिवावर उदार होऊन मराठे शेवटपर्यंत इंग्रजांशीं लढत राहिले. मराठ्यांचें राज्य जिंकूनच इंग्रज या भारताचे राजे झाले. पुण्यावर युनियन जॅक जेव्हां चढलें तेव्हां इंग्रजांची राजवट या देशामध्यें सुरू झाली. त्यानंतरहि गेल्या शंभर-सवाशें वर्षांत भारतवर्ष स्वतंत्र करण्याच्या सर्व प्रयत्नांत मराठेच अग्रभागीं होते. सत्तावन सालच्या पहिल्या स्वातंत्र्यसंगराचे नेते रंगो बापूजी, नानासाहेब पेशवे, सेनापति तात्या टोपे, झांशीची महाराणी लक्ष्मीबाई हीं सर्व मराठीच माणसें होतीं. भारताच्या स्वातंत्र्यासाठीं या साऱ्या वीरांनीं आपलें बलिदान केलेलें आहे. कायदेशीर आणि घटनात्मक मार्गांनीं देशाचें स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं या देशांत जे प्रयत्न सुरू झाले त्यांचेंहि जनकत्व मराठ्यांकडेच येतें. काँग्रेसचा उगमसुद्धां न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांच्या हिमालयाएवढ्या उत्तुंग बुद्धिमत्तेतून आणि कल्पकतेमधून झालेला आहे. इंग्रजी साम्राज्याविरुद्ध असंतोषाची आग भारतांत प्रथम लो. टिळकांनीं भडकावली आणि स्वराज्याच्या लढ्याची सर्व सिद्धता करून ठेवली. म. गांधींप्रमाणेंच लो. टिळक हेहि स्वतंत्र भारताचे जनक आहेत.

म. गांधीनीं केलेल्या अहिंसात्मक लढ्यांत जास्तींत जास्त पराक्रम आणि बलिदान महाराष्ट्रानें केलेलें आहे हें अगदीं खानेसुमारी घेऊन सिद्ध करतां येईल. वासुदेव बळवंत, चाफेकर बंधु, वीर सावरकर, पिंगळे, सेनापति बापट अशीं भारताच्या स्वातंत्र्यासाठीं सर्वस्वाचें बलिदान करणारीं नररत्नें केवळ या महाराष्ट्रामध्यें निर्माण झालेलीं आहेत. स्वातंत्र्य मिळाल्यानंतरहि पठाणी टोळ्यांनीं जेव्हां काश्मीरवर

आक्रमण केलें तेव्हां त्यांची हड्डी मराठे आणि महार सैनिकांनींच नरम केली. स्वतंत्र भारताचें पहिलें परमवीरचक्र आणि वीरचक्र मिळविणारे कॅ. राम राघोबा राणे आणि मे. जठार हे महाराष्ट्रीयच होते. गोव्याच्या स्वातंत्र्यलढ्यामध्यें तर महाराष्ट्राची सर्वांत मोठी आहुति पडलेली आहे. सुधाबाई जोशी, नारायणराव गोरे, शिरुभाऊ लिमये यांना दहा दहा वर्षांच्या शिक्षा झालेल्या आहेत. बाबुराव थोरात आणि हिरवे गुरुजींनीं आपल्या छातीवर पोर्तुगीजांच्या गोळ्या झेलून प्राण दिले आहेत. भारताच्या स्वातंत्र्यासाठीं गेल्या तीनशें वर्षांत एकट्या महाराष्ट्रानें जे जे पराक्रम केले आणि जें जें बलिदान केलें त्याचा इतिहास सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा आहे. अशा ह्या स्वातंत्र्यप्रेमी, त्यागी, शूर आणि बुद्धिमान महाराष्ट्राला भारताच्या इतिहासांतून आणि भूगोलामधून कायमचा नेस्तनाबूद करण्याचें कॉंग्रेसश्रेष्ठींनीं दुष्ट कारस्थान करावें हें बघून प्रत्येक मराठ्याच्या तळपायाची आग मस्तकाला गेली तर त्यांत आश्चर्य कसलें ?

कॉंग्रेसश्रेष्ठींचें हें महाराष्ट्रविरोधी कारस्थान आजचें नाहीं. भाषावार प्रांतरचना करण्यासाठीं सात वर्षांपूर्वी जें 'दार कमिशन' नेमण्यांत आलें, त्या वेळेपासूनचें हें कारस्थान आहे. या कमिशनच्या अहवालांत दारसाहेबांनीं महाराष्ट्राची जास्तींत जास्त बदनामी करून ठेवलेली आहे. या अहवालाच्या दहाव्या पानावर त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, "मराठे हे कर्तबगार आणि शूर लोक आहेत आणि राजकीय सत्तेच्या कोणत्याहि झगड्यांत ते टिकाव धरूं शकतात. पण महाराष्ट्रांत प्रभावी असलेला जो 'पुणेरी विचारपंथ' आहे त्याचे देशांतील बाकीच्या लोकांशीं मतभेद आहेत. या देशाच्या भवितव्याबद्दल किंवा राष्ट्राच्या उत्क्रांतिक्रियेंत घटक प्रांतांनीं काय कामगिरी करावी याबद्दल इतरांच्या दृष्टिकोनाशीं ह्या पुणेरी विचारपंथाचा दृष्टिकोन दुर्दैवानें जमूं शकत नाहीं. संयुक्त महाराष्ट्राची इच्छा ही साहजिकच या विचारसरणींतून उत्पन्न झालेली आहे. तिच्या जोडीला गुजरात आणि महाकोशल यांच्या आक्रमणाची खरी म्हणा किंवा काल्पनिक म्हणा भीतीहि पण आहेच." ह्या विधानाचें अधिक स्पष्टीकरण केल्यास त्यांतून पुढील अर्थ निघतात : (१) महाराष्ट्र हा शूर असेल पण इतरांप्रमाणें देशकल्याणाची दृष्टि त्याच्याजवळ नाहीं. (२) अशा राष्ट्रविरोधी मनोवृत्तीमधून संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचा उगम झाला आहे. (३) हा पुणेरी लोकांचा उपद्व्याप आहे. त्यांना गुजरात्यांचें आणि महाकोशलमधील हिंदी जनतेचें भय वाटतें. महाराष्ट्रीय लोकांची

नालस्ती करण्यासाठीं आणि संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीची नाचक्की करण्यासाठीं हा मजकूर जाणून बुजून दारसाहेबांनीं अत्यंत खोडसाळपणानें लिहिलेला आहे हें सांगण्याची सुद्धां आवश्यकता नाहीं.

वस्तुतः या दार रिपोर्टाच्या महाराष्ट्रामध्यें ठिकठिकाणीं जाहीर होळ्या व्हावयाला पाहिजे होत्या. तीन शतकें ज्या महाराष्ट्रानें देशाच्या स्वातंत्र्यासाठीं आपल्या सर्वस्वाचा होम केला, त्या महाराष्ट्राला देशकल्याणाची दृष्टि नाहीं असें म्हणणारा माणूस एक पाजी तरी असला पाहिजे, नाहीं तर पागल तरी असला पाहिजे. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही राष्ट्रविरोधी चळवळ आहे हें दारसाहेबांचें जें मत होतें, तेंच आजहि फा. कुं. पा. समितीचें आणि कॉंग्रेसश्रेष्ठींचें मत आहे. म्हणूनच काय वाटेल तें झालें तरी 'संयुक्त महाराष्ट्र' होऊं द्यावयाचा नाहीं अशाबद्दल त्यांची पराकाष्ठा चाललेली आहे. संयुक्त महाराष्ट्र झाला कीं भारताचें वाटोळें झालें अशीच त्यांनीं आपली ठाम समजूत करून घेतलेली आहे. संयुक्त-महाराष्ट्रवाद्यांना गुजरातच्या नि महाकोशलच्या आक्रमणाचें भय वाटतें असें जरी दार अहवालांत म्हटलें, तरी वस्तुस्थिति अशी आहे कीं संयुक्त महाराष्ट्र झाला तर त्याच्या आक्रमणाची कॉंग्रेसश्रेष्ठींनाच भीति वाटून राहिली आहे. वास्तविक या भीतीला कांहींहि आधार नाहीं. इतिहासांत याला पुरावा नाहीं. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं महाराष्ट्र प्राणपणानें लढला, पण त्यानें स्वार्थ कधींहि साधलेला नाहीं. नाहींतर महाराष्ट्र असा कंगाल कधींहि राहिला नसता. मराठ्यांच्या हातांत जेव्हां सत्ता होती तेव्हां त्यांना महाराष्ट्रांतल्या शेतकऱ्यांच्या घरावर सोन्याचीं कौलें घालतां आलीं असतीं. महाराष्ट्रांत मोठमोठे राजवाडे अन् महाल बांधून ठेवतां आले असते.

लोभ, चैन, ऐषाराम यांचें महाराष्ट्राला पहिल्यापासून वावडें आहे. महाराष्ट्र जसा धारकरी आहे तसा तो वारकरी आहे. त्याच्या एका हातांत तलवार असली तर दुसऱ्या हातांत भगवी पताका आहे. त्याच्या स्वातंत्र्यप्रीतीला सत्ताविरक्तीचें अस्तर जोडलेलें आहे. 'हर हर महादेव' ह्या वीर गर्जनेबरोबरच तो 'ग्यानबा तुकारामा'चा गजर करत असतो, म्हणून 'संयुक्त महाराष्ट्र' झाल्यावर तो भारतावर आक्रमण करील किंवा भारताचें वाटोळें करील हें कॉंग्रेसश्रेष्ठींना वाटणारें भय द्वेषमूलक आणि मत्सरजन्य आहे. गुजरात्यांना आणि हिंदी भाषिकांना महाराष्ट्राबद्दल वैषम्य आणि असूया वाटते हेंच खरें. संयुक्त महाराष्ट्र झाला तर साऱ्या भारतांत

हें राज्य अत्यंत प्रभावी आणि तेजस्वी होईल आणि त्याच्यापुढें इतर राज्यें निष्प्रभ होतील अशी या लोकांना धास्ती वाटते आहे. म्हणून केवळ सत्तेच्या जोरावर त्यांनीं संयुक्त महाराष्ट्राचा खेळखंडोबा चालविला आहे. विदर्भ कापून कुठें त्याला द्विभाषिक राज्यामध्यें कोंब, नाहींतर द्विभाषिक राज्यामधून काढून विदर्भ त्याला जोडला तर त्याचा प्राण अशी जी मुंबई ती त्याच्या धडापासून कापून वेगळी कर! हा चावटपणा त्यांनीं चालविलेला आहे. तीन कोटी मराठी माणसांनीं मागितलेला मुंबई-विदर्भासह संयुक्त महाराष्ट्र दिला तर जणूं कांहीं त्याच क्षणीं ह्या कॉंग्रेसश्रेष्ठींचे तडफड तडफड करून प्राणच जाणार आहेत. आज कॉंग्रेसमध्यें गुजराती आणि हिंदी मुत्सद्द्यांचें वर्चस्व आहे. म्हणून गुजराती आणि हिंदी भाषिकांचा जास्तींत जास्त फायदा कसा करतां येईल ह्या एकाच 'राजकीय' दृष्टीनें ते देशाचें राजकारण लढवीत आहेत. उत्तर प्रदेश आणि मध्यप्रदेश हीं हिंदी भाषिकांचीं प्रचंड राज्यें त्यांनीं याच हेतूनें निर्माण केलेलीं आहेत. आणि महाराष्ट्राची शेंडी गुजरात्यांच्या हातीं देण्यासाठीं द्विभाषिक राज्याचें कारस्थान त्यांनीं ह्याच दृष्टीनें रचलेलें होतें. आणि आतां कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें त्रिराज्य योजनेची जी नवी शिफारस केलेली आहे, त्यांतहि केवळ गुजराती भांडवलवाल्यांना खूष करण्यासाठीं म्हणूनच त्यांनीं महाराष्ट्रापासून मुंबई वेगळी करून तिचें स्वतंत्र राज्य करण्याचें ठरविलेलें आहे. भारताला स्वातंत्र्य देण्यापूर्वी इंग्रजांनीं जशी या प्रचंड देशाची दुष्ट बुद्धीनें फाळणी केली, त्याप्रमाणें भारतामधील सर्व राज्यांची पुनर्रचना करतांना कॉंग्रेसश्रेष्ठींनींहि अत्यंत अधम बुद्धीनें आमच्या महाराष्ट्राची फाळणी करावयाचें ठरविलेलें आहे. मुंबई काप, विदर्भ तोड, बेळगांव काप, कारवार तोड अशी या शूर आणि थोर महाराष्ट्राची कापाकापी आणि तोडातोड करून त्याला कायमचा खची करून टाकावयाचा त्यांचा राक्षसी डाव आहे. महाराष्ट्राचा नाश कसा करतां येईल याखेरीज आज कॉंग्रेसश्रेष्ठींच्या डोक्यामध्यें दुसरा विचार नाहीं!

मुंबई शहराचा प्रश्न समाधानकारक रीतीनें मिटवतां येत नाहीं म्हणून द्विभाषिक राज्याचें बांडगूळ फा. कुं. पा. समितीनें निर्माण केलें. मुंबईचा प्रश्न समाधानकारक रीतीनें कां सोडवितां येत नाहीं? तर मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत करण्यासंबंधींचा महाराष्ट्राचा युक्तिवाद कितीहि सबळ असला तरी म्हणे मुंबई शहरांतील इतर भाषिकांना वाटत असलेल्या भीतीची उपेक्षा करून भागणार नाहीं. शिवाय

मुंबई महाराष्ट्रांत गेली तर गुजरात्यांना आणि इतर भाषिकांना भयंकर मानसिक धक्का बसेल म्हणे आणि त्याचा परिणाम मुंबई शहराच्या व्यापारी आणि औद्योगिक जीवनावर होईल! फा. कुं. पा. समितीच्या अहवाल्यांतल्या या युक्तिवादापेक्षां अधिक हास्यास्पद आणि पोरकट असा युक्तिवाद जगांत कुठें असूं शकेल काय? मुंबई महाराष्ट्रांत गेली तर म्हणे गुजरात्यांना आणि अन्यभाषिकांना धक्का बसेल. अन् मुंबई महाराष्ट्राला नाहीं मिळाली तर लक्षावधि मराठी माणसांना धक्का बसेल तो! त्याचा विचार फा. कुं. पा. समितीनें कां केला नाहीं? मुंबईमधले उत्तर भारतीय, तेलगू, सिंधी, मल्याळी हे सगळे अन्य भाषिक तर मुंबईचा समावेश संयुक्त महाराष्ट्रामधें व्हावा या मताचे आहेत. त्यांचें मत अजमावण्याचा फा. कुं. पा. समितीनें कधीं प्रयत्न केला आहे काय? मुंबईमधल्या मराठी भाषिकांचें गुजरात्यांना आणि अन्य भाषिकांना भय वाटतें हीहि फा. कुं. पा. समितीची शुद्ध लोणकढी थाप आहे! असें भय वाटण्याला कारण काय त्याचा पुरावा समितीनें आपल्या अहवालांत कुठेंच दिलेला नाहीं. कुठें कोणा मराठ्यानें गुजरात्याला वा अन्य भाषिकांना लुटलें आहे, छळलें आहे का नाडलें आहे? पूर्वीच्या हिंदु-मुसलमान जातीय दंग्यामध्यें तर गुजराती जमातींचें संरक्षण प्रत्येक वेळीं मराठ्यांनींच केलेलें आहे. उलट आज मुंबई शहरांत बहुसंख्य मराठी जमातीची पिळणूक आणि फसवणूक कोणी जर करीत असेल तर ती गुजराती व्यापारी आणि उद्योगपति! सट्टेबाजी, नफेबाजी आणि काळाबाजार करणें हें गुजराती व्यापाऱ्यांचे आणि धनिकांचे राजरोस धंदे आहेत. त्यामुळें लक्षावधि मराठी कामगार लोक आज मुंबई शहरांत अक्षरशः नरकामध्यें राहत आहेत. आणि असें असून 'चोराच्या उलट्या बोंबा' या न्यायानें गुजराती भांडवलवाले मराठी माणसाच्या नांवानें विनाकारण शंख करीत सुटले आहेत याला काय म्हणावें?

मुंबईवर गुजरातचा कसलाहि हक्क नाहीं. 'मुंबई शहराचा आम्हीं विकास केला?' हा त्यांचा युक्तिवाद निरर्थक आहे. ग्वाल्हेर, इंदूर, बडोदें हीं संस्थानें मराठ्यांचीं होतीं. त्यांनीं त्या मुलखाचा इतकीं वर्षे विकास केला असतांहि हा मुलुख महाराष्ट्रांत समाविष्ट करा असा दुराग्रह महाराष्ट्रानें कधीं धरलेला नाहीं. मग गुजरात्यांना मुंबईबद्दल असा हट्ट धरून कसें बसतां येईल? महाराष्ट्रांत अनेक शतकें गुजराती लोक राहत आहेत. पुणें, कोल्हापूर आणि सोलापूर येथें गुजरात्यांची फार मोठी वसति आहे. महाराष्ट्रामधल्या प्रत्येक गांवागांवांत निदान एक तरी गुजर आहेच आहे.

महाराष्ट्रांत राहणाऱ्या ह्या सर्व गुर्जर बंधूंनीं 'महाराष्ट्रीयांचें आम्हांस भय वाटतें' अशी एकदांहि कधीं तक्रार केलेली नाहीं. महाराष्ट्रांतले पुष्कळसे धंदे गुजरात्यांच्या ताब्यांत आहेत. त्यांनाहि कधीं कोणाकडून उपसर्ग पोहोचलेला नाहीं. असें असतां मुंबई महाराष्ट्रांत गेली तर मुंबईमधल्या व्यापाऱ्यांना आणि उद्योगपतींना महाराष्ट्रीयांचें भय वाटण्याचें काय कारण आहे? आणि मुंबईमधल्या व्यापारधंद्याला ओहटी कशी लागणार आहे? कॉंग्रेसश्रेष्ठी आणि गुजराती भांडवलवाले यांनीं महाराष्ट्राविरुद्ध हें शुद्ध ब्लंट रचलेलें आहे. दुसरें कांहीं नाहीं. मुंबई महाराष्ट्राला त्यांना देण्याची इच्छा नाहीं म्हणून मराठी माणसासंबंधीं हें सारें कडयाळ त्यांनीं उत्पन्न केलेलें आहे. इसापनीतीमधला लांडगा कोकराला खातांना 'तूं नाहीं तुझ्या बापानें शिव्या दिल्या असतील!' असा ज्याप्रमाणें त्याजवर आरोप करतो, त्याच कुटिल युक्तिवादाचा अवलंब त्यांनीं महाराष्ट्राविरुद्ध केलेला आहे. आजच्या मुंबई राज्यांतहि वस्तुतः मराठी भषिकांचें प्रमाण गुजरात्यांपेक्षां अधिक असूनही महत्त्वाचीं सर्व खातीं गुजराती मंत्र्याकडे आहेत याचा अर्थ काय? मुख्यमंत्री आणि गृहमंत्री गुजराती. अर्थमंत्री गुजराती. आणि सर्व भिकार मंत्रिपदें मराठी मंत्र्यांच्याकडे! ह्याचा अर्थ काय? गुजरात्यांना जर मराठी भाषिकांचें भय वाटतें तर मुंबई राज्यामधल्या सत्तेचा सर्व मलिदा मराठी माणसांनीं गुजरात्यांच्या हातीं पडूं दिला असता काय? प्रत्यक्ष राज्यकारभारांतहि गुजराती मंत्री महाराष्ट्राचें राजरोसपणें नुकसान करून गुजरातचाच जास्तींत जास्त फायदा करवीत असतात. पब्लिक वर्क्स डिपार्टमेंट हें वस्तुतः मराठी मंत्र्याच्या ताब्यांत. पण आमचे ना. मालोजीराव नाईक निंबाळकर एवढे जागरूक आणि सावध कीं ह्या खात्यांतल्या महाराष्ट्रासाठीं आणि कर्नाटकासाठीं राखून ठेवलेल्या कोटयवधि रुपयांच्या मोठमोठ्या रकमा गुजरातमधल्या कामासाठीं खर्च होतात. मागें महाराष्ट्रांत दुष्काळ पडला. तेव्हां श्री. चिंतामणराव देशमुखांनीं महाराष्ट्रांतल्या दुष्काळनिवारणासाठीं पांच कोटी ऐशीं लक्षाची रक्कम मंजूर करून पाठविली. सदर रक्कम मुंबईचे अर्थमंत्री ना. जीवराज मेहता यांनीं बेधडक गुजरातमधल्या कामासाठीं खर्च करून टाकली असें कळतें. अशी सर्व बाजूनें आणि सर्व आघाडीवर महाराष्ट्राचीं गुजरातकडून लूटमार होत असतांना महाराष्ट्रीयांची आम्हांला भीति वाटते अशी गुजराती व्यापारी अन् भांडवलवाले खोटीच आरडाओरड करतात ह्या कर्माला काय करावें?

फा. कुं. पा. समितीनें सुचविलेल्या द्विभाषिक राज्याचा महाराष्ट्रानें एकमुखानें

धिक्कार केला. म्हणून काँग्रेस वर्किंग कमिटीनें त्या योजनेचा फेरविचार करून पुन्हा जो निर्णय दिला त्यांत मुंबईचें स्वतंत्र राज्य करण्याची शिफारस करून महाराष्ट्रावर पुन्हा आणखीन् अन्याय केला! जणुं कांहीं महाराष्ट्राचें कोणतेंहि म्हणणें जसेंच्या तसें मुळीं ऐकावयाचें नाहीं अशी काँग्रेसश्रेष्ठींनीं प्रतिज्ञाच केलेली आहे! मुंबई पाहिजे असेल तर विदर्भावर पाणी सोडा आणि गुजरातबरोबर संसार करा. अन् महागुजरातची सोबत नको असेल तर अन् विदर्भ पाहिजे असेल तर मुंबईवर पाणी सोडा अशा विलक्षण बेचक्यामध्यें काँग्रेसश्रेष्ठींनीं महाराष्ट्राला पकडून ठेवलें आहे. तथापि या दोन्हीपैकीं कोणतीहि योजना न स्वीकारतां मुंबईसह आणि विदर्भासह संयुक्त महाराष्ट्र अस्तित्वांत आणण्यासाठीं एकसारखें झगडत राहावयाचें अशी आतां मराठी जनतेनें मुळीं प्रतिज्ञाच केलेली आहे. म्हणूनच मुंबईचें स्वतंत्र राज्य करण्याच्या काँग्रेस वर्किंग कमिटीच्या निर्णयाला पाठिंबा देण्याचा ठराव जेव्हां घाईघाईनें मोरारजी देसाई यांनीं अठरा नोव्हेंबरला मुंबई राज्य विधानसभेंत आणला तेव्हां त्याला आपला विरोध आहे हें दाखविण्यासाठीं मुंबईच्या जनतेनें विधानसभेवर शांततामय मोर्चा काढला. सदर मोर्चाला अटक करून लाठ्यांच्या आणि अश्रुधुराच्य जोरावर मुंबईच्या जनतेचा आवाज दडपण्याची मोरारजींनीं पराकाष्ठा केली. दुसऱ्या दिवशीं चौपाटीवर त्यांनीं आणि सदोबा पाटलांनीं पोलिसांच्या बंदोबस्तांत जाहीर सभा भरवून मुंबईचें स्वतंत्र राज्य लोकांच्या गळ्यांत बांधण्याचा प्रयत्न केला. पण लोकांनींच त्यांच्या गळ्यांत खेटरांच्या माळा बांधल्या. त्यामुळें चिडून जाऊन जनतेच्या शांततामय निदर्शनांवर मोरारजींनीं गोळ्या मारून पंधरा लोकांचे मुडदे पाडले. आणि या हिंस्र अत्याचारांना आणि राक्षसी दडपशाहीला न घाबरतां चार लाख मराठी जनतेनें चौपाटीच्या वाळवंटावर एकमुखानें घोषणा केली कीं, 'मुंबई महाराष्ट्राची आहे!' मुंबईमधल्या मराठी जनतेनें मुंबईबाबत जेव्हां एवढें प्रखर आणि विराट स्वरूप दाखवलें तेव्हां मोरारजींची घाबरगुंडी उडाली आणि मुंबई राज्यविधान सभेंतील त्रिराज्य पुरस्काराचा ठराव त्यांनीं बिनमुदत स्थगित केला.

मोरारजीप्रमाणें सदोबा सूर्याजी पिसाळाच्याहि तोंडचें पाणी लोकप्रक्षोभ बघून पळालें आहे. गेल्या रविवारीं पोलिसांचें प्रचंड सैन्य स्वतःभोंवतीं उभें करून शूर सदोबांनीं पुन्हा चौपाटीवर एक सभा घेतली. त्यावेळीं पूर्वीप्रमाणेंच श्रोत्यांनीं आपलें उग्र स्वरूप सदोबांना दाखविलें. त्याबरोबर त्यांच्या डोक्यांतली धुंदी खाडकन्

उतरली. मराठी माणसांना अक्कल नाहीं, ते नालायक आहेत अशा शिव्या देणारें आणि मुंबई पांच हजार वर्षांतच काय पण यावच्चंद्र दिवाकरौ महाराष्ट्राला मिळणार नाहीं अशा धमक्या देणारे सदोबा 'प्रेमानें आणि तडजोडीनें बोलाल तर मी तुमचा गुलाम होईन!' असा श्रोत्यांपुढें गोंडा घोळूं लागले. जोडाजोडी झाली तेव्हां कुठें सदोबा तडजोडीची भाषा बोलूं लागले. एवढेंच नाहीं तर आपण मुंबईचें स्वतंत्र राज्य कधींहि मागितलेलें नाहीं असें ते आतां आपल्या भगतगणांकडून सांगूं लागले आहेत. त्यांचें म्हणणें असें कीं, 'त्रिराज्य योजनेला देवगिरीकरांनीं संमति दिली म्हणून कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें स्वतंत्र मुंबई राज्य निर्माण केलें.' देवगिरीकरांवरील या आरोपाला त्यांनीं अद्याप उत्तर दिलेलें नाहीं. म्हणून त्याबद्दल आम्ही मौन स्वीकारतों. पण 'स्वतंत्र मुंबई राज्य' मीं कधीं मागितलें नाहीं हा सदोबांचा कांगावा 'मीं वसंतसेनेला मारली नाहीं' ह्या मृच्छकटिकांतील शकाराच्या ढोंगी नकाराप्रमाणेंच अपराधी मनोवृत्तीचा निदर्शक आहे. सदोबांच्या या म्हणण्यावर त्यांचे मित्र देखील कधीं विश्वास ठेवणार नाहींत. स्वतंत्र मुंबई राज्याचे सूत्रधार होण्याचें आपलें स्वप्न आतां अशक्य आहे, मस्तकावर मुख्य-मंत्रिपदाचा मुकुट बसण्याऐवजीं पादत्राणाचे प्रहार बसण्याचीच शक्यता आतां अधिक आहे असें दिसून येतांच सदोबा स्वतंत्र मुंबई राज्याच्या जनकत्वाची जबाबदारी आतां टाळूं पाहत असले, तरी त्यामुळें मराठी माणसाची यापुढें दिशाभूल होणें अशक्य आहे. कॉंग्रेसश्रेष्ठींनीं केलेल्या भयानक अन्यायामुळें, मोरारजींनीं केलेल्या हिंसा-दडपशाहीमुळें अन् रक्तपातामुळें आणि सदोबा पिसाळानें केलेल्या महाराष्ट्रद्रोहामुळें आम मराठी जनता आतां खवळून जागी झालेली आहे. या जागृत जनशक्तीमध्यें जुलुमाला आणि दडपशाहीला टक्कर देण्याचें नि अन्यायाचें परिमार्जन करून घेण्याचें प्रचंड सामर्थ्य आहे. तीन कोटी महाराष्ट्रीयांचें संयुक्त महाराष्ट्राचें स्वप्न साकार करून दाखवण्याचा चमत्कार हीच जागृत जनशक्ति करून दाखवील !

महाराष्ट्रांतल्या जागृत जनशक्तीच्या स्वरूपाचें आकलन श्री शंकरराव देव यांच्यासारख्यांना होऊं नये याचें आम्हांला दुःख होतें. ह्या विराट जनशक्तीला डावलून ते संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न केवळ स्वतःच्या तुटपुंज्या शक्तीवर सोडविण्याचा हास्यास्पद प्रयत्न करीत आहेत. चौपाटीवरील मोरारजी—सदोबांच्या सभेंत कांहीं लोकांनीं त्यांच्यावर दगडफेक आणि जोडेफेक केली याबद्दल शंकररावांनीं

पांच दिवसांचें 'उग्र' उपोषण केलें. पांच दिवसांचें उपोषण तें काय आणि त्याची प्रसिद्धि ती केवढी? त्यांचे फोटो छापून आले आणि त्याच्या समाप्तीचा गवगवा केवढा पण करण्यांत आला? म. गांधींची एवढी विटंबना जगांत कोणीं केली नसेल! असल्या पोरकट उपोषणानें शुद्धीकरण तें काय होणार आणि कोणाचें होणार? झालें तर शंकरराव देवांच्या शरीराचेंच होणार! पण, हें उपोषण करून 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या चळवळीची बदनामी मात्र शंकररावांनीं चांगली केली आहे. भांडवलशाही वृत्तपत्रांना तेंच पाहिजे होतें. 'संयुक्त महाराष्ट्र'वादी हे दंगेखोर गुंड आहेत आणि ही चळवळ आतां अत्याचारी लोकांच्या हातीं जात चालली आहे अशी मनसोक्त आरडाओरड त्यांनीं उपोषणाच्या आधारानें करून घेतली. चौपाटीच्या मोरारजी-सदोबांच्या सभेंत दोन लाख मराठी लोक होते. त्यामध्यें कांहीं थोड्या लोकांनीं दगडफेक आणि जोडेफेक केली असली तरी एवढा प्रचंड जनसमुदाय अत्यंत शांतपणें वागला याची दखल मात्र शंकररावांनीं कुठेंच घेतली नाहीं. सदोबांनीं मराठी जनतेला उद्देशून जी अद्वातद्वा शिवीगाळ केली त्याबद्दल शंकरराव मात्र मूग गिळून बसले.

एकवीस तारखेचा संपहि विलक्षण यशस्वी झाला. मुंबईतील बहुसंख्य मराठी जनतेनें उत्कृष्ट संयम पाळला. कोणाच्याहि मालमत्तेचा विध्वंस किंवा लुटालूट झालेली नाहीं. पोलिसांनीं अत्याचार केले. तेव्हां कांहीं लोकांनीं चिडून बसेस जाळल्या. पोलिसांच्या गोळीबारामध्यें पंधरा लोक मरण पावून 'देवमार्गा'नें गेले. निरपराधी लोकांची मोरारजींनीं जी ही कत्तल करविली त्याविरुद्ध वस्तुतः शंकररावांनीं उपोषण करायला पाहिजे होतें. त्यांच्या गांधीवादाला लोकांच्या डोळ्यांतलें 'कुसळ' दिसतें, पण काँग्रेस सरकारच्या डोळ्यांतलें 'मुसळ' दिसत नाहीं. शंकररावांच्या या अप्रामाणिक आणि पक्षपाती वर्तनामुळें जनतेचा त्यांच्या-वरील विश्वास एकदम उडून गेला. जनशक्तीला जो डावलतो त्याला अखेर जनशक्ति डावलल्याखेरीज राहत नाहीं.

दिल्लीला जाण्यापूर्वी शंकररावांनीं जें पत्रक काढलें आहे तेंहि त्यांच्या पक्षपाती भूमिकेला साजेल असेंच आहे. ते म्हणतात, "माझ्या संमतीनें जें चाललें आहे तेंच 'संयुक्त महाराष्ट्र परिषदे'चें कार्य!" गेल्या पंधरवड्यांत मुंबईमध्यें संयुक्त महाराष्ट्राच्या ज्या प्रचंड सभा आणि परिषदा झाल्या त्या कांहीं शंकररावांच्या संमतीनें झालेल्या नाहींत. तेव्हां संयुक्त महाराष्ट्राची जनतेनें केलेली

ही सर्व चळवळ शंकररावांच्या हिशेबीं मुळीं जमाच नाहीं! पुढें शंकरराव या पत्रकांत म्हणतात, "मुंबई शहर महाराष्ट्रांत जबरदस्तीनें किंवा धाकदपटशानें मला घालावयाचें नाहीं!" जणुं कांहीं मुंबई शहर मिळविण्यासाठीं इतरांनीं जी चळवळ चालविलेली आहे ती जबरदस्तीची आणि धाकदपटशाची आहे. स्वतःचा मार्ग तेवढा सन्मार्ग आणि इतरांचा मात्र असन्मार्ग. हा अहंकार शंकररावांमध्यें जोंपर्यंत आहे तोंपर्यंत त्यांनीं स्वतःला गांधीवादी कशाला म्हणवून घ्यावें? आणि 'मला' हा त्यांचा स्वतःसंबंधींचा शब्दप्रयोग पाहा कीं! केवढी घमेंड आहे त्यांच्यांत? म्हणे 'मला मुंबई शहर असें असें यावयाला पाहिजे आहे!' तुम्ही कोण? व्यक्तिशः तुम्हांला कांहीं किंमत नाहीं. जोपर्यंत लोक तुमच्या पाठीशीं आहेत तोंपर्यंत तुमचें सर्व सामर्थ्य! 'मनधरणी आणि हृदयपरिवर्तन ह्या मार्गानें आपण पं. नेहरू व त्यांचे सहकारी यांचें मन बदलूं शकूं' असा शंकररावांना विश्वास वाटतो. ते म्हणतात, "मी त्यांना दोष देत नाहीं. त्यांच्यापुढें पूर्वींची आणि अलिकडची सर्व वस्तुस्थिति ठेवल्यानंतर त्यांच्या दृष्टिकोनांत कांहीं निश्चित फरक पडेल असा विश्वास वाटतो." शंकररावांचा हा आत्मविश्वास बघून हसावें का रडावें हें कळत नाहीं.

नेहरूंचें आणि काँग्रेसश्रेष्ठींचें हृदयपरिवर्तन म्हणे शंकरराव करणार! हत्तीचें हृदयपरिवर्तन करण्याचा उंदरानें प्रयत्न करावा तशापैकीं हें आहे. नेहरूंची आणि काँग्रेसश्रेष्ठींची बौद्धिक पातळी कोणीकडे आणि शंकररावांची बौद्धिक उंची कोणीकडे? नेहरू अन् काँग्रेसश्रेष्ठी शंकररावांना कधींच कास्वोटीला मारून टाकतील. शंकररावांचा त्यांच्यापुढें काय पाड लागणार आहे? म. गांधींची नक्कल केली म्हणून नेहरूंच्या मनावर परिणाम होईल कीं काय? नेहरूंनीं खरे गांधी पाहिलेले आहेत. तें नकली गांधींना थोडेच धूप घालतील! अन् ज्या नेहरूंनीं अन् काँग्रेसश्रेष्ठींनीं काय वाटेल तें झालें तरी मुंबई महाराष्ट्राला म्हणून द्यायची नाहीं असें आठ वर्षांपासून ठरवून ठेवलेलें आहे, ते काय आतां शंकररावांच्या युक्तिवादाला थोडेच बधणार आहेत? आणि शंकररावांना जें कांहीं म्हणावयाचें आहे तें त्यांनीं महिन्यापूर्वीं नेहरूंना सांगून टाकलें आहे. आणि नेहरूंनीं तें ऐकून घेऊन स्वतंत्र मुंबई राज्याचा निर्णय देऊन टाकला आहे. आतां नेहरूंना नवीन सांगण्यासारखें शंकररावांजवळ काय आहे?

—हो आहे. जागृत झालेल्या मुंबईच्या जनतेनें मोरारजींच्या अत्याचारांना

तोंड देऊन स्वतंत्र मुंबई राज्याचा कसा प्रखर निषेध केला तें! पण तो वृत्तांत नेहरूंना सांगावयाला शंकररावांना काय तोंड आहे? शंकररावांच्या दृष्टीनें ती नुसती हुल्लडबाजी आहे. म्हणूनच तर त्यांना पांच दिवसांचें अघोर उपोषण करावें लागलें. सारांश, महाराष्ट्रांत जागृत झालेल्या जनशक्तीच्या सामर्थ्यावर नेहरूंचें मन बदलण्याऐवजीं, केवळ मनधरणीच्या आणि हृदयपरिवर्तनाच्या मार्गानें नेहरूंचें मन बदलण्याचा जो व्यक्तिनिष्ठ प्रयत्न शंकररावांनीं चालविलेला आहे, त्यांतून कांहींहि निष्पन्न होणार नाहीं. म्हणून पुढील आठवड्यांत होणाऱ्या नेहरू–शंकरराव यांच्या वाटाघाटीकडे विशेष आशेनें बघण्याचें कुणालाहि कारण नाहीं. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीनें जनतेमध्यें आतां इतकें खोल मूळ पकडलेलें आहे कीं, या चळवळीला जितका जास्त विरोध होईल तितकी त्याची प्रखरता अधिकच वाढेल. शांततेच्या आणि तडजोडीच्या गोष्टी नेहरू जगाला सांगत असले तरी स्वतः नेहरूंच्या मनावर त्या पद्धतीचा मुळींच परिणाम होत नाहीं असा जुना इतिहास आहे. प्राणांतिक उपोषण करून पोट्टी श्रीरामलू मेले आणि लोकप्रक्षोभांत कोट्यवधि रुपये नुकसान झालें, तेव्हां नेहरूंनीं भाषिक आंध्र दिला. मुंबईसाठीं प्रत्येक मराठा प्राण देईल, पण मुंबईचें स्वतंत्र राज्य तो कदापि होऊं देणार नाहीं, अशी जेव्हां नेहरूंची खातरजमा होईल तेव्हांच ते मुंबई महाराष्ट्राला द्यावयास तयार झाले तर होतील! म्हणून यापुढें मराठी जनतेनें 'देवांच्या मार्गा'नें जाण्याऐवजीं 'मानवाच्या मार्गा'नें जाण्याचें ठरविलें तरच त्यांत त्यांचें कल्याण आहे.

४-१२-१९५५

# फलटणचे तीन हरामखोर

ह्या महिन्याच्या पहिल्या तारखेस ना. यशवंतराव चव्हाण, ना. गणपतराव तपासे आणि ना. मालोजीराव नाईक निंबाळकर या मुंबई राज्याच्या तीन महाराष्ट्रीय मंत्र्यांनीं फलटणच्या 'मनमोहन राजवाड्यां'त जाऊन 'संयुक्त महाराष्ट्रा'विरुद्ध पांचजन्य फुंकून महाराष्ट्रद्रोहाचा जो शिमगा साजरा केला, त्यानें कोट्यवधि महाराष्ट्रीयांच्या तळपायाची आग मस्तकाला गेलेली आहे. आणि या तीन हरामखोर मंत्र्यांच्या फलटणी फितुरीचा महाराष्ट्रामध्यें सर्वत्र कडकडून निषेध होतो आहे. महाराष्ट्राला अशा फितुरीचा पहिल्यापासूनच मुळीं शाप आहे. निष्ठा, इमान, देशभक्ति, बलिदान ह्या अलौकिक सद्गुणांचीं स्फूर्तिदायक आणि रोमहर्षक उदाहरणें महाराष्ट्राच्या इतिहासांत जशीं सर्वत्र विखुरलेलीं आढळतात, त्याचप्रमाणें फितुरी, निमकहरामी, देशद्रोह या दुर्गुणांचीं लाजिरवाणीं उदाहरणेंहि महाराष्ट्राच्या इतिहासामध्यें अधूनमधून दृष्टोत्पत्तीस येतात.

राज्यपुनर्रचना समितीनें महाराष्ट्राला कापून आणि द्विभाषी राज्यामध्यें जबरदस्तीनें कोंबून जेवढा अन्याय केला नसेल, तेवढा अन्याय कॉंग्रेस श्रेष्ठींनीं महाराष्ट्रापासून मुंबई तोडून आणि तिचें स्वतंत्र राज्य कल्पून महाराष्ट्रावर केलेला आहे. देशांतल्या सर्व अन्य भाषिकांना एकभाषिक राज्यें देऊन केवळ महाराष्ट्राच्या भाषिक राज्याचा कॉंग्रेसश्रेष्ठींनीं हा जो खेळखंडोबा चालविलेला आहे, त्यामुळें तीन कोटी मराठी भाषिक आज कॉंग्रेसश्रेष्ठींवर संतप्त झालेले आहेत. मुंबई, विदर्भ, बेळगांव अन् कारवार ह्यांच्यासह आमचा 'संयुक्त महाराष्ट्र' दिल्याखेरीज आमचें समाधान होणार नाहीं असें आम मराठी जनता कॉंग्रेस श्रेष्ठींना खडसावून सांगत आहे. संयुक्त महाराष्ट्र परिषदेचे नेते शंकरराव देव, पं. नेहरूंच्या दारीं संयुक्त महाराष्ट्राचें धरणें धरून बसले आहेत. प्रत्येक क्षण हा महाराष्ट्राच्या जीवन-मरणाचा क्षण आहे. अशा आणीबाणीच्या आणि निकराच्या प्रसंगीं प्रत्येक मराठ्यानें आपली शक्ति, युक्ति आणि भक्ति संयुक्त महाराष्ट्राचा लढा विजयी

करण्याच्या कामीं खर्च केली पाहिजे. असें असतां महाराष्ट्रांतले हे तीन हरामखोर मंत्री फलटणच्या 'मनमोहन' राजवाड्यांत चोरासारखे जाऊन आणि दारें बंद करून 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या पाठींत फितुरीची कट्यार खुपसतात याला काय म्हणावें ? या अधम कृत्याचा जेवढा निषेध करावा तेवढा थोडाच आहे !

त्रिराज्य योजनेच्या पुरस्काराचा ठराव मुंबईच्या कायदेमंडळामध्यें आणून विरोधी भाषणें व मतें देण्याची बंदी जेव्हां महाराष्ट्रीय आमदारांवर मोरारजींनीं घातली, त्यावेळीं ज्या अनेक स्वाभिमानी आमदारांनीं आपले राजिनामे काँग्रेसकडे सादर केले, त्यांमध्यें हे तीन हरामखोर नव्हते, ही गोष्ट त्याच वेळीं सर्वांना कळून चुकली. मुंबई कायदेमंडळामधले सर्व महाराष्ट्रीय काँग्रेस आमदार हे एकजुटीनें 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या लढ्यामागें आहेत असा भोळ्याभाबड्या मराठी जनतेचा जो ग्रह होता, तो कसा चुकीचा आहे हें त्याच वेळीं उघडकीस आलें. तथापि, इतके दिवस अंधारांत दडून बसलेला हा महाराष्ट्रद्रोह दिवसाढवळ्या राजवाड्यांत शिरेल आणि तेथून आपल्या नागव्या निर्लज्जपणाचें असें हिडीस प्रदर्शन महाराष्ट्रापुढें करील असें मात्र कोणालाहि वाटलें नसेल ! महाराष्ट्र-कुलकलंक सदोबा पाटील ह्यांनीं मुंबई ही जी आपली 'आई' ती मोरारजींशीं संगनमत करून गुजराती भांडवलवाल्यांना विकून टाकली आणि आपलें काळें उखळ पांढरें केलें ! महाराष्ट्रद्रोहाची ही जी साथ सदोबांनीं सुरू केली ती पुढें चालविण्यासाठीं मुंबई राज्याच्या मंत्रिमंडळांतील हे तीन हरामखोर इतक्या लौकर पुढें येतील असें मात्र आम्हांला वाटलें नव्हतें.

दुर्दैव महाराष्ट्राचें ! कमनशिब आम्हां मराठ्यांचें ! कीं आमच्या रक्तामांसाच्या, आमच्या हाडापिंडाच्या, आमच्या कुळवंशाच्या माणसांनीं आपला दीडदमडीचा स्वार्थ साधण्यासाठीं, आपलीं कवडीमोलाचीं मंत्रिपदें सांभाळण्यासाठीं, आपल्या मातृभूमीवर निमकहरामीचे असे निखारे ठेवावेत ! सगळ्यांत जर जास्त दुःख आम्हांला कशाचें होत असेल तर ह्या गोष्टीचें कीं हे तीनहि हरामखोर महाराष्ट्रीय मंत्री सातारा जिल्ह्यामधले निघावेत ! ज्या साताऱ्याचें नांव महन्मंगल छत्रपतींच्या नांवाशीं निगडित झालेलें आहे, ज्या साताऱ्याचें नांव वीरांनीं, शूरांनीं आणि क्रांतिकारकांनीं सर्वत्र दुमदुमविलेलें आहे, जो सातारा भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासांत एखाद्या सिताऱ्यासारखा झळकतो आहे, त्या साताऱ्याच्या दुग्धधवल यशाला, त्याच जिल्ह्यांत जन्माला आलेल्या या तीन मंत्र्यांनीं डांबर फासावें ना ?

क्रांतीच्या अमर चिन्हांनीं पवित्र झालेल्या साताऱ्याच्या पवित्र भूमीवर या तीन हरामखोर माणसांनीं गलिच्छ महाराष्ट्रद्रोहाचा शेणसडा शिंपावा ना? हर हर!

फलटणच्या या तीन सातारी मंत्र्यांनीं जो महाराष्ट्रद्रोहाचा शिमगा साजरा केला, त्याचें पौरोहित्यहि एका 'वाईकर भटजी'नें—तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं—केलें, ह्याचाहि आम्हांला अत्यंत विषाद वाटतो. सोरटी सोमनाथाच्या प्रतिष्ठापनेचें महन्मंगल पुण्यकृत्य ज्या हातांनीं केलें त्याच हातांचा उपयोग या तीन महाराष्ट्र-द्रोह्यांना आशीर्वाद देण्यामध्यें व्हावा ना? महाराष्ट्रांतल्या परमपावन कृष्णानदीचें मधुर तीर्थ प्राशन करण्यांत ज्यांचा जन्म गेला त्या 'तर्कतीर्थां'ना मोरारजींचें लवणतीर्थ प्राशन करण्याची आतां ज्याअर्थीं दुर्बुद्धि झालेली आहे, त्याअर्थीं इतःपर त्यांना 'तर्कतीर्थ' न म्हणतां 'नर्कतीर्थ' असें म्हणण्यांत यावें असें आम्ही सुचवितों. महाराष्ट्रद्रोहाचा शिमगा अशा रीतीनें विधिपूर्वक साजरा झाल्यानंतर या तीन हरामखोर मंत्र्यांना श्री. सौ. लक्ष्मीदेवी निंबाळकर ह्यांनीं पंचारतीनें ओवाळिलें असें म्हणतात. महाराष्ट्राच्या पाठींत खंजीर खुपसण्याचा एवढा लोकोत्तर पराक्रम करणाऱ्या या तीन मायेच्या पूतांचा सन्मान करण्यासाठीं मनमोहन राज-वाड्याबाहेर शेकडों लोक काळीं निशाणें आणि पादत्राणें घेऊन आले होते. म्हणून पंचारती ओवाळण्याचा हा विधि घाईघाईनें दारें बंद करून लक्ष्मीदेवींनीं उरकून घेतला.

आपल्या महाराष्ट्रद्रोहाचें समर्थन करतांना ह्या त्रिकूटाचे प्रमुख श्री. यशवंतराव चव्हाण ह्यांनीं या प्रसंगीं वक्तव्य करतांना जे अकलेचे तारे तोडले तें त्यांच्या शेंदाड शूरपणाला सर्वस्वीं शोभण्यासारखेच होते. ते म्हणाले, "राजिनामे, उपवास, निदर्शनें, संप हे मार्ग संयुक्त महाराष्ट्राचें उद्दिष्ट साध्य होण्याच्या दृष्टीनें योग्य नव्हेत. उलट मुंबईत नुकतींच जीं निदर्शनें झालीं त्यामुळें मुंबई आणि महाराष्ट्र ह्यांतील अंतर मात्र वाढलेलें आहे. शंकरराव देव यांनीं आतां उपासाची भाषा बंद करावी. 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा'ची मागणी पदरांत पाडून घेण्यासाठीं शंकरराव देव यांचें नेतृत्व मान्य करण्यास आपण तयार नाहीं. मुंबई विधानसभेचें अधिवेशन चालू असतां मीं राजिनामा दिला नाहीं. उलट देणाऱ्यांना विरोध केला. ह्याबद्दल मला वाईट वाटत नाहीं. पण त्याचा अभिमान वाटतो. तो निर्णय मीं माझ्या सदसद्विवेक बुद्धीला स्मरून घेतला होता. राजिनामे देणें म्हणजे मुंबईतील गैरप्रकारांना नैतिक पाठिंबा दिल्याचें माप पदरीं घेण्यासारखें होतें.

म्हणून स्वतःचा बळी गेला तरी हरकत नाहीं, पण सत्य स्थिति स्पष्ट करणें मला माझें कर्तव्य वाटतें. मंत्रिपदाचा मला मोह नाहीं. काँग्रेसमध्यें मी जेव्हां शिरलों तेव्हां मंत्री होईन असें स्वप्नांत सुद्धां मला वाटलें नाहीं. मी अपघातानें मंत्री झालों. दोन वर्षांपूर्वी मीं जें सांगितलें तेंच पुन्हा सांगतों. पं. नेहरू आणि संयुक्त महाराष्ट्र असा जर प्रश्न निर्माण झाला तर पंडित नेहरूंचें नेतृत्व मी डोळे झाकून स्वीकारीन. ह्या प्रश्नावर भावनेच्या आहारीं जाण्यांत अर्थ नाहीं. संयुक्त महाराष्ट्रावरील माझी निष्ठा मूलभूत स्वरूपाची आहे." देशद्रोही माणसें आपला भ्याडपणा आणि आपलें पातक लपविण्यासाठीं मोठमोठ्या तत्त्वांच्या आणि सिद्धांतांच्या वल्गना करीत असतात. त्याच न्यायानें 'नैतिक पाठिंबा', 'सदसद्विवेक बुद्धि,' 'मूलभूत निष्ठा' इत्यादि 'पवित्र' शब्दांची यशवंतरावांनीं आपल्या भाषणांत खैरात केलेली आढळते. पण हें सगळें यशवंतरावांचें ढोंग आहे.

ज्या यशवंतरावांना काँग्रेसचा आणि नेहरूंचा एवढा मोठा पुळका आज आलेला आहे, तेच यशवंतराव पंधरा सोळा वर्षांपूर्वी रॉयिस्ट पक्षांत होते. आणि काँग्रेसला नि गांधी-नेहरूंना भांडवलदारांचे प्रतिनिधि म्हणून वाटेल त्या शिव्या देत होते. हें यशवंतराव विसरले असले तरी आम्ही विसरलों नाहींत. काँग्रेसबद्दलची त्यांची 'मूलभूत' निष्ठा ही अशा प्रकारची होती. पंधरा-सोळा वर्षांपूर्वींची गोष्ट कशाला ? अवघ्या दोन महिन्यापूर्वी 'शंकरराव देव हे संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचे आत्मा आहेत, प्राण आहेत' असें घसा खरडून हेच यशवंतराव ओरडत होते. त्यांनाच शंकररावांचें नेतृत्व आतां कस्पटाप्रमाणें वाटूं लागलें आहे. मंत्रिपदाचा राजिनामा न देण्याचा निर्णय आपण आपल्या सदसद्विवेकबुद्धीला करून घेतला असें यशवंतराव म्हणतात. संधिसाधु लोकांना 'सदसद्विवेकबुद्धि' ही एक मोठी संभावित सबब आहे. सद् आणि असद् यांचा विचार यशवंतरावांनीं कसा बरें केला असेल ? मंत्रिपदाची प्रतिष्ठा आणि सत्ता हें 'सद्' आणि कऱ्हाडला जाऊन पुन्हा वकिली सुरूं करणें हें 'असद्', तेव्हां या सदसद्विवेकाचा निर्णय मंत्रिपदाचा राजिनामा न देण्यांत व्हावा, हें साहजिकच आहे. यशवंतराव हे अपघातानें मंत्री झाले असतील. पण आतां मात्र आपलें मंत्रिपद 'महाराष्ट्रघाता' नें कायम ठेवण्याचा त्यांचा विचार दिसतो आहे. म्हणूनच राजिनामे वगैरे देण्याच्या मार्गावर त्यांचा आतां विश्वास राहिलेला नाहीं. शंकरराव देवांच्या उपासावर किंवा नेतृत्वावरहि त्यांचा विश्वास नाहीं. काँग्रेसेतर पक्षांनीं चालविलेल्या

निदर्शन, संप इत्यादि गोष्टींना तर ते गैरप्रकारच म्हणतात. त्यांचा विश्वास आतां फक्त नेहरूंवरच आहे. 'संयुक्त महाराष्ट्र कीं नेहरू' असा प्रश्न उपस्थित झाला तर आपण नेहरूंवर निष्ठा ठेवूं, महाराष्ट्रावर ठेवणार नाहीं, असें म्हणण्यांत 'संयुक्त महाराष्ट्र'संबंधीं यशवंतरावांनीं आपली मूलभूत निष्ठा जी प्रकट केली आहे, तिचीं मूळें मंत्रिपदाच्या आसनाखालीं खोल रुतून बसलीं आहेत हें काय आम्हांला माहीत नाहीं?

जो माणूस पंधरा-सोळा वर्षांपूर्वी कॉंग्रेसला आणि नेहरूंना शिव्या देत होता, आणि महाराष्ट्राची आपण परवा करणार नाहीं, पण नेहरूंना डोक्यावर घेऊन नाचूं, असें जो आज म्हणतो आहे, त्याचें अंतरंग न ओळखण्याइतकें का महाराष्ट्रांतले लोक मंदबुद्धि आहेत? महाराष्ट्रापेक्षां नेहरू आपल्याला मोठे वाटतात अशी भाषा लोकशाही राज्यामधल्या एका जबाबदार मंत्र्यानें बोलावी याचें आम्हांस सर्वांत आश्चर्य वाटतें. अमेरिकेंतला एखादा मंत्री जर असें म्हणाला असता कीं 'अमेरिकेपेक्षां मला आयसेनहॉवर मोठे वाटतात', किंवा इंग्लंडमधला एखादा मंत्री जर असें म्हणाला असता कीं 'इंग्लंडपेक्षां मला चर्चिल मोठे वाटतात', तर त्याच्या देशबांधवांनीं त्याला धक्के मारून मंत्रिपदावरून हाकलून दिलें असतें. एखाद्या राजाच्या दरबारांतल्या खुशमस्कऱ्या सरदारानें किंवा थुंकीझेल्या भाटानें आपल्या राजाची जशी भरमसाट स्तुति करावी, तसा यशवंतरावांनीं नेहरूप्रशंसेचा अगदीं अतिरेक करून सोडला आहे. भारतांत आतां राजेशाही नाहीं, लोकशाही आहे, हें यशवंतराव काय विसरले आहेत कीं काय? कोणतीहि व्यक्ति कितीहि मोठी असली तरी लोकशाही राज्यांत ती व्यक्ति लोकांपेक्षां मोठी आहे असें म्हणणें म्हणजे लोकशाहीशीं द्रोह करण्यासारखें आहे एवढें समजण्याइतकीसुद्धां अक्कल यशवंतरावांना नाहीं?

नेहरू कितीहि मोठे असले तरी त्यांची स्तुति करण्याची ही काय रीत झाली? नेहरू महाराष्ट्रापेक्षां मोठे आहेत एवढें म्हणून तरी यशवंतराव कां थांबले कोणास ठाऊक? ते असें कां म्हणाले नाहींत, कीं नेहरू भारतापेक्षां मोठे आहेत, नेहरू जगापेक्षां मोठे आहेत, नेहरू परमेश्वरापेक्षां मोठे आहेत! छे, छे, छे, यशवंतराव हा माणूस इतका लोचट आणि खुषमस्कऱ्या असेल अशी आमची कल्पना नव्हती. महाराष्ट्रापेक्षां मी नेहरूंना जास्त मानतों याचा अर्थ काय? तीन कोटी मराठी माणसांचें वाटोळें झालें तरी मी त्याची पर्वा करणार

नाहीं. मी आपला नेहरूंच्या पायांवर लोटांगणें घालीत बसेन! असाच कीं नाहीं याचा अर्थ? आम्ही यशवंतरावांना विचारतों कीं तुम्हांला नेहरूंना डोक्यावर घेऊन नाचावयाचें असेल तर खुशाल नाचा. पण तेवढ्यासाठीं महाराष्ट्राला पायाखालीं तुडविण्याचें तुम्हांला काय कारण आहे? नेहरू आज कीर्तीच्या आणि लोकप्रियतेच्या शिखरावर जाऊन बसलेच आहेत. त्यांचे हात आभाळाला पोहोंचलेले आहेत. अशा थोरपुरुषाची मुक्तकंठानें स्तुति केली म्हणजे तो तर खूष होईलच होईल, पण महाराष्ट्राच्या निर्भर्त्सनेचें आपलें पाप सहज पचून जाईल अशी यशवंतरावांची समजूत आहे. पण तो त्यांचा भ्रम आहे असें आम्ही त्यांना सांगतों. महाराष्ट्राशीं द्रोह करून यशवंतरावांनीं महाराष्ट्राची एवढी आगळीक केली आहे कीं त्याबद्दल महाराष्ट्र त्यांना कालत्रयीं क्षमा करणार नाहीं.

ज्या मंत्रिपदाच्या मोहासाठीं यशवंतरावांनीं महाराष्ट्राशीं अशी निमकहरामी केली तें मंत्रिपद त्यांना महाराष्ट्राच्या कृपेनें मिळतें का नेहरूंच्या कृपेनें मिळतें याचा खणखणीत जबाब त्यांना महाराष्ट्राकडून आज ना उद्यां मिळाल्यावांचून राहणार नाहीं. महाराष्ट्राचे सारे दुष्मन् आज चव्हाणांना डोक्यावर घेऊन नाचत आहेत. यावरून महाराष्ट्राशीं त्यांनीं केलेली निमकहरामी केवढी भयंकर आहे याची कल्पना येऊं शकेल! सदोबा पाटील, के. के. शहा, अन् 'ब्लिट्झ' पत्राचे करंजिया हे यशवंतरावांची तर एकसारखी पाठ थोपटून राहिले आहेत. करंजिया म्हणतात, "सत्तेच्या राजकारणापेक्षां देशभक्तीला अधिक किंमत देणारे यशवंतराव चव्हाण हे अग्रगण्य महाराष्ट्रीय पुढारी आहेत. त्यांना मी वंदन करतों. त्यांनीं मोरारजीसाठीं देवांचा विश्वासघात केलेला नाहीं. पण देवांच्या गैरनेतृत्वापेक्षां नेहरूंच्या श्रेष्ठ नेतृत्वाला आपण अधिक मानतों असें ते म्हणाले. गुजरात्यांचा कैवार घेऊन त्यांनीं महाराष्ट्राचा विश्वासघात केलेला नाहीं. आपण जातीयवादी महाराष्ट्रीय नसून अस्सल भारतीय देशभक्त आहोंत असें त्यांनीं सिद्ध केलें आहे. चव्हाणांना धन्यवाद असोत!" यशवंतरावांच्या शंभर टक्के देशभक्तीबद्दल करंजियासारखे महाराष्ट्राचे शंभर टक्के दुष्मन् जेव्हां निर्लज्जपणें सर्टिफिकिटें देतात, तेव्हां यशवंतरावांच्या महाराष्ट्रद्रोहाबद्दल आणखी निराळें पुरावे देण्याचें काय कारण आहे?

यशवंतरावांच्या बरोबर फलटणच्या राजवाड्यांत महाराष्ट्रद्रोहाचें शेण खावयास गणपतिबोवा तपासे आणि मालोजीबुवा निंबाळकर हे दोन मराठी मंत्री तयार

व्हावेत याचें आम्हांला कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. गणपतिबुवा तपासे यांची मंत्री होण्याची लायकी काय तर ते 'हरिजन' आहेत एवढीच. दुसरी कांहीं नाहीं. मंत्रिमंडळांत त्यांचा समावेश झाला नसता तर गटारें तपासण्यासाठीं सुद्धां त्यांची कोणीं नेमणूक केली नसती. अन् मालोजीबुवा निंबाळकर यांच्याबद्दल तर कांहीं बोलायलाच नको. एखाद्या नंदीबैलाला सुद्धां त्यांच्यापेक्षां जास्त अक्कल असेल. त्यांच्या पत्नी सौ. लक्ष्मीदेवी निंबाळकर ह्या एक मोठ्या वजनदार बाई आहेत. त्या दर भाऊबीजेला मोरारजींना ओवाळायला जातात. मालोजीबुवांना मिळालेलें मंत्रिपद ही मोरारजी 'भाई'नीं लक्ष्मी 'ताई'च्या ताटांत घातलेली ओवाळणी आहे. मालोजीबुवा हे बांधकाम मंत्री आहेत. पण महाराष्ट्राचें थडगें बांधण्याखेरीज ते दुसरें कोणतेंहि काम करीत नाहींत. त्यांचे उपमंत्री आहेत श्री. बाबूभाई पटेल. ते महाराष्ट्राचें वाटोळें करून गुजरातचें घर भरण्याचें काम व्यवस्थितपणें करीत असतात. अन् त्यावर डोळे झाकून शिक्कामोर्तब करीत असतात हे नंदीबैल नानासाहेब नाईक निंबाळकर.

महाराष्ट्राच्या वांट्याचे कोटयवधि रुपये राजरोसपणें आज गुजरातसाठीं खर्च होत आहेत, तरी त्याची या नंदीबैलाला दखल नाहीं. दक्षिण महाराष्ट्रांतला जो भाग राज्यपुनर्रचना समितीनें जबरदस्तीनें कर्नाटकांत घातला आहे त्याचा अंतिम निर्णय अद्यापि ठरावयाचा आहे. त्याच्या आधींच तिकडच्या रस्त्यावरील मैलांच्या दगडावरचे मराठी आंकडे पुसून त्याच्या ऐवजीं कानडी आंकडे लिहिण्याचें काम चालू झालें आहे. हें आम्हीं परवांच प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें आहे. हें मालोजीबुवा निंबाळकरांचें खातें! एका मराठी मंत्र्याच्या अधिकारक्षेत्रांत कन्नडिगांनीं एवढी दांडगाई चालविली असतांना त्याची त्यानें पर्वा करूं नये याचा काय अर्थ? अशा माणसाला बैल म्हणणें म्हणजे बैलाचाच अपमान करण्यासारखें आहे! मालोजीबुवा परवां म्हणाले, "मला कांहीं मंत्रिपदाचा मोह नाहीं. कारण पूर्वी मी मंत्र्यांच्या नेमणुका करीत होतों!" मालोजीबुवांचे हे उद्गार वाचून आम्ही पोट धरधरून हसलों. टीचभर फलटण संस्थानांत पूर्वी हे मालोजी राजे मंत्री नेमत होते खरे. पण केवढ्या पगारावर? तर महिना पाऊणशें किंवा शंभर रुपये पगारावर. अन् मालोजीबुवा असा आव आणताहेत कीं आपण जणुं कांहीं हजार दोन हजार रुपये पगारावर मंत्र्यांच्या नेमणुका करीत होतों. मालोजीबुवा इतके विनोदी असतील अशी आम्हांला कल्पना नव्हती.

मुंबई कायदेमंडळांतील काँग्रेसच्या मराठी आमदारांमध्यें चव्हाण-तपासे-निंबाळकर ह्यांच्यापेक्षां कितीतरी अधिक लायक आणि सुशिक्षित माणसें आहेत. पण त्यांना वगळून मोरारजींनीं ह्या तीन हरामखोरांना जें मंत्रिपदावर नेमलें त्याचीं कारणें उघड आहेत. आपण सांगूं तेव्हां महाराष्ट्राशीं विश्वासघात करावयाला दुसरीं कोणीहि मराठी माणसें तयार होणार नाहींत, एवढे तिघेजणच काय ते कबूल होतील याची मोरारजींना आधींपासून खात्री वाटत होती, म्हणूनच त्यांनीं या तिघांची निवड केलेली आहे. आमच्या मराठी मंत्र्यांच्या अनंत भानगडी आणि लफडीं मोरारजींच्या हातीं आहेत. त्यांचाच उपयोग करून मोरारजींनीं या तीन हरामखोरांना वेठीला धरलें असावें आणि त्यांच्या हातून फलटणच्या फितुरीचें हें नाटक घडवून आणलें असावें असें आम्हांला वाटतें. सूर्याजी पिसाळ, त्रिंबकजी डेंगळे आणि बाळाजीपंत नातू ह्यांच्याच प्रमाणें सदोबा पाटलांच्या नंतर फलटणच्या ह्या तीन हरामखोर फितुरांचीं नांवें महाराष्ट्राच्या इतिहासांत डांबराच्या रंगानें लिहून ठेवावीं लागतील.

१८-१२-१९५५

# महाराष्ट्रा, झगड्याला तयार हो!

मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची तीन कोटी मराठी माणसांची मागणी काँग्रेसश्रेष्ठी मान्य करतील असें स्वप्नांतहि आम्हांला कधीं वाटलें नाहीं. काँग्रेसश्रेष्ठी हे महाराष्ट्राचे बोलून चालून दुष्मन् आहेत. काय वाटेल तें झालें तरी मुंबई ही महाराष्ट्राला द्यावयाची नाहीं असा आठ वर्षांपूर्वी सरदार वल्लभभाई पटेल ह्यांनीं आदेश देऊन ठेवलेला आहे. महाराष्ट्र हा कितीहि शूर आणि कर्तबगार असला तरी राष्ट्राचें कल्याण कशांत आहे हें कळण्याची त्याला अक्कल नाहीं, असें दार कमिशननें आमच्या तोंडाला डांबर फासून ठेवलेलें आहे. मुंबईबाबत वल्लभभाईंचें जें धोरण होतें तेंच जवाहरलाल नेहरू ह्यांनीं सहीसही पुढें चालविलेलें आहे. मुंबई महाराष्ट्राला मिळावी अशी त्यांची इच्छा नाहीं. नव्हे, 'मुंबई महाराष्ट्राला मी देणार नाहीं' अशी त्यांनीं जणुं कांहीं प्रतिज्ञाच केली आहे. म्हणूनच 'काँग्रेस जिवंत असेपर्यंत मुंबई महाराष्ट्राला मिळणार नाहीं!' असें मोरारजीसारखे महाराष्ट्राचे वैरी छातीठोकपणें म्हणतात. म्हणूनच 'यावचंद्र दिवाकरौ मुंबई महाराष्ट्रांत जाणार नाहीं' असा सदोबासारखे निमकहराम महाराष्ट्रद्रोही दोन्ही हातांनीं पांचजन्य करतात!

फाजलअल्ली समिति हे महाराष्ट्राविरुद्ध काँग्रेसश्रेष्ठींनीं रचलेलें एक भयंकर कारस्थान आहे असें आरंभापासून आम्ही जें एकसारखें सांगतो आहोंत तें काय उगाच? मुंबई महाराष्ट्राला द्यावी हा फाजलअल्लींचा मूळचा निर्णय ह्या काँग्रेसश्रेष्ठींनींच फाडून टाकला आणि विदर्भावांचूनचें द्विभाषिक राज्य त्यांच्याच हातून त्यांनीं महाराष्ट्राच्या डोक्यावर जबरदस्तीनें लादलें. फाजलअल्ली समितीचा अहवाल प्रसिद्ध होण्याच्या आधींपासून मोरारजींनीं महाराष्ट्राभोंवती बंदुकीचा जो पहारा बसविला तो काय उगाच? फाजलअल्लींचें अहवालावर नुसतें नांव. काँग्रेसश्रेष्ठींनीं केला आंतला सारा बनाव. हा सारा इतिहास सूर्यप्रकाशासारखा स्वच्छ दिसत असतांना काँग्रेसश्रेष्ठींकडे जाऊन डोकेंफोड करण्याचें आम्हांला काय कारण होतें? शंकरराव देवांचा नेहरूंच्या न्यायबुद्धीवर कोण विश्वास! म्हणे नेहरूंचें मी मन वळवीन. नेहरूंचें

हृदयपरिवर्तन करीन. अन् नेहरूंच्या हातूनच शेवटीं 'मंगल कलश' घेईन. दिल्लीच्या एवढ्या वाऱ्या करून शंकररावांनीं नेहरूंच्या हातून काय मिळविलें? फुटकें मडकें! आले शंख करीत आतां दोन्ही हातांनीं परत. कां इतके दिवस शंकररावांनीं लोकांची फसवणूक करून त्यांच्या सहनशीलतेचा एवढा अंत पाहिला? नेहरूंना म्हणे न्यायबुद्धि आहे! प्राणांतिक उपोषण करून आंध्राचे पोट्टी श्रीरामलू बिचारे जिवानिशीं मेले; पण त्यांच्याविषयीं गौरवाचें एक अक्षर देखील त्यांच्या तोंडून निघालें नाहीं. उलट, रामलू मेले म्हणून कांहीं भाषिक आंध्र मी तुम्हांला देत नाहीं, असें नाक वर करून सांगावयाला ज्यांना संकोच वाटला नाहीं त्या नेहरूंना न्यायबुद्धि आहे असें कोण म्हणेल!

शांततापूर्वक निदर्शनें करावयाला माझी हरकत नाहीं असें मोठ्या संभावितपणें हैद्राबाद येथें नेहरू म्हणाले. पण अठरा नोव्हेंबरला मुंबईला शांततापूर्वक निदर्शनें झालीं असतांना मोरारजींनीं त्यांच्यावर बेधडक लाठीहल्ला चढवला अन् एकवीस तारखेला तर गोळीबार करून पंधरा माणसांचे त्यांनीं मुडदे पाडले. तरी नेहरूंनीं सहानुभूतीचें एक अक्षर आपल्या तोंडांतून काढलें नाहीं, त्या नेहरूंना न्यायबुद्धि तर राहोच, पण साधीं दया माया तरी आहे काय? तीन कोटी मराठी माणसांचे एका मुंबईसाठीं प्राण तडफडताहेत. लाखों जिभांनीं मुंबईसाठीं महाराष्ट्र आक्रोश करतो आहे. तरी देखील कॉंग्रेसनें महाराष्ट्राच्या काळजाचा लचका तोडला तो तोडलाच. आम्ही हें पाहिल्यापासून सांगत होतों. एक वेळ रेडा दूध देईल पण कॉंग्रेसश्रेष्ठी मुंबई देणार नाहींत!

मुंबई राज्याचे तीन तुकडे करून मुंबई शहराचें स्वतंत्र राज्य करावयाचें हा कॉंग्रेसश्रेष्ठींचा पहिल्यापासूनचा डाव होता. मोरारजी आणि सदोबा ह्यांच्या सल्ल्यानेंच तो डाव रचण्यांत आला होता. फाजलअल्ली समितीनें सुचविलेलें द्विभाषिक राज्य हें एक नुसतें सोंग होतें. तें दुतोंडी गांडूळ महाराष्ट्र कालत्रयीं स्वीकारणार नाहीं हें त्यांना पुरतें माहित होतें. आणि तसें झालें कीं मुंबई राज्याचे तीन तुकडे करून आपण नामानिराळें व्हावयाचें असा त्यांचा बेत होता. तो त्यांच्या अपेक्षेप्रमाणें यशस्वी झाला. महाद्विभाषिक राज्याचा पर्याय घेऊन जेव्हां देव, देवगिरीकर अन् हिरे दिल्लीला गेले तेव्हां तो पर्याय कॉंग्रेसश्रेष्ठी कदापि मान्य करणार नाहींत ही गोष्ट जगजाहीर होती. मोरारजी, सदोबा आणि गुजरात कॉंग्रेस ह्यांनीं त्या पर्यायाला विरोध करून तीन राज्यांची मागणी त्याच वेळीं

केली. आणि पुढें महाद्विभाषिक पर्याय नाकारला गेल्यानंतर तीन राज्यांचा निर्णय जाहीर करण्यापूर्वी नेहरूंनीं त्या योजनेला देव, देवगिरीकर आणि हिरे ह्यांच्याकडून स्पष्टपणें संमति मिळवली होती हें आतां आम्ही महाराष्ट्रांत प्रथम जाहीर करतों.

दिल्ली येथें आम्ही जेव्हां परवां गेलों होतों तेव्हां आंतमधल्या ह्या सर्व भानगडी आम्हांला त्या वेळीं तेथें समजल्या. 'नेहरू आतां फार रागावले आहेत. तेव्हां ते जें देतील ते घ्या. सध्यां विदर्भ तर आपल्या पदरांत पडतो आहे. मुंबई आपल्याला पुढें मिळवितां येईल!' असा ह्या तिघा धूर्तांनीं विचार केला आणि नेहरू–पंतांना डोळे मिचकावून सांगितलें कीं, 'आम्ही महाराष्ट्रांत जाऊन ह्या त्रिराज्य योजनेला मान्यता मिळवतों. तोंपर्यंत तुम्ही कृपा करून बोलूं नका!' देवगिरीकर आणि हिरे ह्यांनीं त्रिराज्याला आपली मान्यता दिलेली आहे अशा बातम्या त्याच वेळीं वर्तमानपत्रांतून फुटल्या होत्या. देवगिरीकर आणि हिरे ह्यांनीं त्या बातम्यांचा त्यावेळीं इनकार जरी केला असला तरी तें त्यांचें ढोंग होतें. कारण, पुढें लोकसभेंत राज्यपुनर्रचनेवर बोलतांना नेहरू आणि पंत ह्यांनीं आपल्या भाषणांत स्पष्टपणें सांगितलें कीं, 'त्रिराज्य योजना महाराष्ट्राला संमत होईल अशी आमची समजूत करून देण्यांत आली होती.' (We were given to understand that the Three-states will be acceptable to Maharashtra.) नेहरू–पंतांची अशी ही समजूत कोणीं करून दिली होती? अर्थातच देव, देवगिरीकर अन् हिरे (म्हणजे 'देव–देव–रे') ह्या तिघांनीं. 'जें काय द्यायचें असेल तें द्या—पण जलदी द्या. कांहीं तरी द्या, देव–देव–रे कुछ' अशी या तिघांची वृत्ति होती.

त्रिराज्य योजनेच्या निर्णयानंतर महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेसचे त्यासंबंधींचें मत व्यक्त होईपर्यंतच्या जवळ जवळ पंधरा दिवसांच्या काळांत शंकरराव देव कावेबाजपणें आपल्या तोंडाला कुलूप लावून बसले होते. त्याच वेळीं आम्हांला त्यांचा संशय आला. मुंबईवांचून एक क्षणभर मी जगणार नाहीं, असें पूर्वी बोलणारा हा माणूस मुंबई महाराष्ट्रापासून तोडण्याचें कॉंग्रेसश्रेष्ठींनीं ठरविलें तरी आतां हूं का चूं सुद्धां करीत नाहीं ह्याचें त्यावेळीं आम्हांला अतिशय आश्चर्य वाटलें. त्या दरम्यान शंकरराव एकदांच कुठें तरी बोलले कीं, 'संयुक्त महाराष्ट्र निर्माण होण्याची प्रक्रिया आतां सुरू झाली!' त्या वाक्याचा अर्थ आतां उत्तम लागतो. महाराष्ट्र कॉंग्रेसनें त्रिराज्याला पाठिंबाहि दिला नाहीं किंवा

विरोधहि केला नाहीं. कारण बाहेर महाराष्ट्रांत संयुक्तमहाराष्ट्रवादी जनतेनें आपलें उग्र स्वरूप दाखवावयाला त्यावेळीं सुरुवात केली. तेव्हां तिचा क्रोध महाराष्ट्र काँग्रेसला ओढवून घ्यायचा नव्हता. अठरा, वीस आणि एकवीस नोव्हेंबर रोजीं मुंबईच्या जनतेनें आपलें जें अक्राळविक्राळ स्वरूप दाखविलें तें बघून मोरारजी नि सदोबा तर गर्भगळितच झाले. पण 'देव-देव-रे' मंडळींची सुद्धां पांचावर धारण बसली. त्यांना कांहींच बोलतां येईना. त्रिराज्य योजनेला मराठी जनता एवढ्या प्राणपणानें विरोध करील अशी त्यांची कल्पना नव्हती. मुंबई कायदे मंडळांतील त्रिराज्य योजना चर्चा त्याच वेळीं बारगळली. अन् पुढें बावीस डिसेंबर रोजीं मुंबई शहराचा समावेश महाराष्ट्रांत केला पाहिजे असा निर्णय देऊन मुंबई कॉर्पोरेशननें सर्वच त्रिराज्यवाल्या मंडळींवर एक प्रचंड बॉंबगोळा टाकला!

तथापि, काय वाटेल तें झालें किंवा प्रत्यक्ष आभाळ जरी कोसळून धरणीवर पडलें तरी मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रांत करावयाचा नाहीं ही खूणगाठ नेहरूंनीं आपल्या मनाशीं पक्की बांधून ठेवली होती. तुम्हांआम्हांला त्यावेळीं वाटलें कीं मुंबई कॉर्पोरेशनच्या निर्णयानंतर आतां मुंबई राज्य स्वतंत्र करण्याची काँग्रेसश्रेष्ठींची छाती नाहीं. पण तो निव्वळ भ्रम होता. नेहरू अन् पंत हीं माणसें आतां पूर्वी-सारखीं साधीं राहिलेलीं नाहींत. देव-देवगिरीकर अन् हिरे ह्या तीन अजागळांना हाताशीं धरून संयुक्त महाराष्ट्राचा खेळखंडोबा करण्याचें नाटक पुन्हा त्यांनीं सुरू केलें. नेहरू अन् मोरारजी ह्यांनीं जुहूच्या वाळवंटावर खलबतें करून मुंबईला व्यापारी राजधानी करण्याचा एक नवा बूट काढला. तो अमान्य झाल्यानंतर महाद्विभाषिक राज्याचा शंकररावांनीं सुचविलेला जुना पर्याय पंतांनीं पुन्हा उकरून काढला अन् तो त्यांच्या गळ्यांत अडकवून जुहूला मोरारजींकडे त्यांना परत पाठवून दिलें. तो पर्याय मोरारजींनीं काय वाटेल तें करून मान्य करावा एवढ्यासाठीं आपल्या कमरेचा पंचा सोडून मोरारजींच्या डोक्याला बांधावयाला सुद्धां शंकररावांनीं कमी केलें नाहीं. पांच वर्षांची मुख्य प्रधानकी मोरारजीला. पन्नास टक्के मंत्रिपदें गुजरात्यांना. पांच वर्षांनंतर महाद्विभाषिक राज्यामधून बाहेर पडण्याची परवानगी गुजरात, मुंबई आणि विदर्भाला. मोरारजी काय जें मागतील तें देण्याची देवांनीं तयारी दाखविली. 'दुसऱ्यांना नाखुष करून मला कांहीं नको. त्यांचें समाधान झालें तर मला त्यांनीं द्यावें!' येथपर्यंत देवांच्या औदार्याची मजल गेली होती. पण काकासाहेब गाडगीळांनीं हा 'गद्धे कोट' उधळून लावला, आणि त्याचे तीन

तेरा वाजविले, तेव्हां देवबाप्पा हिरमुसल्या तोंडानें कारवा वर करून पुण्याला परतले.

यापुढें कॉंग्रेसश्रेष्ठींशीं वाटाघाटी करण्यासारखें कांहींच उरलें नाहीं. आतां ते देतील तो निर्णय मुकाट्यानें मान्य करावयाचा एवढेंच काय तें बाकी उरलें. तोंच पुन्हा देव–देवगिरीकर–हिरे ह्यांना दिल्लीचें पाचारण आलें. लोकांच्या अपेक्षेचा पारा पुन्हा भरभर वर चढत गेला. सर्वांना वाटलें कीं आतां कांहीं तरी अघटित होणार अन् मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचें स्वप्न कांहीं तरी प्रमाणांत साकार होणार! पण कसचें काय अन् कसचें काय? देव–देवगिरीकर अन् हिरे ह्यांच्यासारखे अजागळ रडतराऊत अन् दळभद्रे पुढारी महाराष्ट्राला मिळाल्यानंतर त्याचें जितकें कांहीं वाटोळें व्हावयाचें होतें तितकें तें होणार, हें मुळीं ठरूनच गेल्यासारखें होतें. नाना पर्यायांचीं आमिषें दाखवून कॉंग्रेसश्रेष्ठींनीं देव–देवगिरीकरांची देशभर धिंड काढली, त्यांच्या मुत्सद्देगिरीचें दिवाळें वाजविलें अन् शेवटीं त्रिराज्य योजना देऊन त्यांचे तीन पाट काढले! आपली योग्यता किंवा अक्कल नसतांना एकादें महाकार्य अंगावर घेण्याचा जे आगाऊपणा करतात ते स्वतःचाहि नाश करतात अन् त्या कार्याचेंहि वाटोळें करून टाकतात. देव-देवगिरीकर आणि हिरे ह्यांनीं त्रिराज्य योजनेला प्रारंभापासून संमति दिली म्हणून तीच शेवटीं महाराष्ट्राच्या बोकांडीं येऊन बसली. संयुक्त महाराष्ट्राच्या कैवाराचें सोंग करून ह्या तिघांनीं संयुक्त महाराष्ट्राचा सर्वांत जास्त विश्वासघात केला आणि तीन कोटी मराठी माणसांचे अक्षरशः गळे कापले!

आतां पुढें काय? तीन कोटी मराठी माणसांच्या आकांक्षा धुळीला मिळवणाऱ्या कॉंग्रेसला यापुढें महाराष्ट्रांत किंवा मुंबईत स्थान नाहीं ही काळ्या दगडावरची रेघ आहे. कॉंग्रेसचीं थडगीं बांधण्याचें कार्य मुंबईमध्यें आणि महाराष्ट्रांत आतां ताबड-तोब सुरूच करावयाला हवें. मुंबईवांचून महाराष्ट्र जिवंत राहणें मुळीं अशक्यच आहे. महाराष्ट्राच्या राजधानीबाबत आतांच वाद सुरू झालेला आहे. पुणें का नागपूर? महाराष्ट्राचें वाटोळें करण्यासाठीं बियाणी-कन्नमवारसारखे स्वतंत्र-विदर्भवादी हातांत विस्तव घेऊन उभेच आहेत! विदर्भ-महाराष्ट्राचें हें भांडण पचविण्याचें सामर्थ्य फक्त मुंबईत आहे. मुंबई हें महाराष्ट्राचें मस्तक असल्यानें तें कापून बाकीचें राहिलेलें कबंध फार वेळ तग धरूं शकणार नाहीं. म्हणून जेवढ्या लौकर मुंबई आणि महाराष्ट्र ह्यांचें पुनर्मीलन होऊन संयुक्त महाराष्ट्र निर्माण होईल तेवढें आपल्या कल्याणाचेंच आहे. संयुक्त महाराष्ट्राचा लढा गेले

तीन महिने डाव्या गटाच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्रांतील जनता एकजुटीनें आणि खंबीरपणें लढते आहे. जागृत आणि प्रक्षुब्ध झालेल्या या प्रचंड जनशक्तीला महाराष्ट्रामधल्या कॉंग्रेसनेत्यांनीं हेतुपुरःसर डावललें आहे.

संयुक्त महाराष्ट्र मेला तरी हरकत नाहीं, पण महाराष्ट्रामधला आपला कॉंग्रेसपक्ष टिकला पाहिजे एवढयाच गोष्टीची त्यांना परवा आहे. त्यांच्याच अवसानघातकी आणि कचखाऊ धोरणामुळें तर संयुक्त महाराष्ट्राचें वाटोळें झालें आहे. म्हणून संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांनीं ह्यापुढें कॉंग्रेसशीं सर्वतोपरी असहकार पुकारला पाहिजे. नव्हे, जे महाराष्ट्रीय यापुढें कॉंग्रेसमध्यें राहतील त्यांचा जाहीरपणें धिक्कार केला पाहिजे. त्यांच्यावर व्यावहारिक, सामाजिक आणि आर्थिक बहिष्कार घातला पाहिजे. कॉंग्रेसशीं निष्ठा राखून संयुक्त महाराष्ट्राशीं इमान ठेवूं इच्छिणारे डॉ. नरवण्यांसारखे जे लोक आहेत, त्यांना 'ही तारेवरची कसरत आतां पुरे झाली!' असें जनतेनें निक्षून बजावून सांगितलें पाहिजे. कारण त्यांच्या ह्या दुहेरी धोरणामुळें संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यांत फार मोठा बुद्धिभेद निर्माण होण्याचा संभव आहे. डॉ. नरवणे किंवा त्यांचे सहकारी ह्यांना संयुक्त महाराष्ट्रासाठीं प्रामाणिकपणें लढावयाचें असेल, तर त्यांनीं कॉंग्रेसशीं कोणत्याहि तऱ्हेचें नातें यापुढें ठेवतां कामा नये.

डाव्या गटांच्या एकजुटीबाबतहि संयुक्त महाराष्ट्रवादी जनतेला आम्हांला एक इशारा देऊन ठेवावयाचा आहे. आम्ही स्वतः ह्या एकजुटींत पहिल्यापासून आहोंत म्हणून आम्हांला अंतर्गत धोक्याची विशेष जाणीव आहे. एकवीस नोव्हेंबरपर्यंत सर्व डावे आणि पुरोगामी पक्ष 'संयुक्त महाराष्ट्र कृति समिती'च्या नेतृत्वाखालीं मुंबईंत काम करीत होते. त्यानंतर ही कृतिसमिती एकदम स्थगित करण्यांत आली. कां, तें आम्हांस माहीत नाहीं. त्यानंतर मुंबईमधला संयुक्त महाराष्ट्राचा झगडा प्रत्येक पक्ष आपापल्या व्यासपीठावरून लढूं लागला. त्यांत डॉ. नरवण्यांनीं आपली चूल आणखी निराळी मांडली. हा सर्व तमाशा संयुक्त महाराष्ट्रवादी जनतेनें एकदम थांबविला पाहिजे. कोणींहि संयुक्त महाराष्ट्राची सभा बोलावली कीं तेथें प्रचंड संख्येनें हजर राहावयाचें ही संवय आतां लोकांनीं थांबविली पाहिजे.

व्याख्यानांचें आणि परिषदांचें पर्व आतां संपलें. आतां मोर्चे, निदर्शनें, असहकार, बहिष्कार, कायदेभंग अन् तुरुंगभरती ह्यांचें पर्व सुरू झालें आहे.

म्हणून आतां ह्या लढ्याला प्रखर अन् संघटित नेतृत्वाची आवश्यकता आहे. यापुढें संयुक्त महाराष्ट्राचा लढा पक्षनिष्ठेनें जो लढेल त्यावर संयुक्त महाराष्ट्रवाद्यांनीं कडकडीत बहिष्कार टाकला पाहिजे. कठोर शिस्तीनें आणि समान ध्येयानें एकत्र बांधलेली लढाऊ आघाडी सर्व डाव्यांनीं ताबडतोब स्थापन केली, तरच मुंबईच्या स्वतंत्र राज्यांत महाराष्ट्रीयांचें बहुमत करून तिचा संयुक्त महाराष्ट्रामध्यें ताबडतोब समावेश करून घेतां येईल. लक्षांत ठेवा, महाराष्ट्राचे सारे दुष्मन् श्री. डाह्याभाई पटेलांच्या मुखानें तुम्हांला हिणवीत आहेत कीं, 'संयुक्त महाराष्ट्र मेला!' म्हणून. त्यांना कृतीनें दाखवा कोण मेलें आहे अन् कोण जिवंत आहे तें!

१५-१-१९५६

# शुरू हुवा है जंग हमारा!

माझ्या तीन कोटी मराठ्यांनो! ऐका! कान देऊन नीट ऐका! गेल्या सोमवारीं पहाटे ब्राह्ममुहूर्तावर महाराष्ट्रदुष्मन् मोरारजी देसाई ह्यांनीं 'संयुक्त महाराष्ट्र'च्या विरोधी संग्रामाचा नारळ 'संयुक्त महाराष्ट्र' चळवळीच्या चारशें पुढाऱ्यांना आणि कार्यकर्त्यांना पकडून फोडला. दिवसाढवळ्या सूर्यप्रकाशांत त्यांना पकडण्याची मोरारजी ह्यांची छाती नव्हती. म्हणून चोरासारखा आणि दरवडेखोरासारखा त्यांनीं महाराष्ट्राच्या ह्या बहादूर वीरांवर पहाटेच्या अंधारांत लपतछपत येऊन छापा घातला. मोरारजी हा किती शूर माणूस आहे हें सर्वांना ठाऊक आहे. बलसाडच्या निवडणुकींत त्याचें जनतेनें नाक कापलें. तरी तो आपल्या पराक्रमानें (आणि नेहरूंच्या मदतीनें) मुंबई राज्याचा मुख्य प्रधान झाला. परमेश्वराखेरीज तो कोणालाहि भीत नाहीं किंवा कोणालाहि मानीत नाहीं. आणि एकशेंएकावन्न पोलीस त्यांच्या भोंवतीं रात्रंदिवस पहारा करीत असतांना त्यांनीं परमेश्वराला तरी कां भ्यावें? एकवीस नोव्हेंबरला पंधरा आणि सत्रा जानेवारीला एक अशीं सोळा माणसें त्यांनीं गोळ्या घालून ठार मारलीं. इंग्रजांनीं जेवढा गोळीबार केला नसेल तेवढा मोरारजींनीं गेल्या नऊ वर्षांत केला. पण इंग्रजांच्या गोळ्यांत आणि मोरारजींच्या गोळ्यांत फरक होता. इंग्रजांच्या गोळ्या ह्या शुद्ध हिंसात्मक होत्या. पण मोरारजींनीं आपल्या गोळ्यांना गांधीवादाचें अहिंसात्मक लोणी फासलें होतें. त्यामुळें त्यांनीं जीं माणसें मेलीं, त्यांना मरतांना बिलकूल यातना झाल्या नाहींत. इंग्रजांच्या बंदुकीच्या गोळ्यांनीं जीं माणसें मेलीं तीं तडफडून तडफडून मेलीं. पण मोरारजींनीं जीं माणसें मारलीं, तीं अत्यंत सुखासमाधानानें मेलीं, कोणालाहि त्रास तकलीफ झाली नाहीं अशी स्वर्गांतल्या पी. टी. आय. ची बातमी आहे.

'संयुक्तमहाराष्ट्रवादी' वीरांवर लाठीमार करून, अश्रुधूर सोडून, गोळ्या मारून, आणि त्यांना तुरुंगांत पाठवून महाराष्ट्राला भारताच्या इतिहासामधून आणि भूगोलांतून नेस्तनाबूद करतां येईल अशी मोरारजी आणि नेहरू ह्यांची कल्पना

आहे. त्यांचा हा भ्रम दूर करणें हें, माझ्या तीन कोटी मराठी मर्दांनो, तुमचें कर्तव्य आहे. दिल्लीचें राज्य मुंबईवर येणार हा कॉंग्रेसश्रेष्ठींचा निर्णय जाहीर होण्यापूर्वीच त्यांनीं 'संयुक्त महाराष्ट्र' वादी आघाडीच्या नामवंत नेत्यांना स्थानबद्ध केलें. त्यांना असें वाटलें कीं पुढारी तुरुंगांत घातले कीं 'संयुक्त महाराष्ट्र'ची चळवळ तिथल्या तिथें मरेल—ठार होईल. पण पुढाऱ्यांना पकडल्याची बातमी ज्या क्षणीं प्रसिद्ध झाली त्या क्षणीं मुंबईच्या लक्षावधि जनतेनें आपले सारे दैनंदिन व्यवहार बंद करून नेहरू आणि मोरारजी ह्यांना असें बजावलें कीं प्राण गेला तरी मुंबईवर दिल्लीचें राज्य आम्ही येऊं देणार नाहीं! महाराष्ट्राचा आणि दिल्लीचा झगडा जुना आहे. महाराष्ट्रामधल्या साऱ्या घरांच्या दरवाज्यांचीं तोंडेंच दिल्लीकडे आहेत. म्हणून आम्ही आमच्या दरवाजांना 'दिल्ली दरवाजे' म्हणतों. महाराष्ट्राची राजधानी जी मुंबई, ती हिरावून घेण्याचा नेहरू ह्यांनीं नभोवार्णावरून जाहीर केलेला निर्णय महाराष्ट्राच्या तीन कोटी मराठ्यांनीं गेल्या सोमवारीं लाथेनें उडविला. आतां दिल्लीचें राज्य एक क्षणभरहि मुंबईमध्यें टिकूं शकणार नाहीं.

ह्या भारतांत महाराष्ट्राचे कोणीच मित्र नाहींत. कॉंग्रेसच्या कार्यकारिणींत एकहि महाराष्ट्रीय माणूस नाहीं. नेहरूंच्या भोंवतीं नंदाभाई, खंडूभाई, ढेबरभाई, मोरारजीभाई ह्या महाराष्ट्राच्या शत्रूंचा गराडा पडलेला आहे. मग महाराष्ट्राच्या तीन कोटी जनतेचा आवाज नेहरूंना कसा ऐकूं येणार? कांहीं दिवसांपूर्वी दिल्लीमध्यें भारतामधल्या सर्व मुख्य प्रधानांची परिषद् भरली होती. पण त्या मेळाव्यांत एकहि मराठी मुख्य प्रधान नव्हता. मुंबई राज्यांत पावणेदोन कोटी मराठी माणसें. पण त्यांचा मुख्य प्रधान कोण? तर गुजराती मोरारजी—महाराष्ट्राचा दुष्मन् मोरारजी. मध्यप्रदेशांत पाऊण कोटी मराठी लोक, पण त्याचा मुख्य प्रधान हिंदी पं. रविशंकर शुक्ल. मराठवाड्यामध्यें पंचावन्न लाख मराठी भाषिक. पण त्याचा मुख्यप्रधान आंध्रभाषीय बी. रामकृष्णराव. एवंच, साऱ्या भारतांत एकहि महाराष्ट्रीय मुख्यप्रधान नसावा ह्याचें वैषम्य, माझ्या तीन कोटी मराठ्यांनो, तुम्हांला कधीं वाटलें आहे काय? बरें, मुख्य प्रधान जाऊं द्या. ह्या भारतांत गव्हर्नर तरी कोणी मराठी नेमण्यांत आला आहे काय? नाहीं हो, एकहि नाहीं. अणे आजारी पडले. त्यांच्या ऐवजीं एकाद्या महाराष्ट्रीय गव्हर्नराची नेमणूक नेहरूंनीं केली असती तर काय बिघडलें असतें होय? काका गाडगिळांनीं गव्हर्नरपद नाकारलें म्हणून बाकीचा महाराष्ट्र कांहीं मेला नाहीं. जिवंत आहे. रँ. परांजपे हयात आहेत. रामराव

देशमुख शिल्लक आहेत. त्याखेरीज आमचे म. म. दत्तोपंत पोतदार, केशवराव जेधे, धनंजयराव गाडगीळ ही थोर थोर मंडळी आहेत. ह्यांपैकीं कोणता माणूस भारतामध्यें गव्हर्नर होण्याच्या लायकीचा नाहीं? बरें, गव्हर्नराचा प्रश्न सध्यां बाजूला ठेवा. जगामधल्या नाना देशांत भारतानें आपले अनेक वकील पाठवलेले आहेत. त्यांमध्यें तरी कोणी एकादा मराठी माणूस आहे काय हो? नाहीं ना, एकहि नाहीं.

बाळासाहेब खेर हा भारताचा शेवटचा मराठी परराष्ट्रीय वकील. पण बाळासाहेब कसला मराठी माणूस हो? तो तर महाराष्ट्राचा कट्टर शत्रु. शिवाजी आणि लोकमान्य ह्यांना महापुरुष म्हणावयाला मुद्धां तो तयार नाहीं. अन् बेळगांव कर्नाटकामध्यें घालण्याचें सारें गुप्त कारस्थान ह्या एका नीच माणसानें रचलें. सारांश, भारताच्या राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय राजकारणांत महाराष्ट्रीय माणसांना कुठेंच स्थान नाहीं. मग मुंबईसह 'संयुक्त महाराष्ट्र' स्थापन करण्याचें तुम्हां तीन कोटी महाराष्ट्रीयांचें स्वप्न कसें खरें ठरणार? सांगा, कसें खरें ठरणार? काय वाटेल तें झालें तरी मुंबई महाराष्ट्राला मिळतां कामा नये असा आदेश दहा वर्षांपूर्वी सरदार वल्लभभाई पटेल ह्यांनीं देऊन ठेवला आहे. सरदार पटेल गेले पण त्यांचें भूत आज नेहरूंच्या मानगुटीवर बसलें आहे. तेंच त्यांच्या तोंडून आतां बोलूं लागलें आहे कीं मुंबई ही एकभाषिक महाराष्ट्राची कदापि राजधानी होऊं शकणार नाहीं. चौपाटीवरच्या सभेंत सदोबा पाटील जेव्हां उद्गारले कीं पांच हजार वर्षें मुंबई महाराष्ट्राला मिळणार नाहीं आणि मोरारजी जेव्हां किंचाळले कीं कॉंग्रेस जिवंत असे तोंपर्यंत मुंबई महाराष्ट्राला मिळणार नाहीं, तेव्हां आपणांला ती थट्टा वाटली. पण आतां जेव्हां पंडित नेहरूंनींच स्वमुखानें गेल्या सोमवारीं सायंकाळीं घोषणा केली कीं, मुंबई ही सदैव केंद्रशासितच राहील, तेव्हां सदोबांनीं आणि मोरारजींनीं त्या भयंकर घोषणा पंडित नेहरूंच्या सल्ल्यानेंच केलेल्या असाव्यात हें उघड नाहीं का?

महाराष्ट्राला मुंबई मिळूं नये, बेळगांव मिळूं नये हें कॉंग्रेसश्रेष्ठींचें कारस्थान फार जुनें आहे. त्याचा आरंभ सरदार पटेलांनीं केला. बाळोबा खेरानें त्या धोरणाची अंमलबजावणी आपल्या कारकीर्दीत इमानेंइतबारें केली. भाषावार प्रांत-रचना करण्यासाठीं नेमलेली फाजलअल्ली समिति मुंबई ही महाराष्ट्राची आहे असाच निर्णय देणार होती. त्या निर्णयाचा आपल्या हातांनीं लिहिलेला मूळ

खर्डा फाजलअली ह्यांनीं शंकरराव देव, धनंजयराव गाडगीळ, आणि भाऊसाहेब हिरे ह्यांना विश्वासांत घेऊन वाचून दाखविला. पण ऐन वेळीं ढेबरभाई, मोरारजीभाई आणि सदोबा ह्यांनीं कारस्थान रचून तो मूळ खर्डा बदलून टाकला. आणि 'ध' चा 'मा' नव्हे 'क' चा 'मा' केला. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र 'करावा' ह्याच्या ऐवजीं तो 'मारावा' असा निर्णय त्यांनीं फाजलअली ह्यांना लिहावयाला लावला. त्या निर्णयाला जेव्हां तीन कोटी मराठ्यांनीं एकमुखानें विरोध केला तेव्हां शंकरराव देव, मामा देवगिरीकर अन् भाऊसाहेब हिरे ह्या तीन अजागळ, बावळट आणि विश्वासघातकी नेत्यांना हातांशीं धरून मोरारजी आणि नेहरू ह्यांनीं वाटाघाटीचें नाटक केलें. आणि त्यांची सर्व देशभर धिंड काढून त्यांचे तीन पाट काढले.

मुंबईचें स्वतंत्र राज्य करावयाचें असा त्यांनीं आरंभीं निर्णय दिला. नंतर मुंबई ही भारताची व्यापारी राजधानी करावयाची असा त्यांनीं बूट काढला. पण शेवटीं मुंबईवर दिल्लीचीच हुकुमत चालवायची असा त्यांनीं निवाडा केला. तथापि, प्राण गेला तरी मुंबईवांचून महाराष्ट्र आम्ही मान्य करणार नाहीं असें जेव्हां साऱ्या महाराष्ट्रानें मोरारजींना नि नेहरूंना एकमुखानें बजावून सांगितलें, तेव्हां संयुक्त महाराष्ट्राच्या सर्वपक्षीय आघाडीला सुरुंग लावण्याची मोरारजींनीं मोठी धूर्त कारवाई केली. फक्त कम्युनिस्ट नेत्यांना त्यांनीं आधीं पकडलें. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही अत्याचारी कम्युनिस्टांच्या हातीं गेली असा आरडाओरडा करावयाला बऱ्याच दिवसापूर्वी मुंबई सरकारनें आणि त्यांच्या बगलबच्च्या वृत्तपत्रांनीं प्रारंभ केला होता. त्याच्याच अनुरोधानें त्यांनीं कम्युनिस्टांना प्रथम पकडलें. त्यांना वाटलें कीं त्यामुळें कम्युनिस्टांमध्यें आणि प्रजासमाजवाद्यां-मध्यें फूट पडेल. पण मोरारजींना आम्ही छातीठोकपणें सांगतों कीं संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही कोणत्याहि एका पक्षाची चळवळ नाहीं. कम्युनिस्टांना पकडलें म्हणून प्रजासमाजवादी कार्यकर्ते मागें राहतील हा त्यांचा शुद्ध भ्रम आहे. कम्युनिस्टांच्या खांद्याला खांदा लावून सारी मंडळी हा लढा प्राणपणानें लढवतील हें त्यांनीं पक्कें समजून असावें.

संयुक्तमहाराष्ट्रवादी चळवळ ही अत्याचारी आहे, हिंसावादी आहे असा मुंबई सरकारनें आणि काँग्रेसवाल्यांनीं मोठा जोराचा प्रचार चालविलेला आहे. ह्या प्रचारांत शंकरराव देव हेसुद्धां सामील आहेत. वीस नोव्हेंबर रोजीं

चौपाटीवर जेव्हां सदोबा पाटील आणि मोरारजी देसाई ह्यांनीं मराठी माणसांना अर्वाच्य शिव्या दिल्या, तेव्हां कांहीं मंडळींनीं रागावून त्यांच्यावर दगड आणि जोडे भिरकावले. पण त्याचा शंकरराव देव ह्यांनीं विपर्यास केला. संयुक्त महाराष्ट्राच्या नांवावर मराठी लोकांनीं हुल्लडबाजी केली असा ठपका ठेवून त्यांनीं पांच दिवसांचें उपोषण केलें. सदोबा–मोरारजी ह्यांनीं मराठी जनतेला शिव्या दिल्या ह्या गोष्टीकडे मात्र त्यांनीं जाणून बुजून काणाडोळा केला. भाऊसाहेब हिरे ह्यांनीं त्या हुल्लडबाजीचा निषेध केला. 'आमचे परमपूज्य (का परम पाजी?) पुढारी मोरारजी देसाई आणि सदोबा पाटील' ह्यांचा मराठी लोकांनीं चौपाटीवर अपमान केला ह्याबद्दल त्यांनीं खेद व्यक्त केला.

पंडित नेहरू हे हैद्राबादला भाषण करतांना म्हणाले कीं, "हुल्लडबाजी करून संयुक्त महाराष्ट्रवाद्यांनीं आपल्या कार्याचा घात केला!" म्हणजे गंमत पाहा, मोरारजीच्या पोलिसांनीं अठरा नोव्हेंबर रोजीं संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांवर लाठीमार केला, अश्रुधूर सोडला, आणि एकवीस तारखेस त्यांच्यावर गोळीबार करून पंधरा निरपराधी माणसें ठार केलीं, तरी देखील मोरारजी सरकार हें अनत्याचारी आणि अहिंसावादी. आणि कुठें कांहीं मंडळींनीं चार दगड अन् पांच जोडे मारले तर सारे संयुक्तमहाराष्ट्रवादी तेवढे हुल्लडबाज काय? आम्ही मोरारजी सरकारला आव्हानपूर्वक विचारतों कीं संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीमधील एकाहि जबाबदार नेत्यानें—मग तो कम्युनिस्ट असो वा प्रजासमाजवादी असो—कधीं हिंसेचा वा अत्याचाराचा प्रचार केला आहे काय? लोकशाहीच्या आणि अहिंसेच्या मार्गाचा अवलंब करून संयुक्त महाराष्ट्राचा लढा आपण लढला पाहिजे, असें सांगून सांगून संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या छात्या फुटल्या आहेत आणि घसे बसले आहेत.

आतां पुढें काय? संयुक्तमहाराष्ट्रवादी चळवळीच्या प्रमुख पुढाऱ्यांना आणि कार्यकर्त्यांना पकडून तुरुंगांत टाकण्याची मोहीम मोरारजींनीं सुरू केली आहे. हा मोरारजी काय पागल माणूस आहे काय हो? का, त्याला वेड तर लागलें नाहीं? संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना तुरुंगांत टाकून ही चळवळ थांबेल असें वाटतें कीं काय त्याला? संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचें नेतृत्व पुढाऱ्यांकडे नसून जनतेकडे आहे. मोरारजी किती लोकांना पकडील आणि किती लोकांना तुरुंगांत धाडील? त्यांचे तुरुंग संपतील पण तुरुंगांत जाणारीं मराठी माणसें संपणार नाहींत! बेचाळीसच्या लढ्यांत ब्रिटिश सरकारनें सारे पुढारी तुरुंगांत टाकल्यानंतर जसें त्या लढ्याचें

नेतृत्व जनतेनें आपल्याकडे घेतलें, त्याप्रमाणें संयुक्तमहाराष्ट्रवादी जनतेनेंहि आपले पुढारी तुरुंगांत गेल्यानंतर ह्या लढ्याचें नेतृत्व आपल्याकडेच घेतलें पाहिजे. पुढारी कार्यक्रम सांगतील किंवा आदेश देतील ह्याची कोणींहि वाट पाहूं नये. पण एक गोष्ट मात्र त्यांनीं कटाक्षानें लक्षांत ठेवावी ती ही कीं संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळींत कोणा कॉंग्रेसवाल्यांनीं आपली चूल निराळी मांडण्याचा जर प्रयत्न केला तर तिच्यावर पाणी ओतून ती त्यांनीं ताबडतोब विझवून टाकावी.

कॉंग्रेसश्रेष्ठींनीं संयुक्त महाराष्ट्राचा तर खूनच केला आहे. पण महाराष्ट्रांतल्या देव–देवगिरीकर–हिरे ह्या माजी आणि आजी कॉंग्रेसवाल्यांनीं संयुक्त महाराष्ट्राचा विश्वासघात केलेला आहे. तीन राज्यांला त्यांनींच गुप्तपणानें संमति दिली म्हणून महाराष्ट्रावर हें संकट आलें आहे. त्यानंतर डॉ. नरवणे ह्यांनीं आपल्या उपमंत्रि-पदाचा राजिनामा दिला. त्यांचें महाराष्ट्रानें फार मोठें कौतुक केलें. पण डॉ. नरवणे ह्यांनीं 'संयुक्तमहाराष्ट्रवादी कॉंग्रेसजनां' चा एक निराळाच पक्ष स्थापन करून संयुक्त महाराष्ट्राच्या लढाऊ आघाडींत एक भेद निर्माण केला आहे हें मराठी जनतेनें विसरतां कामा नये. कॉंग्रेसशीं एकनिष्ठ राहून संयुक्त महाराष्ट्राचा लढा लढणें अशक्य आहे. म्हणून गेल्या सोमवारीं रात्रौ शिवाजी पार्कवर भरलेल्या साडेचार लाखांच्या विराट सभेंत आम्ही डॉ. नरवणे ह्यांना विनंति केली कीं, 'संयुक्त महाराष्ट्रा' चा लढा साऱ्या पक्षांनीं 'संयुक्त' झाल्यावांचून लढतां येणार नाहीं. काकासाहेब गाडगिळांनाहि त्या सभेंत आम्हीं तेंच सांगितलें कीं, "काका, कॉंग्रेसमधल्या आपल्या सभासदत्वाचा राजीनामा देऊन बाहेर या आणि संयुक्त महाराष्ट्राचे पुढारी व्हा. तुमच्या जीवनांतून कॉंग्रेस गेली तर तुम्ही गल्लींतले वकील आहांत असें चौपाटीवर म्हणालांत. पण आम्ही तुम्हांला सांगतों कीं तुमच्या जीवनांत जर तुम्हीं संयुक्त महाराष्ट्र मिळवलात तर दिल्लीमधले पंतप्रधान व्हाल !"

सेनापति बापट ह्यांनीं तर त्या सभेंत जें अपूर्व भाषण केलें त्याला मुळीं तोडच नाहीं. ते म्हणाले, "पंडित नेहरूंनीं लोकशाहीचा खून केला आहे. व्यक्तीच्या खुनाला एकवेळ क्षमा करतां येईल. तत्त्वाचा जो खून करतो त्याला देहांत प्रायश्चित्ताखेरीज दुसरें प्रायश्चित्तच नाहीं. पण मी वेदांती असल्यामुळें फाशीच्या शिक्षेवर माझा विश्वास नाहीं. म्हणून मी पंडित नेहरूंना फांशीची शिक्षा फर्मावीत नाहीं. त्यांना पंतप्रधानाच्या कामावरून दूर करावें एवढीच शिक्षा देतों !" माझ्या तीन कोटी मराठ्यांनो, लक्षांत ठेवा. आतां आपलें भांडण

नेहरूंशीं आहे. नेहरूंनीं काश्मीरचें वाटोळें केलें. गोव्याचें वाटोळें केलें. आतां मुंबईचें आणि महाराष्ट्राचें वाटोळें करण्याचें त्यांनीं ठरविलें आहे. नेहरूंचें आपण आजपर्यंत कौतुक केलें, लाड केले, त्यांना डोक्यावर घेऊन नाचलों, त्याचा मोबदला त्यांनीं अशा रीतीनें आपल्याला दिला. मुंबईत नेहरू आतां कसे पाय ठेवतात तें आपण पाहूं! महाराष्ट्राच्या देवघरामध्यें आतां नेहरू ह्या दैवताला स्थान नाहीं. गणपतिबापाप्रमाणें त्यांच्या तसबिरींचें सर्वांनीं समुद्रांत विधिपूर्वक विसर्जन करावें. मुंबईला गिळण्याचा जर दिल्ली सरकारनें प्रयत्न केला तर शुक्राचार्यांचें पोट फाडून जसा कच बाहेर आला, तशी मध्यवर्ती सरकारचें पोट फाडून चौदा लाख मराठ्यांची ही मुंबई बाहेर आल्यावांचून राहणार नाहीं हें त्यांनीं लक्ष्यांत ठेवावें.

२२-१-१९५६

# नेहरू, पोलीस आणि बुद्ध

नेहरू म्हणजे एक चालतें बोलतें नाटक आहे. नाटकांतलें पात्र ज्याप्रमाणें निरनिराळ्या भावनांचा आविष्कार करतें, त्याप्रमाणें नेहरूंच्या मुखांतून प्रसंगविशेषीं परस्परविरोधी भावना—आणि परस्परविरोधी मतें सुद्धां—प्रकट होत असतात. त्यामुळें भारताच्या राजकारणाला एक अत्यंत अस्थिर स्वरूप प्राप्त झालें आहे. कारण नेहरूंच्या लहरीवर आणि मर्जीवर भारताचें राजकारण हेलकावे खात असतें. नेहरू बोलतील ते भारताच्या राजकारणाचे सिद्धांत. प्रजासत्ताक राजाच्या कारभाराला इतकें व्यक्तिनिष्ठ स्वरूप देण्याचा प्रयत्न आजपर्यंत जगांत कोणीं केला नसेल. लोकांनाहि नेहरूंकडे पाहतांना कोणता दृष्टिकोन ठेवावा हें पुष्कळदां कळत नाहीं. नेहरू कधीं प्रेमांत येतील, कधीं भडकतील अन् कधीं पश्चात्ताप झाल्याप्रमाणें प्रकटपणें आत्मपरीक्षण करतील ह्याला कांहीं नियम नाहीं.

परवांचीच गोष्ट पाहा. ग्वाल्हेर येथें भरलेल्या पोलिसांच्या मैदानी खेळांच्या मेळाव्याला त्यांनीं एक संदेश पाठविला. त्यांत ते म्हणतात, "सत्तेमुळें ह्या देशांत जास्तींत जास्त बिघडण्याचा संभव असलेला जर कोणी माणूस असेल तर तो म्हणजे मी. सत्तेनें माणूस बिघडतो असें म्हणतात. जितकी माणसाला जास्त सत्ता तितका तो जास्त बिघडण्याची भीति. पंतप्रधानाला तर सर्वांत मोठें भय. इतर मंत्री आणि सरकारी अधिकारी ह्यांनाहि तोच धोका. पोलिसाची तीच स्थिति. ह्याचें कारण सरकारच्या प्रचंड सामर्थ्याचें बळ त्याच्या मागें असतें. म्हणून अधिकाराचा दुरुपयोग न होईल ह्याची प्रत्येकानें सावधगिरी बाळगावयाची असते. वैयक्तिक सत्तेवर आणि अधिकारावर नियंत्रणें घालण्याच्या अनेक पद्धति लोकशाहीनें शोधून काढल्या आहेत. सार्वजनिक टीकेलाही लोकशाही उत्तेजन देते. देशांतला कितीहि मोठा माणूस असला तरी तो ह्या टीकेमधून सुटत नाहीं. त्यामुळें जनतेपेक्षां आपण मोठे आहोंत असें कोणालाही वाटूं नये असा तिचा उद्देश असतो. इतकी सावधगिरी बाळगूनही व्यक्तीच्या हातून अधिकाराचा दुरुपयोग होतोच.

म्हणून याला पूरक उपाय म्हणजे अधिकारपदावरील प्रत्येक माणसानें आत्मनियंत्रण आणि आत्मसंयमन करावें."

नेहरूखेरीज दुसऱ्या कोणीं हें भाषण केलें असतें तर त्यावर टीका करण्याचें कांहींच कारण पडलें नसतें. पण स्वातंत्र्य मिळाल्यानंतर गेल्या नऊ वर्षांत अधिकाराचा दुरुपयोग केल्याच्या उदाहरणांचे डोंगर देशांत सांचून राहिले आहेत. त्याकडे ज्यावेळीं आणि जें लक्ष नेहरूंनीं द्यावयाला हवें होतें तें त्यांनीं दिलें नाहीं. आणि आतां जसा कांहीं देशांत सत्तेचा विशेष काळजी करण्यासारखा दुरुपयोग झाला नाहीं असा आव आणून ते अधिकाऱ्यांना आत्मनिरीक्षण आणि आत्मसंयम करावयाला सांगताहेत. नेहरूंचें हें ढोंग आहे असें आम्ही म्हणत नाहीं. पण ह्या मनोवृत्तीमध्यें आणि ढोंगामध्यें विशेष फरक नाहीं. नेहरू अधिकारपदावर बसून बिघडले आहेत असाहि आम्ही त्यांच्यावर आरोप करीत नाहीं. पण त्यांच्या भोंवतालच्या तेजोवलयांत ते स्वतः इतके दिपून गेले आहेत कीं, बाहेर काय चाललें आहे हें त्यांना दिसत नाहीं. आणि लोक आपल्याविषयीं काय बोलताहेत हें त्यांना ऐकूं येत नाहीं. सार्वजनिक टीकेला लोकशाही उत्तेजन देते असें नेहरू तोंडानें म्हणतात खरे. पण नेहरूंच्यावर वेळोवेळीं विरोधी पक्षाकडून टीका होते तिजकडे नेहरूंनीं एकदांहि कधीं लक्ष दिलें आहे काय?

तीन कोटी जनता मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत व्हावयाला पाहिजे असा एकमुखानें आक्रोश करीत असतां त्याकडे दुर्लक्ष करून आणि मोरारजी आणि ढेबर ह्यांच्या भिडेला बळी पडून नेहरू मुंबई केंद्रशासित व्हावी असा निर्णय देतात, ह्यापेक्षां सत्तेच्या दुरुपयोगाचें अधिक ढळढळीत उदाहरण कोणतें देतां येईल? 'जनतेची सेवा करणें हें पोलिसांचें कर्तव्य आहे, तिच्यावर हुकमत गाजवणें हें नव्हे' असा नेहरू पोलिसांना संदेश देतात. अन् हिकडे मुंबईंत जनतेवर गोळीबार करून पोलीस शेकडों लोकांचे मुडदे पाडतात, त्याबद्दल निषेधाचें वा नापसंतीचें एक अक्षरहि बोलत नाहींत ह्याला काय म्हणावयाचें? नव्हे मुंबईला आले म्हणजे पोलिसांनीं 'उत्तम कामगिरी' केल्याबद्दल नेहरू त्यांची पाठ थोपटतात. मोरारजी देसाई आणि त्यांच्या हाताखालचे पोलीस अधिकारी ह्यांनीं सत्तेचा आणि अधिकाराचा जेवढा दुरुपयोग केला असेल तेवढा स्वतंत्र भारतांत कोणींहि केलेला नसेल! मोरारजींनीं आत्मनियंत्रण आणि आत्मसंयमन करावें असें नेहरूंचें सांगणें आहे कीं काय? वस्तुतः, मोरारजींना आत्महत्येचाच संदेश त्यांनीं

द्यावयाला हवा. सारांश काय, ह्या देशांत जनतेपेक्षां कोणी मोठा नाहीं असें नेहरू तोंडानें कितीहि बोलले तरी प्रत्यक्ष व्यवहारांत काँग्रेस नेत्यांच्या हिशेबीं जनतेला कवडीची किंमत नाहीं.

ह्या 'स्मशानवैराग्या' चा झटका येऊन दोनच दिवस झाले नाहींत तोंच राज्यपुनर्रचना समितीच्या शिफारसींना विरोध करणारांच्यावर नेहरू असे कांहीं कडाडले आहेत म्हणतां! ते म्हणाले, "ह्या देशाचा पंतप्रधान म्हणून देशांत घडणाऱ्या सर्व घटनांची जबाबदारी मी माझ्याकडे घ्यावयाला सिद्ध आहें. राज्य-पुनर्रचना समितीच्या शिफारसींबाबत 'जंगली टोळ्यां' ना शोभेल असें डोकेफोडीचें अन् डोकेतोडीचें ज्यांनीं वर्तन केलें त्यांचा मी निषेध करतों. अहिंसेच्या तत्त्वाचा आपण त्याग केला तर ह्या देशांत यादवी युद्ध सुरू होईल. सरकारनें घेतलेले सर्व निर्णय लोकशाही पद्धतीनें घेतलेले आहेत. जो तो आपल्याच मतांना दुराग्रहानें चिकटून बसला तर ह्या देशांत लोकशाही कशी चालेल?" जंगली टोळ्यांप्रमाणें डोकेफोडीचें वर्तन कोणीं केलें? अहिंसेचा त्याग कोणीं केला? स्वतःच्याच मतांना दुराग्रहानें कोण चिकटून बसलें? ह्या प्रश्नांची दुसरी जी बाजू आहे ती ऐकावयाच्या मनःस्थितींत नेहरू आहेत काय? तरीहि आपण लोकशाहीच्याच मार्गानें चालतों आहोंत असें पुन्हा पुन्हा म्हणावयाची नेहरूंची तयारी आहेच! म्हणूनच आम्हीं सुरवातीला म्हटलें कीं नेहरू म्हणजे नाटक आहे.

बुद्धजयंतीच्या दिवशीं नेहरूंनीं जें भाषण केलें त्या भाषणांत बुद्धाच्या चरित्रा-बद्दल किंवा तत्त्वज्ञानाबद्दल बोलण्याऐवजीं हिंसा आणि अहिंसा ह्यासंबंधीं आपल्या सरकारचें काय धोरण आहे ह्याविषयीं त्यांनीं एवढ्या संतापानें आणि आवेशानें भाषण केलें कीं निर्वाणस्थ बुद्धाची देखील समाधि भंग पावली असेल. नेहरू म्हणाले, "भारतामध्यें नुकतेच जे प्रकार घडलेले आपण पाहिले त्यांचा उगम अत्यंत क्षुद्र अशा प्रांतीय वादामधून, द्वेषामधून आणि हिंसेंतून झाला. ह्या देशाचें स्वातंत्र्य मिळवतांना सुद्धां आपण हिंसा केलेली नाहीं. आणि आतां एकाद्या प्रांताच्या सीमेसाठीं किंवा अशाच सामान्य गोष्टीसाठीं हिंसाकृत्यें करण्यापर्यंत कांहीं लोकांची मजल गेली आहे. बुद्धीचा आणि नैतिक प्रामाणिकपणाचा एवढा आश्चर्यजनक अधःपात मीं कधीं पाहिला नव्हता. ह्या हिंसेला संपूर्णपणें आणि आत्मविश्वासानें तोंड देण्याची आमची सिद्धता आहे. एकाद्या समस्येच्या गुणदोषांबद्दल मी बोलत नाहीं. एकादा निर्णय मीं चुकीनें सुद्धां घेतला असेल.

पण त्या निर्णयासाठीं मी लढल्याखेरीज राहणार नाहीं. कॉंग्रेस जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत कॉंग्रेसचा आणि हें सरकार जिवंत आहे तोंपर्यंत ह्या सरकारचा कोणताहि निर्णय हिंसेनें बदलूं शकणार नाहीं—मग ती हिंसा ह्या देशांत घडलेली असो वा परदेशांत घडलेली असो. प्रत्येक गोष्टीचा निर्णय लोकशाहीच्याच मार्गानें लागेल —रस्त्यामध्यें नव्हे. रस्त्यामध्यें निर्णय लावावयाच्या गोष्टी जे बोलतात, त्यांचा रस्त्यामध्येंच 'निर्णय' लावावयाला हवा. कांहींहि झालें तरी हिंदुस्थानचें ऐक्य अभंग राहील. दहशतवादानें, हिंसेनें किंवा धमक्यांनीं कोणत्याही गोष्टी बदलल्या जाणार नाहींत. प्रत्येक गोष्ट जुन्या कॉंग्रेसच्या किंवा गांधीवादी पद्धतीनें अथवा बुद्धानें सांगितलेल्या मार्गानें म्हणजे शांततेनें आणि लोकशाहीनें ठरली जाईल. आम्ही कांहीं गांधींचे वा बुद्धाचे आदर्श अनुयायी नव्हेत. आमच्या हातून चुका होतील. आम्ही आपल्या मार्गांत ठेचाळूं. पण गांधींच्या आणि बुद्धाच्या संदेशाचें स्मरण आमच्या मनांत सदैव जागृत राहील. आणि तेंच आमचा उद्धार करील. गांधीजींच्या हातून जर हिमालयाएवढ्या चुका झाल्या तर आमच्या हातून चुका झाल्या असल्या तर त्या कबूल करण्याची लाज आम्हांला कां वाटावी ? प्रतिपक्षाशीं आपण नेहमीं मैत्रीच्या भावनेनें वागावें. हैड्रोजन बॉम्ब का बुद्धाचा संदेश ह्या दोन गोष्टींपैकीं एक गोष्ट जगाला निवडावयाची आहे."

'अक्रोधेन जयेत् क्रोधं' असा संदेश जगाला देणाऱ्या बुद्धाच्या जयंतीच्या पवित्र प्रसंगीं प्रतिपक्षीयाबद्दल इतक्या क्रोधानें, इतक्या संतापानें आणि इतक्या चिडीनें भाषण करून नेहरूंनीं बुद्धाची विटंबना केली आहे. क्रोध म्हणजेच हिंसा. अहिंसेच्या तत्त्वावर अशा हिंसेनें बोलण्याची कांहीं आवश्यकता होती काय? 'क्रोधात् भवति संमोहः' ह्या गीतेमधील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें क्रोधाचा अंतिम परिणाम 'बुद्धिनाशात् प्रणश्यति' असाच व्हावयाचा. त्याप्रमाणें ह्या सबंध व्याख्यानाला बुद्धीचा म्हणजे सत्याचा आणि तर्काचा कुठेंहि आधार नाहीं. प्रांताच्या सीमेसाठीं ह्या देशांत कोणींहि हिंसा केलेली नाहीं. भारतसरकारनें अन्यायानें जे निर्णय दिले त्याचा प्रतिकार लोकशाहीच्या मार्गानें जनता करीत असतां सरकारनें जनतेवर गोळीबार करून हिंसेला प्रारंभ केलेला आहे हें परमेश्वराच्या डोळ्यासमोर घडलेलें सत्य आहे.

ह्या देशाचें स्वातंत्र्य मिळवतांना हिंसा झाली नाहीं हा नेहरूंचा दावा खोटा आहे. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं फाळणीचा मोबदला देऊन नेहरू आणि पटेल

ह्यांनीं ह्या देशांत रक्ताच्या एवढ्या नद्या वाहवल्या आहेत कीं भारताच्या भूमीवर इतक्या हजारों वर्षांच्या इतिहासांत कदापि वाहिल्या नसतील. त्या राक्षसी हिंसेला आणि अत्याचाराला नेहरू आणि पटेल हे दोघे व्यक्तिशः जबाबदार आहेत. नेहरू विसरले असले तरी आम्ही विसरलों नाहींत. 'माझा निर्णय चुकीचा असला तरी मी त्यासाठीं लढेन' ही जी टाळ्यांच्या प्रचंड निनादांत नेहरूंनीं गर्जना केली ती कोणाच्या तत्त्वज्ञानाच्या आधारें? गांधींच्या कीं बुद्धाच्या? आणि त्यानंतर पुन्हा लागलेच हातून चुका झाल्या असल्या तर त्या कबूल कराव्यात असें बोलून पुन्हा लोकांच्या टाळ्या मिळवायची नेहरूंची तयारी आहेच.

हिंसेला आम्ही विश्वासानें तोंड देऊं किंवा रस्त्यावर ज्यांना निर्णय पाहिजे आहेत त्यांचा रस्त्यांतच निर्णय लावूं ही भाषा काय गांधींच्या आणि बुद्धांच्या तत्त्वज्ञानाला सुतराम् तरी शोभण्यासारखी आहे? स्वच्छ शब्दांत बोलावयाचें म्हणजे ही मवाल्याची भाषा आहे. 'शठं प्रति शाठ्यम्' ह्याच वृत्तीचा हा आविष्कार आहे. क्रोधाला अक्रोधानें जिंकावें असें बुद्ध आणि गांधी सांगतात. अन् ज्यांना रस्त्यांत लढायचें आहे त्यांच्याशीं आम्ही रस्त्यांत लढूं असें नेहरू सांगताहेत! हिंसेशीं लढण्याचा हा जो नेहरूंच्या अंगामध्यें विलक्षण 'आत्मविश्वास' निर्माण झाला आहे त्याचा आधार काय? कॉंग्रेस जिवंत असेपर्यंत किंवा सरकार जिवंत असेपर्यंत सरकारचा कोणताहि निर्णय हिंसेनें बदलला जाणार नाहीं हें जें छातीठोक आव्हान नेहरू देत आहेत त्याचें शक्तिस्थान काय आहे? त्याचा आधार आणि शक्तिस्थान पोलिसांच्या लाठ्या आणि बंदुका हेंच ना? प्रत्येक गोष्ट गांधींच्या किंवा बुद्धाच्या मार्गानें मिटवण्याची हीच का नेहरू सरकारची रीत?

नशीब गांधींचें किंवा बुद्धाचें कीं जनतेवर गोळीबार करतांना 'महात्मा गांधीकी जय' किंवा 'ओम् बुद्धाय नमः' अशा घोषणा करण्याचा आदेश कॉंग्रेस सरकारें आपल्या पोलिसांना देत नाहींत! पुढल्या वर्षीचें 'बुद्धजयंती'चें व्याख्यान नेहरूंच्या अध्यक्षतेखालीं मोरारजींनीं द्यावें अशी आमची विनंति आहे.

३-२-५६

# त्रयाणाम् धूर्तानाम्

अमृतसरच्या काँग्रेसमध्यें राज्यपुनर्रचना समितीच्या शिफारसींवरील चर्चेला साहजिकच महत्त्वाचें स्थान मिळालें. त्यासंबंधीं बोलतांना पंडित नेहरू म्हणाले, "मुंबईचा समावेश कुठेंहि झाला तरी मला त्याची परवा नाहीं. कारण राज्यांच्या सीमाभागाचें मला विशेष महत्त्व वाटत नाहीं. प्रत्येक राज्य मला सारखेंच आहे. माझ्या दृष्टीनें हा प्रश्न गौण आहे. राज्यपुनर्रचनेचा उद्देश राष्ट्राचा आर्थिक आणि सामाजिक विकास करणें हा आहे. ह्याचें महत्त्व मला जास्त वाटतें. सध्यां आपण जखमा कशा भरून निघतील तिकडे लक्ष द्यावयास हवें. हें झालें म्हणजे महाराष्ट्रीय आणि गुजराती ह्यांच्यामधला कडवटपणा नष्ट होईल. मुंबईच्या दंग्याबद्दल मी कुठल्याहि जमातीला दोष देत नाहीं. हा निःसंशय गुंडांचा उद्योग आहे. पण समाजांतली ही दंगेखोर मंडळी प्रक्षुब्ध होतील असें कोणींहि कांहीं बोलावयाला अगर करावयाला नको होतें. मुंबई शहरांत राहणाऱ्या महाराष्ट्रीयांनीं, गुजरात्यांनीं आणि इतर मंडळींनीं परस्परांशीं हस्तांदोलन करून मित्रत्वाचें नातें प्रस्थापित करावें. राज्याच्या सीमेसाठीं झालेल्या ह्या प्रक्षोभांचें आकलन मला होत नाहीं. पण लोक एकमेकांना ज्या जखमा करतात—शारिरीक नव्हे-पण दुसऱ्या, ज्या जास्त खोल असतात—त्या मला समजतात. त्यामुळें आम्ही विशेष अस्वस्थ होतों. आणि काय वाटेल तें करून ह्या अप्रिय आठवणी आपल्या मनामधून समूळ नष्ट झाल्या पाहिजेत. मला महाराष्ट्रीयांबद्दल, गुजरात्यांबद्दल आणि इतरांबद्दल वाईट वाटतें. बहुतेक सर्व दंगल जे कोणी असतील त्या बदमाषांनीं आणि गुंडांनीं घडवून आणली आहे हें उघड आहे. त्याबद्दल कोणत्याहि एका जमातीवर आरोप करणें हें संपूर्णपणें आणि निःसंदिग्धपणें चूक आहे. आपण संयमाच्या आणि मैत्रीच्या मार्गानें गेलों तर प्रत्येक प्रश्न अगदीं सुलभपणें सुटेल. पण हिंसेनें, दहशतीनें आणि धमक्यांनीं जर आपण प्रश्न सोडवण्याचा प्रयत्न केला तर तो भयंकर अवघड होऊन बसेल. दंग्यानें आम्ही कांहीं घाबरणार नाहीं. ज्यांचे

प्रतिनिधि होण्याचा मान आम्हांला लाभला आहे त्या जनतेच्या सद्भावना आम्ही मिळवूं. काका गाडगीळ म्हणाले कीं ह्या प्रश्नामुळें निर्माण झालेला जनताप्रक्षोभ आम्ही शांत करूं शकत नाहीं. बरोबरच आहे, जसें पेरावें तसें उगवतें. तें कोणाला टळत नाहीं!"

अमृतसरच्या अधिवेशनाआधीं मुंबईच्या प्रश्नावर नेहरूंनीं तिसऱ्या सप्तकांतला जो सातवा स्वर लावला होता तो ह्या भाषणांत उतरलेला आहे ही आनंदाची गोष्ट आहे. नेहरूंनाहि आपण हें सांगावयाला पाहिजे कीं प्रत्येक प्रश्न शांतपणानें आणि धीमेपणानें विचार केला तर सहज सुटूं शकेल. पण त्यासंबंधीं उगाच डोकें फिरवून आरडाओरड केली तर तो सुटणें कठीण होऊन बसेल. हिंसेनें, दहशतीनें आणि धमक्यांनीं जशी कोणतीहि समस्या सोडवण्याचा प्रयत्न करूं नये, त्याप्रमाणें सत्तेच्या नि अधिकाराच्या जोरावर कोणताहि प्रश्न डालवण्याचा प्रयत्न करण्यांत येऊं नये. कोणत्याहि कसोटीवर घासून पाहिलें तरी मुंबई ही महाराष्ट्राची आहे हें सूर्यप्रकाशासारखें स्वच्छ आहे. असें असतां केवळ सत्तेच्याच जोरावर नेहरू महाराष्ट्राची न्याय्य आणि हक्काची मागणी नाकारताहेत ह्या गोष्टीची जाणीव नेहरूंना अद्याप कां होत नाहीं बरें? जनतेच्या सद्भवना मिळविण्याच्या गोष्टी नेहरू बोलतात, मग तीन कोटी महाराष्ट्रीय जनतेच्या भावनांचा ते असा उपमर्द कां करतात? 'मुंबईचा समावेश कुठेंहि झाला तरी मला त्याची परवा नाहीं, कारण राज्यांच्या सीमाभागाचें मला विशेष महत्त्व वाटत नाहीं.' असें नेहरू निष्काळजीपणाच्या स्वरांत बोलून गेले खरे. पण तिथेंच ग्यानबाची मेख आहे. 'मुंबईचा समावेश कुठेंहि झाला तर मला काय त्याचें' असें नेहरू तोंडानें म्हणतात खरें. पण मुंबईचा समावेश काय वाटेल तें झालें तरी महाराष्ट्रांत होऊं नये हा नेहरूंचा अनेक वर्षांपासूनचा हट्ट आहे. सगळी ही भानगड एकट्या नेहरूंच्या हट्टामुळें निर्माण झालेली आहे.

मुंबईबाबत नेहरू जितकें दाखवितात तितके जर खरोखरच बेपरवा असते तर महाराष्ट्राचा प्रश्न चुटकीसारखा सुटला असता. मुंबईचा प्रश्न हा कांहीं सीमाभागाचा प्रश्न नाहीं, एवढी देखील गोष्ट नेहरूंना माहीत असूं नये काय? सीमाभागाबद्दल लोक डोकीं कां फिरवतात हें, नेहरू म्हणतात, आपल्याला कळत नाहीं. मुंबईचा प्रश्न हा महाराष्ट्राच्या राजधानीचा प्रश्न आहे, म्हणून तो महाराष्ट्राच्या जीवनमरणाचा प्रश्न होऊन बसला आहे. ह्या भाषणांत एकच जी महत्त्वाची कबुली

नेहरूंनीं दिली तिनें महाराष्ट्रावर आलेल्या एका घोर आरोपांतून त्याची मुक्तता झालेली आहे. नेहरू म्हणाले, "मुंबईतले दंगे गुंडांनीं आणि बदमाषांनीं केले. कोणत्याहि जमातीला त्याबद्दल दोष देणें हें चूक ठरेल!" मग आम्ही तरी पहिल्यापासून हेंच म्हणतों. उलट मुंबईतले दंगे हे भारताचें सामर्थ्य आणि एकता ग्वची करण्याच्या हेतूनें करण्यांत आले असून काँग्रेस किंवा सरकार हिंसेला नि अत्याचाराला भिऊन आपला कोणताहि निर्णय बदलणार नाहीं असें स्वतः नेहरूच मोठ्या आवेशानें गर्जून सांगत होते. असो. आतां हे दंगे गुंडांनीं केले असें नेहरू पुन्हाः कबूल करीत आहेत; म्हणून आम्हांला त्याविषयीं कांहीं बोलावयाचें नाहीं. पण आतां तरी 'महाराष्ट्रानें मानव्याला डांबर फासलें' हा गलिच्छ प्रचार आमचे शंकरराव देव थांबवतील काय?

नेहरू म्हणतात, गुजरात्यांनीं आणि महाराष्ट्रीयांनीं परस्परांशीं हस्तांदोलन करून मैत्री करावी. पण संयुक्त महाराष्ट्राचें भांडण हें गुजरात्यांचें आणि महाराष्ट्रीयांचें आहे हें नेहरूंना सांगितलें कोणीं? मग भांडण जर त्यांचें नाहीं तर हस्तांदोलन कसलें करायचें? संयुक्त महाराष्ट्राचें भांडण हें गुजरात्यांशीं नसून नेहरू सरकारशीं किंवा काँग्रेसश्रेष्ठींशीं आहे. गुजराती-मराठी भांडणाचें त्याला जें बाह्यात्कारी स्वरूप प्राप्त झालें आहे तें आगंतुक आहे—खरें नाहीं. मुंबईमध्यें पांच लाख गुजराती राहत असले तरी मुंबईसंबंधीं गुजराती लोकांना कोणताहि दावा करतां येण्यासारखा नाहीं. आतांपर्यंत मुंबईमधल्या गुजराती आणि महाराष्ट्रीय समाजाचे संबंध मैत्रीचे आणि सलोख्याचेच होते. गुजरात्यांशीं हस्तांदोलन करून मुंबईच्या बाबतींत महाराष्ट्रीयांनीं हवेंत हात हलवीत बसावें असें नेहरूंचें म्हणणें आहे काय? उलट आमची नेहरूंना अशी विनंति आहे, कीं महाराष्ट्राला मुंबई त्यांनीं तावडतोब देऊन टाकावी, आणि 'पूर्वीचें झालें गेलें तें विसरून जा' असें सांगून महाराष्ट्रीयांशीं हस्तांदोलन करावें. आमची खात्री आहे, नेहरूंच्या-बद्दल पुन्हा पहिल्यासारखी प्रेमभावना महाराष्ट्रीय जनतेच्या मनांत उत्पन्न होईल.

गोविंद वल्लभ पंत आपल्या भाषणांत म्हणाले, "महाराष्ट्राच्या बाबतींत आमची भूमिका पहिल्यापासून तडजोडीची होती. मी, नेहरू आणि काँग्रेसचे अध्यक्ष ढेबर हे वस्तुतः राज्यपुनर्रचना समितीनें महाराष्ट्राबाबत केलेल्या शिफारसीला अनुकूल होतों. आमच्या मतें सर्वांत ती योजना उत्कृष्ट होती. पण ज्यांना ती योजना मान्य नव्हती, त्यांच्या समजुतीसाठीं आम्हीं तीन राज्यांची योजना पुढें मांडली.

विदर्भांचे लोक महाराष्ट्रांत जावयाला तयार नव्हते. पण आम्हीं त्यांना सांगितलें म्हणून आणि देशाच्या कल्याणाच्या दृष्टीनें ते महाराष्ट्रांत जावयास कबूल झाले. पण त्रिराज्ययोजनाहि जेव्हां अमान्य झाली, तेव्हां केंद्रशासित मुंबईची योजना आम्हीं सुचविली. कोणी म्हणते, आम्ही आपली भूमिका अस्थिरपणें बदलत गेलों. पण पहिल्या योजना मान्य झाल्या नाहींत म्हणून आपण होऊन आम्ही आमच्या कक्षेबाहेर गेलों आणि हात पुढें केला. आम्हांला वाटलें कीं ह्या योगानें तरी ती मंडळी खूष होतील. पूर्वी आम्ही काय बोललों तें सुद्धां आम्ही विसरून गेलों. त्याबद्दल आम्ही अभिमान बाळगून हट्ट धरला नाहीं. मुंबईसंबंधींचा जो निर्णय आम्हीं घेतला तो फार वाद आणि विचार करून आम्हीं घेतलेला आहे. कुटुंबांतला एकादा माणूस हातांत दंडा घेऊन जर एकादी गोष्ट मागत सुटेल तर ती त्याचा बाप, भाऊ किंवा बहीण सुद्धां मान्य करणार नाहीं. लोक जर सरकारच्या विरुद्ध असे दंड फिरवावयाला लागतील तर कोणतेंहि सरकार चालूं शकणार नाहीं!"

महाराष्ट्रानें जें जें मागितलें तें तें आम्हीं मोठ्या सौजन्यानें आणि प्रत्येक वेळीं पडतें घेऊन क़बूल केलें असा जो पंतजींनीं आव आणलेला आहे तो कावेबाज-पणाचा आहे. आमच्याकडे कांहीं दोष नाहीं, दोष जर कोणाकडे असेल तर तो महाराष्ट्राकडे असें भासविण्याचा त्यांचा उद्देश आहे. पण त्यांत सत्याचा अंशहि नाहीं. पंतजींकडे महाराष्ट्राच्या वतीनें मागणी करावयाला जी मंडळी गेली होती त्यांनीं फार मोठा घोटाळा केला हें आम्हांला मान्य आहे. त्यांनीं त्यांच्याजवळ एका वेळीं एक गोष्ट कबूल केली अन् दुसऱ्या वेळीं दुसरी मागितली हेंहि आम्हांला माहीत आहे. पण मुळामध्यें महाराष्ट्रीय जनतेला काय पाहिजे आहे हें पंतजींना माहित नव्हतें, असा अज्ञानाचा बुरखा कांहीं त्यांना पांघरतां येणार नाहीं. मुंबई ज्याची राजधानी आहे असा संयुक्त महाराष्ट्र तीन कोटी मराठी जनतेला हवा होता ही जगजाहीर गोष्ट आहे. असें असतां महाराष्ट्राची ती मागणी नेमकी मान्य न करतां, महाराष्ट्राची आम्हीं 'ही' योजना मान्य केली अन् मागून 'ती' योजना मान्य केली असल्या वायफळ गोष्टी बोलत बसण्यांत काय हांशील आहे? जो जें मागतो तें त्याला द्यायचें नाहीं, अन् मी अमकें त्याला देऊं केलें अन् तमकें त्याला देऊं केलें, अन् त्यानें तें नाकारलें त्याला मी काय करूं, असला पोरकट कांगावा करणें निदान पंतजींसारख्या भारताच्या अव्वल दर्जाच्या मुत्सद्दयाला तरी शोभत नाहीं!

विदर्भ महाराष्ट्रांत आधीं यावयाला तयार नव्हता, तो आम्हीं सांगितल्यामुळें यावयाला तयार झाला असा स्वतःचा खोटा बडेजाव मिरवण्यांत काय अर्थ आहे? विदर्भ महाराष्ट्रीय भाषिकांचा आहे त्याचा महाराष्ट्रांत समावेश व्हायला पाहिजे हा तात्त्विक सिद्धांत आहे. त्यांत विदर्भाची मनधरणी करण्याचा आणि समजूत घालण्याचा कसा प्रश्न उत्पन्न होतो? आधीं तुम्ही विदर्भ महाराष्ट्रापासूनच तोडला कां आणि आठ जिल्ह्यांचा चतकोर प्रांत बनवलात कसा? तुमचा पहिला मूर्खपणा तुम्ही मागून निस्तरलांत असेंच आम्ही म्हणूं. आमच्यावर कांहीं उपकार केला नाहींत. आणि तुम्ही सांगितल्यामुळें जर विदर्भ ऐकूं शकतो एवढें तुमचें देशांत वजन आहे, तर मुंबई महाराष्ट्राला देण्याच्या बाबत तुम्ही गुजरात्यांची समजूत कां हो घालूं शकत नाहीं? ह्याचें कारण तुम्हांला त्यांची समजूत एक घालवयाची तरी नसेल किंवा तुमच्या समजुतीला ते विदर्भाप्रमाणें भीक घालणार नाहींत अशी तुमची खात्री तरी असेल!

पंतजींनीं कुटुंबाचा दाखला दिला. आणि भारताच्या कुटुंबांत राहणाऱ्या महाराष्ट्रानें हातांत दंडा घेऊन मुंबईची मागणी केली तर ती त्या कुटुंबांतले त्याचे नातेवाईक कशी ऐकणार असें मोठ्या लाघवीपणानें विचारलें. महाराष्ट्रानें मुंबईसाटीं हातांत दंडा घेतला नाहीं ही गोष्ट नेहरूंनीं मान्य केली तरी घटकाभर दाखल्यासाठीं आपण असें समजूं कीं, हो, मुंबईसाटीं महाराष्ट्रानें हातांत दंडा घेतला. ह्याचें कारण काय? महाराष्ट्राला हातांत दंडा घेण्याची पाळी कोणीं आणली? महाराष्ट्राच्या हक्काची गोष्ट जर कुटुंबांतली त्याची सख्खी नात्याची मंडळी त्याच्यापासून हिरावून घेऊं लागली, महाराष्ट्रानें त्यांना नाना तऱ्हेनें समजावून सांगितलें, 'दादा-बाबा' केलें, तरी सुद्धां ते त्याला जेव्हां ऐकेनात, तेव्हां महाराष्ट्रानें हातांत दंडा घेऊं नये तर काय करावें? आणि समजा डोकें फिरल्यामुळें त्यानें हातांत दंडा घेतला तर तुम्हीं त्याचे आप्त म्हणविणाऱ्या कुटुंबांतल्या मंडळींनीं काय त्याच्यावर बंदुकीच्या गोळ्या झाडाव्यात? आणि त्याचा प्राण घ्यावा? बंदुकीच्या जोरावर कुठें राज्यें चालतात पंतजी? सांगायचा इत्यर्थ हा, कीं पंतजींनीं आपल्या भाषणांत मुत्सद्दीगिरीचा जो सर्व कोटिक्रम केला, तो सर्व त्यांच्या अंगावर उलटण्यासारखा आहे.

महाराष्ट्राच्या मागणीबाबत संबंधित माणसांनीं कसा घोळ घातला आणि गोंधळ केला ह्यावर मौलाना आझाद ह्यांनीं उत्तम प्रकाश टाकला. ते म्हणाले, "तीन राज्यांची कल्पना माझी आहे. महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस, गुजरात प्रदेश कॉंग्रेस

आणि मुंबई प्रदेश काँग्रेस ह्यांच्या नेत्यांबरोबर ज्या वाटाघाटी झाल्या त्यांतूनच हा निर्णय निष्पन्न झाला. अगदीं प्रारंभीं 'संबंधित मंडळीं'नीं आम्हांला सांगितलें कीं मुंबईचें स्वतंत्र राज्य झालें तर पुष्कळ अंशीं आमचें समाधान होईल. पण त्यानंतर कांहीं खासदार म्हणाले कीं मुंबईचें स्वतंत्र राज्य करण्याऐवजीं जर ती केंद्रशासित झाली तर तें अधिक चांगलें होईल. आणि आम्हांला जास्त मान्य होईल. त्यांनींच पुन्हा सूचना केली कीं, मुंबईचें स्वतंत्र राज्य ताबडतोब करून टाका. पण पुन्हा ह्या लोकांनीं आपलें मत बदललें आणि तेंच म्हणूं लागले, मुंबई ही केंद्रशासितच केली पाहिजे. अशा रीतीनें निश्चितपणें कोणाला काय पाहिजे आहे हेंच मुळीं आम्हांला कळेना. मुंबई महाराष्ट्रामध्यें सामील झाली तर माझा कांहीं आक्षेप नाहीं. पण हातांत दंडा घेऊन जर कोणी कांहीं मागेल तर त्याचें कांहीं एक म्हणणें आम्ही ऐकणार नाहीं!"

नेहरू, पंतजी, आणि आतां मौलाना ह्यांनीं महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचीं नांवें न घेतां संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीबाबत आपल्या अनिश्चितपणामुळें ह्या मंडळींनीं कसा गडबडघोटाळा केला ही गोष्ट आतां चांगली प्रकाशांत आणली आहे. महाराष्ट्र काँग्रेसचे पुढारी किती नालायक आणि निर्बुद्ध आहेत ही गोष्ट साऱ्या भारतांत आतां जाहीर झाली आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या संबंध चळवळींत जनतेशीं एकदांहि कधीं समरस होण्याचा प्रयत्न अथवा परवा न केल्यानें जनतेच्या भावनेची तीव्रता महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसचे नेते कधींच समजूं शकले नाहींत. काँग्रेस-श्रेष्ठींशीं वाटाघाटी करावयाच्या म्हणजे जणुं कांहीं सोंगट्यांचाच खेळ खेळावयाचा अशी त्यांची भावना झाली. त्यामुळें आज एक बोलले, तर उद्यां दुसरें अन् परवा तिसरें असें त्यांच्या वाटाघाटीला अजागळपणाचें स्वरूप आलें. त्यामधलें गांभीर्य नष्ट झालें. अर्थात् काँग्रेसश्रेष्ठींना तेंच पाहिजे होतें. त्यांनीं तीन डावांतच महाराष्ट्र काँग्रेसवाल्यांचे तीन तेरा करून टाकले.

आपल्या मूर्खपणानें महाराष्ट्राचें एवढें वाटोळें झालेलें दिसत असूनहि महाराष्ट्र काँग्रेसवाल्यांना त्याची लाज आहे का? 'काँग्रेसचें रक्षण करण्यासाठीं आम्ही आत्महत्या करूं! काँग्रेस नष्ट होईल, पण वाकणार नाहीं!' अशा मिशावर ताव मारून ते संयुक्त महाराष्ट्रवाद्यांनाच धमक्या देत सुटले आहेत! पंतजींच्या आणि मौलांना आझादांच्या भाषणांमुळें महाराष्ट्र काँग्रेसचे पुढारी केवळ मूर्ख तर नाहींतच पण लबाड आणि थापाडे आहेत ही गोष्ट सिद्ध झाली आहे. त्रिराज्ययोजनेला

आम्हीं संमति दिली नाहीं असें देवगिरीकर आणि हिरे छातीवर हात मारून आणि आणाभाका घेऊन सांगत होते. आतां मौलानांनीं स्पष्टच सांगितलें आहे कीं महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेसशीं वाटाघाटी करूनच आपण ती योजना निश्चित केली. त्याच प्रमाणें शंकरराव देव म्हणतात कीं कॉंग्रेसश्रेष्ठींशीं आपण वाटाघाटी केल्या म्हणून विदर्भासह महाराष्ट्र मिळाला. आतां पंतजींनीं स्पष्टच सांगितलें आहे कीं त्यांनीं विदर्भाची समजूत घातली म्हणून महाराष्ट्रांत यावयास तो तयार झाला. पंतजी आणि मौलाना हे देव–देवगिरीकर ह्यांच्यापेक्षां जास्त सत्यभाषणी आणि विश्वसनीय आहेत हें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

१०-२-५६

## अमृतसरचें विष !

राज्यपुनर्रचनेच्या प्रश्नासंबंधीं अमृतसरच्या कॉंग्रेसनें जो एक लांबलचक ठराव मंजूर केला आहे तो वाचल्यानंतर कॉंग्रेसनें गेल्या वीस वर्षांच्या आपल्या सिद्धांताला आणि धोरणाला कसा सपशेल हरताळ फासला आहे हें दिसून येतें. ह्या ठरावाचा सारांश असाः

(१) तीस वर्षांपूर्वी कॉंग्रेसनें भाषिक प्रांताचा पुरस्कार केला होता खरा. पण तो राज्यकारभाराच्या दृष्टीनें नव्हे. तर आपल्या स्वतःच्या संघटनेच्या सोयीच्या दृष्टीनें. इंग्रज सरकारनें इंग्रजी जाणणारे सुशिक्षित लोक आणि अशिक्षित बहुजनसमाज ह्यांच्यामध्यें एक अभेद्य भिंत निर्माण केली होती. ती नष्ट करणें हा कॉंग्रेसचा उद्देश होता. म्हणून राजकीय प्रांताकडे लक्ष न देतां कॉंग्रेसनें आपले भाषिक प्रांत बनविले होते.

(२) राज्याच्या मर्यादा ठरवण्याचे कामीं केवळ भाषा हाच एक निर्णायक विचार होऊं शकत नाहीं. अर्थात् तो एक महत्वाचा मुद्दा आहे ह्यांत शंका नाहीं. भाषेमुळें जर फुटीरपणाची भावना वाढली तर भारताच्या मूलभूत ऐक्याला धक्का बसल्याखेरीज राहणार नाहीं.

(३) स्वातंत्र्यप्राप्तीनंतर जनतेचा आर्थिक विकास कसा करावा, देशाची संपत्ति कशी वाढवावी, जीवनाची पातळी कशी सुधारावी हा एकच महत्त्वाचा विचार देशापुढें आहे. केवळ भाषिक तत्त्वावर प्रांतरचना केल्यास ह्या कार्यांत अडथळे उत्पन्न होतील.

(४) भाषिक तत्त्वावर निर्माण झालेल्या राज्यांमध्यें जर आपापसांत उद्यां झगडे उत्पन्न झाले आणि त्यानें प्रांतीय भावना वाढली तर देशाच्या ऐक्यावर भाषावादानें अतिक्रमण केल्यासारखें होईल. एक भाषिक गट जर दुसऱ्या भाषिक गटावर हिंसात्मक आक्रमण करील तर देशांत यादवी उत्पन्न होऊन लोकशाही नष्ट होईल. नुकत्याच देशांत घडलेल्या घटनांमुळें अशी भीति वाटूं लागली आहे.

(५) भारताचा फार मोठा भाग एकभाषिक असला तरी द्विभाषिक प्रदेशहि पुष्कळ आहे. भाषिकवाद तेथेंच निर्माण होतात. म्हणून अशा ठिकाणीं एकभाषिक राज्यें करणें धोक्याचें आहे. कारण अशा एकभाषिक राज्यांनीं लोकांच्या व्यवहारांत अडथळे उत्पन्न होतील. देशाला ठोकळेबाजपणाचें स्वरूप येईल. देशाची गतिमान् आणि विकासक्षम अर्थव्यवस्था स्थगित होईल. लोकांचा मानसिक दृष्टिकोन आकुंचित होईल. आज भारताला विशाल दृष्टिकोनाची आणि व्यापक सहकार्यांची आवश्यकता आहे.

(६) ह्या पुनर्रचनेमुळें कांहीं कांहीं राज्यें लहान होतील. तीं आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण होणार नाहींत आणि मोठ्या राज्यांच्या साहाय्यावांचून त्यांचा विकास होणार नाहीं. राज्यकारभाराच्या आणि देशविकासाच्या दृष्टीनें राज्यांचा आकार मोठाच पाहिजे. त्याखेरीज नैसर्गिक संपत्ति आणि संरक्षण ह्या दृष्टीनेंहि त्यांचा विचार करावयाला हवा.

(७) एकभाषी राज्यें करणें जेथें आवश्यकच आहे तेथें तीं करण्यांत येतील. पण त्यांचें निष्कारण महत्त्व वाढवलें जाणार नाहीं म्हणून आजच्या परिस्थितींत झपाट्यानें विकास व्हावा ह्यासाठीं जेथें व्यवहार्य आहे तेथें द्विभाषिक राज्यें निर्माण करण्याला उत्तेजन देणेंच इष्ट वाटतें. मात्र प्रत्येक भाषेच्या आणि संस्कृतीच्या विकासासाठीं अशा राज्यांत प्रादेशिक समित्या नेमण्यांत येतील.

(८) ह्या दृष्टीनें बंगाल आणि बिहार ह्यांच्या विलीनीकरणाचें स्वागत करावयास हवें. भारताच्या दक्षिण भागांत आणि इतर विभागांत या ‘ नव्या मार्गा ’चा स्वीकार होईल अशी आशा आहे. त्या योगानें देशामधली ऐक्याची भावना वाढेल. सर्व भारताचा विकास व्हावा, विशेषतः जनतेचें कल्याण व्हावें ह्या विषयाचा विचार करावयाला हवा. ह्या कामीं कँग्रेसजनांवर फार मोठी जबाबदारी आहे. त्यांना कँग्रेसची शिस्त राखावयाची आहे. ह्या शिस्तींतूनच देशाची सलगता आणि ऐक्य ह्यांचेंहि पण रक्षण करावयाचें आहे.

परिस्थितीनुसार स्वतःचीं मतें बदलणें ह्यामध्यें कसलेंहि पाप नाहीं. पण मतें बदलतांना खोटें बोलण्याचें कांहींच कारण नाहीं. भाषावार प्रांतरचनेचा गेलीं तीस वर्षें कँग्रेस पुरस्कार करीत होती ही गोष्ट जगजाहीर आहे. त्याबाबत डोंगराएवढा पुरावा आहे. आज कँग्रेसला भाषावार प्रांतरचना नको आहे. तर कँग्रेसला सरळ तसें म्हणतां आलें असतें. कोणालाहि तिच्या तोंडाला हात लावतां आला

नसता. तेवढ्यासाठीं आपण भाषावार प्रांतरचनेचा पुरस्कार मुळीं केलाच नव्हता, आपण केवळ कॉंग्रेस संघटनेच्या सोयीच्या दृष्टीनें देशाची भाषिक विभागणी केली होती, देशाच्या राज्यकारभाराच्या दृष्टीनें नव्हे, असें धादांत खोटें बोलून ह्या प्रश्नाबाबत सपशेल कोलांट उडी घेण्याचें कॉंग्रेसला काय कारण होतें ? देशामधले लोक एवढे गाढव आहेत काय कीं कॉंग्रेसला राज्यकारभाराच्या दृष्टीनें भाषिक प्रांत हवे आहेत का केवळ संघटनेच्या दृष्टीनें भाषिक विभाग हवे आहेत ही गोष्ट आजपर्यंत त्यांच्या लक्षांत आली नाहीं ?

बरें, आज कॉंग्रेसनें ठराव करून जी ही घोषणा केलीं आहे, ती गेली आठ वर्षें तिनें कां केली नाहीं ? दार कमिशन, ज. व. प. समिति, फाजलअली समिति ह्या ज्या तीन समित्या तिनें नेमल्या आणि त्यासाठीं राष्ट्राचा एवढा पैसा नि वेळ खर्च केला तो करण्याची कॉंग्रेस सरकारला काय जरूरी होती ! दार कमिशन नेमण्याच्या आधींच कॉंग्रेसनें किंवा सरकारनें जाहीर फर्मान काढलें असतें आणि लोकांना सांगितलें असतें कीं भाषावार प्रांतरचना ही देशाच्या कल्याणाची नाहीं आणि ती करण्याचें आश्वासन कॉंग्रेसनें राष्ट्राला कधींच दिलेलें नाहीं, तर त्याच वेळीं हा सगळा प्रश्न मुळांतच निपटून गेला असता. ही जर चूक असेल तर ती अक्षम्य आहे. कॉंग्रेस नेत्यांच्या नालायकीचा ह्यापेक्षां जास्त भयानक पुरावा देतां येणार नाहीं. ही घोषणा करून कॉंग्रेस स्वतः खोटें तर बोलली आहेच, पण फाजलअली समितीच्या महत्त्वाच्या शिफारसी तात्त्विक दृष्ट्या तरी तिनें निकालांत काढल्या आहेत. आणि तिला गाढव म्हणावयाचें काय तें बाकी ठेवलें आहे.

भाषावार प्रांतरचनेमुळें फुटीरपणाची भावना वाढते, देशाच्या आर्थिक विकासांत अडथळे उत्पन्न होतात, देशाला ठोकळेबाजपणाचें स्वरूप येतें, लोकांचा मानसिक दृष्टिकोन आकुंचित होतो, सारांश भारताचें मूलभूत ऐक्यच नष्ट होतें हे जे निरनिराळे आक्षेप कॉंग्रेसवाल्यांनीं डोकें खाजवून काढले आहेत, त्यांतला एकहि आक्षेप सत्याच्या आणि तर्काच्या कसोटीला टिकणारा नाहीं. ह्या न्यायानें जगांतली प्रत्येक चांगली गोष्ट वाईट ठरवतां येईल. आणि वाईट गोष्ट चांगली ठरवितां येईल. राज्याची मर्यादा ठरवतांना भाषा एक महत्त्वाचा मुद्दा आहे. पण तो निर्णायक नव्हे असें कॉंग्रेसनें जें आपल्या ठरावांत म्हटलें आहे, तें चूक आहे. संघराज्यामधलें प्रत्येक घटकराज्य हें भाषिक तत्त्वावरच बनविणें हा लोकशाहीचा मूलभूत सिद्धांत आहे. जें 'एकभाषा-एकराज्य' हें तत्त्व नाकारण्याचें फाजलअली

समितीनें सोंग करून सोळा राज्यांपैकीं पंधरा राज्यें भाषिक तत्त्वावर बनविलीं तेंच खरें आणि अपरिवर्तनीय सत्य आहे. भाषिक राज्यें निर्माण झालीं तर प्रांतीय भावना वाढते, परस्परांत झगडे उत्पन्न होतात आणि एक गट दुसऱ्या गटावर आक्रमण करतो हीं ठरावांत दिलेलीं कारणें शुद्ध थोतांड आहे. फाजलअली समितीच्या शिफारसी प्रसिद्ध झाल्यानंतर देशांत जो प्रक्षोभ निर्माण झाला त्याचें कारण शुद्ध भाषिक तत्त्वानुसार फाजलअली समितीनें राज्यपुनर्रचनेचा प्रश्न न सोडवतां, त्यांत काँग्रेस पक्षाचें राजकारण घुसडून लोकांवर राजरोस अन्याय केला हें आहे.

मुंबई ही महाराष्ट्राची असतांनाहि ती देण्याची काँग्रेसश्रेष्ठींना इच्छा नाहीं म्हणून द्विभाषिक प्रांताचें बांडगूळ तिनें निर्माण केलं आणि तें जनतेवर जबरदस्तीनें लादण्याचा प्रयत्न केला. त्यांतून नानातऱ्हेच्या वादांची, वाटाघाटींची अन् दंगलीची भुतावळ निर्माण झाली. काँग्रेसनें मूर्खपणा करावयाचा आणि त्याचं खापर भाषिक राज्याच्या डोक्यावर फोडावयाचें हा चांगला न्याय आहे. विदर्भ महाराष्ट्रांतून बाहेर काढावयाची काय जरुरी होती ? तेलंगण आंध्रापासून वेगळा ठेवण्याची आवश्यकता काय होती ? हें सगळें काँग्रेसचें राजकारण आहे. भाषेचें राजकारण नव्हे. आतां ह्या ठरावांत काँग्रेस म्हणते कीं लहान लहान राज्यें नकोत, त्यापेक्षां बंगाल-बिहार-सारखीं मोठमोठीं द्विभाषिक राज्यें हवींत. मग तेलंगण आणि विदर्भासारखीं छोटीं छोटीं राज्यें काँग्रेसच्या प्रेरणेनें फाजलअली समितीनें जेव्हां निर्माण करण्याची शिफारस केली तेव्हां काँग्रेसची अक्कल काय चुलींत गेली होती कां ? आर्थिक विकासाच्या आणि राष्ट्रहिताच्या दृष्टीनें भाषिक राज्यें हानिकारक ठरतील हाहि आक्षेप फोल आहे. घटकराज्य हें कांहीं सार्वभौम राज्य नव्हे. देशविकासाचें कार्य हें मध्यवर्ती सरकारचें कार्य आहे. त्या कार्यांत भाषिक राज्याचें सरकार अडथळे उत्पन्न करील हा आक्षेप शुद्ध पोरकट आहे.

सर्व जगामध्यें रशिया हा एकच देश असा आहे कीं जेथें भाषावार तत्त्वावर राज्यरचना करण्यांत आलेली आहे. रूसी भाषेखेरीज तेथें सव्वीसापेक्षां अधिक लोकभाषा आहेत. आम्हांला माहीत आहेत त्या सव्वीस भाषा अशा : युक्रेनियन, बायलोरशियन, उझबेक, ताजिक, किरघिज, एस्टोनियन, लाटव्हियन, लिथ्युएनिअन, ऑसेशन, चुवाश, बशकीर, उदमूर्त, काराकल्यक, ओइरात, बरुआत-मंगोलिअन, अुईगर, मोक्शन, एर्झिअन, इव्हेन्क, तुमुल्न, अब्हेरिअन, जिप्सी, खाकासियन, तुव्हा, ईव्हन आणि नेनेत्स. ह्या सर्व भाषा समृद्ध असून त्यांचें स्वतंत्र साहित्य आहे.

एवढ्या भाषा असूनही त्यांतल्या ज्या एकमेकांशीं अधिक जवळच्या आहेत त्यांचा एकेक गट करून सोव्हिएट संघानें सोळा भाषिक राज्यें निर्माण केलीं आहेत. तथापि, असें असून रशियाच्या आर्थिक विकासांत कोणतेहि अडथळे निर्माण झाले नाहींत किंवा तेथें भाषिक वाद निर्माण झालेले नाहींत. ज्या राष्ट्राचें राजकीय तत्त्वज्ञान निश्चित आणि स्पष्ट असतें त्यामध्यें भाषाभेदामुळें भांडणें होऊं शकत नाहींत. किंबहुना, भाषेच्या तत्त्वावर त्या राष्ट्रामधलें जनतेचें ऐक्य अधिक बळकट होतें.

आज भारतांत जें अधिकारारूढ सरकार आहे, तें तोंडानें जरी समाजवादाचा जप करीत असलें तरी त्याचें स्वरूप भांडवलशाही आहे. जनतेच्या कल्याणाचें निश्चित तत्त्वज्ञान त्याच्याजवळ नाहीं. किंबहुना, जनतेचें ऐक्य होऊंच नये असेंच त्याचें धोरण आहे म्हणून भाषावार प्रांतरचना त्याला नको आहे. ज्या महाद्विभाषिक राज्याचा पुरस्कार नवीन स्फूर्ति आल्यासारखा कॉंग्रेस आज करीत आहे तो जनताऐक्याच्या विरुद्ध एक डाव आहे. बंगाल बिहार एकत्र आले म्हणजे त्यांच्यांत भाषिक तट पडून त्यांचे एकसारखे तंटे होत राहणार ही काळ्या दगडावरची रेघ आहे. सध्यांच पाहा ना. मुंबई राज्यांत गुजराती, मराठी आणि कानडी भाषिक आहेत. इतकीं वर्षें एकत्र राहूनहि गुजराती लोकांचें जीवन काय आहे, त्यांची भाषा काय आहे, त्यांचें साहित्य काय आहे ह्यांची मराठी लोकांना माहिती नाहीं. किंवा गुजरात्यांना महाराष्ट्राची माहिती नाहीं. आणि दोघांना कानडी लोकासंबंधीं कांहीं एक ठाऊक नाहीं. तीन्ही भाषिक एका राज्यांत असूनहि त्यांचें एकमेकांबद्दलचें अज्ञान भयंकर आहे. आणि त्यामुळें त्यांचा परस्पराबद्दल गैरसमज आणि अविश्वास आहे. त्याचा परिणाम असा होतो कीं कोणतेहि दोन भाषिक गट एकत्र होतात आणि तिसऱ्याविरुद्ध राजकीय कारवाया करतात. मुंबई राज्यांत इतकीं वर्षें हा उद्योग राजरोस चालू आहे. म्हणून भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न खुंटीवर टांगून मोठमोठीं द्विभाषिक राज्यें निर्माण करण्याचा आणि त्यांच्या पोटांत भाषाविषयक प्रादेशिक समिति नेमण्याचा जो 'नवा बूट' कॉंग्रेसनें आतां काढला आहे, त्यामुळें लोकशाहीच्या मार्गांत फार मोठा अडथळा निर्माण झालेला आहे असें म्हटल्याखेरीज गत्यंतर नाहीं. भाषावार प्रांतरचनेचें 'अमृत' देण्याचीं तीस वर्षें आश्वासनें देऊन शेवटीं अमृतसरच्या कॉंग्रेसनें भारतीय जनतेला द्विभाषिकाचें 'विष' पाजावयाचें ठरवावें ह्यापेक्षां देशाचें अधिक दुर्दैव काय असणार?

१७-२-५६

# देशमुख आणि दशमुख

पांच वर्षेपर्यंत मुंबई केंद्रशासित करण्याचा जो जुलमी निर्णय तीन जून रोजीं भारताचे 'हुकूमशहा' जवाहरलाल नेहरू ह्यांनीं लोकसभेला धाब्यावर बसवून मुंबई येथें घोषित केला, त्याचा धिक्कार महाराष्ट्रांतल्या तीन कोटी जनतेनें तेवढ्याच त्वेषानें आणि संतापानें केला. हुकूमशहा नेहरूंनीं मानधन महाराष्ट्राचा केलेला शिरच्छेद मराठी जनता कालत्रयीं मान्य करणार नाहीं असें 'संयुक्त महाराष्ट्र समिती'नें निक्षून सांगितलें आणि गेल्या रविवारीं 'नेहरू-निषेध-दिन' पाळ-ण्याचा तमाम महाराष्ट्राला आदेश दिला. त्याप्रमाणें गेला रविवारचा सारा दिवस बेळगांवपासून तों नागपूरपर्यंत उभा महाराष्ट्र नेहरूनिषेधाच्या गर्जनेनें दुमदुमून गेला. नेहरूंच्या ह्या जुलमी निर्णयाची प्रतिक्रिया महाराष्ट्रांतल्या मुर्दाड काँग्रेस-वाल्यांवर काय होईल हें जाणण्याची निदान महाराष्ट्रांत तरी कोणालाहि उत्सुकत वाटत नव्हती. कारण 'संयुक्त महाराष्ट्रा'वर एकाहिपेक्षां एक भयंकर प्रहार काँग्रेसश्रेष्ठी गेले नऊ महिने एकसारखे करीत असतां महाराष्ट्राच्या हाकेला जे धावून तर आले नाहींतच, पण राजिनाम्याच्या खोट्या थापा मारून ज्यांनीं महाराष्ट्राला झुलवलें, भुलवलें आणि शेवटीं महाराष्ट्राचा सपशेल गळा कापला, त्या मराठी काँग्रेस नेत्यांची आणि मंत्र्यांची महाराष्ट्रांत आज एवढी बेअब्रू झाली आहे कीं काळ्या निशाणांवांचून आणि खेटरांवांचून त्यांचीं आज कुठेंहि संभावना होत नाहीं. तरी देखील 'नेहरू महाराष्ट्राला न्याय देतील!' अशा रंगीत वावड्या उडवून महाराष्ट्रांतले हे कोडगे काँग्रेसवाले इतके दिवस कशीं तरी आपल्या अब्रूचीं लक्तरें सांभाळून होते. पण तीन जून रोजीं पंडित नेहरूंनीं महाराष्ट्रासंबंधीं इतकीं वर्षे हृदयांत धुमसत असलेला आपला सर्व राग आणि आकस जेव्हां पिसाटासारखा प्रकट केला, आणि आपलें खरें स्वरूप जेव्हां महाराष्ट्राला दाखवलें, तेव्हां त्यांच्या न्यायीपणाची जाहिरात करणाऱ्या महाराष्ट्रांतल्या त्यांच्या काँग्रेसवाल्या भगताचें सपशेल दिवाळें वाजलें.

ह्यानंतर त्यांच्या पुढें दोनच मार्ग मोकळे राहिले. आपल्या अधिकारपदांचे आणि सभासदत्वाचे राजिनामे देऊन काँग्रेसमधून बाहेर पडावयाचें आणि छातीठोकपणें संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यामध्यें दाखल व्हावयाचें. नाहीं तर नेहरूंनीं मुंबईबाबत दिलेला निर्णय शिरसामान्य करून महाराष्ट्राच्या राजकारणांतून आणि सार्वजनिक जीवनांतून नामशेष होऊन जावयाचें. आणि ह्याच अपेक्षेनें गेल्या सोळा आणि सतरा तारखेला पुण्यामध्यें भरलेल्या महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस समितीच्या बैठकीकडे सारा महाराष्ट्र बघत होता. आगामी निवडणुकांमध्यें महाराष्ट्र काँग्रेसला अपयश येऊन महाराष्ट्रामधून ती अजीबात नष्ट झाली तरी बेहेत्तर असें नेहरूंनीं स्पष्ट बोलून दाखविलें आणि महाराष्ट्र काँग्रेसच्या कमरेंत चांगली सणसणीत लाथ घातली. तेव्हां आतां तरी महाराष्ट्र काँग्रेसचें तेज आणि स्वाभिमान खळबळून उठेल आणि ती मराठी मंत्र्यांना आणि आमदारांना राजिनाम्याचा आदेश देईल असें पुष्कळांना वाटत होतें. पण कसचें काय अन् कसचें काय. नेहरूंच्या निर्णया-पासून जवळ जवळ पंधरवडाभर जिला बाळंतवेणा येत होत्या ती महाराष्ट्र काँग्रेस गेल्या रविवारीं अखेर बाळंत झाली. काका गाडगीळ, नाना कुंटे, भाऊसाहेब हिरे, यशवंतराव चव्हाण अशा कसलेल्या आणि अनुभवी 'सुईणीं'नीं तिचें बाळंतपण केलें. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं महाराष्ट्र काँग्रेस बाळंत होऊन तिला 'मूल' व्हावयाच्या ऐवजीं 'मुसळच' झालें.

महाभारतामध्यें एक गोष्ट आहे. दारू पिऊन उन्मत्त झालेल्या यादवांनीं एका ऋषीची चेष्टा करण्यासाठीं एका यादवाला गर्भारशीचें सोंग देऊन त्याच्याकडे आशीर्वादाला पाठविलें. ऋषीनें ती थट्टा ओळखून 'तुला मुसळ होईल' असा शाप दिला आणि त्याला खरोखरच मुसळ होऊन शेवटीं त्या मुसळानें सर्व यादवांचा नाश केला. त्याप्रमाणें 'राजीनामे देतों, राजिनामे देतों!' अशीं आश्वासनें देऊन ज्या महाराष्ट्र काँग्रेसनें तीन कोटी मराठी जनतेची पूर्वी दोन वेळां अक्षम्य फसवणूक केली, तिच्याच शापामुळें कीं काय ह्या तिसऱ्या वेळीं महाराष्ट्र काँग्रेसला 'राजीनाम्याचें बाळसेंदार मूल' व्हावयाच्या ऐवजीं हातपाय अन् नाकडोळे नसलेलें हें मुरदाड 'मुसळ' झालें असावें. तथापि, हें मुसळ निर्जीव असलें तरी यादवांप्रमाणेंच मराठी काँग्रेसवाल्यांचा जीव घेण्याचें सामर्थ्य त्यामध्यें निश्चित आहे यांत कांहीं शंका नाहीं.

महाराष्ट्र काँग्रेसचा हा ठराव म्हणजे कोडगेपणाचा, बेवकूफपणाचा आणि

ऱ्याडपणाचा परमोच्च कळसच होय! तीन कोटी मराठी जनतेच्या पवित्र भावनेची ह्यापेक्षां अधिक हिडीस हेटाळणी करतां येणें अशक्य आहे. कर्तव्य-द्रोहाचें आणि विश्वासघाताचें ह्यापेक्षां अधिक घृणास्पद उदाहरण आढळणार नाहीं. संयुक्त महाराष्ट्राच्या पाठींत सुरी खुपसण्याच्या नेहरूंच्या अघोरी निर्णयाबद्दल महाराष्ट्र काँग्रेसनें 'अत्यंत असंतोष आणि असमाधान' व्यक्त केलें आहे. घराला आग लागली असली तर हे बेवकूफ लोक 'घरांत फार उकडतें आहे' एवढेंच फक्त म्हणतील. संयुक्त महाराष्ट्राचें उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं भारतीय ऐक्याला उपसर्ग न पोहोंचेल अशा लोकशाहीच्या आणि शांततेच्या मार्गानें प्रयत्न करण्याचें महाराष्ट्र काँग्रेसनें ह्या ठरावांत आश्वासन दिलें आहे. ह्याचा अर्थ हा कीं नेहरूंनीं आणि काँग्रेसश्रेष्ठींनीं महाराष्ट्रावर कितीहि जुलूम केला तरी महाराष्ट्र काँग्रेस त्याविरुद्ध यत्किंचित्‌हि प्रतिकार करणार नाहीं. एवढेंच नव्हे र मुंड्या खालीं घालून काँग्रेसश्रेष्ठींच्या लाथा खात मराठी मंत्र्यांना, खासदारांना गाणि आमदारांना आपापल्या अधिकारपदांना घट्ट चिकटून राहा असें ती सांगत हणार. भारताचें ऐक्य टिकविण्याचा महाराष्ट्र काँग्रेसला एवढाच लोकशाहीचा गाणि शांततेचा मार्ग माहित आहे.

ठरावाचा शेवटचा भाग असा आहे कीं मुंबई-बेळगांववांचून जो नवा महाराष्ट्र मस्तित्वांत येणार आहे त्याची जबाबदारी आतां महाराष्ट्रांतल्या काँग्रेसवाल्यांनीं नंगावर घ्यावयाला पाहिजे. तेवढ्यासाठीं भाषिक प्रांताबद्दल महाराष्ट्र काँग्रेसचें धोरण ाय आहे हें लोकांना समजावून सांगावयाला हवें. हें धोरण लोकांना समजावून ांगावयाचें म्हणजे लोकांमध्यें गेलें पाहिजे, मिसळलें पाहिजे, सभा भरविल्या ाहिजेत, व्याख्यानें दिलीं पाहिजेत. पण ती गोष्ट तर आज मुळींच शक्य नाहीं. ारण महाराष्ट्र काँग्रेसवाल्यांबद्दल जनतेला आज एवढी चीड आहे कीं ते कुठेंहि ले तरी लोक त्यांना काळीं निशाणें आणि जोडे घेऊन धावतात. एवढ्यासाठीं नतेमध्यें प्रचारकार्य करण्याच्या दृष्टीनें सोयीस्कर व्हावें म्हणून जर कुणाला आपल्या मधिकारपदाचा राजिनामा देणें आवश्यकच वाटलें तर त्यांना तो देण्याची हाराष्ट्र काँग्रेसनें ह्या ठरावानें मुभा दिलेली आहे.

लक्ष्यांत ठेवा, नेहरूंनीं आणि काँग्रेसश्रेष्ठींनीं महाराष्ट्रावर धादांत अन्याय केला कंवा मोरारजींनें गोळीबार करून शेकडों महाराष्ट्रीय माणसें जखमी केलीं, ठार ारलीं आणि जबरदस्तीनें तुरुंगांत घातलीं म्हणून जबाबदार काँग्रेसवाल्यांनीं

आपापल्या अधिकारपदाचा राजिनामा द्यावा असें महाराष्ट्र काँग्रेस सांगत नाहीं. मुंबई, बेळगांव, कारवारवांचून अर्धेमुर्धे कुरतडलेलें महाराष्ट्र राज्य स्थापन होतें आहे म्हणून त्याच्या निषेधासाठीं त्यांना राजिनामे द्यायला महाराष्ट्र काँग्रेस सांगत नाहीं. उलट, असें राज्य निर्माण व्हावें म्हणून जनतेंत निर्धास्तपणें प्रचार करण्यासाठीं सोयीस्कर व्हावें, लोकांनीं काळीं निशाणें दाखवूं नयेत किंवा जोडे मारूं नयेत म्हणून आवश्यक वाटेल तर राजिनामे द्यावेत असें महाराष्ट्र काँग्रेस सांगत आहे. 'भाषिक प्रांताबद्दलचा प्रदेश काँग्रेसचा दृष्टिकोन काय आहे हें जनतेला समजावून सांगण्यासाठीं आवश्यक असेल तर राजिनामा द्यावा.' ही ठरावाची भाषा लुच्चेगिरीची आहे. महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसचा भाषिक प्रांतांबद्दलचा दृष्टिकोन काय आहे ही गोष्ट महाराष्ट्रांतल्या सर्व जनतेला इत्थंभूत माहित आहे. ह्याबद्दल जनतेला नवीन सांगण्यासारखें महाराष्ट्र काँग्रेसजवळ आतां काय आणखी उरलेलें आहे?

आज महाराष्ट्रांत काँग्रेस नेत्यांना जाहिरपणें हिंडणें सुद्धां मुष्किल झालें आहे. म्हणून तेवढा अडथळा दूर करण्यासाठीं ही 'आवश्यक असेल तर राजिनामा देण्याची' युक्ति महाराष्ट्र काँग्रेसनें शोधून काढली आहे. ह्या युक्तीचा फायदा जर एखाद्या काँग्रेसवाल्यानें घेतला 'तर मुंबईबेळगांवसह संयुक्त महाराष्ट्र' होण्यास आपलाहि पाठिंबा आहे असें सांगून तो काँग्रेसचा प्रचार करीत महाराष्ट्रांत राजरोसपणें हिंडूं शकेल. अशा रीतीनें हा ठराव नुसता भ्याडपणाचा नाहीं तर कावेबाजपणाचा आहे. लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्याचा तो एक धूर्त प्रयत्न आहे. सिलेक्ट कमिटीला किंवा लोकसभेला गुंडाळून ठेवून मुंबई पांच वर्षें केंद्रशासित करण्याचा जो हुकूमशाही निर्णय नेहरूंनीं दिला, तो बदलून घेण्यासाठीं तीन कोटी मराठी जनतेनें आतां पुढें काय करावें ह्याचें स्वाभिमानी मार्गदर्शन या ठरावांत कुठेंहि नाहीं. महाराष्ट्र काँग्रेसमध्यें किती स्वाभिमानशून्य आणि पौरुषहीन माणसें आतां उरलेलीं आहेत ह्याचा पुरावा म्हणजे हा ठराव होय. अशा नेभळ्या आणि नामर्द काँग्रेसकडून पराक्रमाची आशा करणें म्हणजे गाढवानें गंधर्वाप्रमाणें गावें, रेड्यानें कामधेनु व्हावें किंवा वांझोटीनें गांधारी व्हावें अशी अपेक्षा करण्यासारखेंच आहे.

असला हा मुडदेफरास ठराव महाराष्ट्र काँग्रेसनें मंजूर करावा म्हणून सदोबा पाटील आणि यशवंतराव चव्हाण या दोघांनीं एक मोठें धूर्त कारस्थान रचून महाराष्ट्र काँग्रेसला कसें घाबरवून सोडलें ह्याची विश्वसनीय बातमी आतांच

आमच्या हातीं आली आहे. ती ऐकून आम्ही तर थक्कच झालों. काय केलें ह्या कावेबाज दुकलीनें कीं महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसची बैठक भरावयाच्या आधीं दोन दिवस त्यांनीं मराठी व इंग्रजी वृत्तपत्रांमधून नेहरूंच्या नांवावर एक बनावट बातमी छापवून आणली. ती अशी कीं, "महाराष्ट्र काँग्रेस नेत्यांनीं एक तर नेहरू योजना स्वीकारावी किंवा सामान्यपणें काँग्रेसमधून निघून जावें असा स्पष्ट इशारा काँग्रेसश्रेष्ठींनीं महाराष्ट्र काँग्रेसच्या कार्यकारिणीला दिला आहे. पंतप्रधान नेहरूंनीं स्वतः महाराष्ट्र काँग्रेसच्या नेत्यांना आपण बेशिस्त वर्णन मुळींच सहन करणार नाहीं असें कळविल्याचें समजतें." ह्या बातमीनें महाराष्ट्र काँग्रेसचे सभासद गर्भगळित होऊन थरथरा कांपूं लागले. आणि त्याचाच परिणाम होऊन महाराष्ट्र काँग्रेसनें मशारनिल्हे मुडदेफरास ठराव पास केला. मागाहून नेहरूंनीं आणि काँग्रेसश्रेष्ठींनीं महाराष्ट्र काँग्रेसला दम दिल्याची ती बातमी खोटी आणि अनधिकृत आहे असें वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालें. पण मग काय उपयोग? त्या बातमीचा जो परिणाम व्हावयाचा तो आधींच होऊन गेला होता.

महाराष्ट्र काँग्रेसमधलीं सर्वच माणसें मुळामध्यें भोंगळ आणि भेकड. त्यांतून त्यांच्या भोंवतालीं इतक्या पापग्रहांचा गराडा पडला होता कीं एवढा फडतूस ठराव सुद्धां ते करूं शकले हा त्यांच्या हातून घडलेला फार मोठा पराक्रम आहे असेंच म्हणावयास हवें. हा ठराव भाऊसाहेब हिरे ह्यांनीं जरी मांडलेला असला तरी त्याच्या पोचट, अर्थशून्य आणि कावेबाज भाषेवरून तो ठराव शंकरराव देवांसारख्या दांभिक आणि तत्त्वशून्य गांधीवाद्याच्या सडक्या मेंदूमधूनच निघालेला असावा ह्याबद्दल आमच्या मनांत तरी तिळमात्र शंका नाहीं. 'राजिनामा' या शब्दाची धार जितकी बोथट करतां येईल तितकी ती करण्याचा किती कसोशीनें प्रयत्न केला आहे हें पाहण्यासारखें आहे. तरी सुद्धां तो शब्द असलेल्या ठरावांच्या अखेरच्या दोन ओळीं गाळण्यांत याव्या अशी उपसूचना चव्हाण गटानें आणली. आणि ती उपसूचना ५६ विरुद्ध ६६ मतांनीं फेटाळली गेली आणि मूळ हिरे ह्यांचा ठराव पास झाला.

मुडदा खांद्यावर न्यावा का हातगाडींत न्यावा एवढाच काय तो वाद. पण तेवढ्यावर 'हिरे गट' आणि 'चव्हाण गट' असे दोन गट पडले आहेत असें नाटक करून केवढ्या प्रखर विरोधानंतर मूळ ठराव पास झाला असा बाहेर भ्रम निर्माण करण्यांत आलेला आहे. एकोणतीस जानेवारीला महाराष्ट्र काँग्रेसनें

केंद्रशासित मुंबईसंबंधीं जो ठराव केला होता तो देखील ह्या ठरावाच्या मानानें पुष्कळच जहाल होता. मुंबईबद्दलच्या आमच्या भावना व्यक्त करण्यासाठीं आम्हांला आमच्या जागांचे राजिनामे देण्याची परवानगी मिळावी, अशी त्या ठरावांत काँग्रेसश्रेष्ठींकडे विनवणी करण्यांत आली होती. आतां मुंबईवर झालेल्या अन्यायाचें स्वरूप अधिक भयानक झालें असूनहि त्यासंबंधीं आपल्या भावना व्यक्त करण्यासाठीं कोणतीहि कृति करण्याची महाराष्ट्र काँग्रेसला आवश्यकता वाटत नाहीं. यावरून गेल्या साडेचार महिन्यांत तिचा किती अधःपात झाला आहे हें दिसून येतें.

ठरावावर जीं निरनिराळ्या पुढाऱ्यांचीं भाषणें झालीं तीं इतकीं अप्रामाणिक-पणाचीं, ढोंगीपणाचीं आणि पौरुषशून्य होतीं कीं कोणाहि स्वाभिमानी महाराष्ट्री-यांना तीं वाचून ओकारी आल्यावांचून राहणार नाहीं. हीं कोण माणसें बोलताहेत कां बिनशेपटाचीं जनावरें बोलताहेत असाच क्षणोक्षणीं भास होतो. महाराष्ट्र काँग्रेसचे अध्यक्ष मामा देवगिरीकर ह्यांचें भाषण त्यांच्या अंतरंगासारखेंच ओंगळ आणि बहिरंगासारखेंच भोंगळ होतें. महाराष्ट्राचे शत्रू संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांवर जे दुष्ट आणि खोटे आरोप करतात तेच त्यांनीं केले. ते म्हणाले, "महाराष्ट्रानें केवळ आपली संस्कृति आणि सुधारणा गमावली नाहीं तर इतर प्रांतांची सहानुभूतीहि गमावली!" पाहिलंत, हा भडभुंजा मामा किती खुनशी आणि खोडसाळ आहे तो? 'मुंबईबाबत केवळ आमचा नाहीं तर सर्वांचा पराभव झाला आहे!' असा कांगावा करून स्वतःच्या नादान निष्क्रियतेचें खापर संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या डोक्यांवरहि फोडावयाला त्यांनीं कमी केलें नाहीं.

मामांचे थोरले भाऊ काका! त्यांना तर आतां म्हातारचळच लागला आहे. ते काय बोलतात त्याचा आतां अर्थच कळेनासा झाला आहे. ते म्हणाले, "काँग्रेस ही श्रेष्ठ असेल पण देश हा काँग्रेसपेक्षां श्रेष्ठ आहे. ही चाळीस वर्षें सार्वजनिक जीवन जगून संपादन केलेली माझी श्रद्धा आहे." देश किंवा जनता ही काँग्रेस-पेक्षां मोठी आहे हें आजचें चार वर्षांचें शेंबडें पोर सांगू शकेल. त्यासाठीं चाळीस वर्षें खर्च करण्याचें काय कारण? पण निरर्थक नाटकी भाषणें करण्याची काकांना मुळीं खोडच लागून राहिली आहे, त्याला काय करायचें? पुढें ते म्हणाले, "महाराष्ट्रीय जनतेचें अंतःकरण काँग्रेसनें पुन्हा जिंकलें पाहिजे. अधिकारपदाचे जोडे बाहेर काढून ठेवल्यावांचून जनतेच्या हृदयमंदिरांत आपल्याला शिरतां येणार नाहीं. जनतेशीं समरस होतां येणार नाहीं!" एवढ्या शहाणपणाच्या सर्व गोष्टी

बोलून पुन्हा अधिकारपदाचा राजिनामा द्यावयाचा प्रश्न आला कीं काकांची अक्कल कुठें शेण खायला जाते तें कळत नाहीं!

स्वतःच्या खासदारीचा राजिनामा देण्याच्या बाबतींत एक अक्षर त्यांच्या थोबाडांतून बाहेर आलें असेल तर हराम. ते म्हणाले, "लोकसभेंत राज्य-पुनर्रचना विधेयक आलें तर तें मी दुरुस्त करून घेण्याची कसोशी करीन. नाहीं तर मी बिलाच्या विरुद्ध मत देईन." काकांचे हे उद्गार ऐकून हसावें का रडावें हेंच कळत नाहीं. नेहरूंच्या मागें सारी लोकसभा उभी असतांना मुंबईबाबतचा निर्णय मी बदलून घेईन ह्या काकांच्या बाष्कळ थापेबाजीला कांहीं अर्थ आहे का? बिलाच्या विरुद्ध मी मत देईन ही काकांची दमदाटी चोर आला तर मी अंगावर पासोडी घेईन ह्या म्हाताऱ्या विधवेच्या धमकीसारखी हास्यास्पद आहे. 'भाऊसाहेब हिऱ्यांना जोडा लागलेला पाहून आम्ही घरांतली सर्व मंडळी रडलों!' असें म्हणून काका गाडगीळ अक्षरशः रडूं लागले असें म्हणतात. कोणाच्या रडण्याची कधीं थट्टा करूं नये. पण मोरारजींनीं गोळ्या घालून नऊ नऊ वर्षांचीं मुलें आणि साठ साठ वर्षांचे म्हातारे जेव्हां ठार मारले (ज्या पापांत भाऊसाहेब हिऱ्यांचाहि हात होता) त्यावेळीं जे काकासाहेब सहकुटुंब रडल्याचें ऐकिवांत नाहीं, ते भाऊसाहेब हिऱ्यांना जोडा लागल्याबरोबर मात्र ढळढळा रडूं लागतात, तेव्हां काकासाहेबांचे हे अश्रु शुद्ध नाटकी 'नक्राश्रू' आहेत असें आम्हीं म्हणूं नये तर काय म्हणावें?

'महाराष्ट्र कॉंग्रेस'मधलीं काका आणि मामा हीं दोन पात्रें एवढीं विनोदी आहेत कीं शेक्सपीअरच्या नाटकामध्येंसुद्धां अशी विनोदी जोडगोळी आढळणार नाहीं. पण भाऊसाहेब हिरे हें पात्र नाटकांतलें वाटत नाहीं. एखाद्या तिसऱ्या दर्जाच्या सर्कशींतले ते एक विदूषक वाटतात. राजकारणांत इतका निर्बुद्ध माणूस क्वचित्च शिरला असेल. आणि शंकरराव देवांचा गुरुमंत्र घेतल्यापासून तर त्यांच्या होत्या नव्हत्या तेवढ्या बुद्धीचें अगदीं वेलवांगें होऊन गेलें आहे. मागें जानेवारी महिन्यांतल्या ठरावावरहि भाऊसाहेब हिऱ्यांनीं महाराष्ट्र कॉंग्रेसमध्यें एक विलक्षण विदूषकी भाषण केलें होतें. त्यावेळीं ते म्हणाले होते कीं, "आमची मागणी न्याय्य आहे हें कॉंग्रेसनेत्यांना आम्ही पुन्हा पुन्हा आर्जवून सांगूं. पण त्या-प्रीत्यर्थ कॉंग्रेस नेत्यांना संकटांत व खोड्यांत टाकणार नाहीं. संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर मी कॉंग्रेस सोडण्यास तयार नाहीं. मी वाटेल ते अपमान गिळीन पण

कॉंग्रेसचें नेतृत्व झुगारून देणार नाहीं. कॉंग्रेसश्रेष्ठींनीं आम्हांला राजिनामे देण्याची जर परवानगी दिली नाहीं तर मात्र आम्ही काय करूं? काय करूं? कांहीं एक नाहीं. मान खालीं घालून, सर्व अपमान गिळून आम्ही कॉंग्रेसमध्येंच राहूं. कॉंग्रेसची शिस्त पाळूं. आणि उर्वरित आयुष्यांत गरीब जनतेच्या कल्याणाचीं कामें करीत बसूं!" असलें मुरदाड आणि शेंदाड भाषण करून भाऊसाहेबांनीं आपला वकूब त्याचवेळीं प्रकट केला होता.

त्या जुन्या कीर्तीला शोभेल असेंच ह्या वेळीं त्यांनीं भाषण केलें. ते म्हणाले, "पूर्वी आम्हांला दिवसांतून दहा दहा आमंत्रणें येत होतीं. आतां महाराष्ट्रांत आम्हांला कोणी कुत्रेंहि विचारीत नाहीं. मला संधि मिळाल्यास मी राजीखुषीनें अधिकारपद सोडीन. जनतेच्या भावनेशीं एकरूप होणें हें माझें कर्तव्य आहे. जनतेला कोरड्या बुद्धिवादाच्या गोष्टी समजत नाहींत. त्यांना साधी प्रत्यक्ष कृति कळते. मंत्र्यांनीं कांहीं कृति करून दाखवावी अशी जनतेची मागणी आहे. मला जनतेपुढें जाऊं द्या. जनतेच्या संतापाला तोंड देऊं द्या. लोक माझें ऐकतील अशी माझी खात्री आहे." जनतेच्या भावनेशीं समरस व्हावयाला पाहिजे आणि कांहीं तरी कृति करून दाखवावयाला पाहिजे ही अक्कल इतके दिवस भाऊसाहेबांना आली नाहीं. ती आतां त्यांच्या गालफडांत जोडा बसला तेव्हां आली काय? आणि एवढेंहि करून भाऊसाहेबांनीं आतां 'कृति' काय केली? तर आपल्या मंत्रिपदाचा राजिनामा देण्याची आपल्याला परवानगी मिळावी म्हणून ते ढेबरचे पाय चाटायला दिल्लीला पळत गेले. पण ढेबरानें त्यांची चांगलीच संभावना केली. नकाराचा रेशमी चढाव त्यांनीं भाऊसाहेबांच्या दुसऱ्या गालफडांत लगावला.

झालें, निकाल लागला भाऊसाहेबांचा. आतां भाऊसाहेब कसली 'कृति' करून दाखवणार? महाराष्ट्रांतल्या कुत्र्यांनींसुद्धां भाऊसाहेबांचें पाणी ओळखलें आहे. म्हणूनच तीं त्यांना विचारीत नाहींत. जीं कुत्रीं म्युनिसिपालिटीच्या दिव्याच्या खांबांना आणि रस्त्यावरच्या दगडांना विचारतात, त्यांनीं आमच्या भाऊसाहेबांना विचारूं नये, ह्याचा काय अर्थ आहे? भाऊसाहेब हिऱ्यांना अधिकारपदावरून कोणीं धक्के मारून हाकून दिलें तरी ते जाणार नाहींत. मंत्रिपद सोडून ते करणार काय? निंबगांव-मालेगांवचे उकिरडे फुंकीत बसणार? आणि समजा इतकेंहि करून उद्यां भाऊसाहेबांनीं मंत्रिपदाचा राजिनामा देण्याचें नाटक केलें तरी त्याचा तीन कोटी मराठी जनतेवर काय परिणाम होणार आहे? कांहीं नाहीं. असल्या

नाटकानें फसण्याइतकी मराठी जनता आतां मूर्ख राहिली नाहीं. मोरारजींनीं मारलेल्या मराठी माणसांच्या रक्तानें भाऊसाहेब हिऱ्यांचेहि हात भरलेले आहेत. अशल्या महाराष्ट्रघातकी माणसाला मराठी जनता कालत्रयीं क्षमा करणार नाहीं. मग तो राजीनामा देवो नाहीं तर संन्यास घेवो!

बाकी, ह्या महाराष्ट्र काँग्रेसच्या साऱ्या नाटकांत जर कोणी 'कलिपुरुष' असेल तर तो यशवंतराव चव्हाण. मोरारजींचा तो मुळीं कल्याणशिष्यच आहे. म्हणून मोरारजींचा संरक्षक हस्त सदैव त्याच्या डोक्यावर आहे. त्याखेरीज का महाराष्ट्राशीं एवढी निमकहरामी करण्याचें धैर्य आतांपर्यंत त्याला झालें? अधिकारपदाचे राजिनामे देण्याला यशवंतरावानें निकराचा विरोध केला. आतां अक्षरशः मोरारजींचीच भाषा यशवंतराव बोलूं लागले आहेत. ते म्हणाले, "केवळ खूप लोकांचे जमाव आपल्याभोंवतीं जमविणें ह्यामध्यें नेतृत्व नाहीं!" यशवंतराव आणि मोरारजींनीं लोकनेत्याची आतां ही नवीन व्याख्या तयार केली आहे, 'ज्याच्या पाठीशीं कोणीहि अनुयायी नाहीं, आणि ज्याच्या पाठीमागें लोक जोडे घेऊन लागतात, तो खरा लोकनेता!' यशवंतरावांनीं अगदीं आपल्या अनुभवामधून लोकनेत्याची ही व्याख्या तयार केलेली दिसते. राजिनाम्याच्या कल्पनेस चव्हाणांनीं विरोध केला, एवढेंच नव्हे तर त्या बाबतींत ५६ माणसांच्या गटाचा त्यांनीं पाठिंबा मिळवला, ही घटना सर्वांत फार महत्त्वाची आहे. एवढा मोठा गट महाराष्ट्र काँग्रेसमध्यें यशवंतराव कसा निर्माण करूं शकले तें समजून घेणें जरूर आहे.

आम्हांला मिळालेल्या खात्रीलायक बातमीवरून आम्ही आजच असें जाहीर करतां कीं, एक ऑक्टोबर पासून जें नवें महाराष्ट्र राज्य अस्तित्वांत येणार आहे, त्या राज्याचे हंगामी मुख्य मंत्री यशवंतराव चव्हाणांना करण्याचें मोरारजींनीं त्यांना वचन दिलेलें आहे. त्या जोरावर निरनिराळीं प्रलोभनें दाखवून यशवंत-रावांनीं महाराष्ट्र काँग्रेसमध्यें आपल्या अनुयायांचा एवढा मोठा गट तयार केला आहे. यशवंतरावासारखा महाराष्ट्रद्रोही माणूस सार्वत्रिक निवडणुका होईपर्यंतच्या काळामध्यें का होईना पण नव्या महाराष्ट्राच्या मुख्य मंत्रिपदीं कसा बसतो तें महाराष्ट्राची जनता योग्य वेळीं पाहून घेईल. खरोखर, महाराष्ट्र काँग्रेसनें गेल्या रविवारचा अत्यंत भेकड आणि अंगचुकार ठराव पास करून स्वतःचा तर नाश करून घेतला आहे, पण त्याबरोबर तीन कोटी मराठी जनतेचा अक्षरशः गळा कापला आहे! ह्या गळेकापीच्या कामांत जर कोठें उणेपणा राहिला असेल तर तो

दूर करण्याच्या कामावर हिरे आणि चव्हाण ह्या दोघा महाराष्ट्रद्रोही सिद्धसाधकांची नेमणूक करण्यांत आली आहे. म्हणून त्यांच्या प्रत्येक हालचालीकडे मराठी जनतेनें अत्यंत बारकाईनें लक्ष द्यावयास हवें.

महाराष्ट्र काँग्रेसच्या ह्या नादान, स्वाभिमानशून्य आणि विश्वासघातकी वर्तनानें सारा महाराष्ट्र चिंताग्रस्त आणि नैराश्यव्याप्त झाला असतां, भारताचे अर्थमंत्री चिंतामणराव देशमुख ह्यांनीं केंद्रशासित मुंबईच्या नेहरू निर्णयाचा निषेध करण्यासाठीं दिलेला राजिनामा नेहरूंनीं स्वीकारल्याची बातमी एकदम येऊन धडकली. त्याबरोबर 'शाबास चिंतामणराव देशमुख, शाबास आहे तुमची, तुम्हींच काय ती महाराष्ट्राची अब्रू राखलीत!' असेच धन्योद्गार तीन कोटी महाराष्ट्रीयांच्या हर्षोत्फुल्ल मुखामधून बाहेर पडले असतील यांत शंका नाहीं. खरोखरच खरा मर्द, खरा मराठा जर कुणाला म्हणावें तर ते चिंतामणराव देशमुखांना. त्यांनीं महाराष्ट्रमातेची कूस धन्य केली. काका–मामा–हिरे–चव्हाण ह्यांनीं मराठी आईबापांच्या पोटीं जन्म घेऊन त्यांना निष्कारण शीण दिला आणि महाराष्ट्राचें नांव साऱ्या भारतांत बदनाम केलें. देशमुख हे नांवाप्रमाणें खरोखरच 'देशमुख' आहेत. बाकीचे सारे महाराष्ट्र-काँग्रेसवाले हे दश-मुख (म्हणजे रावण) आहेत. दुसरें काय? काँग्रेसमधले बाकीचे सारे मराठी मंत्री शेपट्या घालून बसले असतांना, चिंतामणराव देशमुख हा असा बहादूर मराठा वीर निघाला कीं ज्यानें नेहरूंच्या तोंडावर आपला राजिनामा मारून त्यांना निक्षून सांगितलें कीं "मुंबई महाराष्ट्रापासून तोडून तुम्हीं आमच्यावर जो अन्याय केला आहे त्याचा हा मी निषेध करतों!" मंत्रिपदाची लाच देऊन विकत न घेतां येणारा निदान एक तरी तेजस्वी मराठी माणूस ह्या भारतांत आहे हें देशमुखांनीं नेहरूंना दाखविलें ह्याबद्दल महाराष्ट्र देशमुखांचा सदैव ऋणी राहील. संयुक्त महाराष्ट्राच्या इतिहासांत देशमुखांचें नांव सुवर्णाक्षरांनीं लिहिलें जाईल. देशमुखांचा हा महान् पराक्रम बघून आम मराठी जनता 'महाराष्ट्रभूषण' देशमुखांचा मुक्तकंठानें जयजयकार करील तर 'महाराष्ट्रदूषण' काका–मामा–हिरे–चव्हाणांचा धिःक्कारच करील!

२४–६–१९५६

# चोरांचा बाजार !

पांच वर्षे मुंबई केंद्रशासित करण्याचा निर्णय नेहरूंनीं मुंबईमध्यें जो दिला, तो मुंबई शहरामधलें प्रक्षुब्ध आणि प्रतिकूल वातावरण बघून त्यांचें माथें भडकलें म्हणून दिला अशी कांहीं लोकांची जी समजूत आहे ती साफ चुकीची आहे. नेहरूंनीं धारण केलेला जमदग्नि अवतार हें त्यांचें शुद्ध नाटक होतें. असलें नाटक वेळोवेळीं करून दाखविण्यांत त्यांचा हातखंडा आहे. काय वाटेल तें झालें तरी मुंबई महाराष्ट्राला द्यायची नाहीं ही प्रतिज्ञा त्यांनीं आठ वर्षांपूर्वीच करून ठेवलेली आहे. मुंबई पांच वर्षे केंद्रशासित करावयाची हा निर्णयसुद्धां पूर्ण विचाराअंतीं मनाशीं पक्का ठरवूनच ते दिल्लीहून मुंबईला आले. आणि संतापल्याचें सोंग करून त्यांनीं तो महाराष्ट्राच्या टाळक्यावर मारला. केवळ रागाच्या भरांत हा निर्णय त्यांनीं दिला असें मानलें, तर राग थंड झाल्यानंतर असा अन्यायी निर्णय दिल्याबद्दल त्यांना थोडा तरी पश्चात्ताप वाटावयाला नको का? पण हा निर्णय दिल्यानंतर सत्रा दिवसांनीं म्हणजे वीस जूनला विलायतच्या दौऱ्यावर जाण्यापूर्वी दिल्लीच्या रामलीला मैदानावर त्यांनीं जें पन्नास मिनिटांचें भाषण केलें त्यामध्यें पश्चात्ताप तर राहूंद्याच पण त्याच जुल्मी निर्णयाचे कडूजहर डोस महाराष्ट्राला मोठ्या संभावितपणानें आणि शहाजोगपणानें पुन्हा पाजण्याचा प्रयत्न केला आहे. त्या निर्णयांत कानामात्रेचा देखील फरक करण्याची त्यांना आवश्यकता वाटली नाहीं.

ते म्हणाले, "पांच वर्षे मुंबई केंद्रशासित करण्याच्या निर्णयाचा महाराष्ट्रीय जनतेनें स्वीकार करावा. अंतर्गत भांडणें हिंसेनें मिटवण्याची प्रवृत्ति देशांत वाढली तर येथें अराजक माजेल. लोकसभेनें मुंबईसंबंधीं निर्णय देण्याच्या आधीं मीं तो देऊन टाकला अशी माझ्यावर टीका झाली. त्यासंबंधीं माझा खुलासा असा कीं सरकारनें लोकसभेला तशी शिफारस केलेली आहे. माझा निर्णय अनेक महाराष्ट्रीयांना आवडला नाहीं. संकल्पित महाराष्ट्र राज्यांत मुंबईचा समावेश करण्याबद्दलचा त्यांचा दावा चांगलाच आहे यांत शंका नाहीं. पण

दुसऱ्याहि कांहीं गोष्टी विचारांत घेणें जरूर आहे. त्यांच्याकडे दुर्लक्ष करतां येणार नाहीं. मीं दिलेल्या निर्णयाला महाराष्ट्रीयांनीं—विशेषतः कॉंग्रेसवाल्यांनीं—मान्यता द्यावी. महाराष्ट्रांतले कॉंग्रेसवाले फार बिकट परिस्थितीमध्यें सांपडले आहेत हें मला माहीत आहे. हितसंबंधी पक्षांकडून त्यांची फार नाचक्की आणि निर्भर्त्सना होते आहे. पण अशा प्रचाराला जर आपण मान वाकवली तर कोणतेहि निर्णय घेणें किंवा त्याप्रमाणें वागणें बिकट होऊन बसेल. देशाच्या हितासाठीं त्यांनीं मुंबईसंबंधींचा निर्णय मान्य करावा. पुढचें ध्येय साध्य करण्याचा उत्तम मार्ग म्हणजे मुंबई शहरांतल्या दुसऱ्या जमातीच्या मनांतल्या शंका आणि भय नाहींसें करणें हा होय.

"मुंबईतल्या लोकांना आणि विशेषतः महाराष्ट्रीयांना माझी विनंति आहे कीं त्यांनीं शांत डोक्यांनीं आणि अंतःकरणांनीं चालू झगड्याचा त्यांच्या स्वतःच्या आणि देशाच्या हितावर किती परिणाम होईल ह्याचा विचार करावा. असले झगडे भांडणानें आणि हिंसेनें मिटत नाहींत. लोकशाही मार्गानें मिटतात. भांडणें आणि हिंसा ह्यांनीं समाजशत्रूंचे हात बळकट होतील. दुसरें काय? मुंबई शहर कोठल्याहि प्रदेशांत गेलें तरी मला कांहीं त्याची परवा नाहीं. कांहीं झालें तरी भारत एकच आहे. आणि कोणता एकादा जिल्हा कुठूनहि सुरू झाला म्हणून काय बिघडावयाचें आहे? पण भांडणामध्यें भावना उसळावयाला लागल्या म्हणजे त्यांना नियंत्रण घालणें जरूर आहे. आपल्यावर अन्याय झाला असें महाराष्ट्रीयांना वाटत असेल तर त्यांनीं ह्या सर्व प्रश्नांचा विचार करावा आणि सध्यांचा झगडा थांबवावा. स्वतःच्या देशाला त्यांनीं अन्याय करूं नये. मुंबईतले दंगे जबाबदार लोकांनीं केले नाहींत असें मी अजूनहि म्हणतों. हें सारें गुंडांचें काम आहे. त्यांना देशांत गोंधळ आणि फाटाफूट करून स्वतःचे खिसे भरायचे आहेत. मुंबईतली अलिकडची परिस्थिति इतकी अवघड झाली होती कीं ती आवाक्याबाहेर जाते कीं काय अशी पाळी आली होती. तेथें जें काय घडलें तें अत्यंत घृणास्पद होतें."

नेहरूंनीं हें सर्व भाषण अत्यंत थंड डोक्यानें केलेलें आहे असें समजावयाला हरकत नाहीं. पण त्यांत त्यांचे पूर्वग्रह, दुराग्रह, आडमुठेपणा आणि उन्मत्तपणा हे सर्व दुर्गुण अगदीं कांटोकांठ भरलेले आहेत. मुंबईतले दंगे जबाबदार लोकांनीं केले नसून गुंडांनीं केले असें तोंडानें नुसते म्हणायचे. पण गुंडांनीं केलेल्या

अत्याचाराबद्दल मात्र सबंध महाराष्ट्रीय जनतेला फांसावर चढवावयाचें हा नेहरूंचा कोठल्या मुलखाचा न्याय? त्याचबरोबर अंतर्गत भांडणें हिंसेनें मिटवण्याची प्रवृत्ति देशांत बळावत चालली आहे असाहि आरोप नेहरू करतात. ह्याचा अर्थ संयुक्त-महाराष्ट्रवादी चळवळ ही हिंसेवर आधारली आहे असें नेहरूंना म्हणावयाचें आहे. मग मुंबईतले दंगे गुंडांनीं केले असें नुसतें तोंडदेखलें म्हणण्यांत काय हांशील आहे? का, संयुक्तमहाराष्ट्रवादी हे गुंड आहेत असेंच नेहरूंना सुचवायचें आहे? मुंबईसंबंधींचा निवाडा लोकसभेनें निर्णय देण्यापूर्वीं आपण कां जाहीर केला ह्या संबंधीं नेहरूंनीं केलेला खुलासाहि अगदीं लंगडा आहे. ते म्हणतात सरकारनें तशी लोकसभेला शिफारस केली आहे. मग आम्ही नेहरूंना विचारतों कीं सरकारनें लोकसभेला केलेली ही खाजगी शिफारस अखिल भारतीय काँग्रेस समितीच्या बैठकींत आणि चौपाटीच्या वाळवंटावर एवढ्या तावातावानें शंख करून सांगण्याचें नेहरूंना काय कारण होतें? लोकसभेच्या निर्णयावर आधींपासून वजन आणावयाचा हा नेहरूंचा प्रयत्न अत्यंत अश्लाघ्य आणि लोकशाहीविरोधी आहे.

महाराष्ट्रीयांचा मुंबईसंबंधींचा दावा फार मजबूत आहे आणि मुंबई कोणत्या का प्रदेशांत जाईना मला त्याची परवा नाहीं हे नेहरूंचे उद्गार अप्रामाणिकपणाचे आणि ढोंगीपणाचे आहेत. मुंबई दुसऱ्या कोणत्या का प्रदेशांत जाईना पण ती महाराष्ट्रांत जातां कामा नये हा सगळा एकट्या नेहरूंचाच हट्ट आणि कट आहे ह्याबद्दल कोणाहि महाराष्ट्रीयाच्या मनांत आतां सुतराम् शंका नाहीं. नेहरूंच्या ह्या मायावी शब्दांनीं यापुढें कोणीहि महाराष्ट्रीय माणूस फसणार नाहीं. मुंबईवरील महाराष्ट्राचा दावा फार चांगला आहे असें जर का नेहरूंचें म्हणणें आहे, तर मग ते मुंबई महाराष्ट्राला ताबडतोब देऊन कां टाकत नाहींत? तर म्हणे त्या बाबतींत मुंबईमधल्या दुसऱ्या जमातींच्या मनांत शंका आणि भय आहे. हा नेहरूंचा शुद्ध कांगावा आहे. मुंबई शहरामधील अन्यभाषिक जमातींच्या मनांत भय आणि शंका उत्पन्न करण्यासारखें आजपर्यंत महाराष्ट्रीयांच्या हातून कांहींहि घडलें नाहीं. हा सगळा मुंबईमधील मूठभर भांडवलवाल्यांचा महाराष्ट्रीयांविरुद्ध प्रचार आहे. आणि त्याला नेहरू, ढेबर आणि मोरारजी ह्या त्रिकूटानें अवास्तव स्वरूप देऊन त्याचा नुसता बागुलबुवा बनविला आहे.

मुंबई शहरांतल्या मराठी जनतेविरुद्ध तेथील अन्यभाषिक जमातींनीं आतांपर्यंत काय काय तक्रारी केल्या आहेत आणि त्या कितपत खऱ्या आहेत ह्याची जाहीर

चौकशी व्हायला पाहिजे. पण महाराष्ट्रीयांवर वाटेल तसे गलिच्छ आरोप करावयाचे आणि त्यांची कायदेशीर चौकशी म्हणून करावयाचीच नाहीं हा कॉंग्रेसश्रेष्ठी आणि सरकार ह्यांचा नेहमींचा धंदा होऊन बसला आहे. नेहरू म्हणतात, महाराष्ट्रीयांनीं मुंबईमधल्या अन्यभाषिकांच्या मनांतल्या शंका आणि संशय नाहींसे करावेत म्हणजे पांच वर्षांनंतर मुंबई त्यांना मिळेल ! मुंबईमधल्या अन्यभाषिकांची जर आम्हीं मुळीं आगळीकच केली नाहीं, तर त्यांच्या मनांतल्या शंका आणि भय नाहींसें करावयाला आम्हीं मान्यता द्यावयाची म्हणजे आमच्यावरचा हा धादांत खोटा आरोप खरा आहे असेंच कबूल करण्यासारखें आहे. आणि मुंबईमधील अन्यभाषिकांच्या मनांतल्या शंका आणि भय नाहींसें करावयाचें म्हणजे काय करावयाचें? काय मुठींत नाक धरून आणि दांतीं तृण धरून आम्हीं प्रत्येक अन्यभाषिकाच्या घरोघर जावयाचें आणि त्यांना साष्टांग नमस्कार घालून सांगावयाचें कीं आम्हांला मुंबई द्यायला तुम्ही नेहरूंना सांगा! आणि एवढेंहि करून पांच वर्षांनंतर अन्यभाषिकांचें समाधान होईल ह्याची काय हमी? स्वातंत्र्य मिळविण्यापूर्वी मुसलमानांची समजूत घालावयाला ज्याप्रमाणें ब्रिटिशांनीं कॉंग्रेसला सांगितलें होतें त्याच मार्गाचें अनुकरण महाराष्ट्रीयांना मुंबईसाठीं अन्यभाषिकांच्या नाकदुराया काढावयाला आज नेहरू सांगत आहेत. ही काय लोकशाहीची पद्धत झाली ?

असल्या मानहानीच्या मार्गानें जाऊन स्वतःचें हसू करून घ्यावयाला महाराष्ट्रीय लोकांनीं आपल्या अकलेचें कांहीं दिवाळें वाजवलें नाहीं, हें नेहरूंनीं लक्षांत ठेवावें. नेहरू म्हणतात, 'महाराष्ट्रीयांना अन्याय झाला म्हणून त्यांनीं बाकीच्या देशावर अन्याय करूं नये!' म्हणजे काय जुल्म आहे पाहा! स्वतःवर झालेल्या भयंकर अन्यायाचा महाराष्ट्रानें नुसता प्रतिकार केला तर तो बाकीच्या देशांना अन्याय होतो होय? बाकीच्या सर्व देशाची पुनर्रचना भाषिक तत्त्वावर व्यवस्थित झालेली आहे. त्यांचें सारें ठीक आहे. सारा अन्याय आणि पक्षपात महाराष्ट्राच्या बाबतींत झाला आहे. तो अन्याय महाराष्ट्रानें शांतपणें सहन करावा आणि मुकाट्यानें मरून जावें म्हणजे साऱ्या देशाचें समाधान होईल काय? नेहरूंच्या भाषणांत तर्क आणि न्याय औषधाकरितां देखील आढळणार नाहीं! एखाद्या उन्मत्त आणि जुलमी हुकूमशहाला शोभेल असाच नेहरूंच्या भाषणामधला सर्व युक्तिवाद आहे.

महाराष्ट्राच्या बाबतींत नेहरूंनीं हिमालयाएवढा अन्याय करून तीन कोटी जनतेचीं

हृदयें रक्तबंबाळ करून टाकलीं. पण त्याचें तिळमात्र दुःख तरी महाराष्ट्रांतल्या आणि विदर्भांतल्या काँग्रेसवाल्यांना आहे काय? महाराष्ट्रीय आईबापांच्या पोटीं जन्माला आलेलीं आणि महाराष्ट्राच्या अन्नपाण्यावर वाढलेलीं नि पोसलेलीं मराठी माणसें काँग्रेसमध्यें शिरलीं म्हणजे इतकीं नादान आणि स्वाभिमानशून्य कशीं होतात हें आम्हांला कळत नाहीं! 'महाराष्ट्रापेक्षां नेहरू मोठे आहेत' अशी जी महाराष्ट्र-द्रोही घोषणा निमकहराम यशवंतराव चव्हाणानें फलटणला मागें केली होती ती सर्वच महाराष्ट्रीय काँग्रेसवाल्यांनीं कुंकवासारखी आपल्या कपाळावर कोरलेली दिसते. सारे मराठी काँग्रेसवाले नेहरूंचे गुलाम, शागिर्द आणि चपराशी झालेले दिसतात. महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसनें नेहरूंचा निर्णय अत्यंत असमाधानकारक आहे असें नुसतें तोंडानें म्हटलें आहे इतकेंच. पण हा नुसता कांगावा आहे. "इश्श मेलं, हा काय फाजिलपणा" असा 'प्रतिकार' करीत जशी एखादी प्रेयसी आपल्या प्रियकराच्या आक्रमक बाहुपाशांत जाऊन पडते, त्याप्रमाणें 'आपला निर्णय आम्हांला गडे, असमाधानकारक वाटतो' असें म्हणत म्हणत महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसनें नेहरूंच्या पायावर साष्टांग नमस्कार घातलेला आहे.

राजिनामे देण्याच्या बाबतींत देखील महाराष्ट्र काँग्रेसनें किती सोगें अन् किती ढोंगें केलीं आहेत तीं विचारूं नका. 'जरूर तर' आणि 'ज्याला तसे वाटेल त्यानें' म्हणे राजिनामे द्यावेत! कशासाठीं? असमाधानकारक नेहरू निर्णयाचा निषेध करण्यासाठीं? नव्हे, लोक जोडे मारतात आणि काळीं निशाणें दाखवतात म्हणून त्यांना खूष करण्यासाठीं. बरें, तसें कां होईना! लोक-रंजनासाठीं म्हणून तरी महाराष्ट्र काँग्रेसमधला एखादा 'मायेचा पूत' आपल्या अधिकारपदाचा राजिनामा देणारा निघावा कीं नाहीं? भाऊसाहेब हिरे आणि नानासाहेब कुंटे ह्या दोघांचीं नांवें मोठ्या थाटामाटानें जाहीर करण्यांत आली, कीं महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसच्या ठरावानुसार हे दोघे बहाद्दूर वीर आपल्या अधिकारपदाचे राजिनामे देऊन लौकरच बाहेर पडणार! तेवढ्यासाठीं मोरारजींचें दर्शन घेऊन ही जवानमर्द जोडगोळी राजिनाम्याची परवानगी मागाव-याला थेट दिल्लीला गेली ढेबरना भेटावयाला! ढेबर ह्यांच्या राजिनाम्यांना थोडीच परवानगी देणार? त्यांनीं त्यांचे कान चांगले पिरगाळून त्यांना परत पाठवून दिलें. त्यामुळें हिरे आणि कुंटे ह्यांना केवढें दुःख झालें असेल ह्याची इतरांना कशी कल्पना येणार? तरी देखील ढेबरची आज्ञा धाब्यावर बसवून ते दोघे राजिनामे

देणार अशी महाराष्ट्रांत हवा सुटून राहिली. निदान दोघांपैकीं नानासाहेब कुंटे हे तरी नक्की राजिनामा देणार अशा घरोघर लोक पैजा मारूं लागले.

नानासाहेब म्हणाले, "मी अलिबागला माझ्या मतदार संघांत जातों आणि बघा काय करतों तें!" तेव्हां लोक फुलांचे हार घेऊन नानासाहेबांच्या सत्कारासाठीं अलिबागला धावले. अखेर गेल्या मंगळवारीं नानासाहेबांच्या 'भ्रमाचा भोपळा' अलिबाग येथें फुटला! ते म्हणाले, "मुंबईचा प्रश्न हा मी जीवनमरणाचा प्रश्न मानीत नाहीं. आजपर्यंत मानला नाहीं. मुंबईचा निर्णय अमान्य असला तरी काँग्रेसनें आपणांस गेल्या आठ वर्षांत प्रगतीचे मार्गावर निश्चित नेलें आहे. मन वळवून आणि मतपरिवर्तन करून संविधानाच्या मार्गानेंच आपल्याला गेलें पाहिजे. काँग्रेसनें केलेल्या एकूणपन्नास गोष्टी आपण मानतों; मग एक गोष्ट अन्यायाची वाटते म्हणून कसें वागायचें ह्याचाहि आपण विचार केला पाहिजे. मी संकेत, बंधनें झुगारून काँग्रेसचा सेवक म्हणून काम करीत राहणार!" सर्व महाराष्ट्रभर राजिनाम्याच्या प्रचंड जाहिराती फडकावून शेवटीं नानासाहेब कुंट्यांनीं त्यांतून हा पिटुकला उंदीर बाहेर काढला कीं 'आपण यापुढें काँग्रेसचा कुंटणपणा करीत आयुष्य कंठणार!' वा रे वा, काँग्रेसमध्यें शिरल्यानें मराठी माणसें किती नादान आणि निर्लज्ज होतात ह्याचा हा एक नमुनेदार मासला आहे! कुंट्यांच्या राजिनाम्याचे असे तीन तेरा वाजल्यानंतर हिऱ्यांच्या राजिनाम्याचे काय पांच पावणे बारा वाजणार आहेत तें दिसतेंच आहे!

महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसनें नेहरू निर्णयाबाबत निदान 'असमाधानकारक' असा शब्द तरी वापरला. पण नागपूरच्या मराठी काँग्रेसवाल्यांनीं तर मुंबईसंबंधींच्या नेहरूंच्या निर्णयाला शंभर टक्के पाठिंबा दिला. पंधरा दिवसांपूर्वी नागपूर येथें चार जिल्ह्यांतल्या दीड हजार काँग्रेस कार्यकर्त्यांचा एक प्रचंड मेळावा श्री. तुमपल्लीवार ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरला होता. त्या सभेंत भाषण करतांना श्री. तुमपल्लीवार म्हणाले, "बंगालमध्यें कलकत्ता व मद्रासमध्यें मद्रास हीं शहरें जशीं त्या त्या प्रांताच्या सामाजिक चळवळीचीं केंद्रें आहेत तसें कांहीं मुंबई शहर आपल्या प्रांतांत नव्हतें. महाराष्ट्राचें सामाजिक केंद्र पुणें होतें. मुंबईला प्रदेश काँग्रेस कमिटी सुद्धां वेगळी होती. मुंबई शहरावर महाराष्ट्रीयांचा हक्क आहे तसाच इतरांचा आहे हें ह्या गोष्टीवरून स्पष्ट होतें. पांच वर्षांनीं लोकशाहीच्या पद्धतीनें मुंबईचा प्रश्न सोडविण्याचें आश्वासन मिळालें असतांना काँग्रेस विरोधकांनीं

काँग्रेसला नेस्तनाबूद करण्यासाठीं मुंबईचा प्रश्न पुढें करून आंदोलन उभारलें आहे!" श्री. तुमपल्लीवार ह्यांचें हें भाषण वाचल्यानंतर हा एक महाराष्ट्रीय माणूस बोलतो आहे अशी शंका देखील कोणाला येणार नाहीं. आम्हांला तर सदर तुमपल्लीवार हे सदोबा पाटलांचेच भाऊ वाटतात.

मध्यप्रदेशाचे आरोग्यमंत्री श्री. कन्नमवार ह्यांनीं तुमपल्लीवारांचीच 'री' ओढली. ते म्हणाले, "मुंबईच्या निमित्तानें काँग्रेसविरोधी पक्षांनीं एक मोट बांधून पंडित नेहरूंचें वर्चस्व कमी करण्यासाठीं आणि काँग्रेसला शासनावरून खालीं खेचण्यासाठीं ही चळवळ उभारली आहे. म्हणून वादविवाद बाजूला सारून एकजुटीनें पंडित नेहरूंच्या घोषणेचा प्रचार खेडोपाड्यांत केला पाहिजे. ह्या प्रश्नावर महाराष्ट्रांतून कोणी राजिनामे देतील अशी शक्यता दिसत नाहीं." नेहरूंनीं दिलेल्या निर्णयाचा प्रचार करण्यासाठीं आणि काँग्रेसचा संदेश जनतेमध्यें पोहोंचविण्यासाठीं मध्यप्रदेशांतील चार मराठी जिल्ह्यांत एका महिन्याच्या आंत कार्यकर्त्यांच्या एक हजार सभा आणि जनतेच्या शंभर जाहीर सभा भरविण्याचें ठरलें.

ह्या सभेंत माजी विकासमंत्री श्री. रा. कृ. पाटील ह्यांनीं नेहरूंच्या निर्णयाला मान्यता देण्याच्या ठरावाला 'त्या निर्णयाबाबत ह्या सभेंत भिन्न भिन्न मतं आहेत' अशी उपसूचना मांडली. त्या उपसूचनेवर बोलतांना श्री. पाटील म्हणाले, "नेहरूंच्या निर्णयाबद्दल महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसनें एकमतानें खेद व दुःख व्यक्त केलें आहे. मुंबईचा पांच वर्षांनीं निर्णय देण्याऐवजीं आतांच तो कां देत नाहीं हा एक प्रश्न आहे. नेहरूंवर माझा विश्वास आहे. नेहरू करतात ती गोष्ट बरोबर आहे कीं नाहीं हें सांगण्याचा मला हक्क आहे. अबू आणि बल्लारीबाबत बघा. नेहरू करतात तें सर्वच चांगलें असतें किंवा पंडित नेहरूंनीं घोषणा केली एवढ्याच दृष्टीनें मुंबईच्या प्रश्नाकडे न पाहतां, मुंबईचा प्रश्न सुटला आहे कीं नाहीं ह्या दृष्टीनें पाहा. महाराष्ट्रीयांची आज मुंबईत जी लोकसंख्या आहे, ती पांच वर्षांनंतर कायम राहील कीं नाहीं याबद्दल मी साशंक आहें. शिवाय मुंबईसारख्या उत्पादक केंद्रांत पांच वर्षें संघर्ष चालू ठेवणें हें चांगलें नाहीं!" श्री. पाटील ह्यांच्या ह्या भाषणाला सर्व काँग्रेसवाल्यांनीं जोराचा विरोध करून त्यांचें भाषण बंद पाडलें आणि त्यांची उपसूचना फेटाळून लावली! यावरून नागपूरच्या काँग्रेस-वाल्यांची सारासार विचारशक्ति नष्ट होऊन त्यांनीं नेहरूंचें बौद्धिक आणि मानसिक दास्य कसें पत्करलें आहे तें दिसून येतें.

जी स्थिति नागपुरांत, तीच विदर्भांत! विदर्भ प्रदेश काँग्रेसचे अध्यक्ष डॉ. गोपाळराव खेडकर हे तर नेहरूभक्तींत खुद्द यशवंतराव चव्हाणांना देखील हार जाणार नाहींत. यवतमाळ येथें त्यांनीं केलेल्या भाषणाचा नमुना येथें देण्यासारखा आहे. त्या भाषणांत ते म्हणाले, "मी नुकताच मुंबईहून अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या अधिवेशनाला हजर राहून आलों आहें. मुंबई मिळवण्याकरतां मुंबईकरांनीं जो मार्ग अंगिकारला आहे त्यामुळें साऱ्या हिंदुस्थान-भर महाराष्ट्राच्या जनतेविषयीं लोकमत कलुषित झालें आहे. हिंसा किंवा हुल्लडबाजी ह्यामुळें महाराष्ट्राला मुंबई कधींच मिळणार नाहीं. महाराष्ट्राला मुंबई मिळावी असें लोकसभेंतील सभासदांमध्यें अनुकूल मत होतें. व तसें वातावरणहि महाराष्ट्राच्या पुढाऱ्यांनीं दिल्लींत तयार केलें होतें. खुद्द पंडित जवाहरलाल नेहरू हेहि त्या दिशेनें विचार करूं लागले होते. पण परवांच्या मुंबईमधील निंद्य प्रकारानें स्वतः महाराष्ट्रीय जनांनींच देशभर पसरलेली आपुलकी गमावली असें खेदानें म्हणावें लागेल. अशा प्रकारानें मुंबई मिळेल अशी कल्पना असेल तर ती चुकीची आहे. काँग्रेसवर विश्वास ठेवा. मुंबईला जें आंदोलन चालू आहे त्यामागें काँग्रेसला विरोध करणारे डाव्या गटाचे सर्व पक्ष असून हे सर्व पक्ष काँग्रेसला येत्या सार्वत्रिक निवडणुकींत हाणून पाडण्यासाठीं आतांपासून सिद्ध झाले आहेत. मुंबई विषयींच्या मराठी जनतेच्या कोमल भावनांचा ते निवडणुकी-साठीं उपयोग करून घेण्याकरतां तयार आहेत. म्हणून काँग्रेसजनांनीं कोणत्याहि भुलथापेला बळी न पडतां काँग्रेसवर व आपल्या राष्ट्रनेत्यावर आपली श्रद्धा अविचल ठेवून त्यांच्या पाठीशीं निश्चयानें उभें राहावें. पंतप्रधान नेहरू पांच वर्षांतच काय पण शांतता राहिल्यास कदाचित् त्याहि अगोदर मुंबईचा योग्य निर्णय जाहीर करून महाराष्ट्राला ती देतील असा मला विश्वास आहे. आपण जर पंडित नेहरूंसारख्या असामान्य राष्ट्रधुरीणाचे हात मजबूत केले तर पंडित नेहरू एकच काय असलीं दहा मुंबई शहरें आपल्या देशांत उभारूं शकतील एवढें अलौकिक व्यक्तिमत्त्व त्यांच्या ठिकाणीं आहे. म्हणून सध्यां जें मिळालें तेवढें टिकवून धरावें असें मला वाटतें." डॉ. खेडकर आणि श्री. तुमपल्लीवार यांच्या अंगांत नेहरूप्रेमाचा संचार एवढ्या पराकाष्ठेनें झाला आहे कीं आपण महाराष्ट्राचे रहिवासी आहोंत ह्याची त्यांना आठवणहि राहिली नाहीं. त्यांनीं केलेलीं भाषणें महाराष्ट्राचे शत्रूसुद्धां करूं शकणार नाहींत.

पण सर्वांवर कडी जी केली आहे ती आमच्या शंकरराव देवांनीं. मुंबईबाबत नेहरूंनीं दिलेल्या निर्णयासंबंधीं आणि त्याला अनुलक्षून महाराष्ट्र काँग्रेसनें केलेल्या ठरावाविषयीं त्यांनीं एक लांबलचक पत्रक काढलें आहे. वस्तुतः, असें पत्रक काढण्याचा चोंबडेपणा करण्याची शंकररावांना काय जरूर पडली होती? 'संयुक्त महाराष्ट्र परिषदे'चे अध्यक्ष म्हणून आठ महिन्यांपूर्वी तीन कोटी मराठी जनतेचें नेतृत्व ह्या माणसाकडे आपोआपच चालून आलें होतें. पण ह्या उन्मत्त, अहंमन्य, नादान, क्षुद्र आणि करंट्या माणसानें महाराष्ट्राचा विश्वासघात करून तें नेतृत्व डोळ्यांदेखत कीं हो दवडून टाकलें. काय म्हणावें ह्या कर्मदरिद्री माणसाला? महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनांत आज ह्या मनुष्याला कवडीचेंहि स्थान उरलें नाहीं. काळीं निशाणें चुकविण्यासाठीं ह्या क्रियानष्टाला दिवाभीताप्रमाणें तोंड लपवीत चोरट्यानें किंवा रात्रीं बेरात्रीं हिंडावें लागतें. आपल्या हातांनीं ह्यांनीं आपलें वाटोळें करून घेतलें. गाढवाशीं अतिप्रसंग करण्याचा प्रयत्न करणाऱ्या ब्रह्मचाऱ्यानें ज्याप्रमाणें गाढवहि घालविलें आणि ब्रह्मचर्यहि गमावलें, त्याप्रमाणें नेहरू आणि मोरारजी ह्यांच्याशीं पातकी लगट करण्याचा प्रयत्न करून ह्यांनीं काँग्रेस-कडूनहि थप्पड खाल्ली आणि जनतेकडूनहि लाथा मिळवल्या! आणि इतकेंहि असून हा कोडगा आणि लुब्रा माणूस पुन्हा आपलीं ढोंगी पत्रकें काढून मराठी जनतेला उपदेश करण्याचा आव आणतोच आहे!

शंकररावांनीं हें पत्रक काढून पुन्हा आपल्या बुवाबाजीचें आणि महाराष्ट्रद्रोही मनोवृत्तीचें किळसवाणें प्रदर्शन केलें आहे. पंडित नेहरूंचा निर्णय त्यांना पूर्ण समाधानकारक वाटत नाहीं. पण त्याबद्दल ते नेहरूंना दोष न देतां त्या असमाधान-कारक निर्णयाला 'गेल्या दोन-तीन महिन्यांतील ज्या दुर्दैवी घटना घडल्या त्या कारणीभूत आहेत' असें म्हणून मराठी जनतेची बदनामी केली आहे. शंकररावांचा हा धंदा जुनाच आहे. चौपाटीच्या सभेंत मोरारजी-सदोबांनीं मराठी लोकांना वाटेल तशा अद्वातद्वा शिव्या दिल्या. म्हणून कांहीं लोकांनीं त्यांना दगड आणि जोडे मारले. तेव्हां मोरारजी-सदोबांची बाजू घेऊन ह्याच देवजी धसाड्यानें पांच दिवसांचें उपोषण केलें आणि संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना हुल्लडबाज ठरवलें. जानेवारी महिन्याच्या दंगलीचें सारें खापर पुन्हा ह्याच अधम माणसानें मराठी जनतेच्या डोक्यावर फोडलें आणि महाराष्ट्रांत 'मांगल्याची होळी झाली, मानव्याला डांबर फासलें गेलें!' असें म्हणून मोठमोठ्यानें शंख मारीत तो गांवोगांव हिंडू

लागला. आणि आतां मुंबई पांच वर्षें केंद्रशासित करण्याचा नेहरूंनीं जो निर्णय दिला त्याचा अंकुश तो मराठी जनतेच्या डोक्यांतच पुन्हा खुपसूं पाहत आहे. उभ्या महाराष्ट्रांत असा अधम माणूस पाहावयाला मिळेल काय ?

मुंबई महाराष्ट्राला द्यायची नाहीं हा निर्णय आठ वर्षांपूर्वीच नेहरूंनीं ठरवला. पण मुंबई महाराष्ट्रापासून तोडावयाची आणि केंद्रशासित करावयाची हें जहर नेहरूंच्या डोक्यांत ह्या दुष्ट शंकररावांनींच सहा महिन्यांपूर्वी कोंबलें. महाराष्ट्राचा शिरच्छेद करणाऱ्या ह्या भयानक नेहरू निर्णयाला कोणी जर एक माणूस जबाबदार असेल तर तो म्हणजे शंकरराव देव, ही गोष्ट खुद्द त्यांना देखील नाकारतां येणार नाहीं. महाराष्ट्र काँग्रेसच्या ठरावाबद्दल समाधान व्यक्त करून ते आपल्या पत्रकांत म्हणतात कीं, "मुंबईचा महाराष्ट्रांत समावेश व्हावा ह्या मागणीसाठीं सध्यां चालू असलेली सत्याग्रहाची व प्रत्यक्ष प्रतिकाराची चळवळ बंद करावी आणि लोकशाहीच्या इतर शांततामय मार्गांचा अवलंब करण्यांत यावा. कारण प्रक्षोभक साधनांनीं मुंबई मिळविण्याचा प्रयत्न केला, तर मुंबईतील व मुंबईबाहेरील भारतीयांच्या मनावर विपरीत परिणाम होऊन आपण जी त्यांची सहानुभूति कमावली आहे ती गमावून बसूं. आणि त्यामुळें मुंबईच्या प्राप्तीची वेळ अधिकच दूर लोटली जाण्याची भीति आहे. लोकशाहींत सत्याग्रहाला स्थान आहे. निःशस्त्र प्रतिकारानें स्वकीयांची अडवणूक करण्याला स्थान नाहीं. मात्र सत्याग्रहांत राग किंवा चीड ह्यांचें प्रकटीकरण नसावें."

संयुक्त महाराष्ट्रासाठीं सध्यां चाललेल्या सत्याग्रहांत राग आणि चीड असल्यानें तो खरा सत्याग्रह नाहीं, मुंबई मिळवण्याचा तो प्रक्षोभक प्रयत्न आहे, त्यामुळें मुंबई-तील अन्य भाषिकांची आणि इतर भारतीयांची सहानुभूति आपण गमावून बसूं, हा देवांचा साराच्या सारा युक्तिवाद अप्रामाणिकपणाचा आणि कावेबाजपणाचा आहे. संयुक्त महाराष्ट्रासाठीं सध्यां चाललेला सत्याग्रह अत्यंत शांततापूर्ण आहे. तो प्रक्षोभक नाहीं. त्यांत निरपराधी स्वकीयांची अडवणूक नाहीं. त्यांत राग आणि चीड असेल तर ती अन्यायाविरुद्ध आणि अन्यायी व्यक्तीविरुद्ध आहे, कोणत्याहि जमातीविरुद्ध वा जातीविरुद्ध नाहीं. स्वकीय व्यक्ति असल्या तरी त्या जुलूम करूं लागल्या म्हणजे शांततेच्या मार्गानें त्यांची अडवणूक करूं नये तर काय करावें ? गांधीजींच्या नेतृत्वाखालीं झालेल्या सत्याग्रहांत परसत्तेबद्दल आणि पारतंत्र्याबद्दल राग आणि चीड नव्हती असें देवांना म्हणावयाचें आहे काय ?

रागाचें किंवा चिडीचें प्रदर्शन हिंसेंत होऊं नये. एवढेंच सत्याग्रहाला पथ्य आहे. आम्ही आमच्या अन्यायाचें निराकरण करण्यासाठीं सत्याग्रह करीत असलों म्हणून अन्यभाषिकांनीं आणि इतर भारतीयांनीं आमच्यावर संतापण्याचें काय कारण? असल्या खोट्या धमक्यांनीं घाबरण्याइतकी मराठी जनता कांहीं मूर्ख नाहीं.

मुंबई बेळगांव कारवार मिळवावयाचा असेल तर 'विधायक सत्याग्रह करा!' असा शंकररावांचा उपदेश आहे. विधायक सत्याग्रह म्हणजे काय तर (१) लोकशाहीच्या मार्गावर विश्वास (२) महाराष्ट्र, मराठवाडा आणि विदर्भ ह्या नव-महाराष्ट्राच्या तीन्ही विभागांत एकात्मता आणण्याचा प्रयत्न, आणि (३) मुंबईतील निरनिराळ्या भाषिक समूहांत परस्परांत विश्वास आणि सद्भावना निर्माण करणें. संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांचा लोकशाहीवर विश्वास नाहीं हें कोणत्या गाढवानें शंकररावांना सांगितलें? महाराष्ट्र, मराठवाडा आणि विदर्भ ह्यांच्यांत एकात्मता आणावयाची म्हणजे आगामी निवडणुकींत कॉंग्रेसचा पराभव करून नव्या महाराष्ट्रांत डाव्या गटाचें सरकार प्रस्थापित करावयाला हवें. मुंबईमधील अन्यभाषिकांचा विश्वास संपादन करावा हा लुच्चेगिरीचा सल्ला नेहरूंनीं दिला आहे. त्याला आम्हीं मागेंच उत्तर दिलें आहें. एवंच, शंकररावांचा 'विधायक सत्याग्रह' हें एक नुसतें ढोंग असून संयुक्त महाराष्ट्राचें आंदोलन हाणून पाडण्याचा तो एक गांधीवादी कावा आहे. दुसरें काय?

जसे देव, तसेच देवगिरीकर, दोघेही एकाच माळेचे मणि! एक गजकर्ण तर दुसरा हाड्या व्रण! महाराष्ट्राचा गळा कापण्याचे कामीं देवांइतकाच ह्या मामा देवगिरीकरांचा हात आहे. गेल्या रविवारीं पुण्याच्या कॉंग्रेस भवनांत 'चालू राजकीय परिस्थिति' ह्या विषयावर जाहीर व्याख्यान देण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. त्यांच्या सभेला प्रारंभीं काय शेंदोनशें माणसें हजर असतील तेवढींच. पण आवाराबाहेर त्यांच्याविरुद्ध निदर्शनें करण्यासाठीं चार-पांच हजार लोकांचा समुदाय जमा झाला होता. त्यांनीं तारस्वरांत घोषणा करून मामांची त्रेधा उडवली. शेवटीं आंतले श्रोते बाहेर येऊन निदर्शकांत मिळाले. मामा ध्वनिक्षेपकावर नुसते ओरडत राहिले. बंदोबस्तासाठीं जमलेल्या जंगी पोलीस दलालाच त्यांचें भाषण अखेर ऐकावें लागलें. मग मामांनीं कसेंबसें भाषण संपवून कॉंग्रेसभुवनांत पळ काढला.

ह्या तुटपुंज्या भाषणांत मामा म्हणाले, "दुसऱ्याचें म्हणणें शांतपणें ऐकून घेणें हाच लोकशाहीचा खरा मार्ग आहे. घोषणा करून आणि दगडफेक

करून प्रश्न सुटत नसतात. मुंबईच्या कॉंग्रेस अधिवेशनाच्या वेळीं कांहीं लोकांनीं जी दंगल केली त्यामुळें महाराष्ट्राविषयीं परप्रांतीयांचें मन कलुषित झालें व त्यांच्या सहानुभूतीला महाराष्ट्र मुकला. मुंबईसंबंधीं विरोधी पक्षांनीं जी चळवळ चालवली आहे तिचा हेतु कॉंग्रेस नष्ट करण्याचा आहे. मुंबई ही त्यासाठीं एक साधन म्हणून वापरली जात आहे. विरोधक वाट चुकलेले बांधव आहेत. लोकमान्य टिळकांच्या व शिवाजीच्या वंशजांनों, कृपा करून असले प्रकार करूं नका. कॉंग्रेसचा पराभव झाला तरी चालेल. पण सार्वजनिक जीवनांतील सभ्यता व शिष्टाचार आपण सोडतां कामा नये. हल्लीं मराठी वृत्तपत्रांतून जें लिखाण येतें त्यानें महाराष्ट्राच्या इतिहासाला व संस्कृतीला काळिमा लागत आहे !"

लोकशाहीची, भाषणस्वातंत्र्याची, शिवाजीमहाराजांची अन् टिळकांची, सभ्यतेची आणि शिष्टाचाराची, मराठी इतिहासाची आणि संस्कृतीची ह्या निमित्तानें तरी मामा देवगिरीकरांना आठवण झाली हें ठीक झालें. नेहरूंपासून तो देवगिरीकरांपर्यंत आणि कन्नमवार-तुमपल्लीवारपर्यंत सर्वांची एक भाषा आणि सर्वांचा महाराष्ट्रावर एक आरोप, कीं संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही मुंबईसाठीं चळवळ नसून ती कॉंग्रेस नष्ट करण्याची चळवळ आहे. आणि तिचें अधिष्ठान दगडफेकीवर आणि हुल्लडबाजीवर असल्यानें महाराष्ट्राविषयीं परप्रांतीयांचें मन कलुषित झालें आहे. महाराष्ट्राला बदनाम करण्याचा हा ह्या लबाड कॉंग्रेस नेत्यांचा खोटा आणि खोडसाळ प्रचार आहे. कलकत्त्याच्या बंगालच्या 'अमृत बझार पत्रिके'नें एक अग्रलेख लिहून ह्या पाजी प्रचाराचे दांतच पाडले आहेत. 'पत्रिका' म्हणते : "But it is not a fact that Maharashtra has lost the sympathy and understanding of other provinces. The debate in Parliament showed that the Congress High Command's decision on Bombay has very little support in other provinces as well !" "अन्य प्रांतांची सहानुभूति आणि समजूत महाराष्ट्रानें गमावली ही गोष्ट खरी नाहीं. लोकसभेची चर्चा झाली तेव्हां मुंबईबाबतच्या कॉंग्रेसश्रेष्ठींच्या निर्णयाला अन्य प्रांतांतसुद्धां फार थोडा पाठिंबा आहे हें दिसून आलें."

बंगालच्या 'अमृत बझार पत्रिके' सारखीं वजनदार पत्रें महाराष्ट्राला इतक्या आत्मीयत्वानें आश्वासनें देत असतां, महाराष्ट्राच्या पोटीं जन्माला आलेले देव, देवगिरीकर-कन्नमवारसारखे करंटे असेंच कोडगेपणानें सांगत राहणार कीं अन्य

प्रांतांची सहानुभूति महाराष्ट्रानें गमावली आहे म्हणून ? नेहरू, देव, देवगिरीकर ही सर्व मंडळी उठल्याबसल्या 'लोकशाही 'चा हवाला देत असतात. सर्व कांहीं लोकशाहीच्या मार्गांनीं झालें पाहिजे असा हे एकसारखे आक्रोश करीत असतात. म्हणून आम्ही ह्या मंडळींना जाहीरपणें विचारतों कीं 'प्रतिबंधक स्थानबद्धता कायदा' करून भारतीय प्रजासत्ताक राज्याच्या तोंडाला डांबर फासणाऱ्यांना लोकशाहीचें पवित्र नांव उच्चारावयाला शरम कशी वाटत नाहीं ? आपल्या राजकीय विरोधकांना जबरदस्तीनें तुरुंगांत डांबणाऱ्या, निरपराधी नागरिकांवर पावलोपावलीं गोळीबार करून नऊनऊ वर्षांच्या मुलांना आणि साठसाठ वर्षांच्या वृद्धांना ठार मारणाऱ्या आणि इतकेंहि करून गोळीबाराच्या चौकशीला निखालस नकार देणाऱ्या, भांडवलवाल्यांना खूष करण्यासाठीं मुंबई शहरांत राहणाऱ्या चाळीस लाख नागरिकांचे मतदानाचे हक्क सपशेल हिरावून घेणाऱ्या ह्या काँग्रेस पुढाऱ्यांनीं लोकशाहीचे पोवाडे गावयाचे म्हणजे चोऱ्यामाऱ्या करणाऱ्या आणि गळे कापणाऱ्या दरोडेखोरांनीं भगवद्गीतेची महती वर्णन करण्यासारखें आहे !

बहुसंख्य मराठी भाषिकांची वसति ज्या शहरांत आहे तीं मुंबई, बेळगांव, कारवारसारखीं शहरें तीन कोटी मराठी जनतेची एकमुखी मागणी लाथाडून महाराष्ट्रांतून ज्यांनीं जाणूनबुजून काटलीं आणि लोकशाहीचा राजरोस खून केला त्यांनीं 'लोकशाहीच्या मार्गानें हीं शहरें आम्हीं परत मिळवावींत' असें आम्हांलाच उलट सांगावें ह्यापेक्षां अधिक बेशरमपणा ह्या जगामध्यें कांहीं असूं शकेल काय ? मामा देवगिरीकरांना भाषणस्वातंत्र्याचा आतां पुळका आला आहे. ते म्हणाले, "दुसऱ्याचें म्हणणें शांतपणें ऐकून घेणें हा लोकशाहीचा मार्ग आहे !" १४४ कलमाच्या दोरखंडांनीं सभास्वातंत्र्याचें आणि भाषणस्वातंत्र्याचें नरडें मुंबई सरकारनें जेव्हां आवळून ठेवलें होतें तेव्हां मात्र ह्या लुच्च्या मामाला भाषणस्वातंत्र्याची मुळींच आठवण झाली नाहीं ! कऱ्हाड आणि सातारा येथें वालचंद कोठारी आणि आम्ही ह्या उभयतांच्या भाषणांना हजारों श्रोते जमले असतांना काँग्रेसगुंडांच्या सांगण्यावरून आमच्या एका सभेला पोलिसांनीं जेव्हां १४४ कलम आयत्या वेळीं लावलें आणि दुसरी सभा 'बेकायदेशीर जमाव' म्हणून मध्येंच थांबवली तेव्हां ह्या कोल्हेमामानें भाषणस्वातंत्र्याचा कैवार कुठें घेतला नाहीं !

ज्या काँग्रेसमध्यें गुंडांचीं टोळकीं उघडपणें आपल्या सभोंवतीं बाळगणारे सदोबा पाटलांसारखे आणि यशवंतराव चव्हाणांसारखे 'नेते' आणि मंत्री आहेत, त्या

कॉंग्रेसच्या मामांसारख्या पुढाऱ्यांनीं सभ्यतेच्या आणि शिष्टाचाराच्या गोष्टी सांगून स्वतःचें आणखीन् हसें करून घेऊं नये. कांहीं मराठी वृत्तपत्रें आजकाल महाराष्ट्राच्या इतिहासाला आणि संस्कृतीला काळिमा लावतात अशी मामांनीं तक्रार करावी हा सर्वांत मोठा विनोद आहे. महाराष्ट्राच्या इतिहासाला आणि संस्कृतीला कोणत्या सूर्याजी पिसाळांनीं आणि त्रिंबकजी डेंगळ्यांनीं डांबर फासलें ह्याचा निर्णय महाराष्ट्राचे इतिहासकार यथाकाल देतीलच. मामांनीं त्या बाबतींत त्रास घेऊं नये. तेव्हां सांगायची गोष्ट ही कीं देव, देवगिरीकर, खेडकर, तुमपल्लीवार ह्या सर्व कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं तीन कोटी मराठी जनतेवर अन्याय करणाऱ्या नेहरूनिर्णयाला डोक्यावर घेऊन महाराष्ट्राचा विश्वासघात केला आहे. एवढेंच नव्हे तर मस्तक आणि घोटे नसलेल्या 'कबंध महाराष्ट्रा'चें दोन ऑक्टोबर रोजीं अस्तित्वांत येणारें नवें राज्य कबजांत घेण्यासाठीं कमरा कसल्या आहेत. बाजार भरायच्या आधींच चोरांची धांदल. ठीक आहे. नेहरूनिर्णयाचें 'घी' चाटीत बसले आहेत हे. ह्यांनीं जनतेच्या निर्णयाचा 'बडगा' कुठें पाहिला आहे अजून?

१-७-१९५६

# एकजुटीचा गर्जो जयजयकार !

मुंबई पांच वर्षेपर्यंत केंद्रशासित राहणार असा हुकुमशाही निर्णय लोकशाहीचीं तत्त्वें गुंडाळून पंडित नेहरूंनीं तीन जून रोजीं दिल्यापासून संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनामध्यें एक अभूतपूर्व निर्धार, जिद्द आणि वेग निर्माण झाला आहे. आतां हें आंदोलन महापुराच्या खवळलेल्या लोंढ्याप्रमाणें विशाल आणि रौद्र स्वरूप धारण करून गगनभेदी गर्जना करीत वाढत्या गतीनें आपल्या उद्दिष्टाकडे धावूं लागणार ह्यांत कांहीं शंका नाहीं. संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाची ही आतां तिसरी अवस्था. पहिली अवस्था कैफियतीची. तें काम 'संयुक्त महाराष्ट्र परिषदे 'नें उत्तम तऱ्हेनें करून मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची कैफियत तीन कोटी मराठी जनतेच्या वतीनें राज्यपुनर्रचना समितीपुढें व्यवस्थित रीतीनें मांडली. पण राज्यपुनर्रचना समिति हें काँग्रेसश्रेष्ठींच्या हातांतलें एक नुसतें निर्जीव बाहुलें असल्याकारणानें आणि संयुक्त महाराष्ट्राची मागणी मान्य न करण्याचा काँग्रेसश्रेष्ठींनीं मनोमन निर्धार केलेला असल्याकारणानें, त्यांनीं जसें सांगितलें तसें राज्यपुनर्रचना समितीनें मुकाट्यानें लिहिलें आणि विदर्भ-बेळगांव-कारवार-विरहित द्विभाषिक राज्य त्यांनीं महाराष्ट्रावर लादलें. ह्या द्विभाषिक राज्यांत गुजरात बलिष्ठ करण्यांत आला. महाराष्ट्र लंगडा करण्यांत आला. आणि लंगड्या महाराष्ट्राच्या डोक्यावर बलिष्ठ गुजरातची स्थापना करण्यांत आली. ह्या धेडगुजरी द्विभाषिक राज्याचा महाराष्ट्रानें एकमुखानें धिक्कार केला.

येथून संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाची दुसरी अवस्था सुरू झाली. येथपर्यंत महाराष्ट्रामधले काँग्रेससह सर्व राजकीय पक्ष एकत्र होते. पण महाराष्ट्रावर जेव्हां राज्यपुनर्रचना समितीनें उघडउघड अन्याय केला आणि त्या अन्यायाविरुद्ध सत्याग्रही मार्गानें झगडण्याची ज्या क्षणीं आवश्यकता निर्माण झाली, त्या क्षणीं महाराष्ट्रांतले काँग्रेसजन इतर राजकीय पक्षांपासून वेगळे झाले. एवढेंच नव्हे तर बाकीच्या राजकीय पक्षांना आपल्या पुढील प्रचाराला प्रतिष्ठित व्यासपीठ मिळूं

नये म्हणून शंकरराव देवांनीं आपल्या अखत्यारांत 'संयुक्त महाराष्ट्र परिषद्'च मुळीं बरखास्त करून टाकली. तेव्हां उरलेल्या बाकीच्या राजकीय पक्षांनीं मुंबई-बेळगांव-साठीं सत्याग्रही लढा चालवण्याकरतां 'संयुक्त महाराष्ट्र कृतिसमिति' स्थापन केली. तिचेंच रूपांतर कांहीं काळानें 'संयुक्त महाराष्ट्र समिती'मध्यें झालें. ह्याच समितीच्या नेतृत्वाखालीं गेले सहा महिने संयुक्त महाराष्ट्राचा लढा अत्यंत प्रभावी आणि यशस्वी पद्धतीनें चालला आहे.

स्वातंत्र्याच्या लढ्यांत सुद्धां महाराष्ट्रामधले जेवढे सत्याग्रही सामील झाले नसतील, तेवढे संयुक्त महाराष्ट्रासाठीं चाललेल्या ह्या सत्याग्रही संग्रामांत दाखल झाले. आतांपर्यंत ह्या सत्याग्रहांत पंचेचाळीस हजार स्त्रीपुरुषांनीं भाग घेतला. साठसाठ वर्षांचे वृद्ध पुरुष आणि बायकासुद्धां सत्याग्रह करून तुरुंगांत गेल्या. ज्या घरंदाज मराठा महिलांचें नखदेखील दिसूं शकलें नसतें, अशा शेकडों प्रतिष्ठित स्त्रिया हातांत राष्ट्रध्वज घेऊन संयुक्त महाराष्ट्रासाठीं हसत हसत तुरुंगांत गेल्या. हा सत्याग्रह बदनाम करण्याचे कॉंग्रेस नेत्यांनीं परोपरीनें प्रयत्न केले. कॉंग्रेस गुंडांनीं सत्याग्रहाच्या प्रसंगीं दंगल आणि दगडफेक करून सत्याग्रह हा हिंसात्मक आहे अशी त्याची बेअब्रू करण्याची पुष्कळ पराकाष्ठा केली. लोकशाहींत सत्याग्रहाला स्थान नाहीं असे तात्त्विक आक्षेप घेऊन सत्याग्रहाचें वैचारिक अधिष्ठान पोखरण्याची शंकरराव देव आणि काकासाहेब गाडगीळ ह्यांनीं कोशिस केली. त्याखेरीज सत्याग्रहाचें उद्दिष्ट सिद्ध झालें आहे, आतां तो मागें घेण्यांत यावा असा बुद्धिभेद करण्याचीहि रावसाहेब पटवर्धनांसारख्या नेहरूंच्या अंधभक्तांनीं खूप पराकाष्ठा केली. पण ह्या सर्व विरोधी प्रचाराचा आणि कोल्हेकुईचा कांहींहि परिणाम न होतां, सत्याग्रहाचा हत्ती आपल्याच चालीनें आणि रुबाबानें वाट चालत राहिला. शेकडों लोकांना गोळ्या घालून, हजारों लोकांना तुरुंगांत डांबून, सभाबंदीच्या आणि मोर्चाबंदीच्या कायद्यांनीं जनतेची वाटेल तशी मुस्कटदाबी करूनहि संयुक्त महाराष्ट्राचा सत्याग्रही लढा जेव्हां थांबेना, तेव्हां मग नेहरूंच्या संतापाला कांहीं सीमाच राहिली नाहीं. स्वतःची लोकप्रियता आणि देशांतली लोकशाही बेधडक खर्चीं टाकून त्यांनीं मुंबई केंद्रशासित करण्याची घोषणा करून महाराष्ट्राच्या मस्तकावर जबरदस्त प्रहार केला. येथून आतां संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाची तिसरी अवस्था सुरू झाली.

मुंबईबाबत नेहरूंनीं निर्णय देऊन टाकला. पण बेळगांव, निपाणी, कारवार

यांबद्दल ते मूग गिळून बसले. म्हणजे दक्षिण महाराष्ट्राचा हा सर्व सीमाप्रदेश कायमचाच त्यांनीं कर्नाटकांत फेकून दिला असाच त्याचा अर्थ आहे. मुंबईदेखील पांच वर्षांनंतर महाराष्ट्राला मिळेलच अशी खात्री नाहीं. कारण मुंबईतल्या सर्वच नागरिकांनीं म्हणे आतां मुंबईचें भवितव्य ठरवायचें आहे. यापुढील पांच वर्षांत मुंबईतली मराठी लोकसंख्या घटली आणि बिगरमराठी लोकसंख्या वाढली तर पांच वर्षांच्या अखेरीस मुंबईचें भवितव्य काय ठरेल हें काय सांगायला पाहिजे काय? सार्वमत घेऊन मुंबईचें भवितव्य ठरविण्याची ही घातकी क्लृप्ति नेहरूंनीं शोधून काढून संयुक्त महाराष्ट्राच्या डोक्यावर एक भली मोठी तलवारच टांगून ठेवली आहे. लोकसभेपुढें राज्यपुनर्रचना विधेयक पंचवीस जुलैला येणार आहे. तोंपर्यंत विलायतचा दौरा आटोपून नेहरूहि परत येतीलच. पण विलायतच्या थंड हवेनें त्यांचें डोकें शांत होऊन ते पुन्हा मुंबईबाबतचा आपला निर्णय बदलतील आणि महाराष्ट्राला न्याय देतील अशी कित्येक महाराष्ट्रीय कॉंग्रेस नेत्यांना जशी आशा वाटते आहे तशी आम्हांला मात्र मुळींच वाटत नाहीं. हुकुमशहा तो हुकुमशहा. मग तो गरम हवेंत राहो नाहींतर थंड हवेंत जावो.

लोकसभेंत संयुक्त महाराष्ट्राच्या बाजूचें पुष्कळ वातावरण होत चाललें आहे असें ऐकतां. तें खरेंहि असेल. पण पंडित नेहरू आणि गोविंद वल्लभ पंत हे दोन खवीस समोर उभे असल्यानंतर लोकसभा महाराष्ट्राच्या बाजूनें कौल देईल असें आम्हांस वाटत नाहीं. उगाच भलती आशा धरून स्वतःची फसवणूक करून घेण्यांत काय अर्थ आहे? म्हणून लोकसभा नेहरूनिर्णयावरच शिक्कामोर्तब करून पांच वर्षेंपर्यंत मुंबई केंद्रशासित करण्याला मान्यता देईल ह्याबाबत मराठी जनतेनें एव्हांपासूनच आपल्या मनाची तयारी करून ठेवावयाला हवी. त्यानंतर दोन ऑक्टोबरला मुंबई, बेळगांव, कारवार आणि महाराष्ट्राची फाळणी मुंबई होऊन केंद्रशासनाखालीं जाणार, बेळगांव, व कारवार कर्नाटकांत जाणार आणि नागपूर-वऱ्हाडचे आठ जिल्हे, मराठवाड्याचे पांच जिल्हे आणि महाराष्ट्राचे चौदा जिल्हे असें सत्तावीस जिल्ह्यांचें 'नवें महाराष्ट्र राज्य' अस्तित्वांत येणार. पुढें सहा महिन्यांनंतर म्हणजे सत्तावन्न सालच्या मार्च महिन्यांत सार्वत्रिक निवडणुका होणार. तोंपर्यंत या नव्या महाराष्ट्र राज्याचीं सूत्रें महाराष्ट्रद्रोही मराठी कॉंग्रेस मंत्र्यांच्या हातांतच राहणार. नेहरूनिर्णयावर लोकसभेचा मोर्तब झाला आणि दोन ऑक्टोबर रोजीं खंडित महाराष्ट्र राज्य अस्तित्वांत आलें, म्हणजे मुंबई आणि बेळगांवांत सत्याग्रह जरी कांहीं प्रमाणांत चालू राहिला

तरी सत्याग्रहाची अवस्था संपेल. आणि त्यानंतर निवडणुकीचें पर्व सुरू होईल.

दोन ऑक्टोबरपासून पुढचे सहा महिने संयुक्त महाराष्ट्रवादी जनतेचें सर्व सामर्थ्य केवळ निवडणुकीसाठींच संघटित व्हावयाला पाहिजे ह्यासंबंधीं कांहीं वाद असण्याचें कारण नाहीं. 'निवडणुकी गेल्या खड्ड्यांत!' असें नेहरू कितीहि वैतागानें म्हणाले असले आणि 'आगामी निवडणुकींत कोणीहि काँग्रेस उमेदवार महाराष्ट्रांत यशस्वी होणें शक्य नाहीं!' असें भीषण भविष्य मामा देवगिरीकरांनीं कितीहि वर्तवलें असलें, तरी त्यावर फारसा विश्वास ठेवण्याचें कारण नाहीं. हें सारें ह्या मंडळींचें स्मशानवैराग्य आहे. थोड्या दिवसांपूर्वींच महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस, नागपूर प्रदेश काँग्रेस आणि विदर्भ प्रदेश काँग्रेस ह्यांच्या ज्या बैठकी झाल्या त्यांत 'नव्या महाराष्ट्रा'च्या राज्याचीं सूत्रें हातीं घेण्यासाठीं ह्या सर्व महाराष्ट्रद्रोही काँग्रेसवाल्यांनीं आपापल्या कंबरा कसल्या असल्याचें दिसून येतें. इतकेंच काय पण आगामी निवडणुकीसाटीं पैशांचा निधि गोळा करण्याची मोहीमहि त्यांनीं जोरांत सुरू केली आहे असें समजतें. संयुक्त महाराष्ट्रावर नेहरूंनीं आणि काँग्रेसनें एवढा धादांत अन्याय केलेला असूनहि सर्व मराठी काँग्रेसवाल्यांनीं नेहरूंशीं आणि काँग्रेसशीं एकनिष्ठ राहावयाची पुन्हा प्रतिज्ञा केलेली आहे. एवढेंच नव्हे तर सर्व महाराष्ट्रांत काळ्या निशाणांनीं आणि पादत्राणांनीं त्यांची जाहीरपणें संभावना होत असतांनाहि तिला न जुमानतां पुन्हा निवडणुकांना उभे राहून खंडित महाराष्ट्र राज्याचीं सूत्रें पुन्हा बळकावण्याची आकांक्षा ते बाळगीत आहेत. म्हणून हें त्यांचें आव्हान तीन कोटी मराठी जनतेतर्फें स्वीकारणें हें संयुक्त महाराष्ट्राच्या सत्याग्रही आंदोलनांत भाग घेणाऱ्या सर्व राजकीय पक्षांचें कर्तव्य आहे.

संयुक्त महाराष्ट्रवाद्यांचा लढा आतां तीन आघाड्यांवर सुरू होईल. एक आघाडी मुंबईत, दुसरी आघाडी खंडित महाराष्ट्रांत आणि तिसरी आघाडी बेळगांव-कारवारांत. मुंबईमधल्या आघाडीनें केंद्रशासित काळांत त्या शहरांतील मराठी जनतेवर अन्यभाषिकांचें आक्रमण न होईल आणि मराठी भाषिकांचें महत्त्व कमी न होईल ह्याबद्दल सतत जागरूक राहावयाचें एवढेंच नव्हे तर त्यांच्याशीं सलोख्याचे संबंध निर्माण करावयाचे. त्याखेरीज कॉर्पोरेशनच्या आणि लोकसभेच्या निवडणुकींत जास्तींत जास्त जागा जिंकण्याचा प्रयत्न करावयाचा. बेळगांव-कारवारच्या आघाडीवर कन्नडिगांच्या जुलमी आक्रमणापासून मराठी भाषिकांचें संरक्षण

करावयाचें. आणि खंडित महाराष्ट्राच्या आघाडीवर सर्व मराठी जनता संघटित करून आगामी निवडणुकींत महाराष्ट्रद्रोही काँग्रेसचा सपशेल पराभव करावयाचा व खंडित महाराष्ट्राची सर्व सत्ता हातीं घेऊन त्या ठिकाणीं 'संयुक्तमहाराष्ट्र-वादी जनतेचें सरकार' स्थापन करावयाचें. अशा तऱ्हेनें आतां यापुढें संयुक्त-महाराष्ट्रवाद्यांना तीन आघाड्यांवर आपला लढा चालवावा लागेल. नुसतें सत्याग्रही आंदोलन चालविण्यापेक्षां हें कार्य अत्यंत बिकट आणि जास्त जबाबदारीचें आहे. कारण मुंबईमधल्या कॉर्पोरेशनच्या, महाराष्ट्रांतल्या कायदेमंडळाच्या आणि लोकसभेच्या निवडणुका लढवावयाच्या म्हणजे आहे ह्यापेक्षां अधिक मजबूत संघटना निर्माण करावी लागेल, मराठी जनतेच्या सर्वांगीण कल्याणाचा अत्यंत प्रभावी असा कार्यक्रम करावा लागेल आणि त्यासाठीं लागणारीं लायक माणसें आणि पुरेसा पैसा जमवावा लागेल.

हें काम 'संयुक्त महाराष्ट्र समिती'च्या कक्षेबाहेरचें आहे. कारण तिची व्याप्ति सत्याग्रहापुरती होती आणि तिच्यांत समाविष्ट झालेल्या भिन्न भिन्न राजकीय पक्षां-कडून केवळ सत्याग्रही पाठविण्यापलिकडे जास्त सहकार्याची नि एकजुटीची अपेक्षा नव्हती. म्हणून या पुढचा अधिक निकराचा, ऐक्याचा आणि जबाबदारीचा लढा चालविण्यासाठीं संयुक्त महाराष्ट्रवादी जनतेला 'संयुक्त महाराष्ट्र आघाडी' स्थापन केल्यावांचून आतां गत्यंतर नाहीं. हीच आम्ही म्हणतों ती संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाची तिसरी अवस्था. 'संयुक्त महाराष्ट्र समिती'मध्यें समाविष्ट असलेल्या सर्व राजकीय पक्षांना ह्या 'संयुक्त महाराष्ट्र आघाडी'मध्यें दाखल होता येईल. पण तसें करण्यापूर्वी ह्या सर्व राजकीय पक्षांनीं आपापलें आत्मपरीक्षण करणें एकवार जरूर आहे. ह्या सर्व पक्षांमध्यें महत्त्वाचे राजकीय मतभेद आहेत ही तर गोष्ट जगजाहीर आहे. पण ज्या अर्थी गोवेमुक्तीच्या आणि संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळी-मध्यें इतके दिवस आपापले राजकीय मतभेद विसरून एकोप्यानें आणि सलोख्यानें हे सर्व पक्ष काम करीत होते, एकाच रांगेत लढतां लढतां पोलिसांच्या लाठ्या आणि गोळया खात होते, आणि हातांत हात घालून एकत्रपणें कारागृहांत जात होते, त्या अर्थी त्यांच्यांत निर्माण झालेल्या नवीन ऋणानुबंधामुळें समान ध्येयासाठीं स्वतःच्या मतांना आणि पूर्वग्रहांना मुरड घालून एकजुटीनें काम करण्याची एक नवीन मनोवृत्ति निर्माण झाली आहे असें आम्हांला वाटतें.

अशी वृत्ति खरोखरच आपल्यामध्यें निर्माण झाली आहे काय? आणि ती

निर्माण झाली असेल तर ती अधिक वाढवावी असें आपणांस मनापासून वाटतें आहे काय? संयुक्त महाराष्ट्राचें स्वप्न साकार होईपर्यंत परस्परामधील मतभेदाकडे आणि बारीकसारीक दोषांकडे दुर्लक्ष करून पूर्वीसारखाच एकोपा टिकवणें आपल्याला शक्य आहे काय? हे सर्व प्रश्न 'संयुक्त महाराष्ट्र आघाडीं'त येऊं इच्छिणाऱ्या सर्व राजकीय पक्षांनीं स्वतःच्या मनाला विचारून पाहावेत. आणि त्या प्रश्नाचें उत्तर प्रामाणिकपणें 'होय' असें येत असेल तरच त्यांनीं ह्या आघाडींत दाखल व्हावें. 'संयुक्त महाराष्ट्र आघाडी' हा कांहीं राजकीय पक्ष नव्हे. निरनिराळ्या राजकीय पक्षांची ती एकजूट आहे. आपलें व्यक्तिमत्त्व आणि अस्तित्व आहे तसेंच कायम ठेवून एका विशिष्ट ध्येयपूर्तीसाठीं बांधावयाची असलेली ती संघटना आवळ्याभोपळ्यांची मोट होतां कामा नये. शत्रूचें बोट देखील न शिरेल अशी ही अभेद्य पोलादी आघाडी व्हावयाला हवी. कारण शत्रु बलाढ्य आहे. कोणत्याहि साधनाची त्याजजवळ कमतरता नाहीं. आणि आपल्याजवळ तर एकजुटीखेरीज कोणतेंहि साधन नाहीं.

एकजूट हेंच काय तें आपलें भांडवल. आपल्यांत फूट पाडण्यासाठीं शत्रु नानातऱ्हेच्या कारवाया करील. प्रलोभनें दाखवील. भांडणें लावून देईल. त्याला आपण बळी पडतां कामा नये. एवढ्यासाठीं आघाडींत सामील होणाऱ्या सर्व राजकीय पक्षांचा परस्परांच्या प्रामाणिकपणाबद्दल, सद्भावनेबद्दल आणि ध्येयनिष्ठेबद्दल विश्वास आणि आदर असावयाला पाहिजे. तसा जर का नसेल तर मग अशी आघाडी निर्माण होऊं शकणार नाहीं. आणि निर्माण झाली तर ती फार काळ टिकणार नाहीं. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या प्रश्नावर तीन कोटी मराठी जनतेची मात्र अभेद्य एकजूट झालेली आहे. त्या बाबतींत त्यांच्यांत कोणत्याहि प्रकारचे 'मूलभूत मतभेद' नाहींत. सर्व जातींचे, सर्व व्यवसायाचे आणि सर्व विचाराचे मराठी भाषिक स्त्रीपुरुष (आणि लहान मुलें सुद्धां) 'मुंबई-बेळगांवसह संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे!' अशा एका आवाजानें गर्जना करीत आहेत. अडचण जर काय असेल तर ती राजकीय पक्षांची एकजूट होण्यामध्यें. जनतेची एकजूट व्हावी आणि राजकीय पक्षांचीं मात्र आपले 'मूलभूत मतभेद' उगाळीत बसावें हें आश्चर्य नव्हे काय?

'संयुक्त महाराष्ट्रा'च्या सत्याग्रही आंदोलनांत प्रजा-समाजवादी, कम्युनिस्ट, शेतकरी-कामगार, समाजवादी, लाल निशाण, किसान-मजदूर, जनसंघ आणि

हिंदुसभा हे पक्ष आतांपर्यंत एकोप्यानें आणि सहकार्यानें काम करीत आहेत. ह्यांपैकीं कोणताहि एक पक्ष एवढा प्रभावी नाहीं कीं जो स्वतःच्या बळावर काँग्रेसशीं टक्कर देऊन तिचा पराभव करूं शकेल. तथापि, ह्या सर्व पक्षांची एकजूट जर झाली तर मात्र काँग्रेसचा साऱ्या महाराष्ट्रांत धुव्वा उडेल आणि काँग्रेस महाराष्ट्रांतून नामशेष होईल ह्यांत तिळमात्र शंका नाहीं. आजच पहा ना, ह्या सर्व पक्षांनीं मिळून स्थापन केलेल्या 'संयुक्त महाराष्ट्र समिती'नें आपल्या सत्याग्रही आंदोलनानें महाराष्ट्राचें वातावरण इतकें उधसून टाकलें आहे, कीं काँग्रेस नेत्यांना महाराष्ट्रामधून निर्वेधपणें हिंडतां येणें सुद्धां मुष्कील होऊन बसलें आहे. आतां ह्या निरनिराळ्या पक्षांच्या व्याप्तीची नि बलाबलाची तुलना करावयाची तर असें म्हणतां येईल कीं सर्व पक्षांत शेतकरी-कामगार पक्ष हा महाराष्ट्रामध्यें जास्त व्यापक पक्ष आहे. तेवढा प्रभावी मात्र तो नाहीं. ग्रामीण जनतेचा आणि बहुजन समाजाचा त्याला पुष्कळ पाठिंबा आहे. त्याच्या खालोखाल कम्युनिस्ट आणि प्रजासमाजवादी पक्ष येतात. समाजवादी पक्ष हा नवीन पक्ष आहे. जनतेंत त्याचीं मुळें अद्याप रुजलेलीं नाहींत. लाल निशाण आणि किसान मजदूर गटाचा समावेश शेतकरी-कामगार पक्षांत करावयाला हरकत नाहीं. लाल निशाण गट हा स्वतःला कम्युनिस्ट म्हणवतो. संख्येच्या दृष्टीनें तो लहान आहे. जनसंघ आणि हिंदुसभा ह्यांची व्याप्ति शहरांपुरती आहे. पण त्यांचें संख्याबल फारच मर्यादित आहे.

एवंच, संयुक्त महाराष्ट्रासाठीं लढणाऱ्या पक्षांमध्यें शेतकरी-कामगार, कम्युनिस्ट आणि प्रजा-समाजवादी एवढे तीनच पक्ष आज महाराष्ट्रांत महत्त्वाचे आहेत. मराठवाड्यांत सुद्धां शेतकरी-कामगार आणि कम्युनिस्ट पक्षाचें चांगलेंच वजन आहे. तेथें काँग्रेस पक्षालाहि थोडेंबहुत स्थान आहे. महाराष्ट्रांतल्या काँग्रेसवाल्याप्रमाणें मराठवाड्यामधील काँग्रेसवाल्यांच्या अब्रूचें एवढें खोबरें झालेलें नाहीं. नागपूरच्या चार जिल्ह्यांसंबंधीं आम्हांला पुरेशी माहिती नाहीं. पण तेथील बहुसंख्य जनता संयुक्तमहाराष्ट्रवादी आहे ह्याबद्दल मात्र आम्हांला मुळींच शंका नाहीं. विदर्भ मात्र संपूर्ण संयुक्त महाराष्ट्रवादी आहे ही गोष्ट चार महिन्यापूर्वी झालेल्या पोट निवडणुकीच्या निर्णयावरून सिद्ध झालेली आहे. ह्या निवडणुकींत संयुक्त-महाराष्ट्रवादी 'जनता आघाडी'चे उमेदवार श्री. भाऊराव देशमुख हे काँग्रेसचे ख्यातनाम उमेदवार श्री. ब्रिजलाल बियाणी ह्यांचा पराभव करून निवडून आले. ह्या निवडणुकींत प्रजा-समाजवादी उमेदवाराला अवघीं ९३५ मतें पडलीं.

ह्यावरून त्या पक्षाला विदर्भांत कांहींच स्थान नाहीं हें उघड आहे. नागपूर-विदर्भांत शेतकरी-कामगार पक्षाची संघटना मात्र बऱ्यापैकीं आहे. तथापि, बहुसंख्य जनता कोणत्याहि एका विशेष पक्षाच्या मागें नसली तरी कट्टर संयुक्त-महाराष्ट्रवादी आहे हें मात्र निर्विवाद आहे.

त्याचबरोबर हेंहि कबूल केलें पाहिजे कीं नागपूर-विदर्भांत काँग्रेसचें वर्चस्व अद्यापि पुष्कळ आहे. महाराष्ट्राप्रमाणें ती त्या ठिकाणीं अजून दुर्बल झालेली नाहीं. खंडित महाराष्ट्राच्या तीन्ही घटक प्रदेशांमधील राजकीय पक्षाच्या बलाबलाचें हें तुलनात्मक चित्र डोळ्यांपुढें ठेवलें, म्हणजे शेतकरी-कामगार, कम्युनिस्ट आणि प्रजा-समाजवादी ह्या तीन पक्षांनीं जर आपली अभेद्य 'संयुक्त महाराष्ट्र आघाडी' उघडली, तर तिच्याशीं स्वतंत्र विचाराचे अनेक पुढारी आणि कार्यकर्ते अन् बाकीचे सर्व लहान सहान संयुक्त महाराष्ट्रवादी पक्ष आणि गट निश्चितपणें सहकार्य करतील आणि मग ह्या आघाडीला यच्चयावत् संयुक्त महाराष्ट्रवादी जनतेचा प्रचंड पाठिंबा मिळेल! हीच भावना मनामध्यें बाळगून कांहीं दिवसांपूर्वी सेनापति बापट, प्रबोधनकार ठाकरे, माधवराव बागल, प्रभातकार कोठारी आणि आम्ही स्वतः अशा पांच जणांनीं ह्या डाव्या पक्षांना आपली एकजूट करून 'संयुक्त महाराष्ट्र आघाडी'चें नेतृत्व स्वीकारण्याची विनंति केली होती.

ह्या दृष्टीनें आम्हीं तीन्ही पक्षांच्या अनेक नेत्यांशीं आणि कार्यकर्त्यांशीं चर्चा आणि वाटाघाटी केल्या. त्या लक्ष्यांत घेतां शेतकरी-कामगार आणि कम्युनिस्ट हे दोन पक्ष आम्ही म्हणतों त्या उद्देशानें 'संयुक्त महाराष्ट्र आघाडी' निर्माण करण्यास उत्सुक आहेत असें आम्हांस वाटतें. शेतकरी-कामगार पक्षाचे आणि कम्युनिस्ट पक्षाचे कार्यकर्ते आजपर्यंत अनेक क्षेत्रांत एकत्र कामें करीत आले असल्यानें त्यांच्यामध्यें उत्तम प्रकारचा समझौता निर्माण झालेला आहे. प्रजासमाजवादी पक्षाच्या महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांनीं मात्र ह्या बाबतींत काय करावयाचें त्यासंबंधीं अद्याप कांहीं ठरविलेलें दिसत नाहीं. किंबहुना, त्यांचीं मनें अनेक शंकांनीं, भयांनीं आणि संशयांनीं व्याप्त झालेलीं दिसताहेत. त्याचा असा अर्थ नव्हे कीं शेतकरी-कामगार आणि कम्युनिस्ट पक्षांशीं एकजूट करण्याची त्यांना इच्छा नाहीं. 'संयुक्त महाराष्ट्रा'चा लढा शेवटपर्यंत प्रखरपणें लढण्याची त्यांची तयारी आहे. पण आगामी निवडणुकांकडे पाहण्याची त्यांची दृष्टि इतर पक्षापेक्षां अजून वेगळी आहे. त्यांच्या मनांत अनेक विचारांचा संघर्ष सुरू झाला आहे.

तो असा कीं, आजपर्यंत आपण जो सत्याग्रहाचा लढा चालविलेला आहे तो कशासाठीं? आतां यापुढें निवडणुका ज्या लढावयाच्या आहेत त्यांचें उद्दिष्ट काय? उद्यां काँग्रेसचा सपशेल पराभव करून निवडणुका जिंकल्या तर मग पुढें काय करावयाचें? सत्ता ताब्यांत घेऊन मंत्रिमंडळ बनवायचें कीं नाहीं? कीं निवडून आल्यानंतर मध्यवर्ती सरकारला आव्हान द्यायचें कीं मुंबई बेळगांव द्या, नाहीं तर आम्ही राजिनामे देतों, आणि त्यांनीं ती नाहीं दिली तर राजिनामे देऊन मग पेचप्रसंग घडवून आणावयाचा? बरें, राजिनामे न देतां सत्ता ताब्यांत घेऊन मंत्रिमंडळें बनविलीं तर काय होईल? तर कम्युनिस्टांशीं सहकार्य करावें लागेल! आणि प्रजा-समाजवादी पक्षाच्या गया अधिवेशनांत तर काँग्रेस, कम्युनिस्ट किंवा इतर पक्षांशीं निवडणूक करार करून समान कार्यक्रमास बांधून घेऊं नये असा ठराव झालेला आहे. त्याखेरीज लोकहि आपल्याला नांवें ठेवतील कीं काँग्रेसमंत्री सत्तेला चिकटून बसले तेव्हां तुम्ही त्यांना राजिनामे द्यावयाला सांगत होतां आणि आतां स्वतः तुम्हीच त्या मंत्रिपदावर जाऊन बसतां? अशा शंका-कुशंकांच्या अनेक लहानमोठ्या मुंग्या प्रजा-समाजवादी पक्षाच्या महाराष्ट्रीय नेत्यांच्या मेंदूंना डसत असल्यानें त्यांची स्थिति मोठी केविलवाणी झाली आहे.

वस्तुतः, त्यांच्या ह्या सर्व शंकांचें निराकरण करतां येईल. अर्थात्, हें निराकरण करून घेण्याची त्यांची इच्छा मात्र पाहिजे. एकजुटीनें निवडणुका लढण्याच्या बाबतींत प्रजा-समाजवादी पक्षाची ना नाहीं. पण निवडणुका लढावयाच्या म्हणजे कांहीं सत्याग्रह करावयाचा नाहीं. निवडणुकांना उभें राहावयाचें म्हणजे लोकांच्या पुढें स्पष्ट कार्यक्रम मांडावयाला पाहिजे. लोकांना स्पष्टपणें सांगतां आलें पाहिजे कीं आम्ही निवडणुका कां लढवतों आहोंत आणि निवडणुका जिंकल्यानंतर आम्ही काय करणार आहोंत. नुसतें एवढें सांगून भागणार नाहीं कीं मुंबई-बेळगांव मिळविण्यासाठीं आम्ही निवडणुका लढवतों आहोंत म्हणून. निवडणुका जिंकल्या-नंतर तुम्ही राजिनामे देणार आहांत असें जर लोकांना कळलें तर लोक तुम्हांला मतें देणार नाहींत. राजिनामे देऊन पेचप्रसंग निर्माण होईल हा नुसता भ्रम आहे. मध्यवर्ती काँग्रेस सरकार इतकें कोडगें आहे कीं तें तुमच्या राजिनाम्यांना केराची टोपली दाखवील आणि खंडित महाराष्ट्रावर राष्ट्रपतींची राजवट आली म्हणजे पुन्हा काँग्रेसवाल्यांची, अधिकाऱ्यांची आणि पोलिसांची पोळी पिकेल. म्हणजे निवडणुकींत काँग्रेसवाल्यांचा पराभव करावयाचा आणि राष्ट्रपतींची राजवट

आणून पुन्हा काँग्रेसवाल्यांच्या हातांत सर्व सत्ता द्यावयाची हा खूपच शहाणपणा होईल !

मुंबई केंद्रशासित करावयाची आणि महाराष्ट्रांत राष्ट्रपतींची राजवट आणावयाची हा तर काँग्रेसवाल्यांचा मुळीं डाव आहे. काय वाटेल तें झालें तरी महाराष्ट्रांत राष्ट्रपतींची राजवट येण्यास जनतेनें प्राणपणानें विरोध केला पाहिजे. राष्ट्रपतींच्या राजवटींत संयुक्तमहाराष्ट्रवादी आंदोलनाचीं पाळेंमुळें महाराष्ट्रांतून खणून टाकण्याचा जगड्व्याळ प्रयत्न होईल. जनता हैराण होईल. आणि पुन्हां वर्षभरानें निवडणुका झाल्या तर ती सरळ काँग्रेसवाल्यांना मतें देईल. कारण ती स्वतःशीं असा युक्तिवाद करील कीं डाव्या आघाडीच्या लोकांना मतें देऊन निवडून दिलें तर ते राजिनामे देतात. मग त्यांना मतें देण्यांत काय फायदा ? अशा रीतीनें एकदोन वर्षे राष्ट्रपतींची राजवट चालून मग पुन्हा निवडणुका होऊन महाराष्ट्रांत काँग्रेस पक्ष अधिकारारूढ झाला तर पांच वर्षांच्या अखेरीस गुजरातमधील काँग्रेस सरकार उभयपक्षीं करार करून मुंबईसह महाद्विभाषिक राज्य स्थापन करील ही अगदीं काळ्या दगडावरची रेघ आहे. नेहरूंच्या डोक्यामधून द्विभाषिक राज्याची कल्पना अद्यापि गेलेली नाहीं. महाद्विभाषिक राज्याला पूर्वी गुजरातनें नकार दिला होता. पण आतां तें स्वीकारण्याची त्याची तयारी आहे हें विसरून चालावयाचें नाहीं. म्हणून निवडणुका जिकल्यानंतर सत्ता हातीं न घेतां राजिनामे देऊन पेचप्रसंग निर्माण करावयाचा हें मृगजळ प्रजा-समाजवादी पक्षाच्या लोकांनीं आपल्या डोक्यामधून अजिबात काढून टाकावयाला हवें.

सत्तास्वीकार करावयाचा का नाहीं ह्यासंबंधीं आतांच वादंग न घालतां केवळ निवडणुका जिंकून काँग्रेस पक्षाचा धुव्वा उडवावयाचा एवढ्या एकाच मुद्द्यावर सर्वपक्षीय एकजूट साधावी, त्यानंतर मग पुढें सत्तेचा स्वीकार करून मंत्रिमंडळ बनवायचें कीं नाहीं हें पुढें सर्वपक्षीय पुढाऱ्यांनीं ठरवावें असा कांहींजण सल्ला देतात. आम्हांला हा सल्ला अत्यंत भोंगळ आणि धोकेबाज वाटतो. आजचें संकट उद्यांवर ढकललें म्हणून तें टळणार तर नाहींच पण आहे त्यापेक्षां जास्त भीषण स्वरूप धारण करील हें पक्कें लक्षांत ठेवावें. वस्तुतः, सत्तास्वीकार करून मंत्रिमंडळ बनविण्याच्या कल्पनेला शेतकरी-कामगार आणि कम्युनिस्ट पक्षाचा पूर्ण पाठिंबा आहे. पण प्रजा-समाजवादी पक्षाच्या सोयीसाठीं सत्तास्वीकाराचा प्रश्न पुढें ढकलून वर सांगितलेल्या सल्लागारांच्या म्हणण्याप्रमाणें सर्वपक्षांची सैल अशी एकजूट बनवून

निवडणुका लढवल्या आणि त्या जिंकल्या तर पुढें सत्तास्वीकाराच्या वेळीं काय काय अडचणी उभ्या राहतील ह्याची कुणाला कल्पना आहे? समजा राज्यकारभाराच्या कार्यक्रमावर शेतकरी-कामगार नि कम्युनिस्ट ह्यांच्याशीं प्रजासमाजवादी पक्षाचें उद्यां एकमत झालें नाहीं, तर त्या दोन्ही पक्षांशीं फारकत करून तो त्रावणकोर-कोचीनप्रमाणें काँग्रेससरकारशीं सहकार्य करून आपलें मंत्रिमंडळ खंडित महाराष्ट्रांत स्थापन करण्याची शक्यता आहे कीं नाहीं! आमची खात्री आहे कीं महाराष्ट्रांतला प्रजासमाजवादी पक्ष असें कधींहि करणार नाहीं. पण कोणत्या वेळीं कोणाला काय बुद्धि होईल हें कोणीं सांगावें?

प्रजासमाजवादी पक्षाला कम्युनिस्ट पक्षाच्या हेतूबद्दल आज अनेक संशय येतात. त्याचप्रमाणें कम्युनिस्ट पक्षाला प्रजासमाजवादी पक्षाबद्दल असे संशय कां येऊं नयेत? म्हणून आजचें मरण उद्यांवर न ढकलतां ह्या तीन पक्षांची एकजूट घडवितांना हडसून खडसून काय व्हावयाचें आहे तें आतांच होऊं द्या. मग त्यामधून दुर्दैवानें एकादा पक्ष गळालाच तर स्वतःला आणि जनतेला फसवल्याचा आरोप तरी पुढें कोणावर यावयाला नको. 'संयुक्त महाराष्ट्र परिषदे' मधून एक पक्ष गळून 'संयुक्त महाराष्ट्र समिति' स्थापन झाली. त्याचप्रमाणें ह्या समितीमधला आणखी एकादा पक्ष गळून जर 'संयुक्त महाराष्ट्र आघाडी' स्थापन होणार असेल तर तें भवितव्य कोण टाळूं शकणार? पण जें काय होईल तें प्रामाणिकपणानें आणि उघडपणें व्हावें. सर्व पक्षांची एकजूट व्हावी ह्याबद्दल जनतेला तीव्र तळमळ लागून राहिली आहे. काय वाटेल तें करून ही एकजूट तर झालीच पाहिजे. पण त्या एकजुटींत भोंगळपणा किंवा पोकळपणा असतां कामा नये ह्याबाबत अतिशय दक्षता घेतली पाहिजे.

प्रजा-समाजवादी पक्षाचे एक चिटणीस फरीद अनसारी ह्यांनीं थोडया दिवसांपूर्वी एक कम्युनिस्टविरोधी पत्रक काढून महाराष्ट्रामधील सर्वपक्षीय एकजुटीच्या प्रयत्नांत फार मोठा घोटाळा उत्पन्न करून ठेवलेला आहे. ह्या पत्रकांत अन्सारी म्हणतात कीं, "कम्युनिस्ट पक्ष आणि प्रजासमाजवादी पक्ष ह्यांच्यांत मूलभूत विरोध असल्यामुळें त्यांच्यामध्यें निवडणुकांबाबत करार होणें शक्य नाहीं. कम्युनिस्ट पक्षाच्या धोरणांत व वृत्तींत वरवर कांहींहि बदल झालेला असला तरी त्याच्या संघटनेचा सांचा मुळींच बदललेला नाहीं. संयुक्त आघाडया किंवा इतर पक्षांशीं निवडणूक करार याबाबत कम्युनिस्ट पक्षाचे जुनेच डावपेच कायम आहेत. लोकशाही पद्धति

व परंपरा, साधनांची शुचिता, नैतिक मूल्यें या बाबतींत कम्युनिस्ट व प्रजा-समाजवादी पक्ष ह्यांत मूलभूत दृष्टिकोनाचा फरक आहे त्यामुळें त्यांच्याशीं निवडणुकींत सहकार्य होणें शक्य नाहीं!" प्रजा-समाजवादी पक्षाच्या चिटणिसानें कम्युनिस्ट पक्षावर ही जी टीका केली आहे तिच्यापेक्षांहि अधिक विदारक आणि बदनामीकारक टीका कम्युनिस्ट पक्षाला प्रजासमाजवादी पक्षावर करतां येईल. दुसऱ्यावर टीका करण्यासारखी आज प्रजा-समाजवादी पक्षाची स्थिति तरी आहे का? ह्याविषयीं जितकें कमी बोलावें तितकें बरें आहे.

आजकाल जो राजकीय पक्ष उठतो तो आपला आरोळ्या ठोकूं लागतो कीं "आम्ही कोणत्याहि दुसऱ्या पक्षाशीं सहकार्य करणार नाहीं!" सगळ्या राजकीय पक्षांचे म्हणे बाकीच्या साऱ्या राजकीय पक्षांशीं 'मूलभूत मतभेद' आहेत. आणि सर्वांचें अधिष्ठान लोकशाही आणि नैतिक तत्त्वांवर म्हणे झालें आहे. कालपरवां स्थापन झालेला डॉ. नरवणे ह्यांचा पक्ष का परिषद. पांच माणसें नाहींत त्यांच्यांत. तरी देखील त्यांनीं घोषणा केली आहे कीं, 'आम्ही कोणत्याहि पक्षामध्यें मिसळणार नाहीं!' अरे, दांतांवर मांस नाहीं तुमच्या आणि जबडा उघडला आहांत आभाळाचा घास घेण्यासाटीं. काय, म्हणावें काय तुम्हांला? देशांतल्या लहानसहान राजकीय पक्षांनीं एकजूट केल्यावांचून त्यांची धडगत कशी लागणार! 'माझा साबण तुमच्या साबणापेक्षां चांगला आहे' ही भाषा पोटभरू व्यापाऱ्यांनीं करावी. जनतेची सेवा करणाऱ्या राजकीय पक्षांनीं नव्हे. निवडणुकीमध्यें निरनिराळ्या पक्षांनीं केवळ परस्परांत जागा वांटून घ्याव्यात आणि निवडणुका लढवाव्यात अशी खासदार एच. व्ही. कामत ह्यांनीं सूचना केलेली आहे, तीहि योग्य नाहीं. कारण असें झालें तर जो तो पक्ष आपापल्यापुरतेंच पाहील, दुसऱ्याची परवा करणार नाहीं. त्यामुळें एकजूट तर लांबच राहील पण निरनिराळ्या पक्षांतलें अंतर मात्र वाढत जाईल आणि पुढें सत्तास्वीकाराच्या वेळीं भलताच पेचप्रसंग निर्माण होईल.

एवढा सर्व विचार केल्यानंतर प्रजा-समाजवादी, कम्युनिस्ट आणि शेतकरी-कामगार ह्या तीन पक्षांनीं आपली अभेद्य एकजूट निर्माण करून किमान कार्य-क्रमाच्या आधारावर खंडित महाराष्ट्रामध्यें 'संयुक्त महाराष्ट्रवादी सरकार' स्थापन करणें किती आवश्यक आहे तें सर्वांना पटेल. ह्या तीन पक्षांतील 'मूलभूत मतभेदां'ना धक्का न लावतांना असा किमान कार्यक्रम तयार करणें अगदीं शक्य आहे अशी आमची श्रद्धा आहे. डाव्या गटांची कालत्रयीं एकजूट होणार नाहीं, कारण

ते आपापसांत भांडतील, ही गोष्ट कॉंग्रेसवाले मुळीं गृहीत धरून चालले आहेत. ह्याउप्पर जर त्यांचें ऐक्य झालें आणि त्यांनीं निवडणुका जिंकल्या तर 'मुंबई बेळगांव मिळेपर्यंत खंडित महाराष्ट्राच्या राज्यकारभाराची धुरा खांद्यावर घेऊं नये' अशा गर्जना करून काकासाहेब गाडगीळ आणि डॉ. नरवणे ह्यांच्यासारखे कॉंग्रेसचे हस्तक त्यांचा बुद्धिभेद करण्याचा प्रयत्न करीत आहेत. म्हणून सत्तास्वीकार न करण्याची भाषा ही कॉंग्रेसच्या अप्रत्यक्ष प्रचाराची आणि संयुक्त महाराष्ट्राच्या द्रोहाची भाषा ही खूणगांठ मराठी जनतेनें आपल्या मनाशीं पक्की बांधावी.

मुंबईचा आणि बेळगांवचा लढा जास्त प्रभावीपणानें लढण्यासाठींच सत्तेचा स्वीकार करावयाचा आहे. त्यामुळें मंत्रिपदें स्वीकारल्याबद्दल जनता नांवें ठेवील ही भीति खोटी आहे. अन्यायी कायदे रद्द करणें, राजकीय कैद्यांची मुक्तता करणें, पोलीस अत्याचारांची चौकशी करणें, लांचलुचपतखोर अधिकाऱ्यांना शासन करणें, राज्यकारभाराचा भरमसाट खर्च कमी करणें, विकासाच्या योजनांची अंमलबजावणी करून दारिद्र्य आणि दुष्काळ नष्ट करणें अशा कितीतरी गोष्टी संयुक्त महाराष्ट्रवादी सरकारला झपाट्यानें करतां येतील. कॉंग्रेसच्या जुलमी आणि अन्यायी राजवटींतून सुटल्याबद्दल सारी जनता समाधानाचा प्रचंड निःश्वास टाकील तो तर निराळाच! आणि सगळ्यांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे संयुक्त महाराष्ट्रवादी लोक हे हुल्लडबाजी करणारे दंगेखोर लोक नसून आपल्या राज्यांतील अन्यभाषिकांना समतेनें आणि सभ्यतेनें वागवणारे, लोकशाहीची कदर करणारे आणि भारताच्या ऐक्यासाठीं सर्वस्व वेंचणारे असे लोक आहेत हें जर पांच वर्षांत आदर्श राज्य-कारभार चालवून आपण साऱ्या भारताला दाखवूं शकलों तर पांच वर्षांच्या अखेरीस मध्यवर्ती सरकारला मुंबई महाराष्ट्राला परत दिल्यावांचून गत्यंतरच राहणार नाहीं!

म्हणून आम्ही म्हणतां कीं नव्या महाराष्ट्राची सत्ता हातीं घेणें हा मुंबई महाराष्ट्राला मिळविण्याचा सर्वांत प्रभावी मार्ग आहे. एवढ्यासाठीं सर्व संयुक्तमहाराष्ट्रवादी डाव्या राजकीय पक्षांनीं किमान कार्यक्रमावर आपली एकजूट घडवून आणून आगामी निवडणुका लढविण्यासाठीं आणि खंडित महाराष्ट्राची सत्ता हस्तगत करण्यासाठीं तावडतोब 'संयुक्त महाराष्ट्र आघाडी' स्थापन करावी अशी आम्ही विनंति करतां. आपला पक्ष कसा टिकेल ह्याची विवंचना न करतां संयुक्त महाराष्ट्र कसा टिकेल ह्याचा सर्व पक्षांनीं विचार करावा. कोट्यवधि मराठी जनतेच्या कल्याणाचें काम बाजूला सारून जर केवळ पक्षाचा विचार करीत बसाल तर

इतिहास तुम्हांला क्षमा करणार नाहीं. काळिमा लावून घ्याल. आणि नामशेष व्हाल. समर्थ रामदास म्हणतात,

**धरून पक्ष काय रे**
**उपाय तो अपाय रे**
**तुम्ही तुम्हांस वीवरा**
**स्वहीत तें मनीं धरा !**

तीन कोटी जनता विजयी होण्याचा एकमेव मार्ग म्हणजे महाराष्ट्रांतल्या ह्या तीन प्रमुख डाव्या गटांची एकजूट.

८-७-१९५६

# संयुक्त आघाडीचा झेंडा

' संयुक्त महाराष्ट्र समिती 'च्या विद्यमानें संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीसाठीं जो प्रखर सत्याग्रही झगडा मुंबईच्या, बेळगांवच्या आणि महाराष्ट्राच्या आघाडीवर घनघोर चालू आहे, त्या झगड्याचें लोण वऱ्हाडनागपूरमध्यें आणि मराठवाड्यामध्यें जेवढ्या प्रकर्षानें पोहोंचावयाला हवें होतें तेवढें अद्यापि पोहोंचलेलें नाहीं ह्यांत कांहीं संशय नाहीं. वऱ्हाड-नागपुरांतील आणि मराठवाड्यांतील मराठी जनता महाराष्ट्रामधील मराठी जनतेपासून अनेक शतकें वियुक्त आहे. ह्या तीन प्रदेशांतील मराठी जनतेनें एकत्र येऊं नये म्हणून ब्रिटिशांनीं जशीं अनेक कारस्थानें केलीं, तशाच तऱ्हेच्या अनेक कारवाया स्वातंत्र्य मिळाल्यापासून काँग्रेसश्रेष्ठींनींहि चालविल्या होत्या. वऱ्हाडनागपुरांतील भांडवलदारांना आणि श्रीमंत जमीनदारांना तेथील शेतकरी, श्रमजीवी आणि मध्यमवर्गीय जनतेची पिळणूक करण्यासाठीं तो प्रदेश महाराष्ट्रांत समाविष्ट व्हावयाला नको होता. म्हणून त्यांनीं स्वतंत्र ' महाविदर्भा '-ची मागणी केली. ह्या मागणीला महाराष्ट्रद्वेष्ट्या काँग्रेसश्रेष्ठींनीं साहजिकच पाठिंबा दिला. राज्यपुनर्रचना समितीनें आठ जिल्ह्यांच्या स्वतंत्र विदर्भाचें जें राज्य सुचविलें तें काँग्रेसश्रेष्ठी आणि वऱ्हाडनागपुरामधील भांडवलदार-जमीनदारांच्या संयुक्त प्रेरणेमुळें, ही गोष्ट सर्वांना माहितच आहे. ढेबर-मोरारजी आणि बियानी ह्यांचेंच तें पाताळयंत्र होतें. तथापि, महाविदर्भाच्या स्वतंत्र राज्याला जेव्हां तीन कोटी मराठी जनतेनें कडकडून विरोध केला तेव्हां काँग्रेसश्रेष्ठींना महाविदर्भाचा समावेश महाराष्ट्रांत करण्यावांचून मग गत्यंतरच उरलें नाहीं. महाविदर्भांतील बियानी गटाला त्यांना नाइलाजानें सोडून द्यावें लागलें. अशा रीतीनें पहिल्याच चकमकींत संयुक्तमहाराष्ट्रवादी जनतेनें काँग्रेसश्रेष्ठींचा आणि महाविदर्भीय भांडवलदारांचा सपशेल पराभव करून महाविदर्भामधील आणि महाराष्ट्रांतील जनतेचें ऐक्य घडवून आणलें.

विदर्भांतील संयुक्तमहाराष्ट्रवादी जनतेनें गेल्या एप्रिलमध्यें झालेल्या निवड-

णुकींत महाविदर्भवादी बियानींचा दणदणीत पराभव करून आणि विजयाची माळ कट्टर संयुक्तमहाराष्ट्रवादी उमेदवार भाऊराव देशमुख ह्यांच्या गळ्यांत घालून पुन्हा सिद्ध केलें कीं विदर्भातील बहुसंख्य जनता ही संयुक्त महाराष्ट्राच्या मागें आहे. हैद्राबाद संस्थानांतील मराठी, तेलगू आणि कानडी भाषिक प्रजा त्यांच्या त्यांच्या भाषिक राज्यांत घालून हैद्राबाद संस्थानाचें विसर्जन करावें अशी जनतेची मागणी होती. पण त्याला कॉंग्रेसश्रेष्ठींचा आणि विशेषतः पंडित जवाहरलाल नेहरू ह्यांचा निकराचा विरोध होता. हैद्राबाद संस्थानची एक कांहीं तरी विशिष्ट संस्कृति आहे आणि तिच्या संगोपनार्थ हैद्राबाद संस्थान विसर्जित होतां कामा नये, किंबहुना आपल्या हयातींत तसें होऊं देणार नाहीं असा पंडित नेहरूंचा दावा होता. पण लोकशाहीच्या रेट्याखालीं पंडित नेहरूंना अखेर नमावें लागलें आणि भाषिक राज्यांच्या निर्मितीसाठीं हैद्राबाद संस्थान बरखास्त करून टाकण्यास त्यांना मान्यता द्यावी लागली. म्हणून मराठवाड्याचा समावेश महाराष्ट्रांत झाला. शंकरराव देव, देवगिरीकर आणि यशवंतराव चव्हाण नेहमीं लुच्चेगिरीनें सांगत असतात कीं महाविदर्भ आणि मराठवाडा हे दोन मराठी प्रदेश महाराष्ट्राला मिळाले ते महाराष्ट्र कॉंग्रेसश्रेष्ठींच्या मेहरबानीनें. हा त्यांचा दावा साफ खोटा आहे. महाविदर्भ आणि मराठवाडा ह्यांचें महाराष्ट्राशीं झालेलें ऐक्य हें केवळ जनतेच्या जबरदस्त इच्छेमुळें आणि प्रयत्नांमुळेंच होय ही गोष्ट सूर्यप्रकाशासारखी स्वच्छ होय! ह्या सिद्धीचें श्रेय लुबाडण्याच्या कॉंग्रेसवाल्यांच्या प्रचारावर जनता कधींहि विश्वास ठेवणार नाहीं.

महाविदर्भाचा समावेश महाराष्ट्रांत झाला ह्यामुळें तेथील मराठी जनतेला अतिशय आनंद झाला आहे. महाराष्ट्र, महाविदर्भ आणि मराठवाडा ह्यांचें इतक्या वर्षांनंतर प्रथम ऐक्य होणार आहे ही कल्पनाच अत्यंत रोमहर्षण आहे! अनेक वर्षांच्या वनवासानंतर राम, लक्ष्मण, भरत ह्या तीन भावांची जशी भेट व्हावी, तसें ह्या तीन मराठी भाषिक प्रदेशांचें आतां पुनर्मीलन होणार आहे. तथापि, अनेक वर्षांनंतर होणाऱ्या भावाभावांच्या हृदयस्पर्शी भेटीच्या वेळीं राजा दशरथाचा विरह जसा राम-लक्ष्मण-भरतांना जाणवावा तसा मुंबई नगराचा वियोग महाराष्ट्र, महाविदर्भ आणि मराठवाडा ह्या तीन भावंडांना जाणवल्याखेरीज राहणार नाहीं. मुंबई शहर संयुक्त महाराष्ट्रापासून तोडलें जाणार ह्याचें दुःख महाराष्ट्रामधील जनतेला जेवढें तीव्रतेनें जाणवतें, तेवढ्याच तीव्रतेनें तें महाविदर्भातील आणि

मराठवाड्यांतील जनतेला जाणवतें आहे. महाविदर्भापासून आणि मराठवाड्यापासून मुंबई जरी दूर असली तरी मुंबई शहर हें महाराष्ट्राचें मस्तक आहे, तें त्याचें भूषण आहे. तें त्याचें वैभव आहे. तें जर महाराष्ट्रामधून गेलें तर महाराष्ट्राचें केवळ बारा कोट रुपयांचें नुकसान होणार नसून महाराष्ट्राचें आर्थिक आणि औद्योगिक जीवनच मुळीं कोलमडून पडेल ह्याची जाणीव महाविदर्भांतील आणि मराठवाड्यांतील जनतेला पुरेपूर आहे.

असें असून महाविदर्भांतील कॉंग्रेस नेते तेथील जनतेचा आतां असा बुद्धिभेद करीत आहेत कीं मुंबईचा आणि महाविदर्भाचा कांहीं एक संबंध नाहीं आणि नागपूर हीच महाराष्ट्राची राजधानी व्हावयाला पाहिजे. नागपूर ही राजधानी व्हावयाला जणुं कांहीं महाराष्ट्राचा विरोधच आहे असा महाविदर्भीय जनतेच्या डोक्यांत भ्रम निर्माण करून तिच्यांत आणि महाराष्ट्रामधील जनतेमध्यें वैमनस्य निर्माण व्हावें आणि मुंबई-बेळगांवसाठीं चाललेल्या संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या झगड्यांमधून ती बाहेर फुटावी अशा महाविदर्भांतील कॉंग्रेसवाल्यांनीं कारवाया सुरू केल्या आहेत. पांच वर्षें मुंबई केंद्रशासित करण्याचा पंडित नेहरूंचा निर्णय 'अत्यंत असमाधानकारक आणि असंतोषकारक आहे' अशी नांवापुरती शाब्दिक कबुली तरी महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेसनें दिली. मराठवाडा कॉंग्रेसनें तर तिच्याहि पुढें जाऊन अगदीं स्पष्ट शब्दांत सांगून टाकलें कीं 'नेहरू घोषणेनें आपल्याला दुःख होत आहे. मुंबई व इतर सीमा प्रदेश महाराष्ट्राला न देण्यांत अन्याय झाला आहे. पांच वर्षांनंतर मुंबई शहराचें भवितव्य लोकमतानें ठरवण्याचें तत्त्व आपल्याला अमान्य आहे.' पण नागपूर आणि विदर्भ कॉंग्रेस ह्या इतक्या निलाजऱ्या आणि स्वाभिमानशून्य आहेत कीं त्यांनीं नेहरूंच्या ह्या निवाड्याला शंभर टक्के मान्यता देऊन टाकली आहे; एवढेंच नव्हे तर नेहरूंच्या निर्णयाचा प्रचार खेडोपाडीं करण्यासाठीं एका महिन्याच्या आंत कॉंग्रेस कार्यकर्त्यांच्या एक हजार सभा आणि शंभर जाहीर सभा घेण्याचें ठरविलें आहे.

नागपूर कॉंग्रेस समितीचे अध्यक्ष श्री. एम्. डी. तुमपल्लीवार ह्यांचा पल्ला तर येथवर गेला आहे कीं ते म्हणतात, "मुंबई ही महाराष्ट्राची मुळीं नाहींच. कोणत्याहि प्रदेशाचा मुंबईवर हक्क नाहीं. मुंबई केंद्रशासित करण्याचा निर्णय पांच वर्षांपुरताच नसून कायमचा असावा. मुंबई महाराष्ट्रापासून कायमची दूर ठेवण्यांत यावी असें माझें मत आहे." विदर्भ कॉंग्रेसचे अध्यक्ष डॉ. गोपाळराव खेडकरसुद्धां तसेंच

सांगतात कीं, "मुंबई मेली म्हणून रडत बसावयाचें काय कारण आहे? नेहरूंना शरण जा. ते तुम्हांला एक सोडून दहा मुंबया देतील!" महाविदर्भातील कॉंग्रेस नेते तुमपल्लीवार, कन्नमवार किंवा बियानी हे मूळचे महाराष्ट्रीय नसल्यानें मराठी जनतेच्या वतीनें बोलण्याचा त्यांना मुळींच अधिकार नाहीं. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, विदर्भातील कॉंग्रेसचें नेतृत्व त्यांच्याकडे आलें असल्यानें महाराष्ट्रद्रोही प्रचार आज ते राजरोसपणें करीत आहेत. म्हणून तुम्ही आमचे मुळीं प्रतिनिधीच नाहींत असें महाविदर्भातील मराठी जनतेनें त्यांना आतां निक्षून सांगितलें पाहिजे. महाराष्ट्रांत आणि विदर्भांत फूट पाडावी म्हणून पूर्वी जसे त्यांनीं जंगजंग पछाडले, तसे आतांहि त्यांचे प्रयत्न चालूच आहेत. महाविदर्भ हा शिलकीचा प्रदेश आहे आणि महाराष्ट्र हा तुटीचा प्रदेश आहे. तेव्हां महाविदर्भाची संपत्ति दरिद्री महाराष्ट्र लुबाडून स्वतःसाठीं वापरील, अशी भीति महाविदर्भीय जनतेच्या मनांत तेथील कॉंग्रेस पुढारी निर्माण करीत आहेत. त्याखेरीज, पुण्याचे लोक फार स्वार्थी आणि लबाड आहेत, ते महाविदर्भातील जनतेला नाना तऱ्हेच्या युक्त्या लढवून फसवतील आणि सर्व सत्ता आपल्या हातीं ठेवतील, असा प्रचार तर ना. बापूजी अण्यांसारखे जबाबदार लोक किती दिवसांपासून तरी महाविदर्भांत करीत आहेत ना. अण्यांचें खरें नांव अन्नमवार आहे. ह्या अन्नमवारांचे आजचे वारसदार कन्नमवार आणि तुमपल्लीवार तोच विषारी प्रचार महाविदर्भांत आज चालवीत आहेत.

महाविदर्भीय जनतेचीं मनें महाराष्ट्रांतल्या नि विशेषतः पुण्यांतल्या लोकांबद्दल कलुषित करण्याचा जो हीन प्रयत्न तेथील कॉंग्रेसनेते करीत आहेत, त्याला आळा बसेल अशी कांहीं तरी ताबडतोब व्यवस्था होणें जरूर आहे. त्याखेरीज मुंबईबाबत महाविदर्भामधल्या लोकांचा बुद्धिभेद करण्याचीहि ते जी पराकाष्ठा करीत आहेत त्याचा जोरानें प्रतिकार व्हावयाला पाहिजे. ह्याचाच अर्थ संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाचें लोण ह्यापुढें महाविदर्भाच्या कोनाकोपऱ्यापर्यंत नेऊन पोहोंचवलें पाहिजे. ह्या दृष्टीनें 'संयुक्त महाराष्ट्र समिती'च्या कार्यकारिणीची सभा गेल्या आठवड्यांत अकोला व अमरावती येथें भरविण्यामध्यें फारच मोठें औचित्य आणि प्रसंगावधान दाखविण्यांत आलें ह्यांत कांहीं शंका नाहीं. त्यामुळें विदर्भांतल्या परिस्थितीचें प्रत्यक्ष अवलोकन करण्याचा आणि संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाचें वास्तववादी दर्शन तेथील जनतेला घडवण्याचा मोका आम्हांला लाभला. खरें पाहिलें असतां विदर्भामध्यें 'संयुक्त महाराष्ट्रा'ची चळवळ अजून सुरूच झाली नाहीं असें म्हणावयास हरकत

नाहीं. तसा सत्याग्रह तुरळक तुरळक अनेक ठिकाणीं चालू आहे. पण त्याला विशेष जोर नाहीं. ह्याचें कारण जनता जरी संयुक्तमहाराष्ट्रवादी असली तरी तिला मार्गदर्शन करणारा असा एकहि प्रभावी राजकीय पक्ष विदर्भात नाहीं. बहुसंख्य जनता कॉंग्रेसच्या कारभाराला विटलेली आहे. तथापि, कॉंग्रेसची संघटना अजूनहि मजबूत आणि प्रभावी आहे.

महाविदर्भामध्यें राजकारणाचें स्वरूप पुष्कळसें व्यक्तिनिष्ठ आहे. मोठमोठीं नामांकित माणसें अद्यापिहि कॉंग्रेसमध्येंच आहेत. त्यांच्यामुळें कॉंग्रेसचें सामर्थ्य जनतेमध्यें घटलें असूनहि तिची बाह्यात्कारी प्रतिष्ठा अजून कायम आहे. त्या दृष्टीनें कॉंग्रेसविरोधी पक्षांमध्यें मोठीं किंवा वजनदार माणसें जवळजवळ नाहींतच असें म्हणावयास हरकत नाहीं. विदर्भात अकोला, बुलढाणा, यवतमाळ, आणि अमरावती असे चार जिल्हे आहेत. त्यांत वीस टक्के काम शेतकरी-कामगार पक्षाचें आहे, पंचवीस टक्के काम स्वतंत्र व्यक्तींचें आहे. प्रजासमाजवादी आणि कम्युनिस्ट पक्षांना ह्या चारी जिल्ह्यांमध्यें कुठेंच स्थान नाहीं. असलेंच थोडेंसें तर तें अमरावती शहरामध्यें आहे. नागपूर विभागांत नागपूर, वर्धा, भंडारा आणि चांदा असे चार जिल्हे आहेत. ह्या चार जिल्ह्यांपैकीं भंडारा आणि चांदा ह्या जिल्ह्यांत कॉंग्रेसविरोधी पक्षांना कांहींच स्थान नाहीं. भंडारा जिल्ह्यांत प्रजासमाजवादी पक्षाचें थोडेंसें काम झालेलें आहे इतकेंच काय तें. नागपूर आणि वर्धा जिल्ह्यांत शेतकरी-कामगार आणि स्वतंत्र ह्यांचें पंधरा पंधरा टक्के वर्चस्व आहे. कम्युनिस्ट आणि प्रजासमाजवादी ह्यांना पांच पांच टक्क्यांपेक्षां अधिक स्थान नाहीं. सारांश, नागपूर विदर्भातली जनता सत्तर ते ऐंशीं टक्के संयुक्तमहाराष्ट्रवादी असून सुद्धां तिचें दहा टक्के नेतृत्वसुद्धां त्या ठिकाणीं डावे गट अद्याप मिळवूं शकेल नाहींत.

महाविदर्भात फार मोठा सधन जमीनदार वर्ग आहे. ह्याला 'देशमुख' वर्ग म्हणतात. समाजांत आणि राजकारणांत ह्या वर्गाचें फार मोठें वर्चस्व आहे. हा वर्ग कट्टर 'महाविदर्भवादी' आहे. आज तो फार मोठ्या संख्येनें कॉंग्रेसमध्यें आहे. तथापि, बहुसंख्य शेतकरी वर्ग हा देशमुखविरोधी वर्ग आहे. ह्याला 'पाटील' वर्ग म्हणतात. हा मात्र कट्टर 'संयुक्तमहाराष्ट्रवादी' आहे. त्याचें थोडेंफार नेतृत्व 'शेतकरी-कामगार पक्षा'कडे आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. पण त्याचें स्वरूप पुष्कळसें जातीयवादी आहे. हें जातीयवादी स्वरूप

'संयुक्त महाराष्ट्र' च्या चळवळीमुळें मात्र बऱ्याच प्रमाणांत कमी होण्याचा संभव आहे. 'डावी विचारसरणी' मात्र महाविदर्भात अजूनपर्यंत रुजली नाहीं हेंच खरें.

महाराष्ट्रामधला प्रजासमाजवादी पक्ष हा 'संयुक्त महाराष्ट्रवादी' आहे. पण महाविदर्भातला प्रजासमाजवादी पक्ष मात्र आजपर्यंत त्या ठिकाणीं 'महाविदर्भवादी' म्हणजे जनताविरोधी होता. बियानींच्या निवडणुकीमध्येंहि ह्या पक्षानें आपला एक उमेदवार उभा करून जनता आघाडीचे यशस्वी उमेदवार श्री. भाऊराव देशमुख ह्यांना पराभूत करण्याचा प्रयत्न केला. बियानींना अठरा हजार मतें पडलीं. प्रजासमाजवादी पक्षाच्या उमेदवाराला नऊशें पस्तीस मतें मिळालीं. म्हणजे त्याला आणखी एक हजार मतें मिळालीं असतीं तर जनता आघाडीच्या भाऊराव देशमुखांचा पराभव होऊन भांडवलदार काँग्रेसच्या महाविदर्भवादी आणि महाराष्ट्रद्रोही बियानी शेटचा विजय झाला असता. ह्यामुळें विदर्भातील जनतेचीं मनें तेथील प्रजासमाजवादी पक्षाविरुद्ध कलुषित झालेलीं आहेत. म्हणून 'संयुक्त महाराष्ट्र'-च्या प्रश्नावर विदर्भीय जनतेमध्यें आतां चळवळ करतांना तेथील प्रजासमाजवादी पक्षाला फारच सावधगिरीनें आणि प्रामाणिकपणानें काम करावयाला हवें.

महाविदर्भामधील निरनिराळ्या पक्षांच्या नेत्यांना आणि कार्यकर्त्यांना समक्ष भेटून आणि त्यांच्यापाशीं बारकाईनें विचारपूस करूनच आम्हीं ही सर्व माहिती जमविली आहे. आणि कोणताहि आडपडदा मनांत न ठेवतांना ती मोकळेपणानें आम्ही जनतेपुढें मांडीत आहोंत. त्यामुळें 'संयुक्तमहाराष्ट्रवादी' कार्यकर्त्यांना धक्का बसण्याचा आणि ते निरुत्साहित होण्याचा संभव आहे. पण तसें त्यांनीं होण्याचें कारण नाहीं. कारण, महाविदर्भातील मध्यमवर्गीय कामगार आणि शेतकरी जनता ही संयुक्तमहाराष्ट्रवादी आहे, ह्याबद्दल आमची खात्री पटली आहे. म्हणून पुढील सात-आठ महिन्यांत संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांनीं आपलें जास्तींत जास्त सामर्थ्य महाविदर्भात एकवटलें तर त्या ठिकाणीं दिसणारें आजचें निराशाजनक चित्र पार बदलून गेल्यावांचून राहणार नाहीं अशी आमची दृढ श्रद्धा आहे.

अकोला येथें जमलेल्या 'संयुक्त महाराष्ट्र समिती'च्या पुढाऱ्यांनीं ह्या सर्व परिस्थितीचा वास्तववादी विचार करूनच आगामी लढ्याचें आणि सार्वत्रिक निवडणुकीचें धोरण ठरविण्याचा प्रयत्न केला ही आनंदाची गोष्ट आहे. समितीच्या कार्यकारिणीपुढें दोन महत्त्वाचे प्रश्न होते. एक प्रश्न हा कीं मुंबई, बेळगांव

आणि इतर विभागासाठीं आतांपर्यंत जो सत्याग्रहाचा लढा चालू आहे तो जास्तींत जास्त प्रखर कसा करावयाचा आणि दुसरा प्रश्न हा कीं आगामी निवडणुका लढवतांना समितीनें कोणतें धोरण स्वीकारावयाचें. सत्याग्रह फार दिवस चालू शकणार नाहीं, तो कांहीं दिवसांनंतर आतां बंदच करावा लागेल अशा तऱ्हेचें मतप्रदर्शन अलिकडे कांहीं मंडळीं करूं लागली होती. म्हणून त्या बाबतींतलें धोरण समितीनें पुन्हा एकवार अधिक स्पष्टपणें प्रकट करणें आवश्यक होतें.

सत्याग्रहाचा लढा थांबविण्यासारखी परिस्थिति उत्पन्न झाली आहे असें समितीला वाटलें नाहीं. उलट तो अधिकाधिक प्रभावी आणि व्यापक कसा होईल ह्याचाच विचार ह्यापुढें करावयाला पाहिजे असेंच समितीचें मत पडलें. कित्येक विभागांमध्यें सत्याग्रह जोरांत आहे, तर कित्येक ठिकाणीं तो अत्यंत क्षीण स्वरूपांत आहे. त्या त्या ठिकाणीं जाऊन जनशक्ति अधिक जागृत करणें जरूर आहे. टिळक पुण्यतिथीच्या निमित्तानें विशाल महाराष्ट्रांत सर्व ठिकाणीं सत्याग्रहाच्या आंदोलनाला पुन्हा एकदां जोराची चालना मिळावी अशा अर्थाचा आदेश समितीनें संयुक्त महाराष्ट्रवाद्यांना दिला आहे. त्याचप्रमाणें राज्यपुनर्रचना विधेयक ज्यावेळीं लोकसभेपुढें येईल त्यावेळीं संयुक्त महाराष्ट्राची मागणी लोकसभेच्या निदर्शनाला आणण्यासाठीं दिल्लीला जाऊन प्रचंड प्रमाणावर सत्याग्रह करावयाचेंहि समितीनें ठरविलें आहे. अशा रीतीनें सत्याग्रहाचा संग्राम अविरत चालू ठेवून मुंबई-बेळगांवच्या प्रश्नावर लोकमत अधिक संघटित केलें तरच आगामी निवडणुका आपल्याला जिंकतां येतील असाच समितीचा अभिप्राय पडला.

सत्याग्रहाचा लढा सर्वपक्षीय एकजुटीनें आतांपर्यंत जसा लढवण्यांत आला, त्याप्रमाणें आगामी निवडणुकाहि तीच एकजूट पुढें कायम ठेवून समितीनें लढवाव्यात अशी जनतेप्रमाणें सर्व पक्षांची साहजिकच इच्छा होती. समितीमध्यें भिन्न भिन्न पक्ष आणि विचारसरणीचे लोक आज एकोप्यानें आणि सलोख्यानें एकत्र काम करीत आहेत. सत्याग्रहाच्या लढ्यांत त्यांच्या वैचारिक मतभेदाचा मुळीं प्रश्नच उत्पन्न झाला नाहीं. समितीमध्यें समाविष्ट झालेले कित्येक पक्ष अखिल भारतीय स्वरूपाचे आहेत. आणि त्यांचें निवडणुकीबाबत स्वतंत्रपणें धोरणहि ठरलेलें आहे. निवडणुकीमध्यें दुसऱ्या कोणत्याहि पक्षाबरोबर सहकार्य वा करार करावयाचा नाहीं अशी त्यांची प्रतिज्ञा आहे. अशा परिस्थितींत संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीसाठीं निर्माण झालेली समितीची सर्वपक्षीय आघाडी निवड-

गुकांचे वेळीं कशी टिकवावयाची ही फार मोठी समस्या निर्माण झाली. समिती-मधला कोणताहि पक्ष स्वतंत्रपणें निवडणुका लढवून संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर महाराष्ट्रांतसुद्धां काँग्रेसचा पराभव करूं शकेल अशी आज परिस्थिति नाहीं. पण सर्व पक्षांची एकजूट झाली तर निवडणुकींत काँग्रेसचा धुव्वा उडेल ह्याबाबत कोणाच्याहि मनांत सुतराम् संशय नाहीं.

आज महाराष्ट्रांत काँग्रेसचें सर्वत्र दिवाळें वाजलें आहे. आगामी निवडणुकांत उमेदवारसुद्धां कसे उभे करावयाचे ह्याची काँग्रेसला पंचाईत आहे. तरी देखील विरोधी पक्षांची एकजूट होऊं शकणार नाहीं ह्या एका आशेवर तिची भिस्त आहे. म्हणून खंडित महाराष्ट्राचीं सत्तासूत्रें हातीं घेण्याची भाषा ती अलिकडे बोलूं लागली आहे. ह्या सर्व गोष्टींचा अत्यंत व्यावहारिक आणि वास्तववादी विचार करूनच समितीमधल्या घटक पक्षांनीं एकजुटीचा विचार करणें जरूर होतें. ह्या बाबतींत समितीमध्यें दोन विचारप्रवाह होते. एक प्रवाह असा कीं निवडणुकीमध्यें निरनिराळ्या पक्षांनीं परस्परामध्यें जागेची वांटणी करून घ्यावयाची आणि मग आपापल्या पक्षांच्या व्यासपीठावरून ह्या निवडणुका स्वतंत्रपणें लढावयाच्या. अशा रीतीनें निवडणुका लढून काँग्रेसचा पराभव केल्यानंतर आणि बहुमतानें निवडून आल्यानंतर त्या सामर्थ्याच्या जोरावर पेचप्रसंग निर्माण करून संयुक्त महाराष्ट्राची मागणी मान्य करावयास मध्यवर्ती सरकारला भाग पाडावयाचें. दुसरा प्रवाह असा कीं किमान कार्यक्रमाच्या पातळीवर सर्व पक्षांची एकजूट घडवून आणून सर्वांनीं एका निशाणाखालीं निवडणुका लढवावयाच्या आणि काँग्रेसचा पराभव करून महाराष्ट्राचीं सत्तासूत्रें हस्तगत करावयाचीं आणि मग त्या सामर्थ्यावर पेंचप्रसंग निर्माण करून मध्यवर्ती सरकारला आपली मागणी मान्य करावयास लावावयाचें.

पहिल्या विचाराची मंडळी किमान कार्यक्रम करावयास तयार नव्हती. कारण परस्परांतील मूलभूत मतभेदामुळें असा कार्यक्रम तयार करतां यावयाचा नाहीं असा त्यांचा दावा होता. तर दुसऱ्या विचाराची मंडळी जागावांटणीच्या तत्त्वावर पक्षनिहाय निवडणुका लढवण्याच्या विरुद्ध होती. एकजुटीवरच त्यांचा कटाक्ष होता. आणि मूलभूत मतभेदांना धक्का न लावतां किमान कार्यक्रम तयार करतां येणें अगदीं शक्य आहे, असा त्यांचा विश्वास होता. पहिल्या विचाराची मंडळी सत्ता घेण्याच्या अजिबात विरुद्ध होती. तर दुसऱ्या विचाराची मंडळी

वेळ पडली तर सत्ता हातीं घ्यावयाला पाहिजे अशा मताची होती. ह्या दोन्ही पक्षांच्या विचारसरणींचा आणि युक्तिवादाचा समितीनें सांगोपांग विचार करून त्यामधून मोठ्या कौशल्यानें वाट बाहेर काढली ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. सर्वपक्षीय एकजूट कायम ठेवून संयुक्त महाराष्ट्र समितीच्या संयुक्त आघाडीवर (united platform) वरच आगामी निवडणुका लढवाव्यात हा निर्णय एकमतानें समितीनें घेतला. निरनिराळे पक्ष आपापल्या बलाबलाचा विचार करून जागांची वांटणी करतील. पण उमेदवार एकदां निश्चित ठरले म्हणजे मग त्यांची निवडणुक त्यांच्या पक्षातर्फे न लढवतां 'संयुक्त महाराष्ट्र समिती'च्या संयुक्त आघाडीवर लढवावयाची हें एकमतानें आतां निश्चित झालें.

मुंबई-बेळगांव-कारवार ह्यांसह संयुक्त महाराष्ट्र करणें ह्या एकाच ध्येयानें आगामी निवडणुका लढवावयाच्या आणि तमाम मराठी जनता ह्या ध्येयाच्या मागें उभी आहे हें मध्यवर्ती सरकारच्या निदर्शनाला आणून द्यावयाचें एवढा एकच कार्यक्रम मतदारांपुढें ठेवावयाचा असें ठरलें. अर्थात् निवडणुका जिंकून 'संयुक्त महाराष्ट्र समिती'ला बहुमत मिळाल्यानंतर मग ध्येयसिद्धीच्या दृष्टीनें पेचप्रसंग कसा घडवून आणावयाचा, राजिनामे द्यावयाचे का सत्तास्वीकार करावयाचा, हें त्या वेळच्या परि-स्थितीप्रमाणें मुक्रर करावयाचें असें ठरल्यामुळें उभय विचारप्रवाहाची उत्तम सांगड घातली गेली ह्यांत शंका नाहीं. अर्थात् समितीनें हा जो निर्णय घेतला तो सध्यां सूचनेच्या (proposal) स्वरूपांत आहे. तिला निरनिराळ्या पक्षांची मान्यता मिळाल्यानंतरच मग तिला ठरावाचें स्वरूप देण्यांत येईल. तथापि त्या कामीं आतां कोणत्याहि प्रकारची अडचण उत्पन्न न होतां समितीच्या ह्या योजनेला सर्व पक्षांकडून तत्काळ अनुमति मिळेल ह्याविषयीं आम्हांला मुतराम् शंका वाटत नाहीं!

आगामी निवडणुका 'संयुक्त आघाडी'च्या विद्यमानें एकजुटीनें लढवण्याचा 'संयुक्त महाराष्ट्र समिती'नें हा जो ऐतिहासिक निर्णय अकोला येथें घेतला, तो 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या इतिहासांत सुवर्णाक्षरानें लिहावा लागेल. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यांतलें सर्वांत मोठें आणि प्रभावी पाऊल महाराष्ट्रांतल्या सर्व राजकीय पक्षांनीं एकत्र मिळून टाकावयाचें ठरवून आजपर्यंत साऱ्या भारतांत जें कुठेंच घडलें नाहीं तें महाराष्ट्रांत घडवून आणलें आहे. ह्या 'संयुक्त आघाडी'-मध्यें शेतकरी-कामगार, प्रजासमाजवादी, लोहिया गटाचे समाजवादी, कम्युनिस्ट,

लाल निशाणवाले, मजदूर किसान, जनसंघ, हिंदु-महासभा आणि पक्षातीत विचाराचे पुढारी असे सर्व घटक दाखल झाले आहेत. एवढेंच नव्हे तर संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर काँग्रेसमधून फुटून बाहेर पडलेल्या संयुक्त महाराष्ट्रवादी काँग्रेसजनांनींहि ह्या आघाडींत येऊन मिळण्याचें आश्वासन दिलें आहे. ह्यापेक्षां आणखी काय हवें? 'संयुक्त महाराष्ट्र समिती'नें आगामी निवडणुकांसाठीं 'संयुक्त आघाडी' निर्माण करण्यांत हें जें अभूतपूर्व यश मिळविलें आहे त्याबद्दल तीन कोटी मराठी जनता तिच्यावर सहर्ष पुष्पवृष्टीच करील!

अकोल्याला घडून आलेल्या ह्या चमत्काराची बातमी कानांवर पडल्याबरोबर दिल्लीचे काँग्रेसश्रेष्ठी आणि महाराष्ट्रांतले काँग्रेसवाले एकदम बेशुद्धच पडले असतील अशी आमची खात्री आहे. अशा तऱ्हेची एकजूट महाराष्ट्रांतल्या भिन्न भिन्न राजकीय पक्षांमध्यें होणें कालत्रयीं अशक्य आहे अशा पैजा विदर्भ-नागपुरांतले आणि महाराष्ट्रांतले काँग्रेसवाले आपआपल्या 'काँग्रेस भुवनां'त मारीत बसले होते. त्यांचीं बुबुळें आणि बत्तिश्या ही एकजुटीची बातमी ऐकून वीतभर बाहेर आल्यावांचून राहणार नाहींत. अकोल्याला सर्वपक्षीय एकजूट अशा रीतीनें घडून येईल अशी कल्पनाहि कोणाला नव्हती. ह्या अनपेक्षितपणामुळें त्या यशाचा आनंद सर्व संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना अतिशय रोचक वाटेल ह्यांत शंका नाहीं. सर्वपक्षीयांची झालेली ही एकजूट किमान कार्यक्रमाच्या पायावर व्हावी असें व्यक्तिशः आम्हांलाहि वाटत होतें. निवडणुकांमध्यें उद्यांच्या महाराष्ट्राच्या उद्धाराचा विधायक कार्यक्रम ह्या संयुक्त आघाडीनें मतदारांपुढें मांडणें आवश्यक आहे असें अजूनहि आम्हांला वाटतें. पण केवळ तपशिलाच्या मुद्द्यावर एकजूट विसकटूं नये ह्या एका हेतूनें आम्ही आणि आमच्या मताच्या मंडळींनीं आग्रह धरला नाहीं.

संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर काँग्रेसचा पराभव करून तीन कोटी मराठी जनता संयुक्त आघाडीच्या मागें आहे असें भारत सरकारला दाखवणें हा देखील एक प्रचंड विधायक कार्यक्रम आहे. उद्यां पेचप्रसंग निर्माण करण्यासाठीं राजिनामे द्यायचे का सत्ता हातीं घ्यायची हें कांहींच आज ठरलेलें नाहीं. त्याबद्दल वाईट वाटून घेण्याचें किंवा निराश होण्याचें काय कारण आहे? उद्यां निवडणुकी जिंकल्यानंतर सत्ता हातीं घ्यावी असा जनतेनें कौल दिला तर विधायक कार्यक्रम तयार करावयाला कितीसा उशीर लागणार आहे? 'संयुक्त आघाडीं'तले प्रभावी डावे पक्ष हे पुरोगामी असल्यानें ते हातीं घेतील तो कार्यक्रम निश्चितपणें पुरोगामी असेल ह्याबद्दल

आजहि जनतेला शंका वाटण्याचें कारण नाहीं. पेचप्रसंग कसा घडवून आणावयाचा ह्याची रूपरेखा समितीनें मुळींच आंखलेली नाहीं. म्हणून असहकार आणि कर-बंदीच्या आत्यंतिक मार्गांचाच समिति अवलंब करील अशी कल्पना करून घेण्याचें आज मुळींच कारण नाहीं. निवडून आल्यानंतर राजिनामे द्यायचे कीं नाहीं हें जसें ठरलें नाहीं त्याप्रमाणें राजिनामे दिल्यानंतर पुढें काय करावयाचें हेंहि ठरलें नाहीं. तसेंच सत्ता हातीं घ्यावयाची कीं नाहीं हें जसें ठरलें नाहीं त्याप्रमाणें सत्ता हातीं घेतल्यानंतर किमान कार्यक्रम काय पुढें ठेवावयाचा हेंहि ठरलें नाहीं.

ह्यावर कोणी असें म्हणेल कीं हा पलायनवाद आहे. पण हा पलायनवाद नसून शुद्ध वास्तववाद आहे असें आम्ही सांगतों. ह्याचीं कारणें महाविदर्भांत जाऊन तेथील परिस्थिति पाहिल्यावांचून मात्र कळावयाचीं नाहींत. आज महाराष्ट्रांत कॉंग्रेसचें सपशेल दिवाळें वाजलेलें आहे ही गोष्ट खरी असली तरी महाविदर्भांत जनता पाऊणशें टक्के संयुक्तमहाराष्ट्रवादी असूनहि तेथें कॉंग्रेसचें सामर्थ्य अद्याप कमी झालेलें नाहीं ही गोष्ट विसरून चालतां यावयाचें नाहीं. महाराष्ट्रांत संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या प्रचंड आणि विराट् सभा भरतात, म्हणून आगामी निवडणुकांत कॉंग्रेसचा सर्वच विभागांत धुव्वा उडेल आणि आपण खात्रीनें यशस्वी होऊं अशा खोट्या भ्रमांत महाराष्ट्रांतल्या संयुक्तमहाराष्ट्रवादी पुढाऱ्यांनीं आणि कार्यकर्त्यांनीं राहूं नये असें आम्ही स्पष्टपणें सांगतों. महाविदर्भांत आणि मराठवाड्यांत आमचें अद्यापि कांहींच काम झालेलें नाहीं. आगामी निवडणुकींत संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या आणि कॉंग्रेसच्या बलाबलाचें आम्हीं केलेलें टिपणच पुढें मांडतो. सर्व महाराष्ट्रांत एकंदर मिळून २४० जागा आहेत.

| प्रदेश | संयुक्त आघाडी | कॉंग्रेस | एकंदर |
|---|---|---|---|
| महाराष्ट्र | ९६ | ३० | १२६ |
| महाविदर्भ | २० | ५२ | ७२ |
| मराठवाडा | २२ | २० | ४२ |
| | १३८ | १०२ | २४० |

‘संयुक्त आघाडी’च्या संख्येंत स्वतंत्र लोकांचाहि समावेश केलेला आहे. अशांची संख्या पंचवीस ते तीस होईल. ती वजा केली तर कॉंग्रेस आणि ‘संयुक्त आघाडी’ ह्यांच्यांत फारच थोडा फरक राहतो. तो फरक लक्ष्यांत घेतल्यानंतर

आणि स्वतंत्र उमेदवारांच्या प्रवृत्ति लक्ष्यांत घेतल्यानंतर सर्व महाराष्ट्रांत आपण कॉंग्रेसचा सपशेल धुव्वा उडवूं अशीं गाजरें मनांतल्या मनांत खात बसणें केवढें धोक्याचें आहे हें लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं.

कॉंग्रेस वर्किंग कमिटीपुढें मुंबई राज्याचे मुख्य मंत्री मोरारजी देसाई ह्यांनीं कॉंग्रेसच्या यशाचा पुढीलप्रमाणें अंदाज दिल्याची खात्रीलायक बातमी आम्हांला समजली आहे. ती अशी. महाराष्ट्र : ७५ आघाडी + ५१ कॉंग्रेस; महाविदर्भ : १४ आघाडी + ५८ कॉंग्रेस; मराठवाडा : १२ आघाडी + ३० कॉंग्रेस. म्हणजे कॉंग्रेसला सर्व मिळून १३९ आणि संयुक्त आघाडीला १०१ अशीं मतें पडून कॉंग्रेचाच्च विजय होईल अशी मोरारजींची खात्री आहे. ती अक्षरशः खरी मानण्याचें कारण नाहीं. पण त्याचा अर्थ हा कीं महाविदर्भ आणि मराठवाडा या प्रदेशांतील कॉंग्रेसच्या सामर्थ्यावर सर्व महाराष्ट्रांतल्या निवडणुका आपण जिंकूं असा कॉंग्रेसला अद्याप जबर विश्वास वाटतो. म्हणून 'किमान कार्यक्रमा'च्या मुद्द्यावर जोर देऊन 'संयुक्त आघाडी'च्या बळांत फूट पाडणें हें निवडणुकी जिंकण्याच्या दृष्टीनें भयंकर आत्मघातकीपणाचें आहे असा आम्हीं निष्कर्ष काढला.

काय वाटेल तें करून आज एकजूट कायम राखली पाहिजे आणि निवडणुका जिंकल्या पाहिजेत ह्या एकाच गोष्टीवर साऱ्या महाराष्ट्राचें लक्ष्य आणि सामर्थ्य यापुढें केंद्रीभूत केलें पाहिजे एवढेंच नव्हे तर संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याचा महाविदर्भाच्या रणांगणावरच निकाली निर्णय लागेल अशी आम्हीं अकोला-अमरावती येथें भरलेल्या प्रचंड सभेमध्यें घोषणा केली. म्हणून अकोला येथें 'संयुक्त महाराष्ट्र समिती' नें केवळ मुंबई-बेळगांवच्या प्रश्नावर 'संयुक्त आघाडी' बनवून एकजुटीनें लढण्याच्या केलेल्या निर्णयाचें आम्ही अंतःकरणपूर्वक स्वागत करतों. संयुक्त आघाडीच्या ह्या विजयी आणि वैभवशाली झेंड्याखालीं महाराष्ट्रांतील तीन कोटी जनता निर्धारानें आणि एकजुटीनें उभी राहील अशी आमची श्रद्धा आहे.

१५-७-५६

# जास्त हरामखोर कोण ?

जनताद्रोही काँग्रेसवाल्यांना उभ्या महाराष्ट्रांत आज कोठेंहि स्थान राहिलें नाहीं. जाहीरपणें सभा घेणें किंवा उघडपणें जनतेमधून वावरणें आज त्यांना संपूर्णपणें अशक्य झालें आहे. संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांनीं काबीज केलेलें 'महाराष्ट्राचें व्यासपीठ काँग्रेसवाल्यांसाठीं मुक्त करा' म्हणून शंकरदेव आपल्या चिटणिसांच्या खांद्यावर मान टाकून आक्रोश करीत आहेत. पण तें निव्वळ अरण्यरोदन ठरत आहे. आगामी निवडणुकीमध्यें नुसतें उभे राहणें सुद्धां काँग्रेसवाल्यांना अशक्य होईल. मग निवडणुका जिंकणें तर बाजूलाच, असें त्रिंबकमामा देवगिरीकर जें मागें म्हणाले, तें अक्षरशः खरें आहे. 'महाराष्ट्रामध्यें निवडणुका हरल्या तरी त्याची मला परवा नाहीं. निवडणुका गेल्या खड्ड्यांत!' असे पंडित नेहरूंनाहि हताश होऊन वैतागानें उद्गार काढावे लागले. महाराष्ट्रांत काँग्रेस अशी असहाय स्थिति झाली असूनहि, नव्या महाराष्ट्र राज्याचीं सत्तासूत्रें हातीं घेऊन त्या जोरावर आगामी निवडणुका जिंकण्याचें कारस्थान महाराष्ट्रांतल्या काँग्रेस मंत्र्यांनीं आणि नेत्यांनीं एव्हांपासून सुरू केलें आहे. ह्या काळ्या कारस्थानाचा कुजका नारळ ह्या महिन्यांत आठ तारखेला पोलिसांच्या कडेकोट बंदोबस्तांत सुकुरल्यात महाराष्ट्रद्रोही मंत्री यशवंतराव चव्हाण ह्यांनीं सातारा येथें फोडला.

सातारा जिल्ह्यांतील तीनचारशें काँग्रेस कार्यकर्त्यांची एक गुप्त सभा त्या दिवशीं बोलावण्यांत आली. आजूबाजूच्या दोन मैलांच्या परिसरांत पहाटेपासून पोलिसांचें प्रचंड सैन्यहि उभें करून ठेवण्यांत आलें. एवढेंच नव्हे तर काँग्रेसवाल्यांची चोरटी सभा निर्विघ्नपणें पार पडावी म्हणून पोलिसांनीं शहरांतील सोळा प्रमुख संयुक्तमहाराष्ट्रवादी पुढाऱ्यांना आणि कार्यकर्त्यांना आधींच पकडून ठेविलें. सत्तारूढ काँग्रेसपक्षानें आपल्या विरोधकांची मुस्कटदाबी करण्यासाठीं पोलिसांचा उपयोग करण्याचा नवा उपक्रम सुरू केला आहे ह्याकडे जनतेचें आम्ही मुद्दाम लक्ष वेधतों. अशा रीतीनें साताऱ्यांतील संयुक्तमहाराष्ट्रवादी

जनतेची सर्व बाजूंनीं नाकेबंदी करून भरलेल्या कॉंग्रेसवाल्यांच्या ह्या पडदानशीन बैठकींत यशवंतराव चव्हाण केवढ्या वीरश्रीनें आणि आत्मविश्वासानें गरजले असले पाहिजेत ह्याची कोणालाहि कल्पना येईल. सांगलीच्या सभेनंतर जवळ जवळ सातआठ महिने यशवंतरावांच्या तोंडाला कुलूपच लागून राहिलें होतें. मध्यंतरीं पुण्याच्या शिवाजी आखाड्यांत हें कुलूप उघडण्याचा त्यांनीं थोडासा प्रयत्न केला. पण काळ्या निशाणवाल्यांनीं आणि पादत्राणवाल्यांनीं त्यांचा हा प्रयत्न यशस्वी होऊं दिला नाहीं. म्हणून साताऱ्याच्या ह्या बंदिस्त सभेंत इतके दिवस डोक्यांत साठून राहिलेली सारी घाण यशवंतरावांनीं आपल्या भाषणांत ओकून टाकली.

ते म्हणाले, "आज आमचा पराभव झाला हें खरें. पण ह्या पराभवांतून विजयाकडे कसे जाऊं ह्याचा विचार करतांना पक्षाच्या मूलभूत राजकीय तत्त्वांकडे जावें लागतें. आपली तात्त्विक भूमिका घट्ट हवी. आपली भारतीय निष्ठा कोठें विसंगत होणार नाहीं, पक्षाची निष्ठा ढळणार नाहीं आणि शांततेच्या मार्गापासून आपण चळणार नाहीं, ह्या माझ्या तीन मर्यादा आहेत. आईशीं भांडण्याचा आपला हक्क बजावा. पण एकदां आईनें सांगितलें कीं हा मार्ग आहे, म्हणजे त्यावेळीं तिचें ऐकलेंच पाहिजे. तिचें दूध मागतांना तिच्या अंगांतून रक्त येत नाहीं ना एवढें पाहणें जरूर आहे. आज सर्वत्र लढा, बंड आणि असहकाराची हवा सुटली आहे. पण कसल्याहि तऱ्हेच्या असहकाराची कल्पना चुकीची आहे. दिल्लीशीं दोन हात करण्याची भाषा बोलली जात आहे. पण कोण दिल्लीपति आणि कोण महाराष्ट्र? भलत्या लढाऊ गोष्टी बोलून लोकांना फसवत जाऊं नका. लोक शहाणे झाले आहेत. कॉंग्रेसपेक्षां देश मोठा आहे ही माझी भूमिका आहे. मी निवडणुकीमध्यें मतें मिळवण्याचा विचार करीत नाहीं. उद्यां एस्. एम्. किंवा दुर्दैवानें अत्रे सुद्धां निवडले गेले, तर मी म्हणेन जनतेला ते हवे होते. पण मला माझा पक्ष टिकवायचा आहे. म्हणजे तत्त्व, मार्ग, पद्धति ही टिकवायची आहे. संयुक्त महाराष्ट्रासाठीं मी रक्ताची मागणी करणार नाहीं. रक्ताऐवजीं घाम सांडण्याची तयारी ठेवा. संयुक्त महाराष्ट्राचें राज्य नेकीनें आणि कुशलतेनें चालवून यशस्वी करणें हाच मुंबई मिळविण्याचा मार्ग आहे असें माझें मत आहे. मग जें मिळालें तें अपूर्ण असलें तरी हरकत नाहीं. ज्या मुंबईवर महाराष्ट्र अवलंबून आहे त्याच मुंबईवर साऱ्या देशाचें जीवन अवलंबून आहे. म्हणून, सत्याग्रह किंवा

काळीं निशाणें दाखविलीं तर मुंबई तुम्हांला देण्याचें सामर्थ्य ज्यांच्या हातीं आहे ते मुंबई तुम्हांला त्रिवार देणार नाहींत. राज्यकर्ते लवचिक असूं शकत नाहींत. मुंबईच्या प्रश्नाचा दूरवर विचार केला पाहिजे. भौगोलिक दृष्ट्या मुंबई महाराष्ट्राची आहे हें मान्य होण्यांत आपल्या मागणीची न्याय्यता मान्य झाली आहे. तेव्हां ती मिळेल ह्यांत शंका नाहीं. काळ वेळ लागेल पण मिळेल. योग्य मार्गानेंच जाऊन ती मिळवूं. अत्रे-कोठारींना आज सत्तास्वीकार करण्याची घाई झाली आहे. कारण त्यांना कम्युनिस्टांची पाठराखण आहे. कम्युनिस्टांना एक प्रांताची सत्ता घेऊन केंद्रीय सरकारांत पोकळी निर्माण करावयाची आहे. माझे विरोधक मला शिव्याशाप देतात. त्याचें मला वाईट वाटत नाहीं. संवयच झाली आहे. पण ज्या मराठी भाषेला राजसिंहासनावर बसविण्यासाठीं आपण भाषिक प्रांत मागतों, त्या भाषेला कोणत्या गलिच्छ आणि घाण शब्दांचें लेणें आम्ही चढवतों ह्याचा विरोधकांनीं विचार करावा. मीं निश्चय केला आहे कीं शिवीला उत्तर द्यावयाचें नाहीं. सातारा जिल्ह्यांतील कार्यकर्त्यांनीं आतां खंबीर मनें करावींत. दुसरे मोर्चा काढूं लागले कीं गडबडूं नये. त्या मोर्च्यांना एकदां जरूर तोंड देऊन जनतेपुढें ठाम भूमिकेनें जावयाचें आहे. आईचें दूध मागतांना तिला दूध येतें आहे का तिचें रक्त निघतें आहे, हें पाहा. मी तर म्हणतों, त्या आईला थोडें प्रथम रक्त द्या. मध्यवर्ती सरकारशीं राष्ट्रीयत्वाच्या वाढत्या भावनेनें आम्हीं निगडित राहिलों तर सर्व प्रश्न सुटतील. नव्या महाराष्ट्राचें काम नेकीनें (integrity) केलें, कुशलतेनें केलें तर मुंबई मिळेल. लोकांनीं मला मतें दिलीं तर असेंब्लींत बसेन. न दिलीं तर निदान सेवेचा अधिकार तर कोणी काढून घेत नाहीं? काँग्रेसची शक्ति कमी झाली आहे हें मला मान्य नाहीं. लोकसभेचा निर्णय आम्ही मान्य करूं. त्यानंतर येत्या निवडणुकींत काँग्रेस सरकारच अधिकारावर येणार असा मला विश्वास आहे. कारण मी लोकांवर विश्वास ठेवतों. मुंबई मागण्याचा आमचा हक्क आम्हीं कधीं गमावला नाहीं. अजूनहि तें आमचें ध्येय आहे."

भारताशीं अव्यभिचारी निष्ठा बाळगणारे, काँग्रेसशीं इमान पाळणारे, तत्त्वासाठीं झगडणारे आणि जनसेवेकरितां तळमळणारे आपण एक अत्यंत प्रामाणिक, सुसंस्कृत आणि शांततावादी कार्यकर्ते आहोंत--पुढारी सुद्धां नव्हेत--असा यशवंतरावांनीं आपल्या भाषणांत जो आव आणला आहे, त्यानें त्यांच्या सातारी टोळींतील त्यांचे साथीदार आणि अनुयायी गुंड फार झालें तर फसतील. पण महाराष्ट्रांतली तीन

कोटी जनता मात्र कदापि फसणार नाहीं हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. सबंध भाषणांत त्यांनीं आपल्या भारतनिष्ठेचा आणि काँग्रेसनिष्ठेचा उदोउदो केलेला आहे. पण संयुक्तमहाराष्ट्राच्या निष्ठेचा अक्षरानें सुद्धां त्यांनीं कुठें त्यांत उल्लेख केलेला नाहीं. हें महाराष्ट्रीय जनतेनें लक्षांत ठेवावें. आपण महाराष्ट्रनिष्ठ आहोंत असें म्हणण्याची त्यांना लाज वाटत आहे. कारण, त्यामुळें त्यांच्या भारतीय निष्ठेला काळिमा फासला जातो असें त्यांना भय वाटत असावें असें दिसतें. एवढ्यासाठींच तीन कोटी मराठी जनतेपेक्षां नेहरू मोठे आहेत ही महाराष्ट्रद्रोही घोषणा त्यांनीं फलटणच्या मनमोहन राजवाड्यामधून मागें करून ठेवलेली आहे. ज्या आपल्या भारतनिष्ठेचे दिवे यशवंतराव आपल्या तोंडाभोंवतीं ओवाळून घेत आहेत, ती त्यांची भारतनिष्ठा म्हणजे दुसरी तिसरी कांहीं नसून केवळ नेहरूनिष्ठा हीच होय हें त्यांच्या त्या फलटणी घोषणेंत त्यांनीं स्पष्ट केलें आहे.

काँग्रेसपेक्षां देश मोठा आहे आणि निवडणुकींमध्यें आपल्याला मतांची बिलकुल परवा नाहीं, अपेशी झालों तरी आपण जनसेवा करूं असें ते ज्या तोंडानें म्हणतात, त्याच तोंडानें ते पक्ष टिकवण्याची भाषा बोलतात आणि 'आईला आधीं थोडेंसें रक्त द्या' असें सांगतात. आई म्हणजे काँग्रेस. संयुक्त महाराष्ट्रासाठीं रक्त सांडूं नका, फक्त घाम सांडा, असे ते निश्चितपणें सांगतात. पण काँग्रेस आईला मात्र आपलें रक्त द्या असें ते ठासून सांगतात. सांगलीच्या भाषणांत त्यांनीं भावाचें रूपक घेतलें होतें. ह्या भाषणांत त्यांनीं आईचें रूपक वापरलें आहे. ते म्हणतात, काँग्रेस आईशीं तुम्ही खुशाल भांडा पण तिनें एकदां अमुक अमुक करा असें सांगितल्यावर मग मात्र तिचें ऐकलेंच पाहिजे. काँग्रेस आईचें दूध मागा पाहिजे तर. पण तें मागतांना तिच्या अंगांतून रक्त न येईल ह्याची काळजी घ्या. काँग्रेस यशवंतरावांची आई असेल. कारण त्यांच्या सर्व दोषांवर आणि भानगडींवर पांघरूण घालून त्यांना गेलीं कित्येक वर्षें ती यथेच्छ खाऊं पिऊं घालते आहे. म्हणूनच ते एवढे 'माजले' आहेत. त्यांनीं आपलें रक्त पाहिजे तर काँग्रेस आईला द्यावें. पण महाराष्ट्रांतील जनता मात्र काँग्रेसला आई मानावयास तयार नाहीं हें यशवंतरावांनीं लक्षांत ठेवावें.

कशी मानणार? तीन कोटी मुलांच्या आक्रोशाकडे जी दुर्लक्ष करते, एवढेंच नव्हे तर त्यांच्यावर गोळीबार करून त्यांपैकीं कित्येकांना जी ठार मारते, कांहींना जी तुरुंगांत घालून त्यांचा अमानुष छळ करते, आपल्या लक्षावधि पुत्रांना जी

घराबाहेर हाकलून देते ती काँग्रेस हडळ महाराष्ट्राची आई कशी ? आपल्या ढोंगी वात्सल्यानें महाराष्ट्राला फसवणारी आणि नेहरू-निर्णयाचा जहरी पान्हा त्याला पाजून ठार मारणारी काँग्रेस ही पुतनामावशी आहे पुतनामावशी! लढ्याची, बंडाची, असहकाराची किंवा दिल्लीशीं दोन हात करण्याची सर्व भाषा चुकीची असून तिनें लोक फसणार नाहींत, कारण 'लोक आतां शहाणे झाले आहेत' असा यशवंतरावांनीं मोठा विनोदी युक्तिवाद केला आहे. महाराष्ट्रांत पंचेचाळीस हजार लोकांनीं सत्याग्रह केला आहे. पुढल्या आठवड्यांत एक हजार लोक दिल्लीला जाऊन सत्याग्रहाचा संग्राम दिल्लीमध्यें करणार आहेत. असें असतां 'लढ्याच्या भाषेनें लोक फसणार नाहींत. लोक आतां शहाणे झाले आहेत' असें जे यशवंतराव बेधडकपणें म्हणताहेत तें कोणत्या लोकांना उद्देशून ? महाराष्ट्रांतले यच्चयावत् लोक हातांत जोडे आणि काळीं निशाणें घेऊन यशवंतरावांच्या मागें धावत असतां आपण 'लोकांचे' 'प्रतिनिधि' आहांत, असा अजूनहि यशवंतराव आव आणताहेत यावरून ते किती पट्टीचे बेशरम आणि कोडगे आहेत हें दिसून येतें.

सत्याग्रह केल्यानें किंवा काळीं निशाणें दाखविल्यानें राज्यकर्ते तुम्हांला नमणार नाहींत किंवा 'त्रिवार' मुंबई देणार नाहींत अशी यशवंतरावांनीं आपल्या भाषणांत जी धमकी दिली आहे ती नेहरूंच्याच भाषणाची नक्कल आहे. भौगोलिक दृष्ट्या मुंबई महाराष्ट्राची आहे हें नेहरूंनीं मान्य केलें एवढ्या एका गोष्टीवरच लोकांनीं बेहद्द खूष व्हावें असें यशवंतरावांचें सांगणें आहे. ते म्हणतात, 'काळ वेळ लागेल पण मुंबई आतां नक्की मिळणार!' असल्या पोकळ आणि बाष्कळ थापेबाजीनें फसण्याइतकी महाराष्ट्रांतली जनता आतां दूधखुळी राहिली नाहीं. तिला मुंबई आज 'रोख' पाहिजे आहे. असल्या 'उधारी'च्या गप्पा ऐकायला ती तयार नाहीं. मुंबई मिळवण्याचा योग्य मार्ग म्हणजे नव्या महाराष्ट्राचें राज्य 'नेकीनें आणि कुशलतेनें' चालवणें हा होय असें जें यशवंतरावांनीं 'मार्गदर्शन' केलें आहे तें पाहून तर आम्ही सर्दच झालों. म्हणजे महाराष्ट्रीय जनतेचा राजरोसपणें विश्वासघात करून ज्यांनीं महाराष्ट्राचें मस्तक आणि पाय नेहरूंकडून कापविले, त्यांनींच संभावितपणें पुन्हा उलट सांगावें कीं 'कापलेल्या महाराष्ट्राचा कारभार नेकीनें आणि कुशलतेनें चालवला म्हणजे मुंबई परत मिळेल!' यावरून यशवंतराव हा किती ढोंगी आणि उलट्या काळजाचा माणूस आहे हें सिद्ध होतें.

'शांततेच्या मार्गावर आपली अढळ निष्ठा आहे' ही घोषणासुद्धां यशवंतरावांच्या ह्याच स्वभाववैशिष्ट्याची निदर्शक आहे. यशवंतराव हे शांततेचे केवढे कट्टर उपासक आहेत ह्याची साक्ष उत्तर साताऱ्यामधला प्रत्येक कॉंग्रेस गुंड आज देऊं शकेल ! मुंबई मागण्याचा आमचा हक्क आम्हीं कधीं गमावला नाहीं, किंवा कॉंग्रेसची महाराष्ट्रांतली शक्ति कमी झाली आहे हें खोटें असून येत्या निवडणुकीमध्यें महाराष्ट्रांत कॉंग्रेसच विजयी होईल ह्या यशवंतरावांच्या कुडमुड्या आणि शेंदाड भविष्यानें त्यांच्या उत्तर साताऱ्यांतल्या उडाणटप्पू साथीदारांचें सुद्धां समाधान होणार नाहीं. जोडे खाणाऱ्या माणसानें "मला मारल्यानें तुमचे जोडेच फाटतील आणि तुम्हांला अनवाणी चालावें लागेल !" असें म्हणण्यासारखेंच हें आहे !

त्यानंतर बरोबर एका आठवड्यानें भाऊसाहेब हिरे ह्यांनीं नाशिक येथें कॉंग्रेसवाल्यांची अशीच एक पडदानशीन सभा घेतली. त्या वेळीं देखील त्यांनीं साताऱ्याप्रमाणेंच नाशकामधील पंधरा-सोळा संयुक्तमहाराष्ट्रवादी पुढाऱ्यांना आणि कार्यकर्त्यांना पोलिसांकडून पकडविलें आणि आपल्या चोरट्या बैठकीचें वातावरण निर्विघ्न केलें. गेल्या दहा महिन्यांत भाऊसाहेब हिऱ्यांनीं एकहि जाहीर भाषण केलें नव्हतें, पत्रकहि काढलें नव्हतें किंवा पत्रकारांना एकादी मुलाखतहि दिली नव्हती. ह्या कालावधींत महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेसच्या दोन बैठकींत त्यांनीं फक्त भाषणें केलीं. त्यांचीं त्रोटक प्रतिवृत्तें वृत्तपत्रांत जीं कांहीं प्रसिद्ध झालीं असतील तेवढ्यावरूनच त्यांची भूमिका जनतेला काय थोडीफार कळली असेल ती कळली असेल. तथापि, भाऊसाहेबांनीं आपल्या ह्या अबोल वर्तनानें आपल्याभोंवतीं जें एक रहस्यमय वातावरण निर्माण करून ठेवलें होतें, त्यामुळें लोकांची अशी एक चमत्कारिक समजूत होऊन बसली होती कीं भाऊसाहेब हिरे आज ना उद्यां आपल्या मंत्रिपदाचा राजिनामा देऊन बाहेर पडणार. यशवंतराव चव्हाणांनीं मात्र आपल्या बाबतींत असा जनतेचा गैरसमज होऊं दिला नाहीं. पण कांहीं खुद्द झालें कीं भाऊसाहेब हिरे आतां राजिनामा देणार असें महाराष्ट्रांतल्या भोळ्याभाबड्या जनतेला एकसारखें वाटे.

अगदीं परवा-परवाची गोष्ट घ्या ना. नेहरूनिर्णयानंतर महाराष्ट्र कॉंग्रेसची जी बैठक झाली तिच्यांत भाऊसाहेब हिरे ह्यांचा 'जनतेला कॉंग्रेसची भूमिका समजावून सांगण्यासाठीं ज्यांना आवश्यक वाटेल त्यांनीं आपल्या अधिकारपदाचा राजिनामा द्यावा' असा ठराव मंजूर झाला. त्यानंतर राजिनामे देण्याची परवानगी

विचारावयाला हिरे आणि कुंटे दिल्लीला गेले. कुंट्यांनीं सांगितलें कीं 'आज ना उद्यां आपण राजिनामे देऊं!' पण भाऊसाहेब काय करणार ह्याचा कोणाला पत्ता लागेना. पुष्कळांना वाटत होतें कीं ते राजिनामा देणार. ह्या सर्व रहस्याचा स्फोट अखेर नाशिकच्या ह्या गुप्त सभेंत भाऊसाहेब हिरे ह्यांनीं केला आणि एकदांचें सांगून टाकलें कीं, "मी माझ्या अधिकारपदाचा किंवा काँग्रेसच्या सभासदत्वाचा राजिनामा कधींहि देणार नाहीं!" मराठी जनतेची अशा तऱ्हेनें संशयनिवृत्ति करून मानसिक यातनांमधून तिची सुटका केल्याबद्दल भाऊसाहेबांचे आम्ही आभार मानतों.

भाऊसाहेब आपल्या भाषणांत म्हणाले, "महाराष्ट्रांत आज काँग्रेसचे जे पुढारी आहेत त्यांच्यामध्यें दुर्दैवानें अखिल भारतीय कीर्तीचा पुढारी कोणी नाहीं. त्यामुळें मुंबईसंबंधींची आमची योजना काँग्रेस वरिष्ठांना मान्य झाली नाहीं. केंद्रशासित मुंबईची सूचना आम्हीं केली आणि मुंबई हातची घालविली असा आमच्या नांवानें गैरसमज करण्यांत येत आहे. पण मुंबई फक्त दोन वर्षें केंद्रशासित ठेवावी, ह्या दोन वर्षांच्या काळानंतर ती आपोआप महाराष्ट्रांत विलीन करण्यांत यावी, आणि या अवधींत महाराष्ट्राची राजधानी केंद्रशासित मुंबईतच राहावी असें आम्हीं सुचविलें होतें. ह्या आमच्या योजनेंतील दोन गोष्टी नाकारून फक्त पहिलीच--- आणि ती देखील पूर्णपणें नव्हे---स्वीकारण्यांत आली. आपण मुंबई मिळवूं शकलों नाहीं ह्याबद्दल आपणांस दुःख तर होत आहे. पण विदर्भ महाराष्ट्रापासून वेगळा होणार होता तो तसें आम्ही होऊं न देतां महाराष्ट्रांत आणला कीं नाहीं? त्यासाठीं आम्हांला केवढे प्रयास पडले! महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसनें हा फार मोठा टप्पा गांठला. विदर्भ महाराष्ट्रांत आला म्हणून मुंबई महाराष्ट्रांत आणण्याबद्दलचे आमचे प्रयत्न आम्हीं मुळींच थांबविले नाहींत. मुंबई ही महाराष्ट्राची आहे ही गोष्ट पंडितजींना पटविणें आमच्यासारख्या छोट्या पुढाऱ्यांना फार कठिण गेलें. पण भौगोलिक दृष्ट्या मुंबई महाराष्ट्राचा भाग आहे व ती महाराष्ट्रांत पुढेंमागें सामील होऊं शकेल ही गोष्ट पंडित नेहरूंनीं अखेर मान्य केली. ही पंडितजींची मान्यता काय कमी महत्त्वाची आहे? महाराष्ट्र काँग्रेसच्या या विजयाची छाननी केली म्हणजे तिची भूमिका प्रारंभापासून कशी सुसंगत आणि खंबीर आहे हें आपल्याला कळून येईल. गेलीं सात–आठ वर्षें आम्ही 'संयुक्त महाराष्ट्र परिषदे' मार्फत ही चळवळ चालवीत होतों. ह्या काळांत आमचे आजचे

विरोधक परिषदेच्या कचेरीची पायरीदेखील चढले नाहींत. मुंबईचा आग्रह आम्हीं सोडलेला नाहीं—आणि सोडणारहि नाहीं. पण आमचा मार्ग आमच्या विरोधकांपेक्षां वेगळा आहे. लोकशाहीच्या, शांततेच्या आणि हृदयपरिवर्तनाच्या मार्गानें आम्ही मुंबई मिळवूं इच्छितों. मुंबई गेल्याबद्दल आम्हांला जें दुःख झालें, तें व्यक्त करण्यासाठीं आम्ही अधिकाराचा त्याग करतों असा आम्हीं ठराव पास केला. पण त्याचा आमच्या प्रतिपक्षांनीं आणि सहकाऱ्यांनीं भलताच विपर्यास केला. ते म्हणाले, 'काँग्रेसश्रेष्ठींविरुद्ध आम्हीं लढाऊ भाषा वापरली !' छे, छे, असें आम्ही कसें करूं ? काँग्रेस संघटनेची चौकट मोडून तोडून कांहींहि करण्याचा कधींहि आमचा उद्देश नव्हता. पुण्यास तो ठराव केल्यानंतर आम्ही ढेबर आणि पंत ह्यांना भेटलों. त्यांनीं माझ्या भावना समजावून घेतल्या. ते म्हणाले, 'हिरे, तुम्हीं राजिनामा दिला तर लोक तुमचें स्वागत करतील ही तुमची कल्पना चुकीची आहे !' इतर राज्यांतलीं उदाहरणें त्यांनीं मला सांगितलीं. तेव्हां माझी खात्री पटली. विलायतेला जाण्यापूर्वीं नेहरूंनीं रामलीला मैदानावर जें कळकळीचें भाषण केलें त्याचाहि माझ्या मनावर परिणाम झाला. त्यांचा अनुभव आणि सल्ला ह्यांच्याकडे दुर्लक्ष करून मीं राजिनामा दिला असता, तर वैयक्तिक दृष्ट्या कदाचित् ती माझी कृति शौर्याची ठरली असती. पण काँग्रेस संघटना माझ्या राजिनाम्यानें दुबळी झाली असती. म्हणून माझें सारें दुःख मीं गिळलें आणि राजिनाम्याचा विचार सोडून दिला. लोकसभेंत बिलाला मंजुरी मिळेतोंपर्यंत आम्हीं रागवावें, रुसावें, भांडावें आणि उद्दिष्ट साध्य करावें ही माझी भूमिका होती. पण कांहींना आपल्या नेहरूनिष्ठेचें प्रदर्शन करण्याची उतावीळ झाली होती. आपली नेहरूनिष्ठा बावनकशी आणि आमची नेहरूनिष्ठा हिणकस असा आभास ते निर्माण करूं लागले. ह्या दुहीच्या प्रदर्शनानें आमचें मोठें नुकसान झालें. आमची झाकली मूठ उघडी पडली. आम्ही एकोप्यानें मागत राहिलों असतों तर आमचें उद्दिष्ट बहुधा साध्य झालें असतें. माझ्या नेहरूनिष्ठेबद्दल मी एवढेंच सांगतों कीं नेहरू-निष्ठा ही केवळ तोंडानें बोलून दाखविण्याची गोष्ट नाहीं. नेहरूनिष्ठा ही बाजारांतील विक्रीची वस्तु (Marketable commodity) नाहीं. मी माझ्या निष्ठेचें बाजारी प्रदर्शन करणार नाहीं. आजचा हिंदुस्थान नेहरूंमुळें आहे. उद्यांचा हिंदुस्थानहि नेहरूंमुळें निर्माण होणार आहे ह्याबद्दल आमच्या मनांत तिळमात्र संदेह नाहीं. माझ्या मनांत काँग्रेस सोडावी असें कधींच नव्हतें. काँग्रेसचा प्रपंच आम्हांला

चालवावयाचा आहे. उद्यांचें महाराष्ट्राचें राज्य आम्हांला चालवावयाचें आहे. आमची मागणी मान्य करून घेण्यासाठीं आम्हांला शक्ति संपादन करावयाची आहे. म्हणून आम्हीं काँग्रेसजनांनीं एकजुटीनें जनतेपुढें गेलें पाहिजे. प्रत्येक तालुक्यांत चर्चा, अभ्यासमंडळें आणि जाहीर सभा ह्यांद्वारें आपली भूमिका लोकांना समजावून सांगितली पाहिजे. काँग्रेस संघटना महाराष्ट्रांतून नामशेष करण्याचा आज जो प्रयत्न चालू आहे त्यावर मात करण्यासाठीं आम्हीं झटलें पाहिजे. मुंबई सरकारनें गोळीबार केला त्याबद्दल टीका करण्यांत येते. पण जो गोळीबार करण्यांत आला तो अपरिहार्यच होता. After all Government has to rule !"

हें भाषण करून रात्रौ भाऊसाहेब हिरे आपल्या गांवीं म्हणजे मालेगांवीं गेले तेव्हां दोन हजार संयुक्तमहाराष्ट्रवादी लोकांनीं काळीं निशाणें घेऊन घराला गराडा घातला आणि त्यांच्या राजिनाम्याची मागणी केली. भाऊसाहेब घरांत लपूनच बसले. मग पोलिसांनीं कित्येक कार्यकर्त्यांची धरपकड करून जमाव हटवला. पोलीस बंदोबस्तांत यशवंतराव चव्हाणांनीं साताऱ्यांत केलेलें भाषण आणि भाऊसाहेब हिऱ्यांनीं नाशकाला केलेलें भाषण ह्या दोहोंची तुलना करून त्या दोघांपैकीं अधिक ढोंगी, लुच्चा आणि महाराष्ट्रद्रोही कोण हें ठरविणें फार कठिण पडेल. कोण अधिक नेहरूनिष्ठ आणि कोण जास्त काँग्रेसनिष्ठ ह्यांची दोघांमध्यें जणुं कांहीं चढाओढ आणि चुरसच लागून राहिलेली आहे असें वाटतें. मुंबई महाराष्ट्रामधून गेल्याबद्दल आपल्याला अत्यंत दुःख वाटतें असें दोघेहि सारख्याच व्याकुळ स्वरामध्यें सांगतात. पण मुंबई ही भौगोलिक दृष्टया महाराष्ट्राची आहे असें पंडित नेहरूंना आपण कबूल करावयाला लावलें हा आपला केवढा विजय आहे असें दोघेहि हर्षभरानें सांगतात. त्यामुळें आज ना उद्यां मुंबई महाराष्ट्रांत आल्यावांचून राहणार नाहीं असें दोघेहि आपल्या छातीवर हात मारून सांगतात. पण मुंबई जर महाराष्ट्राला पुन्हा मिळावयाची असेल तर हे प्रयत्न काँग्रेस संघटनेच्या चौकटीमध्यें राहूनच करावे लागतील ह्याबद्दल उभयतांची एकवाक्यता आहे.

चव्हाण म्हणतात कीं, "नवें महाराष्ट्र राज्य आपण नेकीनें आणि कौशल्यानें चालवावयाला हवें म्हणजे मुंबई आपल्याला मिळेल." तर हिरे म्हणतात, "नवें महाराष्ट्र-राज्य चालवण्याची जबाबदारी आपण पत्करली पाहिजे आणि आपली मागणी मान्य करून घेण्यासाठीं आपण शक्ति संपादन केली पाहिजे आणि लोकमत पाठीशीं घेतलें पाहिजे." काँग्रेस सोडण्याची, सत्याग्रह किंवा असहकार

करण्याची लढाऊ भाषा दोघांनाहि बिलकूल मंजूर नाहीं. आपली भूमिका लोकांना समजावून सांगण्यासाठीं विरोधकांच्या काळ्या निशाणांना न भितां धैर्यानें यापुढें बाहेर पडलें पाहिजे असा दोघांचाहि निर्धार आहे! अर्थात् पोलिसांची मदत घेतल्यावांचून जनतेच्या गळ्यांत आपली 'घांट' बांधण्यासाठीं कॉंग्रेसचे मूषक कसे बाहेर पडतात तें पाहण्यासारखें आहे. ह्याव्यतिरिक्त हिरे ह्यांनीं आपल्या भाषणांत जे कांहीं निराळे मुद्दे मांडले ते असे. मुंबई केंद्रशासित करण्याची कल्पना आपण नेहरूंना सुचविली आणि मुंबई महाराष्ट्रांतून घालविली ह्या आरोपाला उत्तर देतांना ते म्हणतात कीं, आम्हीं नेहरूंना त्याबाबत जें सुचविलें होतें, तें सर्वच्या सर्व त्यांनीं मान्य केलें नाहीं, अर्धवट केलें, म्हणून आमच्याबद्दल हा गैरसमज निर्माण झाला.

हिऱ्यांचें म्हणणें कबूल करून सुद्धां आम्ही त्यांना असें विचारतों कीं, "महाराष्ट्रांतल्या जनतेला न विचारतां, दोन वर्षें का होईना, पण मुंबई केंद्रशासित करण्याची ही योजना नेहरूंपुढें चोरून मांडण्याचा चोंबडेपणा करावयाला तुम्हांला कोणीं सांगितलें होतें? त्याखेरीज मुंबई पुन्हा महाराष्ट्रांत कशी आणि केव्हां समाविष्ट करावयाची ह्याचे सर्वाधिकार तुम्हीं नेहरूंना देऊन ठेवले होते ना? मग आतां नेहरूंच्या नांवानें कां शंख करतां? नेहरूंना म्हणे आम्ही दोनच विषाचे थेंब पाजावयाला सांगितले होते, ते त्यांनीं आम्हांला पांच थेंब पाजले. ही तक्रार आतां करण्यांत काय अर्थ? आमचा तुम्हांला सवाल हा आहे कीं नेहरूंच्या हातीं तुम्हीं हें विष आधीं दिलेंच मुळीं कां? तुम्ही संयुक्त महाराष्ट्राचा विश्वासघात केला म्हणून तें राजकारण 'संयुक्त महाराष्ट्र समिती'ला हातीं घेऊन आज लढवावें लागतें आहे. राजिनामा देण्यासाठीं आपण पंत-ढेबरकडे कसे गेलों, त्यांनीं आपली केवढ्या कष्टानें समजूत घातली, मग नेहरूंच्या भाषणाचा आपल्या मनावर कसा परिणाम झाला अन् अखेर शेवटीं मुंबई गेल्याबद्दलचें आपलें अपरिमित दुःख आपणास तसेंच गिळून टाकून राजिनामा देण्याचा विचार कसा सोडून द्यावा लागला ह्याचें भाऊसाहेब हिरे ह्यांनीं जें सद्‌गदित कंठानें आणि अश्रुपूर्ण नेत्रांनीं आपल्या भाषणांत वर्णन केलें, तें वाचल्यानंतर भाऊसाहेब हिरे हा एक बुद्दू आणि बेवकूफ विदूषक आहे ह्याबद्दल मात्र सर्वांची खात्री होईल.

तथापि, अधिक नेहरूनिष्ठ कोण ह्याबद्दल यशवंतराव चव्हाणांशीं झालेल्या

आपल्या भांडणाचा त्यांनीं जो उल्लेख केला तो वाचून मात्र हसतां हसतां आमची पुरेवाट झाली. हिऱ्यांचें म्हणणें असें कीं त्यांनीं आणि चव्हाणांनीं मिळून नेहरूंच्या समोर जायचें, त्यांच्याशीं खोटें खोटें भांडायचें, रागवायचें न् रुसायचें. म्हणजे नेहरूंनीं त्यांचें म्हणणें चटकन् मान्य केलें असतें. पण चव्हाणांना आपल्या नेहरूनिष्ठेचें प्रदर्शन करण्याची घाई झाली होती, नेहरू जें देतील तें एकदम मान्य करण्याची तयारी त्यांनीं दाखविली, त्यामुळें हिऱ्यांचा राजिनामा उघडा पडला. त्यांची नेहरूनिष्ठा हिणकस ठरली आणि चव्हाणांची नेहरूनिष्ठा बावनकशी ठरली. ह्या एका गोष्टीचें भाऊसाहेब हिऱ्यांना सर्वांत जास्त दुःख होत आहे असें त्यांच्या भाषणावरून दिसून येतें. म्हणून कॉंग्रेसश्रेष्ठींशीं लढण्यासाठीं राजिनामा देण्याची आपली भूमिका मुळींच नव्हती असें भाऊसाहेबांना जीव तोडून आतां सांगावें लागत आहे. एवढेंच नव्हे तर चव्हाणांपेक्षां आपली नेहरूनिष्ठा कांकणभरहि कमी नाहीं ह्याचा त्यांना जाहीरपणें निर्वाळा द्यावा लागला. चव्हाण म्हणाले कीं 'महाराष्ट्रापेक्षां नेहरू मोठे आहेत!' तर हिरे त्यांच्यापुढें दहा पावलें जाऊन म्हणाले कीं, "आजचा हिंदुस्थान नेहरूंमुळें आहे आणि उद्यांचा हिंदुस्थान नेहरूंमुळेंच निर्माण होणार आहे."

वाहवा! वाहवा! नेहरूभक्तीचें केवढें हें हृदयस्पर्शी आणि रोमांचकारी प्रदर्शन! धन्य चव्हाण अन् धन्य हिरे! उद्यां हिऱ्यावर मात करण्यासाठीं चव्हाण अशीहि घोषणा करतील कीं "चंद्रसूर्य पृथ्वी तारे हे नेहरूंनींच निर्माण केलेले आहेत. हिमालय आणि गंगा ह्यांची उत्पत्ति नेहरूंमुळेंच झालेली आहे. एवढेंच काय पण भारतांतील लोकांना मुलेंबाळें जीं होतात आणि त्यांचे संसार जे चालतात ते सुद्धां नेहरूंच्याच कृपेमुळें!" नेहरूनिष्ठेबाबत ह्या उभयतांत सुरू झालेली ही भयंकर चढाओढ आतां कोठपर्यंत मजल गांठणार हें कळत नाहीं. ह्या चढाओढींत त्यांना 'संयुक्त महाराष्ट्र'चें स्मरण होऊं नये हें साहजिकच आहे. दोघांच्याहि जवळ 'मुंबई-बेळगांवसह संयुक्त महाराष्ट्र' कसा निर्माण करावा ह्याबद्दल काडीचाहि कार्यक्रम नाहीं. त्यांच्याजवळ कार्यक्रम एकच आणि तो म्हणजे नेहरू. नेहरूंना शरण जा. नेहरूंची पूजा करा. म्हणजे तुम्हांला काय पाहिजे तें मिळेल. नेहरूनिष्ठेच्या भावनापूर्ण प्रदर्शनानें मराठी जनतेचें हृदयपरिवर्तन करून आगामी निवडणुका जिंकावयाच्या आणि नव्या महाराष्ट्राचें राज्य हस्तगत करावयाचें हा दोघांचा डाव आहे.

२२-७-'५६

# चिंतामणि देशाचा कंठमणी

गेला आठवडा म्हणजे 'संयुक्त महाराष्ट्र'च्या लढ्यामधला 'सुवर्णपर्व' होता असेंच म्हटलें पाहिजे. ह्या आठवड्यांत भारताच्या राजधानीमध्यें ज्या एकाहिपेक्षां एक देदीप्यमान घटना घडल्या, त्यांनीं 'संयुक्त महाराष्ट्र'च्या लढ्याला आंतरराष्ट्रीय पातळीवर नेऊन बसविलें असें म्हटलें तर त्यांत एका अक्षराचीहि अतिशयोक्ति होऊं नये! संयुक्त महाराष्ट्राचा लढा ही कांहीं माथेफिरू, दंगेखोर आणि दुराग्रही भाषाभिमान्यांनीं चालविलेली एक अराष्ट्रीय स्वरूपाची हुल्लड आहे असा कॉंग्रेसश्रेष्ठींनीं आणि त्यांनीं फेकलेल्या तुकड्यावर जगणाऱ्या कांहीं पोटभरू महाराष्ट्रद्वेष्ट्या वृत्तपत्रांनीं जो देशभर आणि जगभर प्रचार चालविलेला होता, तो किती खोटा आणि खोडसाळ आहे ह्याचें प्रात्यक्षिक भारताच्या राजधानींत सर्व जगाला पाहावयाला मिळालें. सर्व जगांत ज्याच्या कीर्तीचे चौघडे आज झडताहेत, आणि सारें भारतवर्ष ज्याच्या चरणावर आज डोकें घासतें आहे अशा एका 'भारतरत्ना'ला 'लोकशाहीच्या तत्त्वांना हरताळ फासणारे आणि बायकां-मुलांना गोळ्या घालणारे तुम्ही शुद्ध हुकूमशहा आहांत!' असें छातीठोकपणें तोंडावर सांगून चालता होणारा नरशार्दूल केवळ श्रीशिवछत्रपतींच्या महाराष्ट्रांतच निर्माण होऊं शकतो हें दृश्य गेल्या आठवड्यांत जगाला दिसलें!

रणांगणावर तळहातावर शिर घेऊन शत्रूशीं लढणारा शूर मराठा हा लोकशाहीच्या रक्षणासाठीं सत्याग्रही लढा सुद्धां तेवढ्याच प्राणपणानें लढतो, एवढेंच नव्हे तर शौर्य, धैर्य आणि त्याग ह्या गुणांमध्यें मराठी स्त्रिया ह्या मराठी पुरुषापेक्षां 'कांकणभर' सुद्धां कमी नाहींत ह्याचाहि तेजःपुंज पुरावा पुष्कळांना डोळ्यांनीं पाहावयाला मिळाला. कौरवपांडवांचें महाभारतीय युद्ध ज्या रणक्षेत्रावर झालें त्याच्या जवळपासच संयुक्त महाराष्ट्राच्या 'पांडवां'चा सिंहासनारूढ कॉंग्रेस-कौरवांशीं सत्याग्रही संघर्ष व्हावा हा देखील एक मोठा योगायोगच म्हणावयास हवा! एकाद्या महान् नाट्यप्रयोगामधील रोमांचकारी घटना जशा अनपेक्षितपणें आणि झपाट्यानें

घडून येतात, तशा कित्येक नाट्यपूर्ण आश्चर्यकारी घटना अकस्मात् गेल्या आठवड्यांत दिल्लीला घडल्या आणि महदश्चार्य हें कीं हें सर्व अघटित लोकमान्य टिळकांच्या जन्मशताब्दि महोत्सवाच्या पवित्र पार्श्वभूमीवर घडलें! हा ऊर्जस्वल इतिहास स्वतःच्या डोळ्यांनीं पाहण्याची संधि ज्या भाग्यवंतांना लाभली असेल त्यांच्यासारखे धन्य तेच!

सत्याग्रहाची चळवळ मागें घ्या किंवा बंद करा असा दुराग्रह ज्या विघ्नसंतोषी नतद्रष्टांनीं आतांपर्यंत चालविलेला होता, त्यांची तर आतां दिल्लीच्या अभूतपूर्व सत्याग्रहाचीं वर्णनें वाचून अक्षरशः दांतखिळी बसल्याखेरीज राहणार नाहीं. सत्याग्रह हें संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याचें एकमेव अमोघ शस्त्र आहे आणि ह्या शस्त्राच्या अहिंसात्मक पण प्रभावी प्रहारांनीं संयुक्त महाराष्ट्राचे सत्ताधारी शत्रु अजून शरण आले नसले तरी हैराण होऊन गेले आहेत ह्यांत कांहीं शंका नाहीं. सत्याग्रहाला बदनाम करण्यासाठीं आजपर्यंत त्यांनीं जंग जंग पछाडले. पण त्याचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. उलट सत्याग्रहाचें सामर्थ्य आणि स्वरूप जास्त जास्त प्रखर आणि विशाल होत गेलें. एवढें कीं शेवटीं संयुक्तमहाराष्ट्रवादी सत्याग्रहाचा लोंढा दिल्लीला लोकसभेच्या महाद्वारावर जाऊन आदळला आणि त्याच्या सिंहगर्जनेनें काँग्रेसश्रेष्ठींच्या छातीमध्यें धडकी बसली.

अकोल्यास भरलेल्या संयुक्त महाराष्ट्र समितीच्या बैठकीनें जेव्हां दिल्ली सत्याग्रहाचा प्रथम पुकार केला, तेव्हां साऱ्या महाराष्ट्रांतून त्याला प्रचंड साद मिळाली. बेळगांव—निपाणी—हैद्राबादपासून तें तहत उमरावती—नागपूरपर्यंतच्या सर्व मराठी मुलुखांतून सत्याग्रह्यांनीं नांवें नोंदवावयाला सुरुवात केली. तथापि, महाराष्ट्रापासून इतक्या दूरच्या ठिकाणीं जाऊन सत्याग्रह करावयाचा म्हणजे कांहीं सामान्य बाब नव्हती. फार खर्चाची गोष्ट होती ती. एवढे पैसे गरीब सत्याग्रह्यांनीं आणावयाचे कुठून? पण हा अवघड प्रश्न सर्वसामान्य मराठी जनतेनें तावडतोब सोडविला. दिल्लीला जाऊन सत्याग्रह करावयाचा ही कल्पनाच एवढी रोमहर्षक होती कीं तिच्या आनंदानें मराठी जनता बेहोष होऊन गेली. आणि म्हणून सत्याग्रही निधीला तिनें सढळ हातांनीं साहाय्य केलें. मुंबईच्या कामगारांनीं तर सत्याग्रह्यांवर पैशांचा वर्षाव केला म्हणतात! एका आठवड्याच्या आंत एकट्या मुंबई शहरामध्यें सत्याग्रही निधीचा आंकडा पाऊण लाखावर गेला. निधि मागावयाला येणाऱ्या स्वयंसेवकांना विन्मुख मुळीं परतच पाठवावयाचें नाहीं अशी कित्येक लोकांनीं

प्रतिज्ञा केली. त्यामुळें जितक्या वेळां स्वयंसेवक त्यांच्याकडे आले तितक्या वेळां त्यांनीं फूल ना फुलाची पाकळी त्यांच्या पदरांत टाकली.

दिल्लीला जाणाऱ्या सत्याग्रह्यांचें अभिनंदन करण्याच्या आणि त्यांना निरोप देण्याच्या सभाहि कांहीं कमी भरल्या नाहींत. मोहल्यामोहल्यामधून आणि भागाभागांतून सभा करून सत्याग्रह्यांचें जाहीर कौतुक करण्यांत आलें. रेल्वे कंपनीनें स्वतंत्र गाडीची किंवा डब्याची सोय करावी म्हणून समितीच्या चालकांनीं पुष्कळ खटपट केली. पण ती कोणत्या का कारणामुळें म्हणा ना यशस्वी कांहीं होऊं शकली नाहीं. त्यामुळें, साहजिकच सर्वांची निराशा झाली. पण त्यामुळें सत्याग्रह्यांच्या उत्साहांत यत्किंचित्‌हि खळ पडला नाहीं. मुंबईतून आणि महाराष्ट्रांतून जास्तींत जास्त सहा सातशें सत्याग्रही दिल्लीला जातील अशी प्रारंभीं कल्पना होती. पण हा आंकडा शेवटीं वाढत वाढत दुपटीवर गेला. चोवीस जुलैच्या रात्रीं बोरीबंदर स्टेशनावरून पटाणकोट एक्सप्रेसनें सत्याग्रह्यांचा प्रचंड जथा जेव्हां निघाला, तेव्हां हजारों लोक त्यांना निरोप देण्यासाठीं स्टेशनवर जमले होते. त्यांनीं सत्याग्रह्यांवर फुलांची एवढी प्रचंड वृष्टि केली कीं सारा प्लॅटफॉर्म फुलांनीं झाकून गेला. आणि संयुक्त महाराष्ट्राच्या जयजयकारांनीं तर बोरीबंदर स्टेशनचें प्रचंड आवार हादरून गेलें! ऐतिहासिक काळांत मराठ्यांचें सैन्य विजयादशमीच्या सुमुहूर्तावर उत्तर दिग्विजय करावयास जात असे. तें स्मरण होऊन कित्येकांच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले!

दिल्लीला पोहोंचतांच श्री. एस्. एम्. जोशी, आचार्य दोंदे आणि मी असे आम्ही तिघेजण प्रथम चिंतामणराव देशमुखांना भेटावयाला गेलों. आधीं त्यांना फोन करून मीं विचारलें. ते म्हणाले, "आतांच या, मला वेळ आहे." आम्हीं गेलों तेव्हां चिंतामणराव आपल्या भव्य निवासस्थानाच्या मागल्या व्हरांड्यांत एका झोपाळ्यावर एकटेच बसले होते. त्यांच्या मुद्रेवरून ते विचारग्रस्त दिसले. प्रकृतीहि विशेष चांगली असावी असें वाटलें नाहीं. पण बोलावयाला सुरुवात केल्यानंतर मग त्यांची नेहमींची उल्हसित वृत्ति प्रकट झाली. पंडित नेहरूंकडून जर समजा आमंत्रण आलें तर आम्हीं त्यांना भेटावयास जावें का असें आम्हीं त्यांना विचारलें तेव्हां ते म्हणाले, "जरूर जावें. कां जाऊं नये? बघा, काय म्हणताहेत ते?" "पण भेटावयाला जाऊन कांहीं उपयोग होईल काय?" आचार्य दोंदे ह्यांनीं हळूच मध्येंच विचारलें. तेव्हां अगदीं निर्विकार मुद्रेनें चिंतामणराव उत्तरले, "कांहीं होणार नाहीं!"

थोडा वेळ कोणी कांहींच बोललें नाहीं. तेव्हां विमनस्क मुद्रेनें चिंतामणराव म्हणाले, "पुष्कळ मला सांगतात टिळकांवर लिहा, टिळकांवर बोला. काल टिळकांची जन्मशताब्दि होती. पुष्कळ ठिकाणांहून मला व्याख्यानांचीं आमंत्रणें आलीं. कोणी म्हणाले, संदेश पाठवा. पण मी टिळकांवर कांहीं लिहिलें नाहीं. व्याख्यानहि कुठें दिलें नाहीं. संदेशहि पण पाठवला नाहीं. काल दिवसभर मी घरींच बसून होतों. टिळकांचें चिंतन करीत होतों. वाईट वाटतें मला. आज टिळकांचें आपण कांहीं शिल्लक ठेवलें नाहीं, त्यांचें नांव उच्चारावयाची तरी आपली लायकी आहे काय? रायगड आणि सिंहगडाकडे पाहायचें आणि शिवाजीची नि तानाजीची आठवण करावयाची एवढेंच का आतां आपलें काम उरलें आहे? ह्या महापुरुषांचें कोणतें काम आज आपण करतों आहांत? छे, छे, आज महाराष्ट्राची अत्यंत अधोगति झाली आहे. ह्यापेक्षां आपली अवनति होणें शक्य नाहीं. आशा एकच आहे कीं हा 'चक्रनेमिक्रम' आहे. म्हणून आज आपलें चाक कितीहि खालीं गेलें असलें तरी तें उद्यां वर येणार आहे असा विश्वास बाळगावयाला हरकत नाहीं."

मुद्रेवरून अत्यंत सौम्य आणि शालीन दिसणाऱ्या ह्या माणसाच्या हृदयांत महाराष्ट्राच्या ज्वलन्त अभिमानाचा केवढा अंगार धगधगतो आहे, त्याचा प्रत्यय त्यांच्या प्रत्येक शब्दाशब्दामधून येत होता. लोकमान्य टिळकांचा त्यांच्या जीवनावर केवढा गाढ ठसा उमटलेला आहे हेंहि दिसून आलें. टिळकांची त्यांनीं एक अत्यंत हृदयस्पर्शी आठवण सांगितली. ते म्हणाले, "आय. सी. एस. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर मी लोकमान्य टिळकांना एकदां भेटायला गेलों. त्यांना मी म्हणालों, 'सरकारी नोकरीचा राजिनामा देऊन मला देशसेवेला वाहून घ्यावयाचें आहे.' तेव्हां टिळक आम्हांला म्हणाले, 'तुमच्या हृदयांत देशाची ऊर्मि आहे ना? मग ती सारखी उचंबळत ठेवा. ती जागृत ठेवून तुम्ही सरकारची नोकरी करा. राज्यकारभाराचा तुमचा अनुभव स्वराज्यांत फार उपयोगी पडेल. मी तुम्हांला निश्चित सांगतों कीं तुमच्या आयुष्यांत एक दिवस असा उगवेल कीं ज्या दिवशीं तुमच्या हृदयांतील देशसेवेची ही ऊर्मि आपोआप प्रकट होईल!' माझ्या अर्थमंत्रिपदाचा मीं जेव्हां राजिनामा दिला तेव्हां टिळकांची ती वाणी माझ्या कानांत घुमत होती!" चिंतामणरावाचे ते उद्गार ऐकून आमच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. समोर चिंतामणरावांच्या निवासस्थानाचा विस्तीर्ण बगीचा पसरलेला होता. हिरवीगार

हिरवळ डोळ्यांना आल्हाद देत होती. अधूनमधून उंच उंच वृक्ष निश्चल उभे होते. ह्या सर्व राजवैभवावर आणि मानमरातबावर ह्या मराठी माणसानें लाथ मारली होती. कां? तर त्याच्या हृदयांत देशसेवेची ती प्रचंड ऊर्मि आतां उचंबळली होती. त्या ऊर्मीच्या प्रवाहांत त्यानें आपलें महान् मंत्रिपद 'देशार्पणमस्तु' करून टाकलें होतें.

चिंतामणरावांचा निरोप घेऊन आम्ही लोकसभेच्या 'मध्यवर्ती सभागृहां'त आलों. हें सभागृह फारच प्रशस्त आणि शोभिवंत आहे. लोकसभेचे सदस्य ह्या ठिकाणीं वाचनलेखनासाठीं वा उपाहारासाठीं येऊन बसतात. त्यामुळें लोकसभेच्या सभासदांच्या निवांतपणें गांठी घेण्याचें हेंच एक स्थळ आहे. लोकसभेच्या आणि राज्यसभेच्या संयुक्त सभा ह्याच सभागृहामध्यें नेहमीं भरत असतात. व्यास-पीठाच्या उजव्या बाजूला दादाभाई नौरोजी ह्यांचें भव्य तैलचित्र लावलेलें आहे. डाव्या बाजूला लोकमान्य टिळकांचें चित्र लावण्याची त्या दिवशीं तयारी चालली होती. व्यासपीठाच्या मधोमध वर गांधींची तसबीर लावलेली आहे. लोकसभेच्या कित्येक बिगरमहाराष्ट्रीय सभासदांची आणि आमची ओळख श्री. शंकरराव मोरे ह्यांनीं करून दिली. श्री. हरिभाऊ पाटसकर, श्री. काकासाहेब गाडगीळ, श्री. जगन्नाथराव भोसले, स्वामी रामानंद तीर्थ हीं सर्व मंडळीहि तेथें क्रमाक्रमानें भेटलीच.

लोकसभेचे जे जे महाराष्ट्रीयेतर सभासद आम्हांला भेटले ते ते सर्व अगदीं पहिल्याच वाक्यांत म्हणत कीं, "मुंबई महाराष्ट्राची आहे, आणि तिचा समावेश आज ना उद्यां महाराष्ट्रांत करावाच लागेल ह्याविषयीं आमच्या मनांत बिल्कूल शंका नाहीं!"

पण पुढें जेव्हां आम्ही त्यांना म्हणत असूं कीं, "प्रश्न तो नाहीं. मुंबईचा समावेश आज महाराष्ट्रांत करावयाला पाहिजे अशी मराठी जनतेची मागणी आहे. कारण पांच वर्षें महाराष्ट्रापासून मुंबई वेगळी राहिली तर महाराष्ट्राचें भयंकर नुकसान होईल. आणि मुंबईमधलें महाराष्ट्राचें महत्त्व एवढें कमी होईल कीं पांच वर्षांनंतर मुंबई महाराष्ट्राला मुळीं मिळूंच शकणार नाहीं!"

तेव्हां मग ते खांदे आकसून म्हणत कीं, "इतक्या लवकर तुम्हांला मुंबई मिळेल असें वाटत नाहीं. थोडा वेळ गेला पाहिजे. पंडितजींच्या कलाकलानें घेतलें पाहिजे!"

प्रत्येकाच्या बोलण्याचा सूर हाच कीं पंडितजींची समजूत घातली पाहिजे. पंडितजी फार चांगले आहेत. त्यांच्या भोंवतालच्या लोकांनीं त्यांचा गैरसमज करून दिलेला आहे. तुमच्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं "तुमची बाजू जशी मांडावयाला पाहिजे होती तशी मांडली नाहीं." ह्यापेक्षां निराळा युक्तिवाद कांहीं कोणी मांडतांना आम्हांला आढळला नाहीं. अशा युक्तिवादाला आम्हीं काय उत्तर द्यावयाचें? "पंडितजी जर इतके थोर आहेत आणि चांगले आहेत, तर दुसऱ्याचें ऐकून त्यांचें मन असें कलुषित होतें कसें? सत्य काय आहे, न्याय कोणत्या बाजूला आहे हें त्यांच्या स्वतःच्या ध्यानांत कसें येत नाहीं?" असा आम्हीं उलट प्रश्न केला तर त्याला त्यांच्याकडून कांहींच जबाब मिळत नसे. सर्व वादविवाद आणि चर्चा शेवटीं पंडितजींच्या नांवापाशीं येऊन थांबत आणि कुंठित होत. भारता-सारख्या अवाढव्य प्रजासत्ताक राज्याचें सर्व भवितव्य ह्या एका माणसाच्या मनावर आणि मर्जीवर अवलंबून आहे ही गोष्ट लोकसभेच्या दहा-पांच सदस्यांशीं बोललें कीं ताबडतोब लक्षांत येतें. शेवटीं शेवटीं तर आम्हांला त्या गोष्टीची अगदीं शिसारी आली. आम्ही मनांत म्हणालों कीं ही काय लोकशाही आहे का एकशाही आहे? नेहरूंसंबंधीं आदर बाळगणाऱ्या माणसालाहि उबग यावा इतका नेहरूंच्या व्यक्तिपूजेचा तिथें अतिरेक झालेला आहे. एक महाराष्ट्र वजा केला तर बाकीच्या राज्यांच्या दृष्टीनें नेहरू कांहीं अजून तितकेसे बिघडलेले नाहींत. नाहींतर साऱ्या देशामध्यें एकाच माणसाचें एवढें वर्चस्व वाढणें ही कांहीं भारताच्या लोकशाहीच्या कल्याणाच्या दृष्टीनें चांगली गोष्ट नाहीं.

लोकसभेंतील निरनिराळ्या सभासदांशीं बोलतांना एक गोष्ट प्रामुख्यानें आमच्या लक्ष्यांत आल्यावांचून राहिली नाहीं. आणि ती म्हणजे ही कीं महाराष्ट्रीय जनतेच्या विरुद्ध दिल्लीमध्यें आणि इतर प्रदेशांत फारच मोठा प्रचार करण्यांत आलेला आहे. मुंबईमध्यें आणि महाराष्ट्रामध्यें मोरारजींच्या पोलिसांनीं केलेले अत्याचार त्यांना एवढे भयंकर वाटत नाहींत. कारण त्याची खरीखुरी माहिती आणि चित्रें त्यांना कोणीं अजून सांगितलीं नाहींत कीं दाखविलीं नाहींत. पण मुंबई शहरांत मराठी माणसांनीं केलेल्या अत्याचारांचीं मात्र भडक वर्णनें कोणींतरी तिखटमसाला लावून त्यांच्या डोक्यांत कोंबलेलीं आहेत. म्हणून मुंबई महाराष्ट्रापासून पांच वर्षें तोडण्यांत मराठी लोकांवर फार मोठा अन्याय झाला आहे असें त्यांना चुकूनसुद्धां वाटत नाहीं. 'मुंबईच्या लोकांनीं फार वाईट

वर्तन केलें (misbehaved) म्हणून मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत करावयाचा कीं नाहीं ह्या प्रश्नाचा तूर्त विचार करतां येत नाहीं' असे उद्गार पंडित नेहरूंच्या तोंडून जिथें निघाले, तेथें लोकसभेच्या इतर सभासदांचा विश्वास मुंबईमधील मराठी जनतेच्या निरपराधित्वावर कसा बसावा बरें?

मला वाईट वाटलें एका गोष्टीबद्दल. तें हें कीं लोकसभेंतील आमच्या मराठी सभासदांनीं बिगरमराठी सदस्यांना भेटून मुंबईमध्यें आणि महाराष्ट्रामध्यें खरे प्रकार काय काय घडले ह्याची माहिती सांगण्याच्या बाबतींत फार कुचराई केली आहे. मुंबईतल्या मराठी लोकांनीं अन्यभाषिकांचीं दुकानें लुटलीं किंवा अन्यभाषी स्त्रियांवर अत्याचार केले, ह्यांतली एक-एक गोष्ट खरी नाहीं असें जेव्हां आम्हीं कित्येकांना सांगितलें, तेव्हां ते 'आ' वासून आमच्याकडे पाहत राहिले. ते म्हणाले, "आजपर्यंत आम्हांला हें कुणीं सांगितलेंच नाहीं. आजच प्रथम आम्हांला हें समजतें आहे." त्यानंतर मोरारजींच्या पोलिसांनीं आणि कॉंग्रेसच्या गुंडांनीं केलेल्या एकेका अत्याचाराचें आम्ही जेव्हां तपशीलवार वर्णन करूं लागलों, तेव्हां तर त्यांच्या अंगावर कांटाच उभा राहिला. ते म्हणाले, "खरोखरच, तुम्ही ह्या ज्या भयंकर गोष्टी सांगतां त्यांतील एकहि गोष्ट आमच्या कानांवर आजपर्यंत आलेली नाहीं. तुम्ही असें करा. मोरारजीच्या पोलिसांनीं केलेल्या अत्याचारांच्या वास्तववादी वर्णनाचें एक इंग्रजींत किंवा हिंदींत पुस्तक तयार करा. अशा पुस्तकांत तुमचें मतप्रदर्शन नको. जेवढें घडलें तेवढेंच लिहा! तुम्ही सांगतां ह्या गोष्टी जर ह्यापूर्वींच आम्हांला कोणीं सांगितल्या असत्या तर आम्हांला तुमच्या वतीनें पुष्कळच बोलतां आलें असतें!"

सभागृहांत ठिकठिकाणीं खासदारांचे लहानमोठे गट बसलेले होते. कुणी चहा पीत होते. कुणी थंड कॉफी पीत होते. प्रत्येक गटांत आम्ही दहापंधरा मिनिटें बसून बोलत होतों. मुंबईच्या प्रश्नाबाबत सर्वांनीं सहानुभूति दाखविली. पण लोकसभेंत महाराष्ट्राच्या बाजूनें मत देण्यास आपण असमर्थ आहोंत असें सर्वांनीं नम्रतापूर्वक आम्हांला सांगितलें. ह्या सर्व गडबडींत आमचें जेवण हुकलें. पण जेवणाची आठवण कुणाला होती? दुसऱ्याचें हृदयपरिवर्तन करण्यासाठीं उपोषण कां करावें लागतें त्याचा बोध त्यावेळीं मला झाला. एवढ्यांत एक सभासद् हातांत कसलासा कागद् घेऊन गंभीर चेहेऱ्यानें आंत आला. त्याच्या भोंवतालीं चार-पांच सभासद् जमले. त्या कागदांतला मजकूर वाचून त्यांचेहि चेहरे

एकदम गंभीर झाले. साहजिकच आमचें लक्ष्य तिकडे गेलें. काय होतें बरें त्या कागदांत?

इतक्यांत एकजण तो कागद घेऊन आमच्याकडे आला. त्या कागदावर नजर पडतांच एकदम आमचीं बुबुळें निर्जीव झालीं. क्षणमात्र आपल्या छातीचे ठोके बंद पडत आहेत कीं काय असा भास झाला. रुद्ध स्वरानें मीं तो कागद वाचला. चिंतामणराव देशमुखांचा राजिनामा राष्ट्रपतींनें स्वीकारला होता; आणि त्यांचें अर्थमंत्रिपद पंडित नेहरूंनीं आपल्याकडे घेतलें होतें. त्यासंबंधींचें तांतडीचें तें सरकारी पत्रक होतें.

The President has under Clause 2, Article 75 of the Constitution of India accepted with regret the resignation of Shri C. D. Deshmukh of his office as Minister of Finance.

Press Communique

The Prime Minister will hold charge of the Ministry of Finance with effect from today.

भारतीय प्रजासत्ताक राज्यासाठीं सहा वर्षेपर्यंत ज्यांनीं आपलें सर्वस्व वेचलें होतें अशा एका महान् देशभक्ताची वासलात कृतज्ञ भारत सरकारनें अवघ्या सहा ओळींमध्यें लावून टाकली होती. आमच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. आम्ही एकमेकांच्या चेहऱ्याकडे नुसते बघत राहिलों. काय बोलावें हेंच आम्हांला कळेना. आमच्या डोळ्यांपुढें चिंतामणरावांची मूर्ति उभी राहिली. दोनतीन तासांपूर्वींच आम्ही त्यांना भेटून आलों होतों. अर्थात् राष्ट्रपतींनीं त्यांचा राजीनामा स्वीकारला असल्याची बातमी त्यावेळीं त्यांना माहित असायलाच पाहिजे होती. पण त्यांनीं एका अक्षरानें किंवा नजरेनें सुद्धां असें कांहीं घडलें असल्याची गंधवार्ता आम्हांला लागूं दिली नाहीं. केवढी नम्रता आणि केवढा मनःसंयम त्या पुरुषाचा?

चिंतामणरावांची मूर्ति आमच्या मनश्चक्षूंसमोर झपाट्यानें एकदम उंच उंच होत गेली. त्यांच्या आत्मिक सामर्थ्याचें आम्हांला मुळीं आकलनच होईना. मी उद्गारलों, "वाहवा, असा असामान्य त्याग करणारा पुरुष शिवछत्रपतींच्या महाराष्ट्रांतच निर्माण होऊं शकेल. आज महाराष्ट्राची मान उंच झाली!" आचार्य दोंदे म्हणाले, "महाराष्ट्राला नेता नाहीं अशी तक्रार आतां यापुढें कोणाला करतां येणार नाहीं." एस्. एम्. म्हणाले, "देशसेवेसाठीं आत्मार्पण करण्याची आज आम्हांला नवीन प्रेरणा मिळाली!"

त्यानंतर चिंतामणरावांचा राजिनामा हा एकच सर्वांच्या बोलण्याचा विषय होऊन बसला. परदेशचा दौरा संपवून आधल्या दिवशींच नेहरू येतात काय अन् लागलेच दुसऱ्या दिवशीं झटकाफटकीं देशमुखांची बोळवण करतात काय! देशमुखांनीं आपल्या मंत्रिपदाचा राजिनामा दिला ही गोष्ट जगजाहीरच होती. आणि हा राजिनामा राष्ट्रपति केव्हां ना केव्हां तरी मान्य करणारच हीहि गोष्ट पण लोक ओळखूनच होते. पण एवढ्या घिसाडघाईनें ही गोष्ट होईल अशी मात्र कोणालाहि कल्पना नव्हती. पुष्कळांची अशी अपेक्षा होती कीं परदेशच्या दौऱ्यावरून परत आल्यानंतर नेहरू चिंतामणरावांशीं कांहीं तरी बोलतील, चर्चा करतील, आणि मग त्यांचा राजिनामा स्वीकारतील. पण नेहरूंनीं लोकांच्या ह्या सर्व अपेक्षा खोट्या ठरविल्या. देशमुखांसंबंधींचा हा निर्णय विलायतेमध्यें असतांनाच त्यांनीं घेतला असावा असें दिसतें. विलायतच्या थंड हवेंत अगदीं शांत डोक्यानें त्यांनीं ह्या गोष्टीचा विचार केलेला असावा.

देशमुखांनंतर अर्थमंत्रिपद गोविंद वल्लभ पंत ह्यांच्याकडे सोपविलें जाईल असें बोललें जात होतें. पण नेहरूंनीं हें अत्यंत महत्वाचें आणि जिकिरीचें खातें स्वतःकडेच घेऊन लोकांना आश्चर्याचा दुसरा धक्का दिला. नेहरू आतां आपल्या अंगावर कामाचा डोंगर तरी घेणार किती? पंतप्रधान हेच. परराष्ट्रमंत्री हेच. प्लॅनिंग कमिशनचे अध्यक्ष हेच. आणि आतां अर्थमंत्रीसुद्धां हेच! त्यांनीं घेतलेलें प्रत्येक खातें एवढें अजस्त्र आहे कीं त्यासाठीं लोकोत्तर बुद्धीचा एकेक स्वतंत्र आणि संपूर्ण माणूस लागेल! ह्याला काय सत्तेचा लोभ म्हणावा का शहाणपणाचा अभाव समजावा? आणि एवढेंहि करून पुन्हा ब्रह्मदेशच्या निवृत्त पंतप्रधान यू नू ह्यांना, "माझ्या पंतप्रधानकीचा राजिनामा देऊन मला निवृत्त व्हावें असें वाटतें!" असें पत्र लिहावयास हे राजेश्री पुन्हा तयारच! रोज नवी नवी बायको करायची आणि त्याजबरोबर संसाराचा कंटाळा आल्याचीहि घोषणा करायची, त्यांतला हा प्रकार आहे.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही चिंतामणरावांशीं फोनवरून बोललों. मी म्हणालों, "आपल्यासंबंधीच्या कृतज्ञतेच्या भावनेनें आमचीं मनें इतकीं उचंबळून गेलेलीं आहेत कीं आपल्याशीं काय बोलावें हेंच आम्हांला कळत नाहीं. काल सकाळीं आपल्याला जेव्हां आम्ही भेटलों, तेव्हां राष्ट्रपतींनीं आपला राजिनामा स्वीकारल्याचें आम्हांला माहीत नव्हतें. आपल्या डोक्यांत त्यावेळीं कांहीं तरी

निराळेच विचार चालले असतील. अशा वेळीं आपल्या मानसिक व्यग्रतेंत आम्ही व्यत्यय आणला ह्याबद्दल आम्हांला क्षमा करा!"

चिंतामणराव हसून म्हणाले, "छे, छे, तसें कांहीं नाहीं. राजिनाम्याचा माझ्या डोक्यांत विचारहि नव्हता. मी त्यावेळीं अगदीं आनंदांत होतों. तुम्ही वाईट वाटून घेण्याचें कांहीं कारण नाहीं." त्यानंतर ते म्हणाले, "आतांपर्यंत महाराष्ट्रांतले कित्येक लोक वीरश्रीच्या मोठमोठ्या वल्गनाच करीत होते. आम्ही राजिनामे देतों, आम्ही लढतों, आम्ही असें करतों, आम्ही तसें करतों. पण प्रत्यक्ष रणांगणांत उतरण्याची मात्र कोणाचीच तयारी नाहीं. ह्या संग्रामाचा पहिला बळी पडण्याची संधि अखेर मला मिळाली हेंच मी माझें भाग्य समजतों. महाराष्ट्राचा लढा हा कांहीं केवळ प्रांतीय लढा नाहीं. तीन कोटी जनतेची सेवा ही केवळ महाराष्ट्राची सेवा नसून भारताची सेवा आहे असें मी मानतों. कोणतीहि गोष्ट माणसानें करावयाची ती अंतःकरणापासून करावी. टिळकांचा आधिदैविक शक्तीवर विश्वास होता. There is divine power that rules over the destinies of men and nations असें ते म्हणाले होते. त्या आधिदैविक शक्तीवर माझी श्रद्धा आहे. माझ्या वर्तनाबद्दल आज कोणाला कांहीं वाटलें, तरी त्याचा निवाडा शेवटीं तीच शक्ति करील आणि तीच त्याचें फळ देईल!"

चिंतामणरावांच्या अंगांत एका निराळ्याच दैवी शक्तीचा संचार झाल्याचा प्रत्यय त्यांच्या आवाजांतून आणि भाषेमधून होत होता. म्हणून त्यांचें भाषण ऐकतांना मधून मधून आमच्या अंगावर कंप उठल्यासारखें वाटत होतें.

चिंतामणरावांचें आणि आमचें हें भाषण नऊ वाजतां झालें. आणखी दोन तासांनींच लोकसभेपुढें आपल्या राजिनाम्यासंबंधींचें ऐतिहासिक निवेदन ते सादर करणार होते. पण आमच्याशीं बोलतांना यासंबंधीं एक अक्षर त्यांच्या तोंडून निघालें नाहीं. त्यांच्या जागीं काकासाहेब गाडगीळ असते तर त्यांनीं आम्हांला मुद्दाम आमंत्रण देऊन सांगितलें असतें कीं, "आज अकरा वाजतां माझें भाषण आहे लोकसभेंत. तुम्ही जरूर या. बघा कसा हल्कल्लोळ उडवून टाकतों तें!" ह्या दृष्टीनें चिंतामणराव म्हणजे एक अद्भुत माणूस आहे. आपल्या विनीत वृत्तीला ज्या योगानें बाध येईल अशी एकहि गोष्ट चुकून सुद्धां त्यांच्या हातून होणार नाहीं. लोकसभेंत चिंतामणरावांचें भाषण त्या दिवशीं होणार आहे हें आम्हांला माहित नव्हतें. त्यामुळें आम्हीं एक फार मोठी संधि गमावली.

बारा-साडेबाराच्या सुमारास आम्ही लोकसभेच्या 'मध्यवर्ती सभागृहां'त जातों तों एकादा बॉम्बगोळा लोकसभेवर पडावा असा चेहरा करून एकेक सभासद येत होता. पहिल्या प्रथम डॉ. लंकासुंदरम् भेटले. ते म्हणाले, "देशमुखांचें भाषण ऐकतांना माझ्या अंगावर अक्षरशः रोमांच उभे राहिले होते!" त्यानंतर दुसरा एक मद्रासी सभासद आपल्या द्राविडी उच्चारांत म्हणाला, "Bah, it was dignified and devastating!" (बाप रे, फारच रुबाबदार आणि विदारक!) शंकरराव मोरे ह्यांचा हर्ष तर अनावर झाला होता. ते म्हणाले, "देशमुख बोलत असतांना शिवकालीन इतिहासांतील मोठमोठे वीरपुरुष माझ्या डोळ्यांपुढून सरकत होते. बाजी देशपांडे, मुरारबाजी, खंडो बल्लाळ, सखाराम हरि ह्यांचे खरे वंशज शोभतात चिंतामणराव!" काँग्रेस पक्षांतल्या एक विद्वान् महाराष्ट्रीय महिला तेवढ्यांत भेटल्या. त्या म्हणाल्या, "देशमुखांच्या भाषणांचे आंतरराष्ट्रीय परिणाम फार होतील. नेहरूंच्या स्वरूपाची एक निराळीच बाजू देशमुखांनीं जगाला दाखविली. तें बरें झालें का वाईट झालें हें मी सांगूं शकत नाहीं. देशमुख हे कांहीं राजकारणी पुरुष नाहींत. म्हणून सत्याची किंवा तत्त्वाची गळचेपी करून बोलणं त्यांना अशक्य आहे!"

एक वृद्ध पंजाबी सभासद तर देशमुखांच्या भाषणानें अत्यंत सद्गदित झाल्यासारखे दिसले. ते म्हणाले, "सदतीस वर्षांपूर्वी पंजाबच्या अत्याचारानंतर मध्यवर्ती कायदेमंडळांत मदनमोहन मालवीय ह्यांनीं गोळीबारांत मेलेल्या एका तरुणाचें चित्र हातांत घेऊन भाषण केलें होतें. त्याची मला ह्या प्रसंगीं आठवण झाली. मदनमोहन मालवीय हातांतलें चित्र सर्वांना दाखवून म्हणाले, 'हे देवाचें देऊळ आहे. ह्याचा तुम्ही विध्वंस केलात. माणसांनीं बांधलेलीं देवळें भग्न झालीं तर तीं बांधतां येतात. पण हें परमेश्वराचें देऊळ एकदां उद्ध्वस्त झाल्यावर तें पुनः बांधतां येईल काय?' त्यावेळीं ग्यालरींत बसलेल्या स्त्रिया किंचाळून मूर्च्छित पडल्या. मालवीयांचें तें भाषण तीन दिवस चाललें होतें." एक बिहारचे सभासद म्हणाले, "गेलीं कित्येक वर्षें विरोधी पक्षाला जें करतां आलें नाहीं, तें देशमुखांनीं तीन मिनिटांत करून दाखविलें." मद्रासचे डॉ. मुदलियर म्हणाले, "One civilian did what all your professional politicians could not do! But your Maharastrian congressmen had not the goodness to appreciate and applaud his great speech!" (तुमच्या धंदेवाईक देशभक्तांना जें करतां आलें नाहीं

तें नोकरींत जन्म घालवणाऱ्या एका माणसानें आज करून दाखविलें. पण तुमचे मराठी कॉंग्रेसवाले इतके नतद्रष्ट आहेत कीं देशमुखांचें महान् वक्तव्य चालू असतां टाळ्या वाजवून कौतुक करण्याचा चांगुलपणा कांहीं त्यांना दाखवतां आला नाहीं.) आणि त्यांचें तें म्हणणें खरें होतें. विरोधी पक्षाच्या सर्व लोकांनीं देशमुखांच्या भाषणाला योग्यप्रसंगीं टाळ्या वाजवून आणि मोरारजींनीं केलेल्या अत्याचारांचें त्यांनीं वर्णन केलें तेव्हां 'शेम शेम' असें ओरडून भरपूर कौतुक केलें. पण मराठी कॉंग्रेसवाल्यांपैकीं एकदोन अपवाद वजा करून बाकीचे सर्व बाप मेल्यासारखे चेहरे करून आपापल्या जागीं स्वस्थ बसले होते.

देशमुखांनीं अवघीं तीस मिनिटेंच भाषण केलें. अगदीं बजेटाचें भाषण करावें तशा निर्विकार स्वरांत केलें. निर्भेळ सत्याखेरीज त्या भाषणांत दुसरें कांहीं नव्हतें. पण तें सत्य इतकें भयानक होतें कीं त्याच्या दर्शनानें कॉंग्रेसवाल्यांचीं बुबुळें दोन इंच बाहेर आलीं. मोरारजींना तर त्यांनीं सपशेल गारदच करून टाकलें. पण उभ्या हयातींत नेहरूंना त्यांच्या तोंडावर शेकडों लोकांसमक्ष कोणीं सांगितलें नव्हतें कीं, "मंत्रिमंडळाची सर्व सत्ता बळकावणारे आणि नागरिक स्वातंत्र्याची गळचेपी करणारे तुम्ही एक हुकूमशहा आहांत म्हणून!" तें सांगण्याचें ऐतिहासिक कर्तव्य देशमुखांना करावें लागलें. सत्तेचा उन्माद नेहरूंच्या अंगांत शिरलेला आहे. अतिरिक्त स्तुतीनें आणि जयजयकारांनीं तो उन्माद त्यांच्या डोक्यांत जाऊन बसलेला आहे. म्हणून स्वातंत्र्याच्या आणि लोकशाहीच्या हिताच्या दृष्टीनें त्यांच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालून त्यांच्या कर्तव्याची जाणीव त्यांना करून देणारा देशमुखांसारखा पंचाक्षरी आजच्या घटकेस हवाच होता.

भारत सरकारच्या मंत्रिमंडळांतला कारभार किती पोरकटपणानें आणि घटना-विरोधी रीतीनें चाललेला आहे त्यांजवर देशमुखांनीं झगझगीत प्रकाश टाकला. मंत्रिमंडळाची सर्व सत्ता नेहरू आणि त्रिमूर्तिसमिति ह्यांनीं बळकावून मुंबई महाराष्ट्रापासून वेगळी कां करावी ह्याचें एकहि समर्थनीय कारण न देतां किंवा त्या योगानें महाराष्ट्राचें नि भारताचें कल्याण कसें होईल हें न दाखवितां तसा निर्णय घेतला. मुंबईसारखें हत्याकांड (carnage) इतर कोणत्याहि देशांत झालें असतें तर त्याची न्यायालयीन चौकशी कायद्यानेंच करणें भाग पडलें असतें. पण मुख्य प्रधानानें आणि गृहमंत्र्यानें मुंबईतल्या अत्याचाराची चौकशी करण्याची विनंति झटकाफटकीं आणि असभ्यपणें (discourteously) नाकारली. होशारपूरच्या

अत्याचाराची चौकशी होते आणि मुंबईच्या गोळीबाराची चौकशी होत नाहीं यावरून राज्यकर्त्या पक्षाच्या (ruling party) मनांत महाराष्ट्राविरुद्ध वैरभाव (animus) आहे असें आपल्याला वाटतें. म्हणून त्या पक्षाच्या संगतींत राहावयास आपण यापुढें मुळींच तयार नाहीं असें देशमुखांनीं साफ सांगून टाकलें.

त्यांच्या भाषणांतले शेवटचे शब्द तर संस्मरणीय आहेत. ते म्हणाले, "हिंसेचें नियंत्रण न्यायानें आणि समजूतदार वागणुकीनें होतें. मुंबईबाबत ज्यांनीं निर्णय घेतला यांच्या आक्रमक अहिंसेनें भारताच्या ऐक्याला जेवढा धोका पोहोंचेल तेवढा प्रत्यक्ष हिंसेच्या उद्रेकानेंहि पोहोंचणार नाहीं. हिंसेची गय करावी असें कोणीहि शहाणा माणूस म्हणणार नाहीं. पण जेथें शेकडों नागरिकांचा प्रश्न येतो तेथें हिंसेचा प्रतिकार खंबीरपणें करण्यांत यावा. पाशवी रीतीनें करण्यांत येऊं नये!" हिंसेचा प्रतिकार सूड घेण्याच्या दृष्टीनें न करतां निर्वैर भावनेनें करावा असें लोकमान्यांनीं 'गीतारहस्यां'त सांगितलें आहे म्हणून देशमुखांच्या मुखानें प्रत्यक्ष लोकमान्य बोलले असा भास झाल्यावांचून राहत नाहीं. देशमुखांसारख्या हसतमुख आणि विनयशील माणसानें एवढ्या निर्भय निर्दयतेनें नेहरूंची आणि त्यांच्या सहकाऱ्यांचीं बिंगें उजेडांत आणावींत ह्याचा काँग्रेसवाल्यांना सर्वांत जास्त धक्का बसला. त्यांना वाटलें कीं संस्कृत सुभाषितांनीं सुशोभित केलेलें एकादें 'ललितकोमल' वाङ्मयीन भाषण करून देशमुख मंत्रिमंडळांतून चालते होतील. पण एऱ्हवीं कुसुमासारखा मृदु असणारा हा माणूस प्रसंगीं वज्रापेक्षांहि कठोर होणारा एक महात्मा आहे हें त्या बिचाऱ्यांना काय ठाऊक! विलायतेमधून सारे मानसन्मान घेऊन विजयानंदानें परत आलेल्या नेहरूंच्या डोक्यांतली सारी हवाच देशमुखांनीं काढून टाकली.

त्यांचें भाषण ऐकतांना नेहरूंची स्थिति अतिशय अनुकंपनीय झाली होती असें प्रत्यक्ष पाहिलेल्या माणसांनीं मला सांगितलें. नेहरूंचें उत्तराचें भाषण अगदींच मिळमिळीत आणि बुळबुळीत झालें. देशमुखांनीं केलेला एकहि आरोप त्यांना निःसंदिग्धपणें नाकारतां आला नाहीं. तरी देखील एक काँग्रेसवाला एम्. पी. मला म्हणाला, "देशमुखांना जो संयम राखतां आला नाहीं, तो नेहरूंनीं राखला. त्यांनीं देशमुखांना अत्यंत रुबाबदार उत्तर दिलें!" मी हसून त्यांना म्हणालों, "देशमुखांच्या आरोपांना उत्तर देण्याचें नेहरूंनीं टाळलें एवढाच काय तो रुबाबदारपणा त्यांच्या भाषणांत होता!" सगळ्यांत काका गाडगीळांनीं मौज

केली. जणुं कांहीं आपणच भाषण केलें अशा आवेशानें ते आमच्याकडे धावत आले. आणि म्हणाले, "बोला, फर्स्ट क्लास भाषण झालें कीं नाहीं? अर्थात् देशमुखांचे सारे मुद्दे मीं माझ्या भाषणांत पूर्वी सांगूनच टाकले होते. ते आज त्यांनीं आपल्या वैशिष्ट्यपूर्ण भाषेंत सांगितले इतकेंच!" तेव्हां शंकरराव मोरे हळूच माझ्या कानांत म्हणाले, "सांगायला जरा अश्लील वाटतें म्हणून. नाहीं तर हा काका उद्यां सगळ्यांना असेंच सांगत सुटेल कीं भारतामधील सर्व प्रजेचे जनक आपणच आहोंत म्हणून!" देशमुखांच्या भाषणानंतर आतां लोकसभेच्या सभासदांना निराळें सांगण्यासारखें आमच्याजवळ कांहीं नव्हतें. आमचें तें काम संपलें होतें.

दुसऱ्या दिवशीं सकाळचीं दिल्लीमधलीं सर्व वृत्तपत्रें देशमुखांच्या भाषणानें भरून गेलीं होतीं. बहुतेक पत्रें हीं भांडवलवाल्यांच्या मालकीचीं असल्यानें त्यांनीं देशमुखांच्या नांवानें बोटेंच मोडलीं होतीं. 'टाइम्स ऑफ इंडिया' म्हणाला कीं, "The former Finance Minister spoke like a Burocrat than a politician". 'स्टेट्समन' म्हणालें कीं, "आपण राजकारणी पुरुष नाहीं असें म्हणतां म्हणतां देशमुखांनीं जवळ जवळ 'निवडणुकी'चें भाषण केलेलें आहे. आतां ते निवडणुकीला पुन्हां उभे राहणार नाहींत म्हणून आम्ही त्यांच्यावर तसा आरोप करीत नाहीं इतकेंच काय तें!" बिर्ला आणि देवदास गांधींच्या 'हिंदुस्थान टाइम्स'नें देशमुखांवर सर्वांत जास्त खुनशी हल्ला चढवला. ते म्हणाले कीं, "देशमुखांनीं आपल्या आयुष्यांत कमावलेली सारी अब्रू ह्या तीस मिनिटांच्या भाषणानें घालवून टाकली." दिल्लीमध्यें निःपक्षपाती पत्र एकहि नाहीं. सारीं पत्रें काँग्रेसचीं आणि भांडवलवाल्यांचीं प्रचारक. तेव्हां देशमुखांवर त्यांनीं कडकडून तुटून पडावें हें साहजिकच होतें. तथापि, देशमुखांविषयीं सर्वांत अत्यंत हृदयस्पर्शी उद्गार जर कुणीं काढले असतील तर ते आमच्या ना. हरिभाऊ पाटसकरांनीं. सद्गदित कंठानें ते आम्हांला म्हणाले, "देशमुख हे द्वितीय पंच-वार्षिक योजनेचे जनक होत. भारत सरकारचें आजचें आर्थिक धोरण देशमुखांचें आहे. भारताला समाजवादाकडे नेण्याच्या दृष्टीनें त्यांचे सारे प्रयत्न चालले होते. आतां ते गेल्यानंतर भारताच्या आर्थिक धोरणाचीं पावलें समाजवादाच्या रोखानें कशीं पडतील हें मला समजत नाहीं."

त्या दिवशीं दुपारीं तीन वाजतां पंडित नेहरूंच्या भेटीचें तातडीचें आमंत्रण

आल्यावरून एस. एम्. जोशी, बी. टी. रणदिवे, भाई खाडिलकर आणि दत्ता देशमुख असें चौघांचें शिष्टमंडळ नेहरूंना भेटावयाला गेलें. अशोक मेहतांनीं ही मुलाखत घडवून आणली. नेहरू अत्यंत खिन्न आणि विमनस्क चेहरा करून बसले होते. शेजारीं ना. हरिभाऊ पाटसकर बसले होते. मान खालीं घालून नेहरूंनीं हळूहळू बोलावयास सुरुवात केली. "तुम्ही आलांत हें फार चांगलें केलेंत. गेल्या आठनऊ महिन्यांत उभयपक्षीं अशा कांहीं गोष्टी घडलेल्या आहेत कीं ज्यामुळें हा प्रश्न अत्यंत कठीण होऊन बसला आहे. काय करावें हें सांगणें कठीण आहे. सर्वांच्या समाधानानें आणि सहकार्यानें हा प्रश्न सुटावा अशी माझी इच्छा आहे. देशमुख काल म्हणाले कीं, माझ्या मनांत महाराष्ट्रद्वेष आहे. मला फार वाईट वाटलें त्यांच्या या उद्गारांनीं. असा द्वेष माझ्या मनांत मुळींच नाहीं. असलाच तर त्याची जाणीव मला नाहीं. मुंबई कुठें का जाईना? माझा त्याच्यांत काय स्वार्थ? मुंबईचा प्रश्न पांच वर्षांच्या आंतच सुटेल. महाराष्ट्राची बाजू भक्कम आहे. पण मुंबईमधल्या अन्यभाषिकांचें समाधान नको का करावयाला? त्यांचें समाधान झाल्या-वांचून मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत करणें बरोबर नाहीं. महाराष्ट्रीयांना निष्कारण ती डोकेंदुखीच होऊन बसेल! मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत लोकशाहीच्या उपायानें केला जाईल असें मी म्हणालों त्याचा अर्थ मुंबईच्या लोकांचें सार्वमत घेतलें जाईल असा नाहीं. दोन तृतीयांश मतांनीं मुंबईचें भवितव्य ठरवावें असाहि माझा आग्रह नाहीं. थोडा वेळ जाऊं द्या. मग सुचेल आपोआप कांहीं तरी उपाय!" मुंबईचा अंतर्भाव ताबडतोब महाराष्ट्रांत कां करावयाला पाहिजे ह्याबाबत बिनतोड युक्तिवाद शिष्टमंडळानें नेहरूंशीं केला. पण नेहरूंनीं त्याला उत्तर देण्याचें टाळलें. ते मधून मधून पुटपुटायचे कीं, "त्या बाबतींत देखील अनेक अडचणी आहेत." पंचेचाळीस मिनिटें एकंदर मुलाखत होऊन त्यांतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. ज्यांनीं ही मुलाखत घडवून आणली त्यांनीं तसें करून काय साधलें हें कळावयाला मार्ग नाहीं. नेहरूंना भेटून कांहींहि होणार नाहीं असें देशमुखांनीं जें सांगितलें तेंच शेवटीं खरें ठरलें. शिष्टमंडळाला निरोप देतांना नेहरू अत्यंत भावनापूर्ण स्वरांत म्हणाले, "You are always welcome. I don't live in purdah! तुम्ही केव्हांहि आलांत तरी मी तुमचें स्वागतच करीन. मी कांहीं गोषांत राहत नाहीं!"

त्याच दिवशीं सकाळीं महाराष्ट्रांतून आलेले पावणे दोन हजार स्त्रीपुरुष सत्या-

ग्रही दिल्लीला येऊन पोहोंचले होते. पठाणकोट एक्सप्रेस नवी दिल्ली स्टेशनांत येतांच ' संयुक्त महाराष्ट्र 'च्या प्रचंड गर्जनांनीं साऱ्या स्टेशनाचें आवार दुमदुमून गेलें. स्टेशनापासून सत्याग्रह्यांनीं मोर्चा काढला. पुरुष सत्याग्रह्यांची व्यवस्था बिर्लाच्या ' लक्ष्मीनारायण ' मंदिराशेजारच्या हिंदु महासभेच्या प्रशस्त भवनांत केलेली होती. स्त्री सत्याग्रहींची राहण्याची सोय पहाडगंजमधील बृहन्महाराष्ट्र भुवनांत केलेली होती. दिल्लीच्या रस्त्यांतून संयुक्त महाराष्ट्राच्या हिंदी गर्जना करीत महाराष्ट्रीय सत्याग्रहींचा प्रचंड मोर्चा जेव्हां जाऊं लागला तेव्हां दिल्लीची जनता त्यांना पाहून थक्कच झाली. केवळ सत्याग्रह करण्यासाठीं इतक्या लांबून एवढी मंडळी दिल्लीला आली आहेत ह्या गोष्टीवर त्यांचा मुळीं विश्वासच बसेना. त्या दिवशीं दुपारीं तीन वाजतां सर्व सत्याग्रहींचा एक प्रचंड मोर्चा दिल्ली शहराच्या मोक्यामोक्याच्या विभागांतून हिंडून आला. सारी मिळून सात मैलांची रपेट झाली. हा मोर्चा पाहावयाला दिल्ली शहरांतील हजारों नागरिक रस्त्याच्या दुतर्फा जमा झाले होते. संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न काय आहे हें त्या दिवशीं दिल्लीच्या तमाम जनतेला कळून आलें.

सत्याग्रह्यांच्या स्वागतासाठीं सुप्रतिष्ठित स्थानिक नागरिकांची एक समिति नेमण्यांत आलेली होती. ह्या समितीच्या वतीनें त्या दिवशीं सायंकाळीं ' अजमल पार्कवर ' सत्याग्रहींचा एक प्रचंड सत्कार समारंभ भरविण्यांत आला. सभेला अजमासें दहा हजार लोक होते. दिल्ली हें शहर प्रामुख्यानें सरकारी कारकुनांचें आणि अधिकाऱ्यांचें असल्यानें कोणत्याहि पक्षाच्या राजकीय सभेला हजारपांचशें-पेक्षां जास्त माणसें हजर राहूं शकत नाहींत. त्या दृष्टीनें विचार करतां महाराष्ट्रीय सत्याग्रहींच्या सत्काराची ही प्रचंड सभा अपूर्वच होती असें म्हणावयाला हरकत नाहीं. रात्रीं नवाच्या सुमारास संयुक्त महाराष्ट्राच्या जयजयकारांत ही सभा बरखास्त झाली. दिल्लीच्या इतिहासांतील ती एक अभूतपूर्व घटनाच होती असें म्हणावयाला हरकत नाहीं. त्या रात्रीं एकाएकीं पावसाला सुरुवात झाली. आभाळ भरून आलें. विजांचा कडकडाट होऊं लागला. आणि वाऱ्यानें थैमान आरंभलें. आकाशाला भोक पडावें तसा साऱ्या रात्रभर पाऊस कोसळत होता. उद्यांच्या सत्याग्रहाचें काय होणार ह्याची चिंता सर्वांना लागून राहिली. त्यामुळें फार उशिरापर्यंत डोळ्याला डोळा लागला नाहीं.

अखेर सत्तावीस तारीख उजाडली. सुदैवानें पाऊस अजिबात उघडला होता. सकाळीं हिंदुसभाभवनांत सर्व पुरुष सत्याग्रहींची सभा घेऊन, त्यांना सर्व सूचना

तपशीलवार देण्यांत आल्या. महाराष्ट्रभुवनांतील स्त्रीसत्याग्रहींना तेंच सांगण्यांत आलें. संयुक्त महाराष्ट्राचे प्रमुख नेते राजघाटावर गांधीजींच्या समाधीला वंदन करून आले. दुपारीं तीन वाजेपर्यंत 'कनॉट सर्कस' मधील 'रीगल सिनेमा' समोरच्या उघड्या पार्कमध्यें सर्वांनीं जमावयाचें असें ठरलें होतें. त्याप्रमाणें स्त्री-पुरुष सत्याग्रहींचे मोर्चे आपापल्या निवासस्थानावरून बरोबर दोन वाजतां मोठ्या उत्साहानें गर्जत निघाले. तांबडीं शिरोभूषणें घातलेले खाकीकपडेधारी पोलिस अगदीं प्रारंभापासून मोर्च्याबरोबर होते. त्या दिवशीं शहरांत पोलीस बंदोबस्त अत्यंत कडक होता. पंडित नेहरू आणि इतर महत्त्वाचे कॉंग्रेस मंत्री यांच्याभोंवतीं तर सशस्त्र पोलिसांचें सैन्य उभें करण्यांत आलें होतें. महाराष्ट्रीयांची बदनामी करण्याचा प्रत्येक मोका कटाक्षानें साधण्याचा कॉंग्रेस सरकार प्रयत्न करीत होतें. त्याच दिवशीं शहरांतील कांहीं महाराष्ट्रद्वेष्ट्या व्यापाऱ्यांनीं भिंतीवर पोस्टर्स लावून महाराष्ट्रीय सत्याग्रहाच्या हुल्लडबाजींत भाग न घेण्याची आणि नेहरूनिंदेच्या मोहिमेला मदत न करण्याची विनंति दिल्लीच्या नागरिकांना केली होती.

तीनच्या सुमारास सर्व सत्याग्रही 'रीगल'च्या विस्तीर्ण पटांगणांत जमले. त्यांना पाहण्यासाठीं आलेल्या हजारों दिल्लीकरांचा पटांगणाला वेढा पडला होता. सर्व मैदानाला अगदीं युद्धतळाचें स्वरूप आलें होतें. प्रत्येक तुकडी पंचवीस जणांची चारचार जणांच्या रांगांत बनविण्यांत आली. मोर्च्याच्या रचनेचें आणि व्यवस्थेचें कार्य मीच करीत होतों. आघाडीला आचार्य दोंदे, नौशेर भरूचा, दत्ता देशमुख, भाऊसाहेब राऊत आणि बी. टी. रणदिवे होते. सर्वांच्या मधोमध एस्. एम्. जोशी तिरंगी राष्ट्रध्वज हातांत धरून होते. त्यांच्या पाठीमागें महाराष्ट्राच्या निरनिराळ्या विभागांतले कांहीं नेते होते. त्यांच्यामागोमाग स्त्री सत्याग्रही आणि त्यांच्या पाठीमागून पुरुष सत्याग्रही अशी मोर्च्याची रचना करण्यांत आली होती. प्रत्येक तुकडीच्या पहिल्या ओळींतल्या सत्याग्रहीच्या हातांत संयुक्त महाराष्ट्राच्या घोषणेचीं लाल निशाणें फडकत होतीं. लोकमान्य टिळकांचीं, महात्मा गांधींचीं आणि वासुदेव बळवंत फडक्यांचीं हारभूषित मोठमोठीं चित्रेंहि कित्येकांनीं हातांत धरलीं होतीं.

ठरल्याप्रमाणें बरोबर तीन वाजतां सत्याग्रही मोर्चा संयुक्त महाराष्ट्राच्या प्रचंड गर्जना करीत निघाला. रस्त्यावरील रहदारीला अडथळा न येईल अशा रीतीनें

रस्त्याच्या डाव्या बाजूनें व्यवस्थितपणें चालण्याची सर्वांना सूचना देण्यांत आली होती. त्यामुळें सर्व मोर्च्याला एखाद्या सैन्याच्या संचलनाचें शिस्तबद्ध स्वरूप आलें होतें. सर्व मोर्च्याची लांबी पाऊण मैल भरेल अशा रीतीनें तुकड्या पसरविण्यांत आल्या होत्या. कनॉट सर्कसला वळसा घालून लोकसभेकडे जाणाऱ्या विस्तीर्ण आणि लांब रस्त्यानें जेव्हां मोर्चा जाऊं लागला, तेव्हां तो देखावा खरोखर आकाशांतल्या देवांनीं पाहावा असा दिसूं लागला. सर्वांच्या डोक्यावर रंगीबेरंगी टोप्यांनीं, पटक्यांनीं, पगड्यांनीं आणि फेट्यांनीं एक विलक्षण शोभा त्या मोर्च्याला प्राप्त करून दिली होती. महाराष्ट्राच्या अगदीं कोनाकोपऱ्यांतून सत्याग्रही आले होते. महाराष्ट्राचा असा एकहि भाग नव्हता कीं ज्याचें त्या मोर्च्यांत प्रतिनिधित्व नव्हतें. अठरा वर्षांच्या वयापासून तो ऐशीं वर्षांच्या वयापर्यंतचे लोक त्या मोर्च्यांत होते. कांहीं दाढीवाले होते. कांहीं संन्यासी होते. बायकांमध्यें सुद्धां कॉ. नाना पाटलांची ऐशीं वर्षांची आई आणि पाऊणशें वर्षांची मावशी होती. कित्येक स्त्री सत्याग्रही आपापलीं तीन-तीन चार-चार वर्षांचीं मुलें कडेवर घेऊन चालल्या होत्या. सर्व स्त्रियांनीं पांढऱ्या शुभ्र रंगाचीं पातळें परिधान केलीं होतीं. सत्याग्रहींचे लाल बिल्ले सर्वांनीं आपल्या हृदयांवर लटकावलेले होते. सत्याग्रहासाठीं एवढ्या लांबून आलेल्या महाराष्ट्रीय स्त्री सत्याग्रहींचें दिल्लीकरांनीं जास्त कौतुक केलें.

एक वृद्ध शीख अचंबा करीत म्हणाला, "क्या मराठी औरतें ऐसी होती हैं? क्यां इसमेंसेही झांसीकी रानी पैदा हुई थी?" दुसरा एक उत्तरभारतीय म्हणाला, "वाहवा, बडे बहादुर है यह मराठी लोग!" ह्या सत्याग्रहांत खुद्द दिल्लीच्या पांच-पंचवीस स्थानिक कार्यकर्त्यांनीं जरी भाग घेतला असला तरी ऐन वेळीं मोर्च्याच्या स्फूर्तिदायक दर्शनानें प्रेरणा होऊन कांहीं दिल्लीकरहि सत्याग्रहांत दाखल झाले. त्यांपैकीं निळा फेटा घातलेला सफेत दाढीचा एक शीख प्रामुख्यानें दिसत होता. सत्याग्रह्यांच्या निरनिराळ्या तुकड्या निरनिराळ्या घोषणा देत होत्या. "हम क्या चाहते हैं? मुंबई! और क्या चाहते हैं? बेलगाम! और क्या चाहते हैं? कारवार!" "एक हमारी मांग है, हमें बंबई चाहिए!", "डंडे गोली खाएंगे, बंबई को मिलाएंगे!", "जबतक बंबई गुलाम है, तबतक आराम हराम है!", "गोलीबारकी जाँच करो, नहीं तो खुर्सी छोड दो!", "दिल्लीवालो साथ दो, बम्बई को न्याय दो", आणि "We want Bombay!" अशा निरनिराळ्या घोषणा होत्या. सर्वांत शाहीर अमर शेख ह्यांची तुकडी लोकांचें लक्ष्य

आपल्याकडे जास्त वेधून घेत होती. 'जागा मराठा आम जमाना बदलेगा !' हें त्यांच्या गाण्याचें चढ्या स्वरांतलें ध्रुपद सर्वांच्या अंगावर रोमांच उभे करीत होतें. खरोखरच तमाम मराठा जमाना बदलण्याच्या निर्धारानें आतां जागा झालेला आहे असें वाटत होतें. मोर्च्याच्या मधोमध भगवे फेटे घातलेली कोल्हापूरची तगडी तुकडी आणि अगदीं अखेरीस त्याच रंगाची फेटे घातलेली वेळगांव-निपाणीची तुकडीहि दिल्लीकरांच्या कौतुकाचा विषय होऊन बसली होती. कारण या तुकड्यांतील सत्याग्रहींचीं भरदार शरीरें दृष्ट लागण्यासारखीं होतीं. दिल्ली शहरांत आजपर्यंत कधीं कोणाला न दिसणारें तें अभूतपूर्व दृश्य बघून रस्त्याच्या दुतर्फा उभे राहिलेले दिल्लीचे स्त्री-पुरुष नागरिक महाराष्ट्राच्या मर्दुमकीचें कौतुक मनसोक्त करीत होते.

जवळ जवळ एक तासानें मोर्चा लोकसभेच्या समोर येऊन ठेपला. लोकसभेची प्रचंड आणि भव्य दगडी इमारत दृष्टीस पडतांच सत्याग्रह्यांच्या उत्साहाला कांहीं सीमा उरली नाहीं. त्यांच्या गर्जनांनीं आणि घोषणांनीं सारें वातावरण दणाणून टाकलें. लोकसभेच्या प्रवेशद्वारापाशीं पोलिसांचा कडेकोट बंदोबस्त होता. एका बाजूला पोलिसांच्या मोठमोठ्या लॉऱ्यांची रांगच रांग लागून राहिली होती. पोलीस हातांत हात घालून सांखळी करून उभे राहिले होते. त्यांच्यामागें बडेबडे पोलीस अधिकारी उभे होते. पोलिसांच्या हातांत लाठ्या, काठ्या, बंदुका किंवा पिस्तुलें हीं शस्त्रें दिसत नव्हतीं. देशोदेशींचे वार्ताहर संयुक्त महाराष्ट्राच्या या अभूतपूर्व सत्याग्रहाचे चित्रपट आणि चित्रें घेण्यासाठीं आपापले कॅमेरे घेऊन सज्ज उभे होते. लोकसभेच्या वाटोळ्या व्हरांड्यामध्यें शेकडों लोक उभे राहून सत्याग्रही मोर्च्याचें निरीक्षण करीत होते. एक बडे पोलीस अधिकारी बोलण्यासाठीं म्हणून आमच्याकडे आले. तोंच मोर्च्याच्या आघाडीची नेत्यांची तुकडी अशा कांहीं वेगानें आणि जोसानें पोलिसांची सांखळीं तोडून घुसली कीं पोलिसांची दाणादाण उडून गेली. पुन्हा महाराष्ट्राच्या गगनभेदी घोषणांचा गदारोळ उठला. पोलिसांच्या गाड्या आंत उभ्याच होत्या. प्रत्येक गाडींत पंचवीस ते तीस सत्याग्रही बसूं शकत होते. सत्याग्रह करून एक एक तुकडी आंत घुसली कीं एका रांगेनें पोलिसांच्या मोटारींत जाऊन बसे. मोटार भरली कीं ती चालूं लागे आणि तिच्या जागीं दुसरी मोटार येऊन उभी राही. असा सर्व कार्यक्रम अगदीं यंत्राप्रमाणें सुरळित आणि शांततेनें चाललेला पाहून दिल्लीचे पोलीस अधिकारी थक्क झाले.

कारण महाराष्ट्रीय सत्याग्रही हे दगड मारणारे हुल्लडबाज आहेत, अशी काँग्रेसश्रेष्ठींनीं त्यांची बदनामी देशभर करून टाकली होती. संयुक्त महाराष्ट्राच्या सत्याग्रहाला उद्देशून स्वतः पंडित नेहरू म्हणाले, "यह क्या तमाशा है ?" म्हणून महाराष्ट्रीय सत्याग्रह्यांबद्दल दिल्लीच्या पोलिसांच्या मनांत भलभलत्या कल्पना निर्माण झाल्या असल्यास नवल नाहीं. पण प्रत्यक्ष अनुभव मात्र नेमका उलटा आला म्हणून त्यांना विशेष अचंबा वाटला. दिल्लीच्या पोलिसांचीहि सत्याग्रहींशीं वागणूक अत्यंत सभ्यतेची आणि अदबीची होती. उन्ह जसें तापूं लागलें तशा सर्वांना तहाना लागल्या. तेवढ्यांत पोलिसांनीं पाण्याची मोटार आणली आणि सर्व सत्याग्रह्यांना लागेल तेवढें थंड पाणी पुरविलें. सत्याग्रह्यांवर लाठीमार आणि गोळीबार करणाऱ्या मुंबईच्या पोलीसाधिकारी-पशूंशीं तुलना करतां दिल्लीचे पोलीस खरोखरच देवमाणसासारखे भासले. संयुक्त महाराष्ट्राच्या घोषणा करीत सत्याग्रह्यांच्या तुकड्या पोलिसांच्या मोटारींमध्यें एकामागून एक शिरत होत्या. तें सर्वच दृश्य इतकें हृदयस्पर्शी होतें कीं पाहणाऱ्यांच्या डोळ्यांत पदोपदीं अश्रु उभे राहत होते. सत्याग्रह्यांना उत्तेजन देण्यासाठीं लोकसभेंतील विरोधी पक्षाचे अनेक खासदार प्रवेशद्वारापाशीं उभे होते. जवळ जवळ दोन-अडीच तास सत्याग्रहाचें काम चालू होतें. शेवटची तुकडी जायच्या वेळीं सव्वासहा वाजले होते. ही शेवटची तुकडी म्हणजे अमर शेखची. दोन तास त्यांचा पहाडी आवाज त्या वातावरणांत एकसारखा घुमून राहिला होता. 'जागा मराठा आम जमाना बदलेगा !' संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याचा सर्व उन्माद जणुं कांहीं अमर शेखच्या अंगांत संचारलेला होता. विलक्षण आवेशानें ते गात होते. त्यांच्या त्या वीरगीतानें दिल्लीचे हजारों लोक माना डोलावूं लागले. 'दो कौडी के मोल मराठा बिकने को तैयार नहीं !' ही ओळ त्यांच्या मुखांतून निघाली कीं टाळ्यांचा कडकडाट उठे. कित्येकदां पोलीसहि अनवधानानें टाळ्या वाजवीत ! 'जागा मराठा आम जमाना बदलेगा !' हें पालुपद गात गात अमर शेख आणि त्यांचे सहकारी शेवटच्या मोटारींत बसले. आणि संयुक्त महाराष्ट्राचा भारताच्या राजधानींतील हा अभूतपूर्व सत्याग्रह संपला !

दिल्लीमध्यें येऊन महाराष्ट्रीयांनीं खरोखरच दिग्विजय केला असाच एकमुखानें सर्वांनीं उद्गार काढला. ह्या शांततापूर्ण आणि शिस्तबद्ध सत्याग्रहानें, काँग्रेस श्रेष्ठींनीं संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या चळवळीवर आजपर्यंत केलेले आरोप किती खोटे आणि खोडसाळ आहेत हें साऱ्या जगाला दाखवून दिलें. देशमुखांच्या

राजिनाम्याच्या आणि निवेदनाच्या ज्वलन्त पार्श्वभूमीवर हा आदर्श सत्याग्रह झाल्यानें त्यानें दिल्लीकरांचे डोळे अगदीं दिपून गेले असल्यास नवल नाहीं. 'जागा मराठा आम' गीत गुणगुणत लोक घरोघर परतले. पोलीस अधिकाऱ्यांनीं सत्याग्रह्यांचे मजपाशीं आभार मानले. मींहि त्यांचें अभिनंदन केलें. स्त्री-सत्याग्रहींना त्यांच्या निवासस्थानीं नेऊन पोहोंचविल्याची बातमी त्यांनींच मला सांगितली. पुरुष-सत्याग्रह्यांना दिल्लीच्या तुरुंगांत नेऊन ठेवलें आहे असें तें म्हणाले. म्हणून आम्ही लगलेच मोटारींत बसून तुरुंगाकडे गेलों. तुरुंगाच्या बाहेरील आवाराला एका प्रचंड छावणीचें स्वरूप आलें होतें. पोलीस अधिकारी त्यांच्या नांवांच्या याद्या करून घेत होते. सर्व सत्याग्रह्यांवर सरकार सामुदायिक खटले भरणार असल्याचें पोलीस अधिकारी बोलत होते. इतक्यांत सर्व सत्याग्रह्यांना खटला न भरतां बंधमुक्त करण्याचें सरकारनें ठरविलें असल्याची बातमी एकदम येऊन थडकली. मग सत्याग्रह्यांच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. 'संयुक्त महाराष्ट्र'च्या जयजयकारानें तुरुंगाचे सारे प्राकार दणाणून गेले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं श्री. चिंतामणराव देशमुखांचा निरोप घ्यावयाला आचार्य दोंदे आणि मी असे दोघेजण गेलों. चिंतामणरावांची मुद्रा या वेळीं अत्यंत प्रफुल्लित वाटली. कृतकृत्यतेचें एक अपूर्व तेज त्यांच्या तोंडावर झळकत होतें. चिंतामणराव म्हणाले, "इतके दिवस संयुक्त महाराष्ट्रासंबंधीं मी कांहींहि कुठें बोलत नव्हतों. म्हणून महाराष्ट्रांतले कित्येक लोक माझ्यावर चिडले होते. पण दारूगोळा हा जमवून ठेवायचा असतो. वाटेल तसा रस्त्यावर उधळायचा नसतो. ही माझी भूमिका होती. शत्रूच्या सैनिकांच्या डोळ्यांचा पांढरा भाग दिसूं लागला म्हणजे मग बंदुका उडवा असें ड्यूक ऑफ वेलिंग्टन आपल्या सैनिकांना सांगत असे. योग्य प्रसंगीं मीं माझी तोफ डागली म्हणून त्याचा एवढा परिणाम झाला. आतां माझें कार्य संपलें. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ आतां तुम्ही नेटानें चालवा. मी तुम्हांस सल्ला देईन. नेतृत्व पत्करणार नाहीं. राजकारण हा माझा धर्म नाहीं. प्रत्येकानें स्वधर्मास जागावें. माझे शब्द नेहरूंना झोंबले. पण ते महाराष्ट्रद्वेष्टे आहेत असें मीं कधीं म्हटलें नाहीं. त्यांच्याभोंवतीं महाराष्ट्राचे जे शत्रू आहेत त्यांच्या विषाची नेहरूंना बाधा झालेली आहे असें माझें म्हणणें. मुंबई शहर महाराष्ट्रापासून तोडण्यांत देशाचें मुळींच कल्याण नाहीं. जर देशाचें कल्याण असतें तर तें शहर कायमचेंच वेगळें ठेवावयाला हवें होतें. पांच वर्षांनीं जर महाराष्ट्रांत त्याचा

समावेश करावयाचें ठरविलें तर मग देशकल्याणाचा मुद्दा खोटा ठरतो. सूर्य ज्याप्रमाणें पृथ्वीवरील पाणी शोषतो आणि मेघ तें पाणी शतपटीनें पृथ्वीला परत देतात, त्याप्रमाणें खेडेगांवांतील श्रम आणि संपत्ति शहरें शोषतात आणि त्याचा अनेक पटींनीं मोबदला त्यांना परत देतात. म्हणून ग्रामीण विभागापासून शहर निराळें तोडून काढणें हें अनर्थकारक आहे."

दुसऱ्या दिवशींच्या भाषणाच्या तयारींत ते गुंतले असल्यानें, त्यांचा फार वेळ घेणें आम्हांला प्रशस्त वाटलें नाहीं. म्हणून आम्ही लागलीच उठलों आणि त्यांना नमस्कार केला. तेव्हां आमच्या अगदीं जवळ येऊन भावनापूर्ण स्वरांत ते म्हणाले, "मीं माझ्या अर्थमंत्रीपदाचा राजीनामा कां दिला तें सांगूं? मुंबई केंद्रशासित झाल्यानें सर्वांत गरिबांचें फार नुकसान होणार आहे. ते पट्टेवाले, मजूर, कारकून, तीं मध्यमवर्गीयांचीं कुटुंबें या सर्वांचें जीवन उद्ध्वस्त होणार आहे. आणि हें सगळें कशासाठीं? त्यामुळें भारताचें कल्याण होतें आहे हेंहि समाधान आपल्याला लाभत नाहीं! मग कशासाठीं एवढ्या लोकांचा हा नाश करावयाचा?" चिंतामणराव एकदम थांबले. त्यांच्या सजल डोळ्यांमधून त्यांच्या हृदयांत उचंबळणाऱ्या मानवताप्रेमाचें महन्मंगल दर्शन आम्हांला झालें. आम्ही धन्य झालों!

५-८-१९५६

# सत्याग्रहासह सत्ताग्रह हवा !

मुंबई आणि बेळगांव-कारवार ह्यांचा समावेश 'संयुक्त महाराष्ट्रां'त व्हावा एवढ्यासाठीं तीन कोटी मराठी जनतेच्या वतीनें सर्वपक्षीय 'संयुक्त महाराष्ट्र समितीनें' आतांपर्यंत सत्याग्रही लढा अत्यंत यशस्वी रीतीनें चालविलेला आहे ही गोष्ट जगजाहीर आहे. स्वातंत्र्याच्या आंदोलनांतहि महाराष्ट्रांतून एवढे सत्याग्रही गेले नव्हते. ह्या सत्याग्रहाच्या लढ्यानें कॉंग्रेसश्रेष्ठींच्या मनावर अजून व्हावा तितका परिणाम झालेला दिसत नाहीं. कारण संयुक्त महाराष्ट्राची मागणी त्यांनीं अद्याप मान्य केलेली नाहीं. मुंबई पांच वर्षें केंद्रशासित करावयाचें त्यांनीं ठरवलेंच आहे. ह्या निर्णयाला चिकित्सा समितीनें पाठिंबा दिलेला आहे. म्हणून लोकसभाही त्याला मान्यता देईल हें उघडच आहे. म्हणूनच सत्याग्रहाचा व्हावा तो परिणाम कॉंग्रेसश्रेष्ठींच्या मनावर झालेला दिसत नाहीं असें आम्हीं म्हटलें. तथापि कॉंग्रेसवाल्यांना संयुक्त महाराष्ट्राचा हा सत्याग्रह सहन होत नाहीं, एवढेंच नाहीं तर त्यामुळें त्यांची फार पंचाईत झालेली आहे ही गोष्ट मात्र नक्की.

पंडितजींनीं तर ह्या सत्याग्रहाल उघड उघड शिव्याच दिल्या. ते म्हणाले, "हा काय तमाशा आहे ?" काकासाहेब गाडगीळ, शंकरराव देव, रावसाहेब पटवर्धन ह्यांना सत्याग्रहाच्या मिरच्या फार झोंबतात. ह्या सगळ्यांचें सांगणें एक, 'सत्याग्रह नको. सत्याग्रह बंद करा.' सत्याग्रहाची बदनामी करण्याचीहि पराकाष्ठा कॉंग्रेस-वाल्यांनीं गुंडांच्या मदतीनें कांहीं कमी केली नाहीं. ह्यावरून सत्याग्रहाचा प्रभाव कॉंग्रेसपक्षीयांच्या मनावर चांगलाच पडत चाललेला आहे हें उघड आहे. अर्थात् कॉंग्रेसवाले अप्रामाणिक असल्यानें ही गोष्ट ते कबूल करीत नाहींत. सत्याग्रहानें दुसरी एक अभूतपूर्व गोष्ट साधली ती ही कीं महाराष्ट्रीय जनतेमध्यें प्रचंड जागृति आणि एकजूट घडवून आणली म्हणून सत्याग्रहाचें शस्त्र म्यान न करतां अधिक प्रभावीपणानें कसें वापरतां येईल ह्याचा विचार 'संयुक्त महाराष्ट्र समितीनें' अकोला येथें केला हें यथायोग्यच झालें.

त्यानंतर आतां ऑक्टोबरमध्यें मुंबई केंद्रशासित होणार, बेळगांव-कारवार कर्नाटकमध्यें जाणार आणि महाविदर्भाचे आठ जिल्हे, महाराष्ट्राचे बारा जिल्हे आणि मराठवाड्याचे पांच जिल्हे असे पंचवीस जिल्ह्यांचें 'नवें महाराष्ट्र राज्य अस्तित्वांत, येणार आणि त्यानंतर सहा महिन्यांनीं लागलेच सार्वत्रिक निवडणुका होणार. ह्या ज्या महत्त्वाच्या घटना होणार आहेत त्यासंबंधीं संयुक्त महाराष्ट्र समितीनें आपलें धोरण शक्य तितक्या लौकर ठरवणें जरूर आहे. 'महाराष्ट्रांत कॉंग्रेसला निवडणुका लढवणें अशक्य आहे' अशी जरी मामा देवगिरीकरांनीं पूर्वी आरोळी ठोकली असली आणि 'निवडणुकांत कॉंग्रेसचा पराभव झाला तरी मला त्याची परवा नाहीं' अशी स्मशानवैराग्याची नाटकी बतावणी जरी नेहरूंनीं केली असली, तरी नव्या महाराष्ट्र राज्याची जबाबदारी उचलण्याच्या तयारीला महाराष्ट्रांतले कॉंग्रेस नेते जोरानें लागलेले आहेत, हें हिरे आणि चव्हाण ह्यांच्या ज्या वक्तव्यांची चीरफाड गेल्या अंकीं आम्हीं केली आहे त्यावरून दिसून येतें.

'येत्या निवडणुकींत महाराष्ट्रांत कॉंग्रेसचाच विजय होईल' अशी चव्हाणांना आशा वाटत असून नवमहाराष्ट्राचें राज्य आपण नेकीनें आणि कौशल्यानें चालवलें तर मुंबई आपल्याला निश्चित परत मिळेल असा चव्हाणांना आत्मविश्वास वाटतो आहे. तीन कोटी संयुक्तमहाराष्ट्रवादी जनतेची एवढी प्रचंड एकजूट झालेली असतांना आणि आज कॉंग्रेस मंत्र्यांना आणि नेत्यांना उघडपणें जनतेमधून वावरणें अशक्य झालें असतांना सुद्धां आगामी निवडणुकांत महाराष्ट्रामध्यें कॉंग्रेसच यशस्वी होईल असें जें चव्हाण छातीवर हात मारून सांगत आहेत तें कसें? उगाच वारेमाप वल्गना करून ते लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकीत आहेत का त्यांच्या डोळ्यांसमोर कांहीं निराळाच हिशेब आहे? केवळ चव्हाणच नव्हेत तर कॉंग्रेसमधले दुसरेहि कित्येक नेते महाराष्ट्रांतल्या निवडणुकांत कॉंग्रेसच यशस्वी होईल असें गंभीरपणें बोलत असलेले आम्हांस माहीत आहे. असें ह्या मंडळींना कां वाटत असावे? ह्याचा संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांनीं विचार करायला हवा.

आमच्या दृष्टीनें असें त्यांना वाटण्याचीं पुष्कळ कारणें आहेत. पहिली गोष्ट ही कीं संयुक्त महाराष्ट्र समितीमधें समाविष्ट झालेल्या निरनिराळ्या राजकीय पक्षांमध्यें आणि व्यक्तींमध्यें अनेक मतभेद आहेत हें त्यांना माहित आहे. आगामी निवडणुकामध्यें जनतेपुढें कार्यक्रम काय ठेवावा आणि निवडणुका जिंकल्या तर सत्तास्वीकार करावा कीं नाहीं ह्या प्रश्नावर ह्या पक्षांमध्यें मतैक्य होणार नाहीं ह्याबद्दल

त्यांची शंभर टक्के खात्री आहे. दुसरी गोष्ट ही कीं शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन-सारखा महत्त्वाचा राजकीय पक्ष अद्याप 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या चळवळींत उतरलेला नाहीं. महाविदर्भात पंचवीस टक्के अस्पृश्य जनता आहे. आणि मराठवाड्यांत वीस टक्के. त्यांच्या सर्व मिळून एकंदर पंचावन्न ते छप्पन्न राखीव जागा आहेत. हा पक्ष आपल्यामध्यें आला नाहीं तरी निदान तो 'संयुक्त महाराष्ट्रवाद्यां'मध्यें तरी सामील होऊं नये अशा कॉंग्रेसवाल्यांच्या कारवाया चालू आहेत. आणि त्या कारवाया यशस्वी होतील असें त्यांना निश्चयानें वाटतें. तिसरी गोष्ट ही कीं महाविदर्भामध्यें जनता जरी सत्तर टक्के संयुक्तमहाराष्ट्रवादी असली तरी कॉंग्रेसखेरीज दुसरा कोणताहि पक्ष त्या ठिकाणीं संघटित नाहीं. म्हणून महाराष्ट्रांतलें अपयश आपण महाविदर्भात भरून काढू अशी कॉंग्रेसवाल्यांना खात्री वाटते. ह्याखेरीज, सत्ता, संपत्ति आणि इतर अनेक साधनें कॉंग्रेसला अनुकूल आहेत म्हणून आपण यशस्वी होऊं असें कॉंग्रेसनेत्यांना वाटत असावें. कॉंग्रेसला यश मिळेल असें ज्या कारणांमुळें वाटतें त्या कारणांचें निर्मूलन कसें करतां येईल ह्याचा संयुक्त महाराष्ट्रवाद्यांनीं गंभीर-पणें विचार करावयाला हवा.

त्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे पुढील गोष्टी करणें जरूर आहे: (१) संयुक्त महाराष्ट्र समितीमधील सर्व पक्षांची कार्यक्रमाच्या आणि सत्तास्वीकाराच्या प्रश्नावर एकजूट घडवून आणणें, (२) ह्या एकजुटींत शेड्यूल्ड कास्ट फेडरेशनला आणण्याची पराकाष्ठा करणें, आणि (३) महाविदर्भात नि मराठवाड्यांत संयुक्तमहाराष्ट्रवादी एकजुटीची संघटना जास्त सामर्थ्यवान् करणें. ह्या जर गोष्टी साधल्या तर बाकीच्या साधनसामग्रीची प्रतिकूलता असूनहि संयुक्त-महाराष्ट्रवाद्यांना आगामी निवडणुकांत कॉंग्रेसचा निश्चित पराभव करतां येईल. पण हें सगळें साधावें कसें? अकोला येथें 'संयुक्त महाराष्ट्र समिती'नें आगामी निवडणुका केवळ मुंबई-बेळगांवच्या एका प्रश्नावर 'संयुक्त आघाडी'च्या (united platform) विद्यमानें लढवाव्यात असें ठरविलें. निवडणुका जिंकल्या-नंतर पुढें काय करावें, तरीहि मुंबई-बेळगांव देण्यास मध्यवर्ती सरकारनें नकार दिला तर ताबडतोब राजिनामे देऊन पेचप्रसंग घडवून आणावा का सत्तास्वीकार करून कॉंग्रेसच्या जुलूमशाहींतून जनतेची शक्य तितकी सुटका करावी आणि संयुक्त-महाराष्ट्रवादी लढा अधिक सामर्थ्यवान् आणि प्रतिष्ठित करावा ह्यासंबंधीं समितीनें कांहींच निर्णय घेतला नाहीं. हें त्या वेळची परिस्थिति पाहून ठरवावें असें ठरलें.

अकोला येथें 'संयुक्त महाराष्ट्र समिती'नें हा जो निर्णय घेतला तो घटक पक्षांमधील वैचारिक मतभेद जास्तींत जास्त किती मिटवतां येतील ह्या एकाच दृष्टीनें घेतला आणि म्हणून प्रत्येक पक्षाला आपापल्या भूमिकेंत थोडेंथोडें पडतें घ्यावें लागलें. आम्हीही ह्या निर्णयाचें जें मनसोक्त अभिनंदन केलें तें एकाच भावनेनें, कीं समितींत समाविष्ट झालेल्या पक्षांची काय वाटेल तें झालें तरी एकजूट विसकटूं नये. तथापि, ह्या एकजुटीचें स्वरूप अद्यापहि पुष्कळसें विस्कळित आहे आणि हा विस्कळितपणा जर लौकर नाहींसा केला नाहीं तर त्यामधून पुढें फार धोका निर्माण होण्याचा संभव आहे ह्या विचारानें आमचें चित्त अत्यंत अस्वस्थ झालेलें आहे हें मात्र ह्या ठिकाणीं कबूल करणें आम्हांला आवश्यक वाटतें. त्याखेरीज निवडणुकांकडे पाहण्याचें समितीमधील कित्येक मंडळीचें तत्त्वज्ञान तर्कशुद्ध नाहीं असें आम्हांस प्रामाणिकपणें वाटतें. म्हणून ह्या प्रश्नासंबंधीं कित्येक मुद्द्यांचा आणि आक्षेपांचा मौलिक विचार करावयास हवा.

आमचें स्वतःचें असें मत आहे कीं 'संयुक्तमहाराष्ट्र समिती'मध्यें समाविष्ट झालेले कित्येक पक्ष परस्परांमधील वैचारिक मतभेदांचें वाजवीपेक्षां जास्त स्तोम माजवतात. विशेषतः लहान मनांचीं आणि अपुऱ्या अनुभवाचीं जीं माणसें आहेत तीं केवळ या मतभेदांच्या वादविवादावरच आपली गुजराण करीत असतात. संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाच्या अत्यंत व्यापक आणि वास्तववादी दृष्टीनें विचार करावयाला हवा. कोणताहि पक्ष जनतेपेक्षां मुळीं मोठा असूं शकत नाहीं. महाराष्ट्रांतली तीन कोटी जी जनता आहे तिच्यापैकीं ऐशीं टक्के जनता कुठल्याहि राजकीय पक्षांत नाहीं. उरलेली वीस टक्के जनता निरनिराळ्या राजकीय पक्षांत विभागलेली आहे. सबंध जनतेच्या मानानें सर्व राजकीय पक्ष अत्यंत लहान आहेत. असें असतां ह्या लहानसहान पक्षांनीं आम जनतेचा विचार न करतां आपापल्या पक्षांचीच भूमिका जनतेवर लादण्याचा प्रयत्न करावा हा मोठा जुलूम आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यांत भाग घेणाऱ्या सर्व मंडळींनीं आपण प्रथम महाराष्ट्रीय आहोंत ही जाणीव बाळगली पाहिजे. त्यानंतर आपण अमुक अमुक पक्षाचे आहोंत हें स्मरण त्यांनीं मनांत ठेवावें.

अखिलभारतीय दृष्टि बाळगून संयुक्त महाराष्ट्राचा लढा लढावा हें म्हणणें जरी चिंत्य असलें तरी अखिल भारतीय पातळीवरून ह्या लढ्याच्या स्वरूपाचें यथार्थ आकलन होणें अशक्य आहे असें आम्हांस वाटतें. म्हणून अखिलभारतीय

पक्षांनीं महाराष्ट्रामधील आपापल्या शाखांना संयुक्तमहाराष्ट्राचा लढा लढण्याच्या कामीं संपूर्ण स्वातंत्र्य द्यावयास हवें. हें अखिलभारतीय पक्षांचें वर्चस्व ज्या क्षणीं कमी होईल, त्या क्षणीं महाराष्ट्रामध्यें सर्वपक्षीयांची एकजूट होईल. महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसहि महाराष्ट्रापेक्षां काँग्रेसला अधिक मानते. चव्हाणांनीं तसें बोलूनहि दाखवलें आहे. म्हणूनच संयुक्त महाराष्ट्र निर्माण करण्याचे कामीं तिला संपूर्ण अपेश आलें. एवढ्यासाठीं महाराष्ट्रांतला जो राजकीय पक्ष महाराष्ट्राचा विचार आधीं न करतां आपल्या पक्षाचा विचार करील, तो महाराष्ट्र काँग्रेसचेंच अनुकरण करील. त्याला संयुक्त महाराष्ट्राचा लढा संपूर्ण महाराष्ट्रीय निष्ठेनें लढतां येणार नाहीं. अतिरेकी पक्षीय दृष्टि नष्ट झाल्यावांचून संयुक्त महाराष्ट्रवादी मंडळींत खरीखुरी एकजूट निर्माण होणार नाहीं असें आम्हांस मनापासून वाटतें. दुसरी गोष्ट अशी कीं काँग्रेसखेरीज कोणाहि एका राजकीय पक्षाला स्वतःच्या सामर्थ्यावर निवडणुका जिंकतां येणार नाहींत. भारतांत तर नाहींच नाहीं--पण महाराष्ट्रांत सुद्धां नाहीं! ही अशी परिस्थिति नेहरू असेपर्यंत तरी राहणारच. म्हणून 'संयुक्त आघाडी' बनवल्यावांचून जनतेच्या वतीनें काँग्रेसशीं टक्कर देणें केव्हांहि अशक्य आहे, ही गोष्ट महाराष्ट्रांतल्या सर्व राजकीय पक्षांनीं ध्यानांत धरावी.

कोणत्याहि राजकीय पक्षानें कितीहि खळखळ केली तरी त्याच्या नशिबाची 'संयुक्त आघाडी' कांहीं यापुढें टळत नाहीं. आजच्या काळाचें हें चिन्हच आहे. त्याला कोण काय करणार? म्हणून 'संयुक्त आघाडी'च्या प्रश्नाचा प्रत्येक पक्षानें अत्यंत दूर दृष्टीनें विचार करावयाला हवा. आज जरी ती गोष्ट टाळली तरी उद्यां ती गोष्ट तुमच्या डोक्यावर बसल्यावांचून राहत नाहीं. 'संयुक्त आघाडी' हा शब्द ज्या अर्थानें वापरला जातो, त्या अर्थानें कांहीं अकोला 'संयुक्त महाराष्ट्र समिती'ची एकजूट झालेली नाहीं हें उघडच आहे. पुष्कळांना 'संयुक्त आघाडी' बनविणें म्हणजे कमीपणा वाटतो. राजकीय दौर्बल्याचें तें लक्षण आहे असें ते म्हणतात. पण काँग्रेसनें देशांत निर्माण केलेल्या सर्वाधिकारशाहीला यशस्वी तोंड द्यावयाला 'संयुक्त आघाडी' वांचून दुसरा मार्गच नाहीं, 'संयुक्त आघाडी'वांचून काँग्रेसच्या जुलमी मगरमिठींतून सुटका होण्याची जनतेला मुळीं आशाच नाहीं हा विचार केला, म्हणजे 'संयुक्त आघाडी' हें राजकीय दौर्बल्याचें लक्षण न वाटतां, राजकीय सामर्थ्याचें प्रतीक वाटेल.

'संयुक्त महाराष्ट्र समिती'मधील समाजवादी गटांचें म्हणणें असें आहे

कीं आगामी निवडणुका हें 'संयुक्त महाराष्ट्र'च्या प्रश्नावरील एक सार्वमत (Referendum) आहे असें मानण्यांत यावें. मुंबई-बेळगांवसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण झाला पाहिजे ह्या निर्धाराच्या मागें बहुसंख्य मराठी जनता उभी आहे ह्याचें निदर्शन ह्या निवडणुकीमधून भारत सरकारला व्हावें. त्या निदर्शनानेंहि भारत सरकारची खात्री झाली नाहीं तर राजिनामे देऊन बाहेर पडावें. 'मुंबई केंद्रशासित तर महाराष्ट्र केंद्रशासित !' असें भारत सरकारला आपण आव्हान द्यावें. बरें, निवडणुकींतल्या आपल्या यशानें भारत सरकार जर नमलें आणि त्यानें मुंबईचा आणि बेळगांवचा संयुक्त महाराष्ट्रामध्यें समावेश करावयाला मान्यता दिली, तर मग 'संयुक्त आघाडी' विसर्जन करून तिच्यांतील सर्व राजकीय पक्षांनीं बाहेर पडावें आणि आपापल्या कार्यक्रमावर पुन्हा निवडणुका लढवून महाराष्ट्राचीं सत्तासूत्रें काबीज करावींत. आम्हांला ही सर्वच्या सर्व भूमिका अशास्त्रीय आणि अव्यवहार्य वाटते.

राज्यशास्त्रांत 'निवडणूक' ह्या शब्दाला विशेष अर्थ आहे. त्याचे उद्देश आणि व्याप्ति ठरलेली आहे. ज्या ब्रिटिश पार्लमेंटरी राज्यपद्धतीचें आपण ह्या देशांत अनुकरण करतों त्या राज्यपद्धतीमध्यें निवडणुकांचा हेतू सत्तेमध्यें बदल घडवून आणावयाची जनतेला संधि देणें हा असतो. जो पक्ष अधिकारारूढ असेल तो जर लोककल्याणाच्या दृष्टीनें राज्यकारभार करीत असेल तर सत्ता त्याच्याच हातीं राहावी असें जनता निवडणुकींत ठरविते. बरें, अधिकारारूढ पक्ष हा नालायक आणि लोकविरोधी आहे असें वाटत असेल, तर जनता त्याच्या हातून सत्ता काढून घेते आणि लायक पक्षाच्या हातीं ती सोपविते. राज्य करण्याची सत्ता कोणाच्या हातीं राहावी हें ठरविणें हा निवडणुकांचा एकमेव उद्देश आहे. अशा निवडणुकांचा उपयोग केवळ सार्वमतासाठीं करावयाचा, सत्ताग्रहणाच्या दृष्टीनें करावयाचा नाहीं ही निवडणुकांकडे पाहण्याची दृष्टि लोकशाहीविरोधी (un-parliamentary) आहे. ब्रिटिश पार्लमेंटरी राज्यपद्धतीवर गांधीवादाचें कलम चढवण्याचा हा प्रयत्न आहे. तो यशस्वी होणार नाहीं.

निवडणूक हें एक प्रचंड यंत्र आहे. त्यासाठीं अमर्याद मनुष्यबळ आणि द्रव्यबळ लागतें. त्या यंत्राशीं लहानसहान खेळ करणें बरोबर नाहीं. त्या यंत्राचा जो उपयोग आहे तोच करावयाला पाहिजे. सगळ्या जंगलाला आग लावायची आणि त्यावर भाजायचें काय तर म्हणे एक थालिपीट. निवडणुकांचा केवळ

सार्वमतासारखा उपयोग करणें हें तितकेंच हास्यास्पद आहे. अचाट प्रयत्न करून निवडणुका जिंकावयाच्या आणि आपला हेतु ताबडतोब साध्य झाला नाहीं तर राजिनामे देऊन बाहेर पडावयाचें हें कांहीं राजकीय शहाणपणाचें लक्षण नाहीं. तीन कोटी मराठी जनतेच्या आकांक्षा हेतुपुरःसर दडपण्याचें पंडित नेहरूंनीं ठरविलें आहे. निवडणुका तुम्हीं जिंकल्या रे जिंकल्या कीं ते ताबडतोब शरण येतील असें तुम्हांला वाटतें? शक्य नाहीं. ही दीर्घकाल टिकणारी लढाई आहे. म्हणून निवडणुकींत आपण यशस्वी होऊनहि आपलें ध्येय ताबडतोब साध्य झालें नाहीं तर सत्ता हातीं घेऊन हा आपला लढा अधिक प्रखर आणि प्रभावी करण्याचा आपण प्रयत्न करावयाला हवा. आपण राजिनामे दिले तर कॉंग्रेसला ते हवेच आहेत. कारण निवडणुकांत पराभव होऊनहि राष्ट्रपतीची राजवट आली कीं पुन्हां कॉंग्रेसवाल्यांच्या हातीं सारीं सत्तासूत्रें येतातच आहेत. म्हणून 'मुंबई केंद्रशासित तर महाराष्ट्र केंद्रशासित' ही घोषणा केवळ अविचाराचीच नाहीं तर आत्मघातकीपणाची आहे. 'तुम्हीं माझें नाक कापलेंत तर मी माझा गळा कापून घेईन' असें म्हणण्यासारखेंच तें आहे.

निवडणुका जिंकून संयुक्त महाराष्ट्राचें आपलें ध्येय साध्य झाल्यानंतर मग राजिनामे देऊन पुन्हा प्रत्येक पक्षानें आपापल्या कार्यक्रमावर निवडणुका लढवावयाच्या ही शक्कल ज्या टाळक्यांतून निघाली असेल त्याचें कौतुक करावयाला आमच्याजवळ तर शब्दच नाहींत. म्हणजे एवढे भगीरथ प्रयत्न करून 'संयुक्त महाराष्ट्रा'ची गंगा दिल्लीहून महाराष्ट्रांत आणावयाची आणि ती कॉंग्रेसच्या गटारामध्यें ओतावयाची. वाहवा, खूप! समाजवादी पक्षाच्या विचारसरणींत ज्या ह्या निरनिराळ्या विसंगति निर्माण झालेल्या दिसताहेत त्याचें एक कारण म्हणजे 'संयुक्त आघाडी' बद्दल त्यांच्या मनांत असलेले पूर्वग्रह. आणि दुसरें कारण म्हणजे त्यांच्या बुद्धिवादाला लागलेली गांधीवादाची कसर. हे दोन्हीहि दोष दूर करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला म्हणजे 'संयुक्त आघाडी' आणि 'निवडणुका' ह्यांकडे पाहण्याची वास्तववादी दृष्टि त्यांना प्राप्त होईल.

२९-७-'५६

# पाताळांत गाडा हें महाद्विभाषिक !

अखेर शेवटीं महाराष्ट्रांतल्या आणि गुजरातेमधल्या पांच कोटी जनतेला अक्षरानें-सुद्धां न विचारतां लोकसभेवरील बहुसंख्य उत्तरभारतीय आणि बिहारी पुरभय्यांनीं आपल्या बहुमताच्या जोरावर 'महाद्विभाषिक राज्य' तिच्यावर जबरदस्तीनें लादलें आणि पंडित नेहरूंनीं अत्यंत कृतकृत्यतेच्या स्वरांत "हें महाद्विभाषिक राज्य म्हणजे राष्ट्राला मिळालेली एक बहुमोल देणगी आहे!" असें ह्या 'महान् ऐतिहासिक निर्णया'चें स्वागत करून समाधानाचा भला मोठा सुस्कारा टाकला! सद्गदित कंठानें नेहरू आणखी म्हणाले कीं, "महाद्विभाषिक राज्य हा मला पहिल्यापासूनच आदर्श पर्याय वाटत होता. त्याचा नाट्यपूर्ण जीर्णोद्धार जो अकस्मात् झाला त्याच्यामागें एकादी 'अदृश्य शक्ति' असावी असें मला वाटतें. लोकसभेचा हा प्रचंड विजय आहे. ह्या निर्णयानें देशांतील आकुंचितवादाची मृत्युघंटा वाजली!" असें म्हणून ह्या द्विभाषिकाची कल्पना यशस्वी करण्यांत त्या 'अदृश्य शक्ती'ला ज्यांनीं दृश्य हातभार लावला त्या सर्व कॉंग्रेसवाल्यांच्या नेहरूंनीं पाठी थोपटल्या! लोकशाहीचा हा प्रचंड विजय झाला असा सर्व सिद्धसाधकांनीं प्रचंड जयघोष केला!

गृहमंत्री गोविंद वल्लभ पंत उद्गारले कीं, "हा आदर्श आणि खराखुरा राष्ट्रीय निर्णय असून तो लोकसभेच्या स्वयंस्फूर्तीमधून निर्माण झाला!" तिकडे तो मद्रासचा कोल्हा राजगोपालाचारियर तर आनंदातिशयानें ओक्साबोक्शीं रडू लागला. तो म्हणाला, "आज टिळक आणि गांधी पुन्हा जिवंत झाले असें मला वाटतें!" महाराष्ट्रांतल्या आणि गुजरातमधल्या पांच कोटी जनतेच्या भावनेशीं आणि जीवनाशीं पंडित नेहरू आणि त्यांचे साथीदार कॉंग्रेसश्रेष्ठी यांनीं गेले नऊ महिने जो भयानक खेळखंडोबा चालवला होता त्याचा त्यांनीं अशा राक्षसी रीतीनें शेवट करून लोकशाहीचा अगदीं राजरोसपणें खून पाडला! याबद्दल त्यांना लाज नाहीं, लज्जा नाहीं, दुःख नाहीं कीं पश्चात्ताप नाहीं. असे बेशरम आणि कपटी राज्यकर्ते जगाच्या पाठीवर आजपर्यंत कुठें झाले नसतील.

जो भाषिक राज्याचा प्रश्न सोडवण्याचा गेलीं आठ वर्षें सतत प्रयत्न चाललेला आहे—ज्यासाठीं एक नाहीं तीन निरनिराळ्या कमिश्या नेमण्यांत आल्या आणि त्यांनीं वर्ष वर्ष साक्षी घेतल्या, पुरावे जमविले, सारा देश पायाखालीं तुडवला तरी सुद्धां त्यांना जो प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडवतां आला नाहीं, तो लोकसभेच्या सभासदांनीं घाईघाईनें सह्या गोळा करून चार दिवसांच्या आंत चुटकीसरशीं सोडवावा आणि पंडित नेहरूंसारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या मुत्सद्दयांनीं त्या निर्णयाचें 'महान् ऐतिहासिक निर्णय' म्हणून स्वागत करावें, ह्यापेक्षां राजकारणाची अधिक घोर विटंबना होऊं शकेल काय? एकाच प्रश्नावर नऊ महिन्यांत जे नऊ निर्णय देतात ते ह्या देशावर राज्य करण्यास लायक आहेत असें कोणाला म्हणतां येईल काय?

गेल्या वर्षाच्या ऑक्टोबर महिन्यांत विदर्भावांचून द्विभाषिक राज्य सुचविण्यांत आलें. लगलीच पुढच्या महिन्यांत मुंबई, गुजरात आणि महाराष्ट्र हीं तीन निरनिराळीं राज्यें पाडण्यांत आलीं. नंतर जानेवारी महिन्यांत मुंबईचें स्वतंत्र राज्य खतम् करण्यांत येऊन मुंबई केंद्रशासित करण्याची घोषणा ठोकण्यांत आली. पुढें जून महिन्यांत पांच वर्षें मुंबई केंद्रशासित राहणार असल्याची दुसरी घोषणा पुकारण्यांत आली. आणि आतां ऑगस्टच्या पहिल्या आठवड्यांत पूर्वीच्या सर्व घोषणांवर आणि निर्णयांवर सपशेल बोळा फिरवण्यांत येऊन महाद्विभाषिक राज्याची नवी द्वाही पुकारली गेली ! ह्यापेक्षां लोकशाहीचे जास्त धिंडवडे आणि राजकीय मुत्सद्देगिरीची अधिक दिवाळखोरी जगांत कोठें कोणाला पाहावयाला मिळूं शकेल काय ? आणि सगळ्यांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे ही कीं ज्या लोकांचें भवितव्य ह्या निर्णयावर अवलंबून आहे त्या लोकांच्या इच्छा आणि आकांक्षा प्रत्येक निर्णयाच्या वेळीं सपशेल दडपून टाकून त्यांच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काला हरताळ फासायला राज्यकर्त्यांना यत्किंचित्हि शरम वाटली नाहीं.

मुंबईचें स्वतंत्र राज्य करायचें का ती केंद्रशासित करायची हें ठरवायचें कोणीं ? तर नेहरूंनीं तिकडे दिल्लींत बसून. आणि महाराष्ट्र-गुजरातचें महाद्विभाषिक राज्य करण्याचा निर्णय घ्यायचा कोणीं ? तर लोकसभेंत बसलेल्या उत्तर भारत आणि बिहारमधल्या पुरभय्यांनीं आपापसांत सह्या गोळा करून. मूठभर पुढाऱ्यांनीं आपल्या मर्जीला वाटेल तो निर्णय घ्यावयाचा आणि जनतेच्या डोक्यावर जबरदस्तीनें लादावयाचा हा काँग्रेसछाप लोकशाहीचा अजब शिरस्ता काँग्रेसश्रेष्ठींनीं हिंदुस्थानच्या

फाळणीपासून जो सुरू केला आहे, तो अजून चालूच आहे. त्याच शिरस्त्याला अनुसरून महाराष्ट्राच्या आणि गुजरातच्या जनतेवर हा 'महाद्विभाषिक' राज्याचा महाभयंकर बलात्कार आतां करण्यांत येत आहे.

जें कोणाच्या ध्यानीं मनीं आणि स्वप्नीं सुद्धां नव्हतें तें महाराष्ट्र-गुजरातचें महाद्विभाषिक राज्य एकाद्या वादळासारखें अकस्मात् लोकसभेमध्यें उपटलें कसें आणि पाहतां पाहतां आकाशांतल्या कुऱ्हाडीप्रमाणें उभय प्रदेशांतील पांच कोटी जनतेच्या डोक्यावर येऊन एकदम आदळलें कसें हा भारतीय राजकारणांतला या शतकामधला अभूतपूर्व चमत्कार म्हणून निःसंशय गणला जाईल. हा चमत्कार पाहिला म्हणजे आतां यापुढें ह्या देशामध्यें काय वाटेल तें होऊं शकेल असें मानावयाला मुळींच हरकत नाहीं. दीडशें वर्षांच्या भगीरथ प्रयत्नांनीं मिळवलेल्या स्वराज्याचा अवघ्या नऊ वर्षांच्या आंत हे कॉंग्रेसवाले असा खेळखंडोबा करतील अशी कल्पना तरी कुणाला होती का? उद्यां नेहरूंनीं असें ठरविलें कीं महाराष्ट्रांतील सर्व लोकांनीं आपापल्या डोक्यावर चालावयाचें आणि त्या ठरावाला लोकसभेंतील दोनशें पुरभय्यांनीं हात वर करून पाठिंबा दिला म्हणजे खरोखरच सर्व मराठी माणसांना आपल्या तंगड्या वर करून टाळकीं घाशीतच रस्त्यावरून चालावें लागेल! असल्या बिनभरंवशाच्या लहरी लोकशाहीपेक्षां ती ठगठणीत सुलतानशाही बरी असाच नाइलाजानें पुष्कळांना निष्कर्ष काढावा लागेल.

महाद्विभाषिक राज्याची ही कल्पना अकस्मात् कशी निर्माण झाली, ती कां निर्माण झाली आणि कुणीं निर्माण केली ह्यासंबंधीं सर्वसामान्य माणसांना फारच मोठा अचंबा वाटत असेल. आजच्या राज्यकर्त्यांच्या मनांत महाराष्ट्राविरुद्ध वैरभाव(animus) आहे असें चिंतामण देशमुखांनीं नेहरूंच्या तोंडावर सांगून एक आठवडासुद्धां लोटला नसेल. त्याचप्रमाणें आजच्या राज्यकर्त्यांनीं महाराष्ट्राविरुद्ध एक भयंकर कट रचला आहे असें काकासाहेब गाडगीळ ओरडून ओरडून दमले. ह्या वैरभावाचें आणि कटाचें काय झालें? तो वैरभाव आणि कट आतां एकदम नाहींसा झाला आणि कॉंग्रेसश्रेष्ठींच्या अंतःकरणांत महाराष्ट्रप्रेमाची राजापुरी गंगा एकदम उचंबळून आली अन् त्या प्रेमाच्या नि सद्भावाच्या गंगाप्रवाहामधून हें महाद्विभाषिक मुंबई राज्य प्रकट झालें असें सर्वसामान्य माणसांनीं समजावयाचें कीं काय? ह्या सर्व घटनेच्या मागें 'अदृश्य शक्ति' आहे, असा पंडित नेहरूंना साक्षात्कार झाला आहे तर 'महाद्विभाषिक राज्या'च्या दर्शनानें आमच्या नाशिकच्या 'परमिट-गोविंद' देश-

पांड्यांना एवढें भडभडून आलें कीं, त्यांना बोलवेना. भावनाकंपित स्वरांत ते कसेबसे उद्गारले कीं, "ही सर्व ईश्वरी प्रेरणा आहे!"

विदर्भ आणि महाराष्ट्र काँग्रेसच्या नेत्यांनीं आपापल्या प्रदेश काँग्रेस समित्यांना न विचारतां परस्परच 'महाद्विभाषिका'ला संमति देऊन टाकली. "वरिष्ठ नेत्यांनीं दिलेल्या निर्णयाला मान्यता देणें हें आपलें कर्तव्य आहे." असें ते म्हणाले. गुजरात काँग्रेसचे प्रवक्ते म्हणाले, "गुजरातचें हित पंडित नेहरूंच्या हातीं सुरक्षित आहे अशी आमची निष्ठा आहे. पण 'महाद्विभाषिक राज्या'ची व्यवस्था जर गुजरातच्या आणि महाराष्ट्राच्या कल्याणाची असेल तर ही व्यवस्था कायम स्वरूपाची असावी अशी माझी प्रार्थना आहे!" नेहरूंनीं त्यांची ती प्रार्थना ताबडतोब मान्य केली. ते म्हणाले, "आतां ही व्यवस्था कायम स्वरूपाचीच राहील!" ह्या एकापेक्षां एक अद्भुत आणि अनपेक्षित घडामोडी एवढ्या झपाट्यानें आणि नाट्यपूर्ण रीतीनें एकाएकीं कशा काय घडून आल्या ह्याचें सर्वांना आश्चर्य वाटत असेल! नेहरू किंवा परमिट-गोविंद म्हणतात त्याप्रमाणें खरोखरच ही सर्व 'अदृश्य शक्तींची' किंवा 'ईश्वरी प्रेरणे'ची लीला असेल तर साहजिकच असा प्रश्न पडतो कीं इतके दिवस ही अदृश्य शक्ति आणि ईश्वरी प्रेरणा झोपा घेत आणि घोरत कां पडली होती?

द्विभाषिक राज्याची योजना आपल्याला पसंत आहे असें नेहरू आणि पंतजी मधून मधून म्हणत असत हें खरें. पण त्यांच्या डोळ्यांपुढें राज्यपुनर्रचना समितीनें सुचविलेलें मर्यादित द्विभाषिक असे. महाद्विभाषिक नसे. एक ऑगस्टला नेहरूंनीं पुण्यांत भाषण केलें. त्या भाषणांत सुद्धां महाद्विभाषिकाबद्दल कुठेंहि त्यांनीं उल्लेख केलेला नाहीं. दोन ऑगस्टला लोकसभेंत अशोक मेहता, तुळसीदास किलाचंद, आचार्य कृपलानी, पुरुषोत्तमदास टंडन आणि सदोबा पाटील ह्यांनीं महाद्विभाषिकाच्या तुताऱ्या आणि नौबती एकदम वाजवायला अकस्मात् सुरुवात केली. तत्पूर्वीं 'महाद्विभाषिका'चा नामोच्चार सुद्धां लोकसभेंत कोणीं केला नव्हता. तुळसीदास किलाचंद म्हणाले, "महाद्विभाषिकाला पाठिंबा देण्याचें आश्वासन कालच चिंतामणराव देशमुखांनीं मला दिलें." त्याबरोबर साऱ्या महाराष्ट्राचें लक्ष्य एकदम लोकसभेकडे खेचलें गेलें. आणि बघतां तों खरेंच, दुसऱ्या दिवशीं चिंतामणरावांनीं महाद्विभाषिक राज्य अक्षरशः डोक्यावर उचलून धरलें. ते म्हणाले, "असें राज्य भारतांत सर्वोत्कृष्ट राज्य होईल अशी माझी खात्री आहे.

हें राज्य महाराष्ट्राच्या कल्याणाचें कसें आहे हें महाराष्ट्रीय जनतेला समजावून सांगण्यासाठीं मी महाराष्ट्रामधून दौरादेखील काढीन!" आपल्या मंत्रिपदाचा राजिनामा देऊन आणि पंडित नेहरूंवर 'न भूतो न भविष्यति' असा जबरदस्त हल्ला चढवून ज्या चिंतामणरावांनीं साऱ्या भारताचें नव्हे, साऱ्या जगाचें लक्ष्य एका दिवसांत आपल्याकडे वेधून घेतलें, त्यांनीं 'महाद्विभाषिका'ची तळी एवढी उचलून धरल्यावर मग काय लोकसभेमधल्या पुरभय्यांना भलताच जोर चढला !

आधीं एकशेंऐंशी आणि मागाहून पन्नास अशा दोनशें-तीस सभासदांनीं ल्गा ल्गा सह्या करून महाद्विभाषिकाला आपला पाठिंबा आहे असा अर्ज ताबडतोब पंडित नेहरूंना सुपूर्द केला. त्याबरोबर मध्यवर्ती सरकारचीं सर्व यंत्रें भराभरा हलूं लागलीं. काँग्रेस कार्यकारिणी आणि मध्यवर्ती सरकारच्या मंत्रिमंडळानें घाईघाईनें सभा भरवून 'महाद्विभाषिका'ला पाठिंबा देऊन टाकला. त्यानंतर लोकसभेंतील काँग्रेस पक्ष, गुजराती आणि मराठी खासदार, मुंबई राज्याचे मराठी मंत्री ह्यांनीं आपापले बाहू चटाचटा उभारून त्या योजनेला मान्यता दिली आणि शेवटीं ही महाद्विभाषिक राज्याची योजना मध्यवर्ती गृहमंत्री गोविंद वल्लभ पंत यांनीं मान्य करून तिच्यावर शिक्कामोर्तबहि करून टाकला. हा सर्व चमत्कार अवघ्या सहा दिवसांत झाला हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. पांच कोटी लोकांच्या भवितव्याचा प्रचंड प्रश्न दोनशें-तीस सह्यांच्या आधारावर नेहरू आणि पंत ह्या दोघांनीं अवघ्या सहा दिवसांत कायमचा सोडवून राजकीय पराक्रमाचा जागतिक विक्रम करून दाखविला. तो काय त्याच्या मागें 'अदृश्य शक्ति' किंवा 'ईश्वरी प्रेरणा' असल्यावांचून झाला होय ?

महाराष्ट्राच्या आणि गुजरातच्या जनतेवर जबरदस्तीनें 'महाद्विभाषिक राज्य' लादणाऱ्या ह्या 'अदृश्य शक्ती'चें किंवा 'ईश्वरी प्रेरणे'चें स्वरूप काय असावें हें जाणण्यासाठीं, आम्हीं आमच्या 'नवयुग' ऑफिसमध्यें चार तास 'समाधि' लावून बसलों. तेव्हां आमच्या अंतश्चक्षूंसमोर एकसारखा पंडित नेहरूंचा चेहरा दिसूं लागला. आणि आमचा 'आंतला आवाज' आम्हांला गंभीर स्वरांत सांगूं लागला कीं ही अदृश्य शक्ति किंवा ईश्वरी प्रेरणा दुसरी तिसरी कोणी नसून स्वतः पंडित नेहरू हीच आहे. आम्हांला झालेल्या ह्या दैवी साक्षात्कारासंबंधीं जो कोणी संशय घेईल तो 'नास्तिक' ठरेल असें आम्ही त्याला बजावून सांगतों. अखिल ब्रह्मांडाचें नाटक जसा तो लीलालाघवी जगत्सूत्रधार परमेश्वर चालवतो, त्याप्रमाणें

पस्तीस कोटी जनतेच्या ह्या भारताचें सर्व नाटक पंडित नेहरू हेच एकटे चालवतात हें काय आम्हीं सांगावयाला पाहिजे होय ?

'संयुक्त महाराष्ट्रा'ला मुंबई, बेळगांव आणि कारवार मिळूं नये, किंबहुना 'संयुक्त महाराष्ट्र' मुळीं निर्माणच होऊं नये आणि भारताच्या नकाशांतून महाराष्ट्र अजिबात नामशेष व्हावा ह्या सर्व कपटनाटकाचा एकमेव सूत्रधार आणि प्रमुख नायक पंडित नेहरू हेच होत असें म्हटलें तर त्यांत बिलकूल अतिशयोक्ति होऊं नये. मोरारजी किंवा सदोबा हीं नुसतीं पंडितजींच्या हातांतलीं निर्जीव खेळणीं होत. पंडितजींच्या निःश्वासाच्या तालावर नाचण्यापलिकडे त्यांना स्वतःची अशी इच्छाशक्ति नाहीं. पंडितजी हे जन्मतःच एक श्रेष्ठ दर्जाचे नट असल्यामुळें त्यांचें खरें स्वरूप कोणतें आणि त्यांचें नाट्य कोणतें ह्यांतला फरक पट्टीच्या प्रेक्षकांनासुद्धां कळूं शकणार नाहीं. ते रागावतात काय, चिडतात काय, रुसतात काय अन् पुन्हा एकदम प्रेमांत येऊन हसतात काय! सारेंच नाटक. 'महाराष्ट्राच्या हृदयापासून मी दुरावला गेलों!' असे उद्गार त्यांनीं व्याकुळ स्वरानें काढले कीं सर्व मराठी माणसांचीं अंतःकरणें भरून येतात आणि त्यांना खरोखरच वाटूं लागतें कीं महाराष्ट्राच्या प्रेमाला मुकल्याबद्दल पंडितजींचें हृदय खरोखरच तळमळतें आहे!

'मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत होऊं नये ह्याबद्दल पूर्वी एक कारण असेल तर आतां दहा लक्ष कारणें आहेत!' असे संतापाचे उद्गार पंडितजी ज्या तोंडानें काढतात, त्याच तोंडानें 'मुंबई महाराष्ट्रांत जावो कीं कुठेंहि जावो, मला काय त्याचें सुखदुःख!' अशी निःपक्षपातीपणाचा आव आणणारी भाषा बोलावयाला त्यांना यत्किंचित्‌हि अडचण पडत नाहीं. अलिकडे तर पंडितजींच्या अंगांतल्या ह्या नाट्यकलेचा भलताच विकास झालेला आहे. चिंतामणराव देशमुखांच्या आरोपांना उत्तर देतांना लोकसभेंत पंडितजी म्हणाले, "मुंबई जर महाराष्ट्रांत गेली तर मला निरतिशय सौख्य होईल असें माझ्यापुरतें तरी मी सांगतों. मी लोकसभेला अगदीं पूर्ण मनमोकळेपणानें सांगतों कीं मुंबई महाराष्ट्रांत जावी ह्याविरुद्ध मला असण्याचें कांहींच कारण नाहीं. उलट मी असें म्हणतों कीं मुंबई महाराष्ट्रांत जावी ह्या बाजूचा युक्तिवाद समर्पक आणि उत्तम आहे. विरुद्ध बाजूला देखील तशींच समर्पक कारणें आहेत. भावना प्रक्षुब्ध झाल्यामुळें मुंबई-संबंधीं निर्णय घेण्याची ही वेळ नव्हे एवढेंच माझें म्हणणें. शांतता होऊं द्या. स्थिरस्थावर होऊं द्या. मग ह्याचा निर्णय लावूं. निर्णय ह्याचा अर्थ लोकमत घेणें

असा सुद्धां मी करीत नाहीं. पण वातावरण शांत झालें म्हणजे तसल्या त्रासदायक मार्गाचा अवलंब केल्यावांचून मला हा प्रश्न सोडवणें सोपें होईल. एवढेंच काय पण शांतता प्रस्थापित झाली कीं महाराष्ट्राच्या वतीनें ह्याबाबत दुसऱ्यापाशीं वकिली करण्याला देखील मी सिद्ध आहें. तुम्ही जबरदस्तीनें मुंबई इकडे टकलली किंवा तिकडे टकलली तर त्यापासून निष्कारण डोकेदुखी उत्पन्न व्हावयाची. त्याचा महाराष्ट्राला काय फायदा? महाराष्ट्राला मुंबई द्यावयाची तर ती योग्य तऱ्हेनें द्यावी. मैत्रीच्या आणि सहकार्याच्या भावनेनें द्यावी. त्या योगानें महाराष्ट्राचें कल्याण होईल, मुंबईचें कल्याण होईल, देशाचें कल्याण होईल."

लोकमान्य टिळकांच्या पुण्यतिथीला पुणें येथें भाषण करतांना पंडित नेहरू म्हणाले, "पुण्यांतील आणि महाराष्ट्रांतील लोकांना मुंबई शहराचा समावेश महाराष्ट्रांत व्हावा असें वाटतें ह्याची मला जाणीव आहे. ह्या प्रश्नावरील त्यांच्या भावनांची सखोलता आणि तीव्रताहि मला माहीत आहे. एवढेंच नव्हे तर आज महाराष्ट्रीय जनतेच्या डोक्यांत ह्याखेरीज दुसरा कोणताहि विचार नाहीं. मुंबईच्या अखिल भारतीय काँग्रेस समितीमध्यें मीं जी घोषणा केली ती मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रांत होण्याच्या मार्गांत अडथळा उत्पन्न व्हावा म्हणून मीं केली नव्हती. पांच वर्षांची मुदत अगदीं अक्षरशः लागू करण्याचा माझा उद्देश नव्हता. मुंबई शहरांत राहणाऱ्या विविध जमातींच्या सहकारी प्रयत्नांनीं त्या शहराची उभारणी झाली आहे. महाराष्ट्राच्या नव्या राज्याचें हें शहर म्हणजे एक मोठें बळ होऊं शकेल. अर्थात् त्याचा अंतर्भाव सर्वांच्या सद्भावानें आणि सहकार्यानें मात्र व्हावयाला पाहिजे. अन्य मार्गानें हें घडवून आणलें तर त्या राज्याला निष्कारण डोकेदुखी होईल. भारताच्या इतिहासांत महाराष्ट्रीयांनीं फार तेजस्वी कार्य केलें आहे. भविष्यकाळांतहि तसल्याच तेजस्वी कार्याची त्यांच्याकडून अपेक्षा आहे. पुढल्या पांच वर्षांत मुंबई शहर कांहीं कुठें पळून जाणार नाहीं. किंवा भारतहि कुठें पळून जाणार नाहीं. दोन्ही आज आहेत तिथेंच राहतील. महाराष्ट्रीय योग्य मार्गांनीं गेले तर त्यांचें उद्दिष्ट ते साध्य करूं शकतील!"

पंडित नेहरूंचीं हीं भाषणें इतक्या विस्तारानें आम्हीं मुद्दाम जीं दिलीं आहेत, त्याचें कारण मुंबईवर महाराष्ट्राचा कसा हक्क पोहोंचतो आणि तिचा समावेश महाराष्ट्रांत व्हावा याबद्दल सर्व मराठी जनतेच्या भावना किती तीव्र आहेत ह्याची आपणाला पूर्ण जाणीव आहे असा नेहरूंनीं ह्या भाषणांत स्पष्ट कबुलीजबाब

दिलेला असून त्याबाबत आपली संपूर्ण सहानुभूतीहि व्यक्त केलेली आहे. एवढीं आश्वासक भाषणें ऐकल्यानंतर आतां आपणांस आज ना उद्यां मुंबई मिळणार, 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचें' आपलें स्वप्न साकार होणार अशी मराठी लोकांच्या मनाची भावना झाल्यास त्यांत आश्चर्य तें काय? किंबहुना आम्ही असें म्हणतों कीं मुंबईबाबत मराठी लोकांच्या आशा मुद्दाम वाढवण्यासाठीं म्हणून पंडित नेहरूंनीं हीं सर्व भाषणें केलीं. आणि हीं भाषणें करीत असतांना त्यांमध्यें मराठी जनतेला दिलेल्या अभिवचनांपैकीं एकहि वचन पूर्ण करण्याची पाळी पुढें आपल्यावर येणार नाहीं ही गोष्ट पंडितजींच्या मनाला पक्की माहीत होती. कारण, मुंबई तुम्हांला मिळणार असें सांगून मराठी माणसांना ज्या वेळीं ते झुलवीत होते, त्याच वेळीं आंतून त्यांचीं महाद्विभाषिकांचीं कारस्थानें चालू होतीं. मुंबई पांच वर्षें केंद्रशासित ठेवण्याच्या आपल्या निर्णयाची महाराष्ट्रीय जनतेवर जी भयंकर प्रतिक्रिया झाली होती ती त्यांनीं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिली होती. म्हणून केंद्र-शासनाखालीं मुंबई फार वेळ टिकूं शकणार नाहीं, वर्ष दोन वर्षांच्या आंत ती महाराष्ट्राला द्यावी लागेल हें भविष्य त्यांनीं त्याच वेळीं ओळखलें होतें. त्याच-बरोबर खंडित महाराष्ट्रांत कॉंग्रेस नेस्तनाबूद होणार आणि तेथें डाव्या गटाचें सरकार येणार हेंहि चित्र त्यांच्या डोळ्यांना भेडसावीत होतें. महाराष्ट्रामध्यें कॉंग्रेसहि नष्ट होते आणि मुंबई ही पुन्हा महाराष्ट्राला द्यावी लागते अशा दुहेरी आपत्तीमधून वांचविण्याचा एकच उपाय म्हणजे महाद्विभाषिक राज्य होय हें पंडितजींच्या लक्ष्यांत न येण्याइतके कांहीं ते मंद बुद्धीचे खास नाहींत!

हें ज्या वेळीं त्यांच्या लक्ष्यांत आलें त्याच वेळीं आपल्या हस्तकांच्या करवीं त्यांनीं महाद्विभाषिकाचा प्रचार लोकसभेच्या सदस्यांमध्यें अतिशय गुप्तपणें करा-वयाला प्रारंभ केला. आणि बाहेरून मात्र महाराष्ट्रीय जनतेला मुंबईचीं प्रलोभनें दाखविण्याचें त्यांचें 'नाट्य' हसतमुखानें चालूच होतें. त्यांच्या अंतरंगांत शिजत असलेला हा महाद्विभाषिकाचा कावा अगदीं शेवटच्या घटकेपर्यंत त्यांनीं कोणाला कळूं दिला नाहीं. लोकसभेच्या दोनशें-तीस लोकांनीं महाद्विभाषिक मुंबई राज्य बनवावें असा जो विनंति अर्ज केला तो सर्व ह्या कपटनाटकाचाच एक भाग होता. शेवटीं लोकसभेच्या बहुसंख्य सदस्यांच्या इच्छेला मान देऊन आपणांला ह्या योजनेला मान्यता देणें भाग आहे, ही सर्व घटना 'अदृश्य शक्ती'नें घडवून आणलेली आहे हे नेहरूंचे उद्गार म्हणजे ह्या कपटनाटयाचा परमोच्च

कळस (climax) होय. सारांश, 'महाद्विभाषिक' नाटकामधील पंडित नेहरूंची भूमिका म्हणजे शेक्सपीयरच्या 'ऑथेल्लो' नाटकांतील 'आयागो'वर सुद्धां मात आहे असें म्हणावयाला हवें.

भोळा बिचारे आमचे पांडोबा गाडगीळ. त्यांना वाटतें कीं डाव्या गटाच्या लोकांनीं दिल्लीला जाऊन सत्याग्रह केला त्याचें 'महाद्विभाषिक' हें आम्हांला ताबडतोब प्रायश्चित्त मिळालें. असें म्हटल्यानें 'संयुक्त महाराष्ट्र समिती'ची नालस्ती करण्याचें समाधान जर त्यांना मिळत असेल तर तें त्यांनीं खुशाल मिळवावें. पण 'महाद्विभाषिका'ची योजना ही कांहीं आकस्मिक योजना नव्हती. तें एक प्रचंड कारस्थान होतें, ह्याचा आम्ही त्यांच्यापुढें पुरावाच मांडतों. आम्ही जेव्हां दिल्लीला जाऊन लोकसभेच्या निरनिराळ्या बिगर-मराठी सभासदांना भेटूं लागलों आणि मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रांत कां व्हावयाला पाहिजे हें त्यांना समजावून सांगूं लागलों, त्याच वेळीं त्यापैकीं कित्येकांनीं आम्हांला विचारलें कीं, "महाद्विभाषिकाच्या बाबतींत लोकसभेच्या सदस्यांमध्यें सध्यां खाजगी प्रचार चालू आहे. त्याबद्दल तुमचें काय म्हणणें आहे?" आम्हांला त्या प्रश्नाचा बोध झाला नाहीं आणि रोखहि पण समजला नाहीं. आम्ही त्यांना म्हणालों, "महाद्विभाषिकाचा प्रश्न आतां उत्पन्नच होत नाहीं. तो पर्याय महाराष्ट्राला, गुजरातला किंवा कोणालाहि मान्य होणार नाहीं! गुजरात आणि महाराष्ट्र ह्यांच्या मालमत्तेची फाळणी करण्याचें काम सध्यां जोरानें तिकडे सुरू आहे. तेव्हां 'महाद्विभाषिका'चा प्रश्न आतां येतोच कुठें?"

लोकसभेच्या सदस्यांत 'महाद्विभाषिका'चा प्रचार चालू असल्याची बातमी आम्हांला जवळ जवळ प्रत्येकानें तिथें सांगितली. पण आम्हीं त्याला विशेष महत्त्वच दिलें नाहीं. कारण 'महाद्विभाषिक' इतक्या जोरानें उसळी मारून पुन्हां वर येईल अशी कल्पनाहि त्या वेळीं आमच्या डोक्यांत नव्हती. चिंतामणराव देशमुखांना सुद्धां तशी कल्पना नसावी. महाद्विभाषिकाबद्दल त्यांचें आणि आमचें बोलणें सुद्धां झालें. ते म्हणाले, "महाद्विभाषिकाचा जरी मी पुरस्कर्ता असलों तरी जोंपर्यंत गुजरातचें आणि महाराष्ट्राचें नेतृत्व मोरारजी, जीवराज, हिरे किंवा चव्हाण अशा मंडळीकडे आहे, तोंपर्यंत तें स्वीकारणें कल्याणाचें नाहीं. महाराष्ट्र आणि गुजरात ह्यांचें नेतृत्व बदलेल तरच महाद्विभाषिक राज्यानें उभय प्रदेशांतील जनतेचें कल्याण होईल!" आपल्या राजिनाम्याच्या भाषणांतही 'हा पर्याय सध्यां

व्यवहार्य नाहीं' असेंच त्यांनीं स्पष्ट म्हटलेलें होतें. लोकसभेमध्यें महाद्विभाषिकाचा प्रचार चालू असल्याची जाणीव चिंतामणरावांना होती की नाहीं हें कळावयाला मार्ग नाहीं. बहुतेक नसावी असा आमचा अंदाज आहे.

लोकसभेंत महाद्विभाषिकाचा जो गुप्तपणें प्रचार चाललेला होता त्याचे सूत्रधार अशोक मेहता हे होते. त्या कामांत तुळसीदास किलाचंद, सत्यनारायण सिंह, फिरोज गांधी हे लोक त्यांचे साथीदार तर होतेच. पण त्या सर्वांचे नेते अशोक मेहता होते. अशोक मेहता आणि पंडित नेहरू ह्यांचे संबंध हल्लीं केवढे घनिष्ठ झाले आहेत ह्याची फार थोड्यांना कल्पना असेल. अशोक मेहता हे सध्यां नेहरूंचे उजवे हात झालेले आहेत एवढें म्हटलें म्हणजे अधिक सांगण्याची आवश्यकता नाहीं. म्हणून महाद्विभाषिकाचें सर्व कारस्थान पंडित नेहरूंनीं अशोक मेहतांच्या हातून परस्पर शिजविलें. बरें, त्यावेळीं पंडित नेहरू विलायतेंत होते. त्यामुळें महाद्विभाषिकाच्या कल्पनेशीं त्यांचा जणुं कांहींच संबंध नाहीं असा भास प्रचारकांना सहजच निर्माण करतां आला. 'संयुक्त महाराष्ट्र समिती'च्या कांहीं मंडळींनीं पंडित नेहरूंना भेटावें ह्याबद्दल अशोक मेहतांना सर्वांत जास्त उत्सुकता वाटत होती. आणि समितीच्या चार सदस्यांची आणि नेहरूंची भेट त्यांनींच स्वतः घडवून आणली. अर्थात्, ह्या भेटींत महाद्विभाषिकाचा प्रश्न निघाला नाहीं ही गोष्ट निराळी. पण ही भेट घडवून आणण्यांत पंडित नेहरूंचा आणि अशोक मेहतांचा कांहीं तरी निराळाच हेतु असावा असा नंतर घडलेल्या गोष्टीच्या अनुरोधानें मनांत संशय आल्यावांचून राहत नाहीं.

मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण होऊं नये ह्यासाठीं काँग्रेसच्या राजकर्त्यांनीं जें प्रचंड कारस्थान उभारलेलें आहे असें आम्ही आतांपर्यंत म्हणत आलेलों आहोंत, त्याच कारस्थानाच्या नाटकाचा शेवटचा अंक म्हणजे हें महाद्विभाषिकाचें कारस्थान होय. जून महिन्याच्या पंधरा तारखेपासून हें कारस्थान सुरू झालें. कारण, त्याच सुमारास गुजरात महाराष्ट्राच्या फाळणीचें काम स्थगित करण्याचे गुप्त हुकूम सुटले होते ह्याची आम्हांला आतांच बातमी मिळाली. महाद्विभाषिकाबद्दल लोकांना विचार करावयाला किंवा आपलें मत प्रकट करावयाला एवढीशी सुद्धां संधि न देतां गिधाड जसें भक्ष्यावर एकदम झडप मारतें, तशा तऱ्हेनें महाराष्ट्राच्या आणि गुजरातच्या जनतेवर तें आदळावयाचें हा ह्या कारस्थानामधला सर्वांत महत्त्वाचा भाग होता. म्हणून ह्या सर्व घटनेच्या मागें 'अदृश्य शक्ति' होती किंवा हा

निर्णय लोकसभेच्या स्वयंस्फूर्तीमधून निर्माण झालेला आहे ही नेहरूंची किंवा पंतांची भाषा शुद्ध लुच्चेगिरीची आहे. त्याचप्रमाणें गुजरातेंतील आणि महाराष्ट्रांतील जनतेबद्दल वाटणाऱ्या सद्भावनेमधून आणि कल्याणबुद्धीमधून महाद्विभाषिकाची योजना निर्माण झाली हें म्हणणेंहि धादांत लबाडीचें आहे. केवळ मुंबई महाराष्ट्राला मिळूं नये आणि महाराष्ट्रांतून कॉंग्रेस नष्ट होऊं नये एवढ्या एकाच हेतूनें लोकशाहीचा खून करून कॉंग्रेसश्रेष्ठींनीं हें महाद्विभाषिक महाराष्ट्रावर जबरदस्तीनें लादलें आहे.

महाराष्ट्राचें कल्याण व्हावें ह्या दृष्टीनें आजपर्यंत एकदाहि कॉंग्रेसनें कधीं विचार केलेला आम्हांला माहीत नाहीं. दार कमिशननें संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचें स्वरूप राष्ट्रविरोधी आहे असा त्यावर ठपका मारला आणि पुढें मागें जर भाषिक महाराष्ट्र झालें तर त्यांत मुंबईचा समावेश करण्यांत येऊं नये अशी मेख मारून ठेविली. ज. व. प. समितीनेंहि त्याचीच 'री' पुढें ओढली. फाजलअली समिति तर त्या दोघांच्या पुढें गेली. तिनें महाराष्ट्रामधून बेळगांवची आणि विदर्भाची फाळणी केली आणि अशा रीतीनें महाराष्ट्राला पांगळा करून महागुजरातच्या तावडींत देऊन टाकलें. या योजनेला महाराष्ट्रानें विरोध करतांच कॉंग्रेसश्रेष्ठींनीं विदर्भ महाराष्ट्राला जोडला आणि मुंबई कापून निराळी केली. मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत व्हावा म्हणून गेले नऊ महिने तीन कोटी मराठी जनता धाय मोकलून आक्रोश करते आहे, पण कॉंग्रेसश्रेष्ठींनीं तिच्या गाऱ्हाण्यांकडे कांहीं लक्ष्य दिलें नाहीं. शेवटीं त्यांनीं महाद्विभाषिकाच्या घोंगडींत महाराष्ट्राची आणि गुजरातची गठडी करकचून बांधून फेकून दिली. महाराष्ट्राच्या जनतेचें कोणतेंहि म्हणणें मुळीं ऐकावयाचें नाहीं, त्यांना जें पाहिजे आहे तें मुळीं द्यावयाचेंच नाहीं अशी कॉंग्रेसश्रेष्ठींनीं अगदीं प्रतिज्ञाच करून ठेवलेली आहे.

महाराष्ट्राला काय हवें हें साऱ्या जगाला ठाऊक आहे. द्विभाषिक राज्य महाराष्ट्रानें कधींच मागितलें नव्हतें. तें त्याच्यावर जबरदस्तीनें लादणें ही लोकशाही का लोकशाहीची विटंबना? विदर्भ आजपर्यंत हिंदी द्विभाषिक राज्यांत रखडत होता. आणि मराठवाडा तर चार भाषांच्या कोंडवाड्यांत अडकून पडला होता. एका द्विभाषिक राज्यांतून दुसऱ्या द्विभाषिक राज्यांत येण्याची त्यांना मुळींच इच्छा नव्हती. त्यांना एकभाषिक राज्यांत येण्याची इच्छा होती. कच्छ आणि सौराष्ट्र ह्यांनाहि महागुजरातमध्यें समाविष्ट होण्याची उत्सुकता होती. विदर्भ, मराठवाडा,

कच्छ आणि सौराष्ट्र ह्या प्रदेशांतील जनतेच्या आकांक्षा विचारांत न घेतां त्यांना वेधडक द्विभाषिक राज्यांत ढकलणें हा त्या त्या प्रदेशांतील जनतेचा केवढा भयंकर विश्वासघात आहे. गोविंद वल्लभ पंत म्हणाले, "हा निर्णय राष्ट्रीय स्वरूपाचा आहे!" आम्ही त्यांना विचारतों कीं द्विभाषिक राज्य जर राष्ट्रीय स्वरूपाचा निर्णय आहे तर मग भारतांमधील इतर चौदा राज्यें एकभाषिक म्हणजे अ-राष्ट्रीय कां? त्यांचीं सुद्धां द्विभाषिक राज्यें बनवून ह्याच राष्ट्रीय पद्धतीनें सारा राज्य-पुनर्रचनेचा प्रश्न कॉंग्रेसश्रेष्ठींनीं सोडवायला हवा होता. तेव्हां महाराष्ट्राचें आणि गुजरातचें महाद्विभाषिक राज्य हा 'राष्ट्रीय निर्णय' आहे ही भाषा लबाडीची आहे. तिनें कोणी फसणार नाहीं.

महाद्विभाषिक मुंबई राज्य निर्माण करण्यांत कॉंग्रेसश्रेष्ठींचा हेतु प्रामाणिकपणाचा आहे असें जर म्हणावें तर हा पर्याय गेल्या ऑक्टोबर महिन्यांत शंकरराव देव आणि महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस ह्यांनीं कॉंग्रेसश्रेष्ठींपुढें मांडला होता. त्या वेळीं तो त्यांनीं तडकाफडकीं कां लाथाडला? गुजरात प्रदेश कॉंग्रेसनें आणि मोरारजीभाईनीं त्याला साफ नकार दिला. गुजरात प्रदेश कॉंग्रेस त्यावेळीं म्हणाली कीं, "फाजलअली समितीनें सुचविलेलें द्विभाषिक जर महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना नको असेल, तर मग मुंबई राज्याचीं तीन राज्यें करणें हेंच सर्वांच्या हिताचें ठरेल. कारण आपली बहुसंख्या अधिक वाढावी ह्याच हेतूनें विदर्भाच्या समावेशाची मागणी महाराष्ट्रानें केलेली आहे." मोरारजीभाई म्हणाले, "आतांपर्यंत एकभाषी राज्य हें महाराष्ट्रीयांचें नैतिक तत्त्व होतें. पण आतां द्विभाषिक राज्यावरील आपली निष्ठा जाहीर करून त्यांनीं आपल्या भूमिकेंत मौलिक बदल केला आहे. महाराष्ट्रीयांना स्वतःचें मोठें संख्याधिक्य असलेलें द्विभाषिक राज्य हवें आहे. राज्यपुनर्रचना समितीनें सुचविलेल्या द्विभाषिक राज्यांत जर गुजरात्यांबरोबर सहजीवन जगणें महाराष्ट्रीयांना अशक्य असेल तर महाराष्ट्र, गुजरात आणि मुंबई अशी तीन राज्यें निर्माण करण्याची मागणी गुजरात्यांना करावी लागेल!" अशा रीतीनें महाद्विभाषिक राज्य स्वीकारण्यास दहा महिन्यांपूर्वी ज्या मोरारजींची तयारी नव्हती तेच आज त्या महाद्विभाषिकाचें स्वागत 'अत्यंत आनंददायी घटना' अशा शब्दांनीं करीत आहेत.

सदोबा पाटलाच्या मुंबई प्रदेश कॉंग्रेसनेंहि महाद्विभाषिक राज्याचा पूर्वी धिक्कारच केला होता. त्यावेळीं सदोबा चक्क म्हणाले होते कीं, "शंकरराव देवांनीं सुचविलेलें महाद्विभाषिक आम्हांला कधींच मान्य होणार नाहीं. कारण विदर्भाच्या

समावेशानें सर्व राज्याचा तोल (Balance) ढळण्याचें भय आहे!" हाच लुच्चा सदोबा महाद्विभाषिक आल्याबद्दल आतां आपल्या टेऱ्या बडवून "मी व मुंबई शहर ज्याची वाट पाहत होतों तो आयुष्यांतील हा सर्वांत आनंदाचा प्रसंग होय!" असें ओरडत सुटला आहे. दहा महिन्यांपूर्वी ज्या द्विभाषिकाची योजना महाराष्ट्र ह्या सर्वांच्या दाराशीं घेऊन गेला होता त्यावेळीं तिला चिमट्यानें उचलण्याची सुद्धां ज्यांची तयारी नव्हती, तेंच लोक आज त्याच योजनेला डोक्यावर घेऊन 'महान् ऐतिहासिक निर्णय', 'अभूतपूर्व राष्ट्रीय तोडगा', 'भारताला मिळालेली बहुमोल देणगी!', 'ईश्वरी शक्तीचा चमत्कार!' अशा आरोळ्या ठोकीत सुटलेले आहेत. यापेक्षां अधिक ढोंगीपणा कांहीं असूं शकेल काय?

गेल्या जानेवारी महिन्यांत सुद्धां हीच महाद्विभाषिकाची योजना घेऊन शंकरराव देव गोविंद वल्लभ पंतांकडे पुन्हा दुसऱ्यांदा गेले होते. त्यावेळींहि पंतांनीं त्यांना वाटण्याच्या अक्षता लावल्या. ते म्हणाले, "ह्या योजनेला मोरारजींची संमति घेऊन या!" तेव्हां शंकरराव मोरारजींना भेटावयाला जुहूला गेले. मोरारजींनीं त्यांना तीन अटी घातल्या. त्या अशा: (१) ह्या महाद्विभाषिक राज्याचे पांच वर्षेपर्यंत मुख्य प्रधान मोरारजी राहतील. (२) मंत्रिमंडळांतील पन्नास टक्के जागा गुजरात्यांना देण्यांत याव्यात. (३) पांच वर्षांनंतर गुजरातप्रमाणेंच विदर्भ आणि मुंबई ह्यांना ह्या महाद्विभाषिकामधून बाहेर पडण्याची मुभा राहील. महाराष्ट्र काँग्रेसनें ह्या अटी अमान्य केल्यामुळें महाद्विभाषिकाचा स्वीकार करण्यास मोरारजींनीं पुन्हा नकार दिला, तेंच मोरारजी आज 'राष्ट्रहितासाठीं आणि काँग्रेसश्रेष्ठींच्या इच्छेला मान देण्यासाठीं' म्हणून मोठ्या त्यागबुद्धीनें त्याच महाद्विभाषिकाचा स्वीकार करण्यास तयार झालेले आहेत!

अवघ्या दहा महिन्यांच्या अवधींत काँग्रेसश्रेष्ठींच्या आणि नेत्यांच्या भूमिकेंत हा जो आमूलाग्र फरक झाला त्याच्यापाठीमागचें राजकारण अगदीं उघड आहे. मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत होऊं नये म्हणून आजपर्यंत काँग्रेसश्रेष्ठींनीं नाना तऱ्हेच्या युक्त्याप्रयुक्त्या केल्या आणि कोल्हांटउड्या मारल्या. पण त्याचा मराठी जनतेवर कांहींहि परिणाम होऊं शकला नाहीं. उलट त्यामुळें संयुक्त महाराष्ट्राचा लढा अधिकाधिक प्रखर आणि प्रभावी होत गेला. आणि शेवटीं महाराष्ट्रांत काँग्रेसचा सत्यानाश होणार आणि मुंबई अखेर महाराष्ट्राला द्यावी लागणार येथ-पर्यंत जेव्हां पाळी येऊन ठेपली, तेव्हां मग शेवटीं महाद्विभाषिकाला शरण जाण्या-

वांचून काग्रसश्रेष्ठींना गत्यंतरच्च उरलें नाहीं. कारण महाराष्ट्रांतील कॉंग्रेसची अब्रू वांचवण्याचा आणि मुंबई सर्वस्वीं महाराष्ट्राच्या कचाट्यामध्यें जाऊं न देण्याचा महाद्विभाषिक हा एकच्च मार्ग होता. म्हणून महाद्विभाषिक राज्य हें कॉंग्रेसच्या कुटिल, अप्रामाणिक, सत्ताबाज आणि महाराष्ट्रद्वेष्टया धोरणामधून निर्माण झालेलें आहे हें प्रत्येकानें लक्ष्यांत ठेवावें.

तथापि, सगळयांत अत्यंत शोच्चनीय आणि हृदयद्रावक गोष्ट म्हणजे ज्या पंडित नेहरूंनीं संयुक्त महाराष्ट्राचा बळी घेण्यासाठीं हें महाद्विभाषिकाचें कुटिल कारस्थान रच्चलें, त्यांनींच त्या महाद्विभाषिकाचें 'मंगलाच्चरण' चिंतामणराव देशमुख ह्यांच्या मुखानें परस्पर वदवून त्यांचाहि बळी तर घेतलाच्च, पण त्यांनीं आठवड्यापूर्वीं आपल्यावर मिळविलेल्या महान् विजयाचें सर्व श्रेय हिरावून घेऊन त्यांच्यावर सूड उगवला. पंडित नेहरू आणि त्यांच्या भोंवतालच्या महाराष्ट्रद्वेष्टया कॉंग्रेसश्रेष्ठींच्या हुकूमशाही आणि अन्यायी कारवायांवर चिंतामणरावांनीं झगझगीत प्रकाश टाकून त्यांच्या आंतरराष्ट्रीय अब्रूचीं लक्तरेंच्च लोंबावयाल लावलीं होतीं. भारतीय स्वातंत्र्याच्या आणि लोकशाहीच्या इतिहासांत चिंतामणरावांची ही कामगिरी सदैव अविस्मरणीयच्च राहील यांत काय संशय? चिंतामणरावांच्या आरोपांना उत्तरें देतांना नेहरू आणि पंतजी यांची नुसती फें फें उडाली. नेहरू काय म्हणाले, "I am something more than the Prime Minister of this Country. We are all something more. We are the children of the Indian revolution and We still have something of the fire of the revolution in us !"(मी केवळ पंतप्रधान नाहीं. त्यापेक्षां कांहीं तरी अधिक आहें. आपण सगळेच्च कांहींतरी अधिक आहोंत. आपण भारतीय क्रांतीचीं अपत्यें आहोंत आणि त्या क्रांतीच्या अग्नीचा अंश अजून आपल्या अंगांत आहे.)

आपल्या जुलमी हुकूमशाहीचें समर्थन 'मी पंतप्रधानापेक्षां कांहीं तरी अधिक आहें. मी क्रांतीचें अपत्य आहें!' अशा शब्दांनीं पंडित नेहरूंना करावयाला लागावें, ह्यापेक्षां त्यांच्या लोकशाही निष्ठेची अधिक नाचक्की कोणाला करतां येईल असें आम्हांला वाटत नाहीं! भारताच्या घटनेंत अशा वाजवीपेक्षां 'अधिक' असलेल्या क्रांतिपुत्र पंतप्रधानाला कुठेंहि स्थान नाहीं असेंच ह्या देशांतला कोणीहि सामान्य नागरिक पंडित नेहरूंना त्यांच्या तोंडावर सांगेल. नेहरू म्हणतात कीं, त्या क्रांतीच्या आगीचा अंश अजून आपल्यांत आहे.

नेहरूंचें म्हणणें आम्हांला मान्य आहे. त्यांच्या क्रांतीची ही आग त्यांचे पोलीस आपल्या बंदुकीच्या नळकांड्यामधून आमच्यावर ओतून आम्हांला त्याचा मधून मधून आस्वाद देतात खरा. गोविंद वल्लभ पंतांना तर चिंतामणरावांनीं असें ठणकावून चापलें कीं त्या म्हाताऱ्याची दांतखिळीच बसली. चिंतामणराव म्हणाले, "जास्ती बोलूं नका. माझ्याजवळ प्रत्येक गोष्टीचा लेखी (documentary) पुरावा आहे. तो मी तुमच्या तोंडावर मारीन!" महाराष्ट्रावर झालेला अन्याय चिंतामणरावांनीं भारताच्या—नव्हे, जगाच्या—वेशीवर मांडून संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याला एका दिवसांत असें कांहीं देदीप्यमान स्वरूप प्राप्त करून दिलें कीं नेहरूंना आणि त्यांच्या साथीदारांना कळून चुकलें कीं आतां महाराष्ट्रांत काँग्रेस नेस्तनाबूद होणार आणि मुंबई महाराष्ट्राला आज ना उद्यां द्यावी लागणार!

त्याबरोबर त्यांनीं महाराष्ट्राला मारण्यासाठीं गुप्तपणें तयार केलेलें 'महाद्विभाषिका'चें ब्रह्मास्त्र एकदम बाहेर काढलें. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या दृष्टीनें चिंतामणरावांच्या भाषणांत एकच कच्चा दुवा होता. आणि तो म्हणजे महाद्विभाषिकाबद्दल त्यांना वाटणारें प्रेम. त्याच कच्च्या दुव्याचा काँग्रेसश्रेष्ठींनीं फायदा घ्यावयाचा ठरविलें. तुळसीदास किलाचंदांना पुढें करून त्यांनीं चिंतामणरावांकडून महाद्विभाषिकाच्या पुरस्काराचें हळूच आश्वासन घेऊन टाकलें. चिंतामणराव बिचारा देवमाणूस! काँग्रेसश्रेष्ठींच्या गुप्त कारस्थानाची त्यांना कुठून माहिती असणार? संयुक्त महाराष्ट्राला मारण्यासाठीं आणि मुंबई त्याला न मिळूं देण्यासाठीं काँग्रेसश्रेष्ठी आतां 'महाद्विभाषिका'चा स्वीकार करावयाला तयार झाले होते. हें त्यांचें कवटाळ चिंतामणरावांच्या ध्यानांत आलें नाहीं. त्यांनीं सद्भावनेनें आणि प्रामाणिकपणें महाद्विभाषिकाचा पुरस्कार केला. काँग्रेसश्रेष्ठींना तेवढेंच पाहिजे होतें. चिंतामणरावांच्या त्या भाषणाचा तुरा लागलेच त्यांनीं आपल्या पगडींत खोंवला आणि मोठ्या रुबाबानें आणि प्रतिष्ठेनें आपलें 'महाद्विभाषिका'चें कुटिल कारस्थान यशस्वी करून त्यांनीं तीन कोटी महाराष्ट्रीयांचें 'संयुक्त महाराष्ट्रा'चें स्वप्न तावडतोब धुळीला मिळवून टाकलें. चिंतामणराव जर महाद्विभाषिकाचे पहिल्यापासून पुरस्कर्ते होते, तर पंडित नेहरूंनीं त्यांच्या म्हणण्याला त्याच वेळीं मान्यता कां दिली नाहीं बरें? केंद्रशासित मुंबईच्या मुद्द्यावर त्यांना राजिनामा द्यावयाला लावून मंत्रिमंडळांतून बाहेर जावयाला नेहरूंनीं त्यांना कां भाग पाडलें?

हा सुद्धां एक निराळ्या कारस्थानाचाच भाग आहे. देशाचें आर्थिक धोरण

आणि राष्ट्रीय नियोजन समाजवादाच्या दृष्टीनें आंखण्यांत देशमुखांनीं अलौकिक यश मिळविलें होतें. त्यामुळें नेहरूंच्या भोंवतीं असलेल्या व्यापारी भांडवलशाहीला ते नकोसे झाले होते. मध्यवर्ती मंत्रिमंडळामधून देशमुख कधीं जातील असें त्यांना झालें होतें. पं. नेहरू ह्या लोकांच्या सर्वस्वीं आहारीं गेलेले असल्यामुळें मुंबई केंद्रशासित करण्याच्या त्यांच्या सोळा जानेवारीच्या घोषणेनंतर सहा दिवसांनीं जेव्हां चिंतामणरावांनीं आपला राजिनामा त्यांच्याकडे सादर केला, तेव्हां नेहरूंनीं तो मुकाट्यानें खिशांत घालून ठेवला. त्याच वेळीं नेहरूंनीं देशमुखांना सांगावयाला पाहिजे होते कीं, "तुम्ही राजिनामा देऊं नका! तुमचें म्हणणें मुंबई महाराष्ट्रांतून जाऊं नये असेंच आहे ना? मग चला तर. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें आपण महाराष्ट्र-गुजरातचें महाद्विभाषिक राज्य बनवूं या!" पण नेहरू तसें त्यांना म्हणाले नाहींत. मंत्रिमंडळांतून देशमुखांनीं जावें असेंच त्यांना मनांतून वाटत होतें. शिवाय मुंबई केंद्रशासित करण्याची मस्ती त्यावेळीं त्यांच्या डोक्यांत चढून बसली होती. तथापि, देशमुखांच्या हातांत त्यावेळीं बजेटासारखीं अनेक महत्त्वाचीं कामें होतीं. म्हणून त्यांचा राजिनामा त्याच वेळीं स्वीकारणें नेहरूंना परवडण्यासारखें नव्हतें. एवढ्यासाठीं त्यांच्या राजिनाम्याच्या पत्राला उत्तर देतांना नेहरूंनीं हळूच 'महाद्विभाषिका'च्या मधाचें बोट देशमुखांच्या तोंडाला लावून ठेवलें. (The Prime Minister's reply to his letter of resignation 'held out hopes' of a bigger bilingual state.) त्यामुळें देशमुखांनीं आपल्या राजिनाम्याचा प्रश्न एकदम धसाला लावला नाहीं.

पुढें तीन जूनला मंत्रिमंडळाला न विचारतां नेहरूंनीं मुंबई पांच वर्षें केंद्रशासित राहील अशी जेव्हां अकस्मात् घोषणा करून टाकली, तेव्हां 'महाद्विभाषिका'बद्दल पूर्वीं नेहरूंनीं आपल्याला दाखवलेलें प्रलोभन खोटें होतें हें देशमुखांना चक्क कळून आलें, आणि मग त्यांनीं आपला राजिनामा स्वीकारण्याची नेहरूंकडे निकड लावली. तरी देखील नेहरूंनीं त्यांना तसेंच घोळत ठेवलें. मुंबई केंद्रशासित राहणें अशक्य आहे हें नेहरूंच्या जेव्हां लक्षांत आलें, तेव्हां त्यांनीं आपलें महाद्विभाषिकाचें कारस्थान 'अशोक मेहता आणि मंडळी'च्या मार्फत शिजवायला सुरुवात केली. तेवीस जुलैला नेहरू विलायतेहून दिल्लीला परत आले. त्यावेळीं तें कारस्थान शिजून पक्कें झाल्याचें जेव्हां त्यांना समजलें, तेव्हां त्यांनीं चिंतामणरावांचा राजिनामा ताडकन् स्वीकारून त्यांची बोळवण करून

टाकली. महाद्विभाषिकाचें श्रेय चिंतामणरावांना द्यावयाचें नाहीं. त्यांना मंत्रि-मंडळामधून तर घालवून लावायचें. आणि केवळ लोकसभेच्या सदस्यांच्या आग्रहा-वरून आपणाला महाद्विभाषिक स्वीकारावें लागत आहे असें 'नाटक' जगाला दाखवावयाचें. इतक्या तीन गोष्टी नेहरूंना साधावयाच्या होत्या. त्या त्यांनीं बरोबर साधल्या. एवढेंच नव्हे तर त्या साधूनच्या साधून त्यांनीं महाद्विभाषिकाचें प्रशंसा-स्तोत्र चिंतामणरावांनाच गावयाला लावून त्यांच्यावर पक्का सूड उगवला. आपल्या प्रियतमेचें लग्न दुसऱ्या माणसाशीं लागत असतांना प्रियकरानें तेथें हजर राहून जोरजोरानें 'मंगलाष्टकें' म्हणावींत तसा हा प्रकार झाला!

कोणाला असें वाटत असेल कीं महाद्विभाषिकाची चिंतामणरावांनीं एवढी तळी उचलली म्हणून नेहरू त्यांच्यावर प्रसन्न होऊन आतां त्यांना परत मंत्रिमंडळांत बोलावतील किंवा नव्या महाद्विभाषिकाच्या मुख्यमंत्रिपदावर त्यांची स्थापना कर-तील. पण असल्या भ्रमांत कोणींहि राहूं नये. नेहरूंचा स्वभाव जर आम्ही बरोबर ओळखत असूं तर आम्ही आव्हानपूर्वक असें सांगूं कीं चिंतामणरावांनीं नेहरूंच्या अब्रूचीं जीं आंतडीं बाहेर काढलीं, त्याबद्दल नेहरू चिंतामणरावांना ह्या जन्मांत कधींहि क्षमा करणें शक्य नाहीं. आतां महाद्विभाषिकाचा पुरस्कार करतांना चिंतामणरावांनीं जो युक्तिवाद केला आहे, त्यानें महाराष्ट्रांतील जनतेचा फार मोठा बुद्धिभेद होण्याचा संभव असल्यानें त्याला उत्तर देणें जरूर आहे. राजिनाम्याच्या निवेदनांत चिंतामणराव स्पष्ट म्हणाले होते कीं सध्यांचें स्थानिक नेतृत्व जोंपर्यंत आहे तसेंच आहे तोंपर्यंत महाद्विभाषिक अव्यवहार्य आहे. म्हणून आम्ही त्यांना विचारतों कीं पूर्वीचें नेतृत्व आहे तसेंच असतांना आतां त्यांना हें महाद्विभाषिक एकदम व्यवहार्य कसें वाटूं लागलें? ज्या राज्यकर्त्यांच्या रोमरोमांत महाराष्ट्रद्वेष भरला आहे म्हणून आपल्याला त्यांच्याशीं सहकार्य करणें अशक्य आहे असें चिंतामणराव आठ दिवसांपूर्वी म्हणाले होते, त्या राज्यकर्त्यांच्या हृदयांतला तो महाराष्ट्रद्वेष एकदम नष्ट झाला असें का चिंतामणरावांना म्हणावयाचें आहे? यापुढें महाराष्ट्राच्या कल्याणाच्या दृष्टीनें हे राज्यकर्ते महाद्विभाषिक राबवतील अशी यांना खात्री वाटते का?

मुंबई महाराष्ट्रापासून तोडण्याचें एकहि सयुक्तिक कारण नेहरू देऊं शकले नाहींत असा देशमुखांचा त्यांच्यावर आरोप होता. त्याच चालीवर आम्ही असें म्हणतों कीं महाद्विभाषिकाचें समर्थन करणारें सयुक्तिक कारण कॉंग्रेसश्रेष्ठींनीं किंवा

स्वतः देशमुखांनींहि आपल्या भाषणांमधें दिलेलें नाहीं. भारतामधलीं सर्व राज्यें एकभाषिक तत्त्वावर झालेली असतां 'महाद्विभाषिक' हें 'राष्ट्रीय तत्व' मुळीं होऊंच शकत नाहीं. भाषिक राज्यांनीं देशाचें ऐक्य दुभंग होण्याचा संभव आहे हाहि आक्षेप खोटा आहे. भाषिक राज्यांनीं उलट लोकशाहीची वाढ होते आणि राष्ट्रीय एकता संघटित होते. डॉ. आंबेडकर 'भाषिकराज्यविचार' ह्या आपल्या पुस्तकांत म्हणतात, "One state and one language is a universal feature of almost every state." एक राज्य आणि एक भाषा हें जगांतील बहुतेक सर्व राज्यांचें सर्वसामान्य लक्षणच होऊन बसलें आहे.) आर्थिक दृष्ट्या महाद्विभाषिकाचें देशमुखांनीं समर्थन केलें आहे. ते म्हणतात, "मुंबई शहराची वाढती शिल्लक गुजरात आणि महाराष्ट्राला मिळत राहील " हा देशमुखांचा भ्रम आहे. संमिश्र राज्यांत गुजराती राज्यकर्ते महाराष्ट्राची आर्थिक लूटमार करतात असा आतांपर्यंतचा अनुभव आहे. हा मुद्दा पुढें आम्ही स्पष्ट करणार आहोंत. तेव्हां महाद्विभाषिक राज्यांत आर्थिक दृष्ट्या जर सर्वांत जास्त कोणाचें नुकसान होईल तर तें महाराष्ट्रीय जनतेचें ही गोष्ट जगजाहीर आहे.

दुसरा एक महत्त्वाचा मुद्दा आम्ही देशमुखांपुढें मांडतों. कुलाबा जिल्ह्यांतील मतदारांचे आपण प्रतिनिधि आहोंत म्हणून मुंबई महाराष्ट्रापासून वेगळी झाली तर आपल्या मतदाराचें अत्यंत नुकसान होईल म्हणून आपणाला राजिनामा देणें भाग आहे असें देशमुखांनीं राजिनामा देतांना म्हटलें होतें. तोच मुद्दा घेऊन आम्ही त्यांना विचारतों कीं, "कुलाबा जिल्ह्यांतील मतदारांना महाद्विभाषिक राज्य पाहिजे आहे का नको असें त्यांना विचारल्याखेरीज तुम्ही त्या राज्याचें समर्थन स्वतःच्या अखत्यारांत कसें करूं शकतां ?" महाराष्ट्रांतल्या जनतेला 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र' फक्त हवा आहे, दुसरें कांहीं नको, ही गोष्ट जगजाहीर असतांना 'महाद्विभाषिकच' त्यांच्या हिताचें आहे असा आग्रह देशमुख कसा करूं शकतात ? ह्या प्रश्नावरील महाराष्ट्राच्या ज्वलन्त भावना देशमुखांनीं ओळखावयाला हव्या होत्या. महाराष्ट्रांतून हजारों सत्याग्रही दिल्लीला जे आले ते काय 'महाद्विभाषिक' मागण्यासाठीं ? त्यांच्या आरोळ्या देशमुखांच्या कानावर आल्या कीं नाहींत ? 'मुंबई-बेळगांवसह संयुक्त महाराष्ट्र' हें तीन कोटी मराठ्यांचें आतां ब्रीद होऊन बसलें आहे. त्यांच्या जीवन-संग्रामाची ती गर्जना झालेली आहे. असो. 'महाद्विभाषिका' बद्दल चिंतामणरावांची भूमिका कांहींहि असली तरी महाराष्ट्राच्या आणि भारताच्या कल्याणासाठीं चिंतामण-

रावांनीं जें हौतात्म्य पत्करलें, त्याबद्दल त्यांच्यापुढें अनंत काळपर्यंत महाराष्ट्र आपलें शिर कृतज्ञतेनेंच नमवीत राहील.

खंडित महाराष्ट्रामध्यें आगामी निवडणुकींत काँग्रेसचा संपूर्णपणें पराभव होऊन त्या ठिकाणीं डावें सरकार आलें असतें आणि त्यांनीं पेचप्रसंग निर्माण करून मुंबईचा अंतर्भाव महाराष्ट्रामध्यें करण्यास मध्यवर्ती सरकारला भाग पाडलें असतें. ती आपत्ति टाळण्यासाठीं नेहरूंना ‘महाद्विभाषिका’ चा तोडगा स्वीकारावा लागला असें आम्हीं जें सांगितलें त्याचा आतां पुरावा देतों. महाद्विभाषिक राज्याच्या नव्या कायदेमंडळामधील एकंदर सभासदांची संख्या ३९६ ठरविण्यांत येणार आहे. मराठी लोकसंख्या ६५ टक्के आणि गुजराती लोकसंख्या ३५ टक्के ह्या प्रमाणांत ३९६ संख्येची वांटणी मराठी सदस्य २५५ आणि गुजराती सदस्य १४१ अशी पडते. खंडित महाराष्ट्र राज्यांत ह्या २५५ जागांची प्रदेशवार पुढीलप्रमाणें वांटणी झाली असतीः महाराष्ट्र १३८, महाविदर्भ ७४ आणि मराठवाडा ४३ मिळून २५५. आगामी निवडणुकांमध्यें महाराष्ट्रांत डाव्या गटाला १०८, काँग्रेसला ३०, महाविदर्भांत डाव्या गटाला २४, काँग्रेसला ५०, आणि मराठवाड्यांत डाव्या गटाला २३, काँग्रेसला २०, अशा रीतीनें डाव्या गटाचे १५५ आणि काँग्रेसचे १०० लोक निवडून आले असते आणि काँग्रेसचा पराभव होऊन डाव्या गटाचें सरकार प्रस्थापित झालें असतें. आतां नव्या राज्यांत १४१ गुजराती सभासद वाढले. त्यांच्यापैकीं आगामी निवडणुकींत निदान १२० सभासद तरी काँग्रेसचे येतील. म्हणजे महाद्विभाषिक राज्यांत काँग्रेसच्या सर्व सभासदांची संख्या २२० होईल. आणि विरोधी पक्षाच्या सभासदांची संख्या १७६ होऊन काँग्रेसचेंच मंत्रिमंडळ अधिकारावर येईल! हें चित्र लक्ष्यांत घेतल्यानंतर काँग्रेसश्रेष्ठींनीं एवढ्या घिसाडघाईनें महाद्विभाषिक राज्य महाराष्ट्रावर कां लादलें ह्याचा सर्वांना बोध होईल.

महाद्विभाषिक राज्याचीं सूत्रें सदैव भांडवलशाही काँग्रेस सरकारच्या हातीं राहतील. त्या ठिकाणीं जनतेचें खरेंखुरें प्रातिनिधिक सरकार येणें सर्वस्वीं अशक्य आहे. म्हणून महाद्विभाषिक राज्याचा धिक्कार जनतेनें करावयाला हवा. महाद्विभाषिकांत मराठी जनता ६५ टक्के आणि गुजराती जनता ३५ टक्के आहे, तेव्हां ह्या राज्यांत मराठी जनतेचेंच सर्वस्वीं वर्चस्व राहील अशी लालूच तिला दाखविण्यांत येत आहे. पण हा निव्वळ भ्रम आहे. आजच्याच मुंबई राज्याचें

उदाहरण पाहा. ह्या राज्यांतली मराठी लोकसंख्या २ कोटी १७ लक्ष आहे आणि तिचे कायदेमंडळांतले प्रतिनिधि १४९ आहेत. गुजराती लोकसंख्या १ कोटी १९ लक्ष आहे आणि तिचे कायदेमंडळांतले प्रतिनिधि १०६ आहेत. असें असून गुजराती मंत्री ४, मराठी मंत्री ४ आणि कानडी मंत्री १ अशी वांटणी करण्यांत आली आहे. गुजरात आणि महाराष्ट्र ह्यांच्या मंत्र्यांची संख्या सारखी ठेवून उभयतांना समानतेचें (parity) दुष्ट तत्त्व लागू करण्यांत आलेलें आहे. कर्नाटकला बेळगांव देण्याचें अभिवचन देऊन हे चार गुजराती मंत्री कानडी मंत्र्याला नेहमीं आपल्या खिशांत ठेवीत असतात. म्हणजे मुंबई राज्यांत मराठी लोक बहुसंख्य असूनहि मंत्रिमंडळांत मात्र मराठी मंत्री अल्पसंख्य आहेत.

एवढेंच नव्हे तर राज्यकारभाराचीं सर्व महत्त्वाचीं खातीं गुजराती मंत्र्यांकडेच आहेत. त्यांच्या अखत्यारांत एकंदर २०२ विषय आहेत, तर मराठी मंत्री चार असूनहि त्यांच्या ताब्यांत फक्त ८८ विषय आहेत. आतां राज्यविकासाच्या खर्चाच्या बाबतींतला पक्षपात पाहा. १९५२–५३ सालीं दर मराठी माणसामागें १·८ रुपये खर्च तर दर गुजराती माणसामागें ३·२ रुपये खर्च. म्हणजे महाराष्ट्राच्या दुपटीनें (आणि महाराष्ट्राच्या खर्चानें) गुजरातमध्यें विकासाचीं कामें आतांपर्यंत चाललेलीं आहेत. आज गुजरातमध्यें रस्ते, रेल्वे स्टेशनें, पूल आणि धरणें ह्यांची केवढी प्रचंड वाढ झालेली आहे हें तेथें जाऊन पाहिल्यावांचून कळणार नाहीं. त्या मानानें महाराष्ट्रामध्यें अगदीं ठणठणाट आहे! कोणी म्हणेल कीं महाराष्ट्राचें चार मंत्री महाराष्ट्राची बाजू जोरदारपणें मंत्रिमंडळांत कां मांडत नाहींत? त्याचें उत्तर हें कीं, गुजराती मुख्य मंत्र्यांनीं नालायकांतल्या नालायक मराठी मंत्र्यांना निवडून घेऊन त्यांना आपल्या ताटाखालचीं मांजरें बनवून टाकलें आहे. मोरारजींच्या विरुद्ध बोलावयाची एका मराठी मंत्र्यांची ताकद नाहीं. मोरारजींनीं गोळीबार करून एवढीं मराठी माणसें ठार मारलीं तरी एका मराठी मंत्र्यानें त्यांच्या विरुद्ध 'ब्र' सुद्धां काढला नाहीं. उलट हिरे निर्लज्जपणें म्हणतात कीं, "गोळीबार करावयाचा नाहीं तर मग राज्य कसें करावयाचें?" असलीं हीं आमचीं मराठी माणसें! महाद्विभाषिक राज्यांत हाच शिरस्ता ह्याहूनहि मोठ्या प्रमाणांत चालणार हें आतां आम्ही लिहून देतों.

मोरारजी कितीहि नाहीं म्हणाले तरी तेच ह्या राज्याचे मुख्यमंत्री होणार हा अगदीं वज्रलेख आहे. आणि महाराष्ट्राबद्दल काडीचाहि अभिमान नसलेले आणि

केवळ सत्तेला आणि मानाला लालचावलेले हिरे-चव्हाणांसारखे निमकहराम मराठी मंत्री पुन्हा ते निवडणार आणि त्यांच्या मदतीनें ते महाराष्ट्राची राजरोसपणें लूटमार करून गुजरातच्यां घरें भरणार हेंहि पण तितकेंच सत्य आहे. राज्य-कारभारांत तर गुजराती-मराठी समानतेचें विषारी तत्त्व अगदीं खालपर्यंत लागू करण्यांत येईल हेंहि आम्ही सांगून ठेवतों. म्हणून 'महाद्विभाषिक' राज्यांत मराठी लोक बहुसंख्य असूनहि त्या ठिकाणीं गुजरातचें पक्षपाती कॉंग्रेस सरकारच अधिकारावर येणार असल्यानें, त्याच्या राजवटींत महाराष्ट्राचें संपूर्ण वाटोळें झाल्यावांचून राहणार नाहीं ही काळ्या दगडावरची रेघ आहे.

एवढ्यासाठीं प्रत्येक मराठी माणसानें ह्या 'महाद्विभाषिक राज्या'चा प्राणपणानें प्रतिकार करून त्याला अगदीं पाताळांत गाडून टाकलें पाहिजे. केवळ मुंबई महाराष्ट्राला मिळूं नये ह्या गुजराती भांडवलशाहीच्या दुष्ट हट्टाला बळी पडून पांच कोटी जनतेच्या आकांक्षा आणि इच्छा 'महाद्विभाषिका'च्या वरवंट्याखालीं ठेचून काढावयाला कॉंग्रेसश्रेष्ठी आज प्रवृत्त झाले आहेत. 'महाद्विभाषिक' महाराष्ट्राला जसें नको आहे तसें गुजरातलाहि पण नको आहे. गेल्या बुधवारीं सबंध गुजरातमध्यें महाद्विभाषिक राज्याविरुद्ध लोकप्रक्षोभाचा भयानक ज्वालामुखी फुटला. अहमदाबादमध्यें ऐंशीं हजार विद्यार्थ्यांनीं हरताळ पुकारला, वीस हजार कामगार त्या हरताळांत सामील झाले. ठिकठिकाणीं मोरारजींच्या फोटोंच्या आणि गांधीटोप्यांच्या होळ्या पेटवण्यांत आल्या. त्याबरोबर मोरारजींच्या पोलिसांनीं गोळीबार करून सात लोकांना ठार आणि शंभर लोकांना जखमी केलें. संयुक्त महाराष्ट्राचा लढा चिरडण्यासाठीं मोरारजींनीं १०७ प्राणांचे बळी घेतले. आतां 'महागुजरात'ला गारद करण्यासाठीं हा नरराक्षस किती प्राणांची हत्या करतो आहे हें पाहावयाचें आहे!

चंगीझखान आणि तैमूरलंग ह्यांना लाजविण्यासाठींच जणुं कांहीं आधुनिक भारतांत अवतार घेतलेल्या ह्या रक्तपिपासू सैतानाला आळा घालणारी एकहि शक्ति अजून ह्या देशांत निर्माण होत नाहीं काय हो? संयुक्त महाराष्ट्राचा लढा हा हिंसाखोर आणि हुल्लडबाज मराठी लोकांनीं आकुंचित भाषावादासाठीं चालविला आहे अशी आजपर्यंत त्याची नेहरू आणि मोरारजी बदनामी करीत होते. आतां गेल्या बुधवारीं अहमदाबादमध्यें महागुजरातवादी जनतेनें महाद्विभाषिक राज्याविरुद्ध जो प्रचंड लढा सुरू केला आहे तो पाहिल्यानंतर संयुक्त महाराष्ट्रवाद्यांना दाखवावयाला

नेहरू मोरारजींना आतां कांहीं तोंड उरलें आहे काय? आतां त्यांना समजून येईल कीं भाषिक लढा हा जातीय वा प्रांतीय लढा नसून तो जनतेच्या मूलभूत हक्कांचा लोकशाही लढा आहे. महाद्विभाषिकाविरुद्ध संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना आतां जो प्रचंड लढा उभारावयाचा आहे, त्यांत महागुजरातवादी लोकांचें सहकार्य त्यांना मिळणार आहे, ह्या कल्पनेनें मराठी जनतेला आतां विलक्षण धीर आल्यावांचून राहणार नाहीं. गोविंद वल्लभ पंतांनीं धमकी देऊन ठेवली आहे कीं लोकशाही घटनेमध्यें टीका करण्याचा जेवढा हक्क असतो त्याच्या पलिकडे जाऊन महाद्विभाषिकाचा कोणालाही धिक्कार (defiance) करतां येणार नाहीं. मोरारजींनीं ह्या धमकींत भर घातली. ते म्हणाले, "जे (ह्या योजनेविरुद्ध) दुर्वर्तन करतील त्यांना अद्दल घडेल!" आणि पंडित नेहरू तर आजपर्यंत परोपरीनें आम्हांला सांगत आले कीं लोकशाहीमध्यें कोणतीहि गोष्ट निर्णायक नाहीं. कोणतीहि योजना सर्वांच्या विचारानें बदलतां येईल! संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांचा 'महाद्विभाषिका' विरुद्ध होणारा लढा हा संपूर्णपणें लोकशाहीच्या आणि अहिंसेच्याच मार्गानें होईल. पण पंतांनीं आणि मोरारजींनीं वाटेल तशा धमक्या दिल्या आणि अमानुष गोळीबार केला म्हणून महाद्विभाषिक राज्याचा मराठी अगर गुजराती जनता स्वीकार करील अशी जर त्यांची समजूत असेल तर ती त्यांनीं स्वतःच्याच टाळक्यांत ठेवून द्यावी.

जवळजवळ सर्व भारताला एकभाषी राज्यें देण्यांत आलेलीं आहेत. बंगाल्याला मान वर करून म्हणतां येईल कीं हें माझें बंगाली राज्य. हिंदी माणसाला म्हणतां येईल कीं हें माझें हिंदी राज्य. कन्नडिगांना आणि तेलगू माणसांना म्हणतां येईल कीं हीं आमच्या भाषेचीं राज्यें. मराठ्यानें आणि गुजरात्यानें माना खालीं घालून काय म्हणावें कीं हें आमचें धेडगुजरी राज्य! नाहीं; असली मानहानि आणि असला अन्याय महाराष्ट्र कदापि सहन करणार नाहीं! महाद्विभाषिक राज्यांत मुंबई-मधल्या आणि बाकीच्या महाराष्ट्रांतल्या तीन कोटी मराठी जनतेची तर आमच्या डोळ्यांदेखत राखरांगोळी होणार; पण कर्नाटकांत कडेलोट करून टाकलेल्या बेळगांव, निपाणी, कारवारमधील आमच्या लक्षावधि मराठी बांधवांचें काय होणार ह्या विचारानें तर आमच्या काळजाला पीळ पडल्यावांचून राहत नाहीं! मुंबई-बेळगांवसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण व्हावा म्हणून शंभराचेवर लोकांनीं आपलें बलिदान केलें आहे. पांचसहाशें जखमी लोकांनीं आपलें रक्त सांडलें आहे. पन्नास हजार लोकांनीं सत्याग्रह केला आहे. अनेक नेते आणि कार्यकर्ते

अद्याप स्थानबद्धतेंत खितपत पडलेले आहेत. आपल्या ध्येयपूर्तीसाठीं महाराष्ट्रानें केलेला हा अभूतपूर्व प्राणयज्ञ काय .व्यर्थ जाणार? कदापि नाहीं. महाराष्ट्रद्वेष्टया राज्यकर्त्यांनीं भारतामधून महाराष्ट्राला नामशेष करण्यासाठीं सूडभावनेनें रचलेलें हें महाभयानक महाद्विभाषिक कारस्थान उखडून टाकण्यासाठीं हुतात्म्यांच्या रक्ताची शपथ घेऊन तीन कोटी मराठ्यांनीं आतां यापुढें आपल्या सर्वस्वाचा होम करावयाला सिद्ध झालें पाहिजे. शिवछत्रपतींचा महाराष्ट्र आजपर्यंत कोणाच्याहि जुलमाला शरण गेला नाहीं. आणि ह्यापुढेंहि जाणार नाहीं!

१२-८-५६

# मराठी गुजराती भाई भाई!

जनता ही सगळीकडचीच सारखी असते. जशी महाराष्ट्राची जनता, तशीच गुजरातची जनता. आणि तशीच बंगालची जनता. तथापि, या भारतामध्यें फक्त महाराष्ट्रांतली जनताच काय ती हिंसावादी आणि अत्याचारी आहे असें भासवण्याचा गेले कित्येक महिने कॉंग्रेसश्रेष्ठींनीं कसून प्रयत्न चालविलेला होता. अगदीं नेहरूंपासून तो मुरारजींपर्यंत. नेहरू तर बेंबीच्या देठापासून ओरडून ओरडून मराठी जनतेला सांगत होते कीं, "माझ्या जिवांत जीव असेपर्यंत मी तुमच्या गुंडगिरीला शरण जाणार नाहीं; मग कॉंग्रेस मेली तरी हरकत नाहीं; किंवा देश बुडाला तरी पर्वा नाहीं!" मोरारजी देसाई ह्यांनीं तर एडवर्ड डीन ह्यांना स्पष्टच बोलून दाखविलें कीं, "सबंध भारतांत दुसऱ्याच्या पाठींत सुरे खुपसणारे, हिंसक आणि लुटारू वृत्तीचे लोक जर कुणी असतील तर ते म्हणजे मराठी!"

मुंबई-बेळगांवसह संयुक्त महाराष्ट्र आपल्याला मिळावा म्हणून तीन कोटी मराठी जनतेनें तळहातावर शिर घेऊन गेले दहा महिने कॉंग्रेसश्रेष्ठींशीं जो लोकशाही लढा चालविलेला आहे, त्याला तर्कानें, न्यायानें, आणि नीतीनें तोंड देण्याचें सामर्थ्य कॉंग्रेसश्रेष्ठींजवळ राहिलें नसल्यानें, महाराष्ट्राला बदनाम करण्याच्या ह्या असल्या वाममार्गाचा अवलंब करण्यावांचून त्यांना दुसरा उपायच नव्हता. त्याच्या उलट 'गुजरात हा अत्यंत नीतीनें, धर्मानें आणि शांततेनें वावरणारा प्रांत असून महात्मा गांधींचा आणि कॉंग्रेसचा तो कट्टर अनुयायी आहे. आणि राष्ट्राच्या कल्याणासाठीं कॉंग्रेस जें सांगेल तें सदैव शिरसावंद्य मानणारा आहे' अशी किती दिवसांपासून तरी मोरारजींनीं त्याची 'भलामण' चालविलेली होती. एवढेंच नव्हे तर भाषिक तत्त्वावर आपला निराळा प्रांत व्हावा अशी महाराष्ट्राप्रमाणें गुजरातनें कधीं मागणीच केली नव्हती असें सांगावयाला देखील मोरारजींनीं कमी केलें नाहीं. पण शेवटीं गेल्या आठवड्यांत गुजरातच्या जनतेनें कॉंग्रेस-

श्रेष्ठींना असें कांहीं 'चौदावें रत्न' दाखवलें कीं त्यांचीं बुबुळें आणि अत्तिशा त्यांच्या डोक्यांतून नि तोंडांतून चार चार बोटें तरी बाहेर आल्या असतील. चिंतामणरावांनीं जशी नेहरूंची अब्रू बाहेर काढली, तशीं गुजरातनें अवघ्या तीन दिवसांत काँग्रेसच्या अब्रूचीं लक्तरें लोंबविलीं. काँग्रेसश्रेष्ठींच्या जुलुमाचा प्रतिकार मराठी जनता जितक्या त्वेषानें करते, तितक्याच त्वेषानें गुजराती जनताहि पण करूं शकते हें सर्वांना दिसून आलें. म्हणूनच आम्ही प्रारंभीं म्हणालों कीं जनता ही सगळीकडची सारखीच असते.

राग, लोभ, प्रेम ह्या भावना व्यक्त करण्याचे मार्ग सर्वांचे सारखेच असतात. जनता एकाद्यावर प्रसन्न झाली म्हणजे जशी त्याला डोक्यावर घेऊन नाचेल, तशीच रागावली म्हणजे त्याला पायाखालीं तुडवून त्याचा चेंदामेंदा करायला चुकावयाची नाहीं. गुजराती लोकांना 'महागुजरात' नको आहे आणि गुजरातमधील यच्चयावत् जनता काँग्रेसमागें आहे हीं जीं दोन 'ढोंगें' ( frauds ) आतांपर्यंत निर्माण करून ठेवण्यांत आलीं होतीं त्यांना आतां साबरमतीच्या कांठावर यथासांग मूठमाती मिळालेली आहे. कच्छमध्यें झालेल्या भूकंपानें धक्का बसला नसेल, त्याच्या शेकडोपट हादरा गुजरातमधल्या ह्या राजकीय भूकंपानें काँग्रेसला बसला आहे. एवढा कीं आज गुजरातमध्यें काँग्रेस जगते आहे कीं मरते आहे अशी स्थिति झाली आहे. आमची माहिती ऐकीव नाहीं. आम्ही अहमदाबादला स्वतः जाऊन डोळ्यांनीं ह्या साऱ्या गोष्टी पाहिल्या आहेत. आठ ऑगस्टला दुपारीं अहमदाबादच्या विद्यार्थ्यांवर पोलिसांनीं गोळीबार करून काँग्रेस हाऊस समोर त्यांचे मुडदे पाडले. आणि दहा तारखेला सकाळीं नऊ वाजतां आम्ही विमानानें तेथें जाऊन पोहोंचलों. उभ्या अहमदाबादेंत आम्हांला 'गांधी टोपी' म्हणून दिसली नाहीं. अनेक वर्षें जें शहर गांधीजींच्या पवित्र अधिवासाचें स्थान होऊन बसलें होतें, ज्या ठिकाणाहून सरदार वल्लभभाई काँग्रेसच्या राजकारणाचीं सूत्रें वर्षानुवर्षें हलवीत होते, त्या काँग्रेसच्या बालेकिल्ल्यांत असा एक दिवस उगवेल कीं ज्या दिवशीं गांधी टोप्यांच्या चौकाचौकांत होळ्या पेटवण्यांत येतील आणि खादीभांडारें फोडून त्यांच्यांतली खादी जाहीरपणें रस्त्यावर जाळण्यांत येईल असें स्वप्नांत तरी कोणाला वाटलें असतें काय?

पण असा अभूतपूर्व चमत्कार गेल्या आठवड्यांत अहमदाबादेंत घडला खरा. मुंबईमध्यें आणि महाराष्ट्रामध्यें एवढें काँग्रेसविरोधी वातावरण आहे. शहरांतील बहुसंख्य जनता आतां कोणतीहि टोपी मुळीं घालेनाशीच झाली आहे. तथापि, गांधी

टोप्या वापरणारे लोक आपल्याकडे पुष्कळ आहेत. खेडेगांवांत तर त्यांची संख्या फार मोठी आहे. पण अहमदाबादेमध्यें आम्ही सर्व शहरांतून हिंडलों. कर्फ्यू असतांना हिंडलों आणि नसतांनाहि हिंडलों. पांढरी टोपी म्हणून आम्हांला कुठेंहि आढळली नाहीं. साबरमतीवर तीन पूल आहेत. ह्या तीन्ही पुलांवरून शेकडों गांधी टोप्या खालून वाहणाऱ्या पुरामध्यें फेकून देण्यांत आल्या. एवढेंच नव्हे तर खादीचा सदरा कोणाच्या अंगांत दिसला कीं लोक त्याच्या पाठीमागें हात धुवून लागत. खादी म्हणजे कॉंग्रेस आणि खादीधारी माणूस म्हणजे कॉंग्रेसवाला एवढीच त्यांनीं आपल्या मनाशीं खूणगांठ बांधून ठेविली होती. अहमदाबादमध्यें ह्यापुढें कॉंग्रेसची नांवनिशाणी सुद्धां दिसतां कामा नये अशीच जणुं कांहीं अहमदाबादच्या लोकांनीं प्रतिज्ञा केलेली दिसली.

"गांधी टोपीवर एवढा कां तुमचा राग?" असें एका प्रतिष्ठित नागरिकाला आम्हीं विचारलें. तेव्हां तो म्हणाला, "ज्या पांढऱ्या टोप्या घालून कॉंग्रेसश्रेष्ठींनीं आमच्या महागुजरातचा गळा कापला, जी सफेत टोपी डोक्यावर चढवून आमच्या पोराबाळांवर गोळीबार करण्याचा मोरारजींनीं आपल्या पोलिसांना हुकूम दिला, ती पांढरी टोपी दृष्टीला पडली कीं आतां आमच्या अंगाची लाही लाही होते!" कॉंग्रेसमंत्र्यांच्या आणि नेत्यांच्या मागें महाराष्ट्रांतले लोक काळीं निशाणें आणि जोड्यांच्या माळा घेऊन धावतात हें जरी खरें असलें तरी ते जाहीर सभांमधून प्रकट झाले तरच! त्यांच्या घरांत जबरदस्तीनें शिरून कांहीं त्यांचा छळ महाराष्ट्रांतल्या जनतेनें कधीं केला नाहीं. पण अहमदाबादमधल्या आणि गुजरातमधल्या लोकांनीं तेथल्या कॉंग्रेसनेत्यांच्या आणि आमदारांच्या घरांघरांमध्यें घुसून त्यांची शिकार केली आहे आणि त्यांच्या मोटारी जाळल्या आहेत. त्यामुळें ठिकठिकाणचे प्रमुख कॉंग्रेसवाले घाबरून एक तर भूमिगत झाले आहेत किंवा आपापल्या गांवांतून परागंदा झाले आहेत. महात्मा गांधींनीं आफ्रिकेमधून आल्यानंतर जो 'कोचरब आश्रम' पहिल्या प्रथम अहमदाबादमध्यें स्थापन केला, तो जाळण्यापर्यंत तेथील जनतेच्या कॉंग्रेसवरील संतापाची मजल गेली आहे, एवढें सांगितलें म्हणजे अधिक सांगण्याची काय जरुरी आहे?

महाराष्ट्राबद्दल गुजरातचें मन जसें कलुषित करून टाकण्यांत आलें आहे, तसा गुजरातबद्दल सुद्धां महाराष्ट्राचा फार मोठा गैरसमज करून देण्यांत आलेला आहे. गुजराती जनतेला महागुजरात नको आहे, असें आम्हांला वेळोवेळीं सांगण्यांत

आलें. एवढेंच नव्हे तर मुंबई महाराष्ट्राला कदापि मिळतां कामा नये ह्याबद्दल गुजराती जनतेचा कटाक्ष आहे असेंहि आम्हांला भासविण्यांत आलें. ह्या दोन्ही समजुती किती खोट्या आहेत हें आतां आपोआपच प्रकट झालें आहे. मुंबई शहरामध्यें गुजराती जनतेच्या भावना गुंतून पडलेल्या आहेत असें राज्यपुनर्रचना समितीनें आपल्या अहवालांत बेधडक विधान करून ठेवलें आहे. वस्तुतः, मुंबई महाराष्ट्राला मिळूं नये अशी कच्छ, सौराष्ट्र आणि गुजरातमध्यें राहणाऱ्या जनतेची इच्छा असण्याचें कांहींच कारण नाहीं. गुजरातच्या सरहद्दीपासून मुंबई नव्वद मैल दूर आहे. तेव्हां गुजरातच्या जनतेच्या भावना मुंबई शहरांत अडकून पडण्याचें काय कारण आहे? उलट असें म्हणणें ही गुजरातच्या जनतेची बदनामी आहे. मग असें जर आहे तर मुंबई हें गुजरात आणि महाराष्ट्राच्या भांडणामधलें 'हाड' कसें झालें आणि तें कुणीं केलें? ह्याचा विचार केला पाहिजे.

मुंबई महाराष्ट्राला मिळूं नये हा सगळा मुंबईमधल्या मूठभर गुजराती भांडवलवाल्यांचा कट आहे. मोरारजी, ढेबर आणि सदोबा हे ह्या भांडवलशाहीचे भाडोत्री हस्तक आहेत. आणि त्यांच्या हातांत सत्ता असल्यामुळें ते गुजरातमधल्या जनतेच्या नांवावर काय वाटेल त्या उचापती करूं शकतात. गुजरातमधल्या जनतेचे जणुं आपणच मुखत्यार आहोंत असें आतांपर्यंत त्यांनीं भासविलेलें आहे. पण आतां त्यांचें तें ढोंग सपशेल उघडें पडलें आहे. 'मुंबईच्या मागें लागून तुम्हीं आमच्या महागुजरातचा नाश करून टाकला आहे' असा उघड उघड ठपका गुजरातमधले लोक त्यांना देऊं लागले आहेत. एवढेंच नव्हे तर 'आमचा अन् मुंबईचा कांहीं संबंध नाहीं. ती ज्यांना द्यायची त्यांना द्या. आम्हांला आपलें महागुजरात देऊन टाका!' असेहि उद्गार गुजरातमधले लोक ठिकठिकाणीं काढूं लागले आहेत. पाकिस्तानचा व्यूह जसा हिंदुस्थानांत राहणाऱ्या मुसलमानांनीं रचला, तसें मुंबई महाराष्ट्राला मिळूं नये हें कारस्थान मुंबईमध्यें राहणाऱ्या गुजराती भांडवलदारांनीं गुजरातेंतल्या जनतेच्या नांवावर रचलें, ही खरी गोष्ट आहे. कलकत्त्याच्या किंवा मद्रासच्या भवितव्यावर मत देण्याचें जसें महाराष्ट्राच्या जनतेला कारण नाहीं, तसें मुंबईचें भवितव्य ठरवण्याचें गुजरातच्या जनतेलाहि प्रयोजन नाहीं. हें अगदीं तर्काला धरून आहे. मुंबईबाबतच्या सर्व काळ्या कारवाया 'मेसर्स मोरारजी, ढेबर ॲण्ड सदोबा' ह्या कंपनीच्या होत ही गोष्ट आतां सूर्यप्रकाशासारखी स्वच्छ झाली आहे.

गुजरातच्या जनतेला ‘महागुजरात’ पाहिजे आहे. दुसरें कांहीं नको. गुजराती जनतेचें हें स्वप्न कांहीं आजचें नाहीं. फार जुनें आहे तें. गुजरातच्या महाकवीलाच ‘गरवी गुजरात’चा पहिल्यानें साक्षात्कार झाला. आणि त्यानेंच तिचा जयजयकार केला. श्री. कन्हय्यालाल मुनशींसारखा थोर साहित्यिक ‘गरवी गुजरात’च्या माहात्म्याचीं स्तोत्रें वर्षानुवर्षें गुर्जर जनतेला ऐकवतो आहे. ह्या सर्व कविकल्पनांना आकार देऊन ‘महागुजरात’ची घोषणा करण्याचा मान सरदार वल्लभभाई पटेल ह्यांनीं मिळवला. महागुजरात हें सरदारांचें स्वप्न होतें. म्हणून गुजराती जनतेच्या सर्व आशाआकांक्षा त्यावर एवढ्या खिळून बसल्या आहेत. आणि हें स्वप्न एका क्षणांत उद्‌ध्वस्त झाल्याबद्दल म्हणूनच तिला परमावधीचें दुःख झालें आहे. कॉंग्रेसश्रेष्ठींना जनतेच्या भावनांची मुळीं परवाच वाटत नाहीं. स्वतःचें राजकारण यशस्वी करण्यासाठीं कोणाच्याहि भावनांचा बळी द्यावयाला ते नेहमीं तयार असतात. राज्यपुनर्रचना समितीची नेमणूक झाल्यापासून महाराष्ट्राचा नाश कसा करतां येईल आणि मुंबई त्यापासून कशी हिरावून घेतां येईल, ह्याचीं मोरारजी-ढेबरांनीं कारस्थानें सुरू केलीं. महाराष्ट्रापासून विदर्भ आणि बेळगांव तोडावयाचें आणि उरलेला महाराष्ट्र महागुजरातला जोडून द्यावयाचा ही पहिली ‘द्विभाषिक’ शक्कल ह्याच जोडगोळीची ! त्या द्विभाषिकाचा महाराष्ट्रानें धिक्कार केला. गुजरातनें केला नाहीं. कारण त्यांत त्याचें महागुजरातचें स्वप्न साकार झालेलें होतें. म्हणून त्याला तक्रार करण्याचें कारण नव्हतें.

पुढें त्रिराज्य-योजना आली. तिचाहि महाराष्ट्रानें धिक्कार केला. पण गुजरातनें केला नाहीं. कारण त्या योजनेनें त्यांना निर्भेळ महागुजरात देऊन टाकलेला होता. नंतर मुंबई केंद्रशासित झाली. पांच वर्षें केंद्रशासनाची मुदत ठरली. तथापि, त्यामुळें महागुजरातला कसलाच उपसर्ग झाला नाहीं. म्हणून गुजराती जनता शांत होती आणि मराठी जनता केंद्रशासनाच्या निर्णयाविरुद्ध झगडत होती. पुढें महाराष्ट्रांतून कॉंग्रेसचें उच्चाटन होऊं नये आणि मुंबई महाराष्ट्राला देणें भाग पडूं नये म्हणून कॉंग्रेसश्रेष्ठींनीं ऑगस्टच्या पहिल्या आठवड्यांत जेव्हां एकदम कोल्हांट उडी मारली आणि उलट्याचें पालटें करून टाकलें, तेव्हां महाराष्ट्रापेक्षां गुजरातला सर्वांत जास्त धक्का बसला. कारण महाराष्ट्राच्या पदरांत तोंपर्यंत कांहींच पडलें नव्हतें. पण ‘महागुजरात’चा घास गुजरातच्या अगदीं तोंडांत पडला होता, तो कॉंग्रेसश्रेष्ठींनीं हात घालून बाहेर काढला. आणि महाद्विभाषिकाची माती

त्याच्या तोंडांत कोंबली. म्हणून त्याच्या तळपायाची आग मस्तकाला पोहोंचली. पंडित नेहरूंसारख्या थोर माणसानें कालपर्यंत एक भाषा बोलावी आणि आज दुसरेंच करावें, ह्याचा गुजरातला राग आला. गुजरातच्या नेत्यांनीं गुजराती जनतेच्या भावनांची परवा न करतां किंवा तिच्या कल्याणाचा कैवार न घेतां महाद्विभाषिकाला परस्पर संमति देऊन आपला विश्वासघात करावा ह्याचा गुजरातला संताप आला. सदोबा पाटलांसारख्या उपऱ्यांनीं "मी गुजरातची समजूत घालीन!" अशी आगंतुकी करून गुजराती जनता जशी कांहीं आपल्या खिशांतच आहे असा भाव मारावा, ह्याची गुजरातला मनस्वी चीड आली. आणि ह्या त्यांच्या सर्व मानसिक प्रक्षोभाला जर जास्तींत जास्त भयानक स्वरूप कशामुळें प्राप्त झालें असेल, तर तें पोलिसांनीं केलेल्या विद्यार्थ्यांच्या राक्षसी हत्येमुळें! ज्या 'सिव्हिल हॉस्पिटल'च्या इमारतींत महागुजरातचें सचिवालय येणार असें चित्र अहमदाबादची जनता रंगवीत बसली होती, त्याच ठिकाणीं आपल्या मुलबाळांचीं प्रेतें बघण्याची तिला पाळी आली त्यामुळें तिच्या सहनशक्तीचा अगदीं कडेलोट झाला!

महाराष्ट्रीय लोकांपेक्षां गुजराती लोक अधिक रागीट आणि संतापी आहेत असें आम्हांला वाटतें. कारण महाराष्ट्रीय लोक वृत्तीनें क्षत्रिय आहेत, तर गुजराती लोक वृत्तीनें वैश्य आहेत. वैश्य लोकांना राग लौकर येत नाहीं. पण एकदां आला म्हणजे तो इतका अनावर होतो कीं सांगतां सोय नाहीं. म्हणून अहमदाबादेंत आणि गुजरातेंत काँग्रेसविरोधी निदर्शनांची जी एकदम भयंकर लाट उठली तशी महाराष्ट्रांत किंवा इतरत्र आजपर्यंत कधीं उठली नसेल. काँग्रेस हाऊससमोर जमलेल्या तरुण विद्यार्थ्यांवर कांहीं कारण नसतांना पोलिसांनीं अघोरपणें अचानक गोळीबार केला आणि त्यांची भीषण हत्या केली ही गोष्ट गुजराती जनतेच्या जिवाला अतिशय लागून राहिली. वस्तुतः पोलिसांना विद्यार्थ्यांवर गोळीबार करण्याचें कांहींहि कारण नव्हतें. 'लोकसत्ते'चे संपादक श्री. महाजनी ह्यांनीं परवांच्या अग्रलेखांत म्हटलें आहे कीं, "दंगलीला विद्यार्थ्यांनीं सुरुवात करावी ही खेदजनक घटना आहे. अत्याचार थांबविण्यासाठीं पोलिसांनीं गोळीबार करूं नये तर काय करावें? सार्वजनिक मालमत्तेला आगी लावण्याची रीत कोणतेंहि सरकार चालूं देणार नाहीं." श्री. महाजनी ह्यांचा हा युक्तिवाद नुसता खोटाच नाहीं पण अत्यंत दुष्टपणाचा आहे. अहमदाबादच्या काँग्रेस हाऊससमोर जमलेल्या

विद्यार्थ्यांनीं कोणत्याहि तऱ्हेची दंगल केली नसतां त्यांच्यावर गोळीबार करण्यांत आला. ही गोष्ट अनेक पुराव्यांनीं सिद्ध करतां येईल. तोंपर्यंत अहमदाबादेंतील सर्व वातावरण अत्यंत शांत होतें. पण सुरेश भट ह्याची अर्धी कवटी जेव्हां पोलिसांनीं उडवली, तेव्हां जनतेच्या संतापाचा ज्वालामुखी एकदम फुटला.

अत्याचार थांबविण्यासाठीं मोरारजीचे पोलीस गोळीबार करतात हें कोणत्या गाढवानें महाजनींना सांगितलें? बंडू गोखल्याला ठाकुरद्वारच्या रस्त्यावर पोलीसांनीं जेव्हां गोळी घातली तेव्हां तेथें कोणते अत्याचार चालले होते? मुंबईच्या काळाचौकीपाशीं शांतपणें उभ्या असलेल्या जनसमूहावर नराधम ई. एस. मोडक ह्यांनीं गोळ्यांचा वर्षाव करून रक्ताच्या नद्या वाहवल्या आणि मुडद्यांच्या राशी रचल्या, त्यावेळीं तेथें कोणते अत्याचार घडत होते? मुंबईच्या गोळीबारांत तर अनेक लोक घरांत बसले असतां गोळ्या लागून मेले, ते काय सार्वजनिक मालमत्तेला आगी लावीत होते? एकवीस नोव्हेंबरला फ्लोरा फाउन्टनपाशीं जीं माणसें मारलीं गेलीं, त्यांच्यावर केलेला गोळीबार असमर्थनीय होता असा तर कायद्याच्या कोर्टानें निर्णय दिलेला आहे हें महाजनींना माहीत आहे कीं नाहीं! लोकांनीं अत्याचार केले म्हणून गोळीबार करणें भाग पडलें हा सरकारचा ठराविक युक्तिवाद धादांत लबाडीचा आहे. महाजनींसारख्या स्वतंत्र आणि स्वाभिमानी वृत्तीच्या संपादकानें ह्याच टोकळेबाज युक्तिवादाचा स्वीकार करावा, ही गोष्ट शिसारी आणणारी आहे. सर्व दंगलीचें आणि दोषांचें खापर जनतेच्या डोक्यावर फोडावयाचें आणि आपण केलेल्या राक्षसी गोळीबारावर पांघरूण घालावयाचें हा काँग्रेस सरकारचा नित्याचा धंदाच होऊन बसला आहे. एवढ्याचसाठीं गोळीबाराची न्यायालयीन चौकशी होऊं द्या आणि अपराधी कोण ह्याचा निवाडा लागूं द्या अशी दर वेळीं जनतेची मागणी असते. पण ही मागणी प्रत्येक वेळीं काँग्रेस सरकार बेशरमपणें धुडकावून लावते ह्याला काय म्हणावें?

अहमदाबादच्या ह्या गोळीबाराची तावडतोब चौकशी झाली पाहिजे अशी एका आवाजानें साऱ्या गुजरातनें आतां मागणी केलेली आहे. त्याला मोरारजींनीं जें मासलेवाईक उत्तर दिलें आहे तें त्यांच्या उन्मत्तपणाला आणि अमानुषपणाला शोभण्यासारखेंच आहे. मोरारजी म्हणाले, "अशी चौकशी होणार नाहीं! मुळींच होणार नाहीं. गोळीबाराच्या चौकशीची जे मागणी करतात, ते स्वतःच दंगेखोर असतात! नाहींतर ते स्वतः दंगलीच्या ठिकाणीं जाऊन दंगल कां थांबवीत

नाहींत?" मोरारजींच्या ह्या युक्तिवादाला काय उत्तर द्यावयाचें? मुंबईतल्या अत्याचारांच्या चौकशीची मागणी श्री. चिंतामणि देशमुख ह्यांनीं लोकसभेंत केली. त्यांना जर हा मोरारजींचा युक्तिवाद लागू केला तर मुंबईतले सर्व दंगे चिंतामणि देशमुख ह्यांनीं केले असाच मूर्खपणाचा निष्कर्ष त्यांतून काढावा लागेल. 'लोकसत्ते'च्या दीडशहाण्या संपादकांनींसुद्धां ह्याच युक्तिवादाचा अवलंब आपल्या अग्रलेखांत केला आहे. ते म्हणतात, "सरकारच्या पाशवी शक्तीवर टीकास्त्र सोडणारे लोक जमावाला शांत करण्यासाठीं कांहींच खटपट करीत नाहींत!" प्रक्षुब्ध जनतेला शांत करण्याची जबाबदारी समाजामधील शहाण्यासुर्त्या लोकांची नसून त्यांना भडकविणाऱ्या राज्यकर्त्यांचें तें आद्य कर्तव्य असतें. म्हणूनच १९३७ सालीं अहमदाबादमधील दंगे 'मी कसे शांत करूं?' असा मोरारजींनीं महात्मा गांधी ह्यांना प्रश्न केला असतां महात्माजींनीं त्यांना उत्तर दिलें कीं, "तूं त्या दंगलीच्या आगींत उडी टाक आणि कानपूरच्या गणेश शंकर विद्यार्थ्यासारखें स्वतःला जाळून घे!"

लोकांच्या मागण्या आणि भावना राज्यकर्त्यांनीं खुशाल पायाखालीं तुडवावयाच्या आणि लोक प्रक्षुब्ध झाले कीं त्यांच्यावर गोळ्या झाडावयाच्या आणि 'लोकांना शांत करण्याची जबाबदारी समाजधुरीणांवर आहे, आपल्यावर नाहीं' असें म्हणून काखा वर करावयाच्या, हा ह्या देशांतील राज्यकर्त्यांचा आतां शिरस्ताच ठरून गेला आहे. अहमदाबादची सर्व दंगल पोलिसांनीं विद्यार्थ्यांवर आधीं गोळीबार केला म्हणून सुरू झाली ही गोष्ट जगजाहीर असतांना पंडित नेहरू आपले खुशाल म्हणतात कीं, "लोकसभेच्या निर्णयाला जर लोक रस्त्यांत दंगे करून जाळपोळ आणि मोडतोड करून उत्तर देऊं लागले तर ह्या लोकशाहीचें पुढें होणार काय?" गृहमंत्री पंत म्हणाले, "देशांतील तरुण दंगलखोर राजकीय पक्षांच्या आहारीं जाऊन जर हिंसात्मक कृत्यें करूं लागले तर ह्या देशाची प्रगति होणार तरी कशी?" ह्या देशांतल्या प्रगतीची आणि लोकशाहीची पंत आणि नेहरू ह्यांना केवढी पण तळमळ लागून राहिली आहे? अरेरे, बिचारे! तेवढ्यासाठीं तर पांच पांच कोटी लोकांचें भवितव्य तें पांच पांच दिवसांत शेंदोनशें लोकांच्या सह्या गोळा करून एवढ्या घाईघाईनें ठरवून टाकतात! पण लोकांना त्यांची किंमत कुठें आहे? ते आपले दंगेच करतात! नेहरू-पंतांच्या दृष्टीनें आज देशामध्यें कॉंग्रेसवाले आणि पोलीस एवढेच काय ते 'सभ्य' आहेत. बाकीचे सर्व लोक 'गुंड' आहेत!

अहमदाबादच्या आणि गुजरातच्या लोकांनीं आपल्या रागाचा आणि संतापाचा जास्तींत जास्त भडिमार मोरारजींवर केला ही गोष्ट आम्हांला सर्वांत जास्त अर्थपूर्ण वाटते. अहमदाबादचें आणि मोरारजींचें विशेष नातें आहे. गेल्या निवडणुकींत ज्या मोरारजींना बलसाडनें उताणें पाडलें, त्यांना अहमदाबादनें पुन्हा निवडून देऊन मुंबई राज्याचे मुख्य प्रधान बनविलें. त्यामुळें मोरारजी हे आपले एकमेव नेते आहेत अशा भावनेनें व विश्वासानें गुजरातची जनता त्यांच्याकडे पाहूं लागली. सरदार वल्लभभाई पटेलांचीच जागा त्यांनीं घेतली असें म्हणावयास हरकत नाहीं. ज्या अहमदाबादच्या जनतेनें पूर्वी मोरारजींना दगड मारले होते, तीच जनता एकदम अनुरक्त होऊन त्यांच्यावर फुलांचा वर्षाव करूं लागली, असें मोरारजींनीं अहमदाबाद येथें गेल्या फेब्रुवारींत झालेल्या आपल्या वाढदिवसाच्या एका समारंभाच्या वेळीं स्वतः सांगितलें. आठ महिन्यांपूर्वी जेव्हां महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेसनें महाद्विभाषिकाचा पर्याय सुचविला, त्यावेळीं गुजरातच्या जनतेच्या वतीनेंच मोरारजींनीं तो झिडकारून टाकला. म्हणून, आपलें महागुजरातचें स्वप्न ज्या मोरारजींच्यामुळें साकार होईल असा गुजराती जनता भरंवसा धरून बसली होती, त्याच मोरारजींनीं 'महागुजरात'च्या नरड्याला नख लावून आपला विश्वासघात करावा ह्याचें तिला सर्वांत जास्त दुःख झालें.

एवढेंच करून मोरारजी थांबते तर ठीक होतें. पग त्यांत त्यांच्या पोलिसांनीं केलेल्या राक्षसी गोळीबाराची आणखीन् भर पडली. त्यामुळें मोरारजी-विरोधी संतापाचा एकदम सर्वत्र भडकाच उठला. मोरारजींचें एक भव्य तैलचित्र थोड्याच महिन्यांपूर्वी कॉंग्रेस हाऊसमध्यें विधिपूर्वक लावण्यांत आलें होतें. तें लोकांनीं तोडून फोडून आणि त्यावर पेट्रोल ओतून जाळून टाकलें. सबंध गुजरातभर मोरारजींच्या प्रतिमेच्या प्रेतयात्रा काढण्यांत येऊन त्याच्या होळ्या करण्यांत आल्या. ह्यावरून गुजराती जनतेचा मोरारजींवर केवढा क्रोध भडकलेला आहे तें दिसून येतें. अहमदाबादच्या मजूर वस्तींत लोकांनीं गाढवांच्या पाठीवर 'मोरारजी गद्धा, निकळी जा!' अशीं अक्षरें लिहून तीं गाढवें रस्त्यांमधून सोडून दिलेलीं. आम्हीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलीं. आतां ह्यापेक्षां अधिक काय सांगावें? सारा महाराष्ट्र मोरारजींचा अगदीं मनापासून द्वेष करतो. पण गुजरातनें त्यांची एका आठवड्यांत जेवढी विटंबना केली, तेवढी महाराष्ट्रानें आजपर्यंत कधीं केलेली नाहीं. आजवर मोरारजींनीं मुंबई-महाराष्ट्रांत गोळीबार करून शंभराचे वर माणसें ठार

मारलीं. त्यामुळें मराठी लोकांना साहजिकच असें वाटत होतें कीं मोरारजी हा गुजराती माणूस आहे, म्हणून मराठी माणसें ठार मारावयाची त्याला क्षिति वाटत नाहीं. पण आतां त्यांनीं गुजरातेंत हत्याकांड सुरू करून सोळा गुजराती माणसें माणसें मारून दाखविलीं. त्यावरून आतां हें सिद्ध होतें कीं, जो हुकूमशहा असतो त्याला भाषा नसते, कीं जात नसते. आपल्या अत्याचारी धोरणांत हा माझा आणि तो दुसऱ्याचा असा पक्षपात तो मुळींच करीत नाहीं. तो बंदुकीच्या नळीमधूनच साऱ्या जगाकडे पाहत असतो.

आजपर्यंत मोरारजी केवळ महाराष्ट्रीय जनतेच्या शिव्याशापाचे धनी होते. पण यापुढें आतां गुजरातच्या द्वेषाचे आणि तिरस्काराचे ते लक्ष्य-बिंदु झाल्यानें मुंबई राज्याच्या सार्वजनिक जीवनांत त्यांना आतां कोठेंहि स्थान उरलें नाहीं. ह्यापुढें गुजरातच्या कोणत्याहि विभागांतून ते निवडून येणें अशक्य आहे ह्याबद्दल आमची खात्री आहे! तथापि, एवढें सर्व होऊनहि मोरारजींचे किंवा काँग्रेस श्रेष्ठींचे डोळे अद्याप उघडत नाहींत ह्याचें आम्हांला आश्चर्य वाटतें. 'महाद्विभाषिक राज्य मराठी आणि गुजराती जनतेच्या कल्याणाचें आहे म्हणून त्याचा स्वीकार करून त्यांनीं तें यशस्वी करून दाखवावें' असें कोडगेपणानें ते पुन्हा पुन्हा आपले सांगतातच आहेत. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचा नाश करण्यासाठीं काँग्रेस श्रेष्ठींनीं हा महाद्विभाषिकाचा खड्डा खणला. कारण गुजरातमध्यें काँग्रेसला निर्णायक बहुमत मिळेल असा त्यांना जबरदस्त विश्वास वाटत होता. पण महाराष्ट्राच्या नाशासाठीं खणलेल्या ह्या खड्ड्यांत शेवटीं काँग्रेसलाच मूठमाती मिळेल किंवा काय असा पेचप्रसंग गुजरातनें आतां निर्माण केलेला आहे. महाद्विभाषिकाचा स्वीकार जसा महाराष्ट्र करणार नाहीं तसा गुजरातहि पण करणार नाहीं ही गोष्ट आतां स्पष्ट झाली आहे. गुजरातवर महाद्विभाषिक लादण्याची जर काँग्रेसश्रेष्ठी जबरदस्ती करतील तर महाराष्ट्राप्रमाणेंच गुजरातमधूनहि काँग्रेस नेस्त-नाबूत झाल्यावांचून राहणार नाहीं, ही काळ्या दगडावरची रेघ आहे.

गुजरातमधील दंगल ही कम्युनिस्टांनीं आणि समाजवाद्यांनीं घडवून आणली आहे ह्या ठराविक युक्तिवादानें कांहीं काँग्रेसनेते आपलें समाधान करून घेत आहेत. ह्या दंगलीचा आगामी निवडणुकीमधील काँग्रेसच्या निश्चित यशावर कांहींहि परिणाम होणार नाहीं असें सांगणारे मुद्धां आम्हांला अहमदाबादेमध्यें भेटले. पण आमचा अंदाज निराळा आहे. गुजरातमध्यें काँग्रेसखेरीज दुसरा पक्ष नाहीं ही गोष्ट खरी

आहे. महात्मा गांधी आणि सरदार पटेल ह्यांच्या अमर्याद लोकप्रियतेमुळें गुजरातेंत डाव्या पक्षांची वाढ मुळीं होऊंच शकली नाहीं. तथापि, अशी जरी परिस्थिति असली, तरी प्रत्येक गुजराती माणसाला 'महागुजरात' ची तहान लागून राहिलेली आहे, ही गोष्ट तितकीच खरी आहे. म्हणूनच, 'महागुजरात नाहीं !' असे काँग्रेसश्रेष्ठींच्या तोंडून उद्गार निघाल्याबरोबर, एका दिवसांत काँग्रेसचें नेतृत्व गुजरातमधून कोलमडून पडलें ! 'महागुजरात कसा आणि कधीं मिळेल' ह्याचें निश्चित मार्गदर्शन आगामी निवडणुकींत जर काँग्रेस देऊं शकेल तरच काँग्रेसला यश मिळेल. पण ती गोष्ट तर आतां शक्य नाहीं ! म्हणून येत्या निवडणुकींमध्यें महाराष्ट्रांत काँग्रेसचा जसा धुव्वा उडेल, तसा किंवा त्याहूनहि कदाचित् अधिक प्रमाणांत गुजरातमध्यें काँग्रेसचा पराभव झाल्यावांचून राहणार नाहीं असें निदान आतां तरी आम्हांला वाटतें.

महागुजरातच्या चळवळींचें नेतृत्व गुजरातच्या विद्यार्थ्यांनीं आतां पत्करलें आहे. शेकडों विद्यार्थी शाळाकॉलेजें सोडून महागुजरातचा संदेश पोहोंचविण्यासाठीं खेडेगांवांत गेले आहेत. गुजराती महिलाहि फार मोठ्या संख्येनें महागुजरातच्या आंदोलनांत आतां उतरल्या आहेत. शेकडों काँग्रेसवाले आपापल्या जागांचे राजीनामे देऊन बाहेर पडले आहेत. म्हणून महागुजरातची चळवळ ही पुराच्या पाण्याप्रमाणें चार दिवसानें उतरून जाईल असें ज्यांना वाटतें, त्यांना 'गुजरातचा आत्मा' समजलाच नाहीं असें आम्ही सांगतों. मुंबईमधल्या मूठभर गुजराती भांडवलवाल्यांनीं आणि त्यांच्या मोरारजी-ढेबर-सदोबांसारख्या हस्तकांनीं आजपर्यंत मराठी आणि गुजराती जनतेंत वितुष्ट आणि गैरसमज निर्माण करण्याचीं जीं नाना तऱ्हेचीं कारस्थानें रचलीं तीं आतां सपशेल कोलमडून पडलीं ही सर्वांत आनंदाची गोष्ट आहे. गुजराती आणि मराठी जनतेमध्यें ह्यापुढें कसलाहि वादच मुळीं उरला नाहीं. गुजराती जनतेला 'महागुजरात' पाहिजे आहे. आणि मराठी जनतेला 'संयुक्त महाराष्ट्र' हवा आहे. मुंबईशीं महागुजरातचा संबंधच येत नाहीं. तेव्हां तिचा समावेश 'संयुक्त महाराष्ट्रां'त व्हावयाला आतां अडचणच राहिली नाहीं. म्हणून गुजराती आणि मराठी जनतेनें बंधुभावानें आणि स्नेहभावानें महाद्विभाषिकाविरुद्ध जर आपला लढा लढविला तर येत्या निवडणुकांमध्येंच काँग्रेसचा निःपात करून आपापलीं ध्येयें त्यांना निश्चितपणें साध्य करून घेतां येतील !

सार्वभौम लोकसभेनें 'महाद्विभाषिका'चा दिलेला निर्णय आपण आतां शिरोधार्य मानला पाहिजे असा उपदेश काका गाडगीळांसारखे 'लांडे कोल्हे' आतां करूं लागले आहेत. लोकसभेचें सार्वभौमत्व म्हणजे दोनशेंचाळीस पुरभय्यांनीं हात वर करून पांच कोटी जनतेचें भवितव्य पांच दिवसांत ठरवावयाचें हेंच ना? लोकसभेच्या सार्वभौमत्वाची जर कुणीं विटंबनाच केली असेल तर ती कॉंग्रेसश्रेष्ठींनीं आपल्या बहुमताच्या जोरावर. म्हणून आगामी निवडणुकींत महाराष्ट्र आणि गुजरात ह्यांनीं कॉंग्रेसचा पाडाव करून 'सार्वभौमत्वा'च्या नांवावर कॉंग्रेसनें पांच कोटी जनतेवर जो 'द्विभाषिक' जुलूम केला आहे, तो भारताच्या वेशीवर टांगणें जरूर आहे!

१९-८-१९५६

# द्विभाषिकाला महाराष्ट्राचें आव्हान !

' संयुक्त महाराष्ट्र समिती 'च्या विद्यमानें ' शेतकरी-कामगार पक्षा 'चे नेते खासदार भाऊसाहेब राऊत, एम्. पी., ह्यांच्या अध्यक्षतेखालीं महाराष्ट्रांतील समग्र सर्व-पक्षीय संयुक्त महाराष्ट्रवादी कार्यकर्त्यांची एक विशाल परिषद् शिवाजी पार्कवर काल आणि आज भरत आहे. ह्या परिषदेचें उद्‌घाटन कोल्हापूरचे साम्यवादी पुढारी भाई माधवराव बागल ह्यांनीं केलें असून त्याला भारतीय स्वातंत्र्ययुद्धाचे सेनापति भीष्माचार्य बापट ह्यांनीं आशीर्वाद दिला आहे. तीन कोटी मराठी जनतेची ' संयुक्त महाराष्ट्रा 'ची मागणी द्वेषानें आणि दुष्टपणानें लाथाडून लोकसभेंतील हुकमी हातांच्या आणि मतांच्या जोरावर काँग्रेसश्रेष्ठींनीं तिला जबरदस्तीनें ' महाद्विभाषिका ' च्या सापळ्यांत लोटून दिलें आहे. देशांतील चौदा राज्यांपैकीं तेरा राज्यें लोकशाहीच्या तत्त्वाप्रमाणें एकभाषिक करून आणि फक्त महाराष्ट्राचें आणि गुजरातचें तेवढें एकच राज्य ' द्विभाषिक ' बनवून काँग्रेसश्रेष्ठींनीं लोकशाहीचा खून केलेला आहे. महाद्विभाषिक हें केवळ महाराष्ट्र आणि गुजरातमधील जनतेवरील महाभयंकर संकट नसून तें भारताच्या स्वातंत्र्यावरील आणि लोकशाहीवरील एक प्राणघातक गंडांतर आहे. म्हणून हें महाद्विभाषिक राज्य शक्य तितक्या लौकर नष्ट करून सर्व मराठी भाषिकांचें संयुक्त महाराष्ट्र आणि सर्व गुजराती भाषिकांचें महागुजरात अशीं दोन एकभाषिक राज्यें निर्माण होण्यामध्येंच भारताचें कल्याण आहे.

काँग्रेसश्रेष्ठींनीं महाराष्ट्रावर हा जो धादांत अन्याय केला आहे त्याचें कारण एकच आहे, आणि तें चिंतामणराव देशमुखांनीं भर लोकसभेंत नेहरूंच्या तोंडावर सांगितलें आहे तें हें कीं, भारताच्या आजच्या राज्यकर्त्यांच्या हृदयांत महाराष्ट्रद्वेष भरलेला आहे. नाहींतर महाराष्ट्रानें एकमुखानें जें जें म्हणून मागितलें तें तें कटाक्षानें काँग्रेसश्रेष्ठींनीं कां नाकारलें? आणि महाराष्ट्राला जें जें नको आहे तें तें त्याच्यावर जबरदस्तीनें नेमकें कां लादण्यांत आलें बरें ? पोट्टी श्रीरामलू ह्यांनीं भाषिक आंध्रासाठीं आपलें बलिदान केलें आणि त्यामुळें आंध्रांत कांहीं काळ लोकप्रक्षोभ झाला. तर नेहरूंनीं भाषिक

आंध्र ताबडतोब त्यांच्या अंगावर फेकून दिला आणि आतां उरलें सुरलें तेलंगणहि त्यांना देऊन टाकलें. आणि 'संयुक्त महाराष्ट्रा'साठीं शेकडों लोकांनीं आपल्या प्राणाचें बलिदान केलें. शेकडों लोक कारागृहांत गेले. हजारों स्त्रीपुरुषांनीं सत्याग्रह केला. लाखों लोकांच्या सभा भरल्या, मोर्चे गेले, संप आणि हरताळ पुकारले, तरी कांग्रेसश्रेष्ठी खुशाल कानांत दट्टे घालून, डोळ्यांवर कातडें ओढून आणि निर्विकार चेहरे करून स्वस्थ मुडद्यासारखे पडून आहेत. महाराष्ट्रांत काय चाललें आहे हें जणुं कांहीं त्यांना दिसत नाहीं. आणि महाराष्ट्राला काय हवें हें त्यांना कळत नाहीं. आंध्राबद्दल त्यांना जें प्रेम वाटलें तें महाराष्ट्राबद्दल त्यांना कां वाटूं नये बरें? भारतांतल्या तेरा भाषिकांच्या एकभाषिक राज्यांच्या मागण्या ज्यांनीं निःसंकोचपणें मान्य केल्या, त्यांनीं 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या मागणीला एवढा निकराचा विरोध कां करावा? तेव्हां राज्यकर्ते कॉंग्रेसश्रेष्ठी हे महाराष्ट्राचे दुष्मन् आहेत असा जो चिंतामणरावांनीं निष्कर्ष काढला तो अक्षरशः खरा आहे. आणि महाराष्ट्रावर सूड उगवण्यासाठीं त्यांनीं गुजरातचा बळी घेऊन तर राजकीय राक्षसीपणाचा अगदीं उच्चांकच मोडलेला आहे!

महाराष्ट्रांतली आम जनता आणि कॉंग्रेस खेरीज करून तमाम राजकीय पक्ष हे कट्टर संयुक्तमहाराष्ट्रवादी आहेत. महाद्विभाषिकाला त्यांचा प्रखर विरोध आहे. महाराष्ट्रांतले कॉंग्रेस पुढारीहि राज्यपुनर्रचना समितीचा अहवाल प्रसिद्ध होण्यापूर्वी स्वतःला कट्टर संयुक्तमहाराष्ट्रवादी म्हणवीत होते. महाराष्ट्रांतल्या झोपडीझोपडीसाठीं लढूं अशा गर्जना भाऊसाहेब हिरे करीत होते, तर यशवंतराव चव्हाण आपला 'लाल लंगोट' दाखवून दंड थोपटीत उभे होते. शंकरराव देवांनीं तर संयुक्त महाराष्ट्राच्या किमान मागणीसाठीं आपले प्राण पणाला लावले होते. ते म्हणत होते कीं, "संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न सुटल्याखेरीज भारताचा प्रश्न सुटणार नाहीं!" आमचे काका गाडगीळ शमीच्या झाडावर आपलीं शस्त्रें ठेवून त्या झाडाखालीं भीमाच्या पवित्र्यांत भारतीय युद्धाचा पांचजन्य फुंकीत उभे होते. पण कॉंग्रेसश्रेष्ठींना प्रसन्न करण्यासाठीं ह्या सर्व कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं आपल्या पूर्वीच्या सर्व प्रतिज्ञांना, आश्वासनांना आणि गर्जनांना हरताळ फासून संयुक्त महाराष्ट्राचा सपशेल गळा कापला आणि आतां महाद्विभाषिकाला पाठिंबा देऊन तर संयुक्त महाराष्ट्राला कायमची मूठमाती द्यावयाला ते सिद्ध झाले आहेत! त्यांनीं केलेल्या विश्वासघाताला आणि हरामखोरीला कांहीं तुलना नाहीं!

प्रारंभीं 'संयुक्त महाराष्ट्रा'चा लढा हा दिल्लीचे कॉंग्रेसश्रेष्ठी आणि मुंबईचें कॉंग्रेस सरकार ह्यांच्या विरुद्ध होता. पण आतां हा लढा महाद्विभाषिकाचें समर्थन करणाऱ्या महाराष्ट्रांतल्या कॉंग्रेसवाल्यांविरुद्ध आहे. कारण आणखी पांच महिन्यांनीं होणाऱ्या सार्वत्रिक निवडणुका ह्या मुंबई राज्यांत तरी 'महाद्विभाषिका'च्या एकाच मुद्द्यावर लढल्या जातील ह्यांत कांहीं शंका नाहीं. गुजरातेंत महागुजरात जनता परिषद एका बाजूला आणि प्रदेश कॉंग्रेस दुसऱ्या बाजूला, महाराष्ट्रांत संयुक्त महाराष्ट्र समिति एका बाजूला अन् प्रदेश कॉंग्रेस दुसऱ्या बाजूला अशी ह्या निवडणुकींत रणधुमाळी माजणार आहे. आणि निवडणुकींमध्यें उभय प्रदेशांतील कॉंग्रेसपक्ष पराभूत झाले तरच मराठी आणि गुजराती जनतेला संयुक्त महाराष्ट्र आणि महागुजरात मिळण्याची शक्यता आहे. महाराष्ट्रांतील महाद्विभाषिकविरोधी सर्वपक्षीय कार्यकर्त्यांची जी विशाल परिषद् काल आणि आज भरत आहे तिच्यापुढें एकच प्रश्न आहे. आणि तो हा कीं, आगामी निवडणुका सर्वांनीं एकजुटीनें, एका व्यासपीठावरून आणि किमान कार्यक्रमाच्या आधारावर लढून कॉंग्रेसला नेस्तनाबूद कसें करावयाचें ?

'संयुक्त महाराष्ट्रा'चा प्रश्न हा तीन कोटी मराठी जनतेला जीवनमरणाचा प्रश्न वाटतो. संयुक्त महाराष्ट्रावर आजपर्यंत मराठी जनतेनें जी अनन्य भक्ति आणि असामान्य निष्ठा व्यक्त केली, संयुक्त महाराष्ट्र साकार व्हावा म्हणून तिनें जो अभूतपूर्व त्याग केला त्याला महाराष्ट्राच्या इतिहासांत पूर्वीचा दाखला नाहीं. महाराष्ट्रांत जनतेच्या ऐक्याचा आणि प्रक्षोभाचा असा विराट् देखावा इतिहासानें कधीं पाहिलेला नाहीं. भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीलाहि महाराष्ट्रांत एवढें विशाल स्वरूप प्राप्त झालेलें आम्हांला कधीं आढळलें नाहीं. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही खरोखरच एक महापर्वणी होती. महाराष्ट्रीय जनतेच्या उद्धारासाठीं आकाशांतून उतरलेली जणुं कांहीं ती भागीरथीच होती. असा महापूर अनेक शतकांमधून एखादे वेळींच यावयाचा. तथापि, ह्या महापुराच्या वेगाची आणि ओघाची कल्पना प्रारंभीं पुष्कळशा पुढाऱ्यांना आली नाहीं. ते त्या पुराच्या लोंढ्याबरोबर असहायपणें वाहातच गेले. त्यामुळें जनता पुढें आणि पुढारी मागें असाच ठिकठिकाणीं देखावा दिसला. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या प्रश्नावर जनतेमध्यें जेवढें ऐक्य दिसलें, तेवढें जर पुढाऱ्यांमध्यें निर्माण झालें असतें तर 'संयुक्त महाराष्ट्रा'चा प्रश्न चुटकीसरशीं सुटला असता. पण ह्या

चळवळीच्या अप्रकट सामर्थ्याचें आणि सुप्तशक्तीचें आकलन महाराष्ट्रांतल्या करंट्या आणि बेवकूफ कॉंग्रेस पुढाऱ्यांना कांहीं झालें नाहीं. त्यांनीं ह्या महापुराचें पाणी अडवण्यासाठीं आपल्या खादीच्या पंच्यांचे बांध बांधले आणि स्वतःचें हसूं आणि छीःथू मात्र करून घेतली.

संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही महाराष्ट्रांतील जनतेच्या अस्तित्वाची, अस्मितेची आणि अभिमानाची चळवळ होती. ती समग्र जनतेची चळवळ होती. त्या चळवळीशीं द्रोह करण्याचें महाराष्ट्रांतील कॉंग्रेसनेत्यांना वस्तुतः कांहीं कारण होतें का ? आंध्र आणि कर्नाटकमधल्या भाषिक चळवळीचे नेते कॉंग्रेसवालेच होते. ते कांहीं कॉंग्रेसश्रेष्ठींच्या रोषाला आणि विरोधाला घाबरले नाहींत. नेहरू काय म्हणतील ह्याची कधी त्यांनीं परवा केली नाहीं. त्यांनीं ह्या प्रश्नावर विलक्षण एकजूट आणि खंबीर वृत्ति दाखवली म्हणून शेवटीं कॉंग्रेसश्रेष्ठींना त्यांचें म्हणणें मान्य करण्यावांचून मुळीं गत्यंतरच उरलें नाहीं. त्याच्या उलट आमच्या महाराष्ट्रांतलें कॉंग्रेसनेते पाहा. मुंबई-बेळगांवसह संयुक्त महाराष्ट्र द्यावयास नेहरू तयार नाहींत असें पाहतांच ते पटापट संयुक्त महाराष्ट्र परिषदेंतून बाहेर पडले. आणि 'नेहरू महाराष्ट्रापेक्षां मोठे आहेत' अशा आरोळ्या ठोकूं लागले. शंकरराव देवांनीं कोणाला न विचारतां स्वतःच्या अखत्यारांत 'संयुक्त महाराष्ट्र परिषदे'ला टाळें ठोकलें आणि नेहरूंचें 'हृदयपरिवर्तन' करण्यासाठीं ते दिल्लीला खेपा घालूं लागले. शेवटी शंकररावांनीं नेहरूंचें हृदय-परिवर्तन करावयाच्या ऐवजीं नेहरूनींच शंकररावांचें हृदयपरिवर्तन केलें आणि त्यांना 'महाद्विभाषिका'चे कट्टर पुरस्कर्ते अन् 'संयुक्त महाराष्ट्रा'चे प्रखर द्वेष्टे बनवून परत पाठवलें. पिकेटिंग करावयाला दारूच्या गुत्त्यांत जाणाऱ्या स्वयंसेवकानें शेवटीं अट्टल दारूबाज बनावें तसें शंकररावांचें झालें. 'संयुक्तमहाराष्ट्र परिषदे'च्या अध्यक्षानें 'महाद्विभाषिका'चा प्रचारक व्हावें ह्यापेक्षां अधिक नामुष्कीची आणि नाचक्कीची गोष्ट कांहीं असूं शकेल काय ?

शंकररावांसारख्या आजन्म ब्रह्मचाऱ्यानें एकादी 'रखेली' ठेवली असती तरी आम्हांला एवढें दुःख झालें नसतें, तेवढें त्यांच्या ह्या महाराष्ट्रद्रोही धर्मांतरानें आम्हांला झालें आहे. 'नेहरूंच्या न्यायीपणावर तुम्ही विश्वास ठेवा. नेहरू आज ना उद्यां तुम्हांला मुंबई दिल्याखेरीज राहणार नाहींत' असें सांगून काकासाहेब गाडगीळांनीं शेवटपर्यंत मराठी जनतेची फसवणूक केली. आणि शेवटीं लोकसभेनें महा-

द्विभाषिकाला मान्यता दिल्याबरोबर त्यांनीं 'संयुक्त महाराष्ट्रा'कडे सपशेल पाठ फिरवून महाद्विभाषिकाला साष्टांग नमस्कार घातला! देव, देवगिरीकर, हिरे, चव्हाण आणि गाडगीळ ह्यांनीं 'राजिनामे तयार आहेत', 'शस्त्रें सिद्ध आहेत' असली बेशरम थापेबाजीनें भरलेलीं नाटकी भाषणें करून अखेर शेवटीं संयुक्त महाराष्ट्राशीं जी भयंकर दगलबाजी केली ती महाराष्ट्रीय जनता कालत्रयीं तरी विसरणें शक्य आहे काय? मराठी जनतेचा असा भयानक द्रोह करण्याचें ह्या लोकांना कांहीं कारण होतें का? काय मिळविलें त्यांनीं हें महापातक करून? दगड, जोडे, आणि काळीं निशाणें एवढेंच ना? आपल्या हातांनीं आपलीं नाकें ह्यांनीं कापून घेतलीं आणि उभ्या महाराष्ट्रांत आपली नाचक्की करून घेतली. उघडपणें कुठें कोणत्याहि सार्वजनिक सभेंत भाग घेण्याची आतां ह्यांना चोरी होऊन बसली आहे. रस्त्यांतून जातांना हे नुसते दिसले तर लोक हातांत जोडे घेऊन धावतात.

ज्या शिवाजी पार्कच्या सभेंत शंकरराव देवांच्या व्याख्यानाला चार लाख माणसें एक वेळ जमत होतीं, त्या शंकररावांना खांदा द्यायला तेथें चार माणसें आज जमतील कीं नाहीं ह्याची पंचाईत होऊन बसली आहे. हिरे-चव्हाणांच्या गळ्यांत तर तें जेथें जातील तेथें खेटरांच्या माळा पडताहेत. एवढें असूनहि हे दोघेजण आपलीं मंत्रिपदें कांहीं सोडायला तयार नाहींत. माना खालीं वाकवून ते जोडे खातील, पण तसेच मंत्रिपदावर बसून राहतील. असा निर्लज्जपणा आणि कोडगेपणा जगांत कुठें कुणीं पाहिला आहे काय? महाराष्ट्रद्रोहाचें एवढें शासन ह्या मंडळींना मिळूनहि पुन्हा महाद्विभाषिकाचाच पुरस्कार करावयाला हे आपले तयारच! लोकांच्या सहनशीलतेचा आणि चांगुलपणाचा अंत तरी किती पाहणार हे? खरोखर, महाराष्ट्रांतल्या कॉंग्रेसवाल्यांनीं जर 'संयुक्त महाराष्ट्रा'शीं विश्वासघात केला नसता, तर तीन कोटी मराठी जनतेवर जबरदस्तीनें 'महाद्विभाषिक' लादण्याची कॉंग्रेसश्रेष्ठींची कधीं छातीच झाली नसती. आणि आतां हा महाद्विभाषिकाचा गळफांस महाराष्ट्राच्या मानेभोंवतीं कायमचा राहावा आणि महाराष्ट्राचें जन्माचें वाटोळें व्हावें एवढ्यासाठीं हे आगामी निवडणुकांत आपल्या प्रयत्नांची शिकस्त करावयाला पुन्हा तयारच!

'संयुक्त महाराष्ट्रा'च्या चळवळीमधून महाराष्ट्रांतला कॉंग्रेस पक्ष बाहेर पडल्यानंतर आणि 'संयुक्त महाराष्ट्र परिषदे'ला नतद्रष्ट शंकरराव देवांनीं टाळें ठोकल्यानंतर संयुक्त महाराष्ट्राचा लढा पुढें चालवावयाचा कसा आणि कोणी हा 'संयुक्त

महाराष्ट्र परिषदे 'मधल्या उरलेल्या घटक पक्षांपुढें आणि व्यक्तींपुढें फारच मोठा प्रश्न येऊन पडला. राज्यपुनर्रचना समितीनें मुंबईचा वादस्तंभ करून संयुक्त महाराष्ट्राची मागणी फेटाळली होती. म्हणून साहजिकच संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला मुंबईमध्यें एकदम प्रखर स्वरूप प्राप्त झालें. आणि त्या चळवळीच्या पाठीमागें सर्वपक्षीय संघटना असण्याची आवश्यकता तेथें विशेष तीव्रतेनें भासूं लागली. गोमंतकाच्या लढ्याच्या निमित्तानें सर्व पक्षांमधील नेत्यांना आणि कार्यकर्त्यांना एकत्र काम करण्याची आधींपासूनच संवय झालेली होती. ती उपयोगीं पडली. आणि गेल्या नोव्हेंबर महिन्यांत मुंबईमध्यें काँग्रेसखेरीज करून सर्व राजकीय पक्षांची 'संयुक्त महाराष्ट्र कृतिसमिति' स्थापन करण्यांत आली. ह्या कृतिसमितीच्या नेतृत्वाखालीं मुंबईमधील १८ नोव्हेंबरचा सत्याग्रह आणि २१ नोव्हेंबरचा आम हरताळ कमालीच्या यशस्वितेनें पार पडला. त्यामुळें 'कृतिसमिती'ला एका आठवड्याच्या आंत एवढें महत्त्व आणि प्रतिष्ठा प्राप्त झालीं कीं कांहीं विचारूं नका. वस्तुतः, हीच कृतिसमिति आजपर्यंत अस्तित्वांत असावयाला हवी होती. पण २१ नोव्हेंबरचा संप-हरताळ संपतो न संपतो तोंच समितीमधील कांहीं अदूरदृष्टीच्या आणि संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाकडे पक्षीय वृत्तीनें पाहणाऱ्या धूर्त मंडळींनीं ही 'समिति' एकदम स्थगित (म्हणजे बरखास्तच!) करून टाकली. त्यानंतर पुन्हा संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचें एकसूत्री मार्गदर्शन करावयाला संघटनाच राहिली नाहीं.

प्रत्येक पक्ष आपापल्या व्यासपीठावरून अलगपणें संयुक्त महाराष्ट्राच्या सभा भरवूं लागला. ह्या गोष्टीचें वैषम्य व्यक्तिशः आम्हांला फार जाणवलें. म्हणून आम्ही स्वतः उचल घेऊन पुन्हा बहुतेक सर्व पक्षांची मंडळी एकत्र जमविली. आणि 'संयुक्त महाराष्ट्र पूरक समिति' त्यांच्याकडून स्थापन करविली. पण ह्या 'पूरक समिती'ची संघटना तयार होऊन ती कामाला लागण्यापूर्वीच जानेवारी महिन्यांत मुंबईच्या संयुक्त महाराष्ट्रवादी पुढाऱ्यांची आणि कार्यकर्त्यांची अकस्मात धरपकड झाली. आणि 'पूरक समिति' जन्मकाळींच मरण पावली. पुढें दंगलीच्या काळांत संयुक्त महाराष्ट्राच्या कार्याला कुणाचेंहि नेतृत्व राहिलें नाहीं. व ज्याला जें सुचलें तें त्यांनीं केलें. लोकप्रक्षोभाचें कोणी नियंत्रण करूं शकला नाहीं. त्यामुळें पोलिसांना गोळीबार करावयाला चांगलेंच फावलें. लोक हकनाक मेले. आणि संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांवर सरकारनें वाटेल तसे आरोप केले. भिन्नभाषिक

नागरिकांमध्यें निर्माण झालेली घबराट नाहींशी करून शांतता प्रस्थापित करण्याचें कार्य बाहेर असलेल्या कांहीं नेत्यांना आपल्या वैयक्तिक जबाबदारीवर करावें लागलें. शंकरराव देवांसारख्या 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या हितशत्रूंना महाराष्ट्राची बदनामी करावयाला ती चांगलीच संधि मिळाली. शांतताप्रस्थापनेचें नांव पुढें करून तें बाहेर पडले आणि सारी दंगल, अत्याचार आणि लुटालूट मराठी माणसांनीं केली असा तें ठिकठिकाणीं राजरोसपणें टणाणा करूं लागले. हा सर्व घोटाळा 'कृतिसमिति' बरखास्त करून टाकल्यामुळें झाला.

जानेवारी महिन्यांत जर 'कृतिसमिति' अस्तित्वांत असती, तर अनेकांचे प्राण वांचले असते आणि मुंबईच्या दंगलीला जें भयानक स्वरूप प्राप्त झालें तें झालें नसतें ह्याविषयीं आमच्या मनांत तिळमात्र शंका नाहीं. त्यानंतर अवघ्या पंधरवड्याच्या आंत म्हणजे ६ फेब्रुवारी रोजीं पुणें येथें श्री. एस्. एम्. जोशी, आचार्य दोंदे आणि नौशीर भरूचा ह्या संयुक्तमहाराष्ट्रवादी पुढाऱ्यांच्या प्रयत्नांची 'संयुक्त महाराष्ट्र समिति' स्थापन झाली. त्यावेळीं आम्ही सर्व मंडळी कारागृहांत होतों. संयुक्त महाराष्ट्राचा सत्याग्रही लढा आणि आंदोलन ह्या समितीच्या नेतृत्वाखालीं गेले आठनऊ महिने एकजुटीनें आणि यशस्वितेनें चालविण्यांत आलेलें आहे. समिति ही संयुक्त महाराष्ट्राचें ध्येय साध्य करण्याची तीन कोटी मराठी जनतेची एकमेव आघाडी होऊन बसली आहे. ह्या समितीनें संयुक्त महाराष्ट्राचा लढा इतका प्रखर आणि तीव्र केला कीं केंद्रसरकारला अगदीं दे माय धरणी ठाय होऊन गेलें. त्याला आपलें संयुक्त महाराष्ट्रासंबंधीचें धोरण एकसारखें बदलत ठेवावें लागलें. तीन जून रोजीं मुंबईत आणि एक ऑगष्ट रोजीं पुण्यांत पंडित नेहरूंच्या जाहीर सभेवर संयुक्तमहाराष्ट्रवादी जनतेनें बहिष्कार घालून आपलें जें विराट् मेळावे भरविले आणि अखेर आपल्या सत्याग्रहाचा लोंढा दिल्लीच्या लोकसभेच्या दरवाज्यावर नेऊन जो आदळविला, तो 'संयुक्त महाराष्ट्र समिती'च अभूतपूर्व विजय होता ह्यांत काय संशय?

त्यामुळें खंडित महाराष्ट्रांत कॉंग्रेस नेस्तनाबूद होणार आणि शेवटीं मुंबई संयुक्तमहाराष्ट्राला द्यावी लागणार ह्याबद्दल नेहरूंची आणि कॉंग्रेसश्रेष्ठींची खात्री झाली. त्याबरोबर त्यांनीं पूर्वीचा सर्व पवित्रा एकदम बदलला. आणि संयुक्त महाराष्ट्राचा अभिमन्यूप्रमाणें घात करून टाकण्यासाठीं त्याच्याभोंवतीं महाद्विभाषिकाचा चक्रव्यूह रचला. आतांपर्यंत कॉंग्रेसश्रेष्ठींच्या अन्यायाशीं टक्कर

देण्यासाठीं 'सत्याग्रह' हा एकमेव मार्ग होता. सभा-परिषदा भरविणें, मोर्चे काढणें, निदर्शनें करणें, सत्याग्रह करून तुरुंगांत जाणें, संप-हरताळ पुकारणें ह्या सर्व रूढ लोकशाही मार्गानें मराठी जनतेनें आपलें मागणें कॉंग्रेस सरकारपुढें मांडलें. पण त्याचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. आतां लोकसभेनें महाद्विभाषिकाचा कायदाच करून टाकलेला आहे. हा कायदा कांहीं नुसत्या चळवळीनें आणि सत्याग्रहानें बदलतां येणार नाहीं. घटनात्मक मार्गानेंच हा कायदा बदलून घेतला पाहिजे. तो मार्ग म्हणजे निवडणुकांचा. आगामी निवडणुकांमध्यें संयुक्त महाराष्ट्रवाद्यांना आणि महागुजरातवाद्यांना कॉंग्रेसचा जर संपूर्ण पराभव करतां आला, आणि राज्यसभेंत नि लोकसभेंत आपले बहुसंख्य प्रतिनिधी पाठवतां आले, तर मुंबईच्या महाद्विभाषिक राज्याची योजना बदलण्यावांचून लोकसभेला गत्यंतरच राहणार नाहीं. म्हणून ह्यापुढें संयुक्त महाराष्ट्र समितीला आपली इतर चळवळ थांबवून आपलें सर्व सामर्थ्य आगामी निवडणुका जिंकण्याचा दृष्टीनें संघटित करावयाला हवें.

निवडणुकांची सावली पुष्कळ दिवसांपासून समितीच्या कार्यावर पडूं लागली आहे. आणि महाद्विभाषिक झाल्यापासून तर निवडणुकांखेरीज समितीपुढें दुसरा विचारच राहिला नाहीं. त्यामुळें समितीच्या पुढें अनेक बिकट समस्या निर्माण झाल्या. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला जोंपर्यंत सत्याग्रही स्वरूप होतें तोंपर्यंत 'समिती' मधल्या भिन्न भिन्न घटक पक्षांच्या एकजुटीमध्यें व्यत्यय येण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण समितीतर्फे निवडणुका लढवायच्या म्हटलें म्हणजे मग नाना तऱ्हेचे प्रश्न निर्माण होतात. समितीला 'संयुक्त आघाडी'चें स्वरूप द्यायचें कीं नाहीं? भिन्न भिन्न पक्षांना मान्य होईल असा किमान कार्यक्रम तयार करायचा कीं नाहीं? हे प्रश्न निर्माण झाल्याबरोबर 'समिती'चें घोडें एकदम अडून बसलें. कारण समितीमधल्या 'प्रजा-समाजवादी' आणि 'समाजवादी' या पक्षांनीं निवडणुकांसाठीं कॉंग्रेस, जातीयवादी आणि साम्यवादी यांच्याशीं करार वा जागावांटणीची तडजोड कालत्रयींहि करावयाची नाहीं अशा मुळीं शपथाच घेऊन ठेवल्या आहेत. 'समिती'मध्यें कॉंग्रेस जरी नसली तरी हिंदुसभा, जनसंघ आणि कम्युनिस्ट हे पक्ष आहेत. त्यांपैकीं जनसंघाला भाषावार प्रांतरचना नको आहे. कम्युनिस्ट आणि हिंदुसभा यांची कॉंग्रेसखेरीज करून कोणत्याहि पक्षाशीं 'संयुक्त आघाडी' करावयाची तयारी आहे. अशा परिस्थितींत आतांपर्यंत मोठ्या

शिकस्तीनें राखून ठेवलेली 'संयुक्त महाराष्ट्र समिती'ची एकजूट निवडणुकीच्या वेळीं टिकावी कशी हा फार महत्त्वाचा प्रश्न अकोला येथें उत्पन्न झाला.

तितकाच दुसरा महत्त्वाचा प्रश्न तिथें असा उत्पन्न झाला कीं, समजा 'संयुक्त महाराष्ट्र समिती'नें उद्यां निवडणुका जिंकल्या, तर खंडित महाराष्ट्रांत तिनें आपलें मंत्रिमंडळ बनवावयाचें, का निवडणुका जिंकल्यानंतर आपापल्या जागांचे राजिनामे द्यायचे आणि महाराष्ट्रांत पेचप्रसंग निर्माण करून भारत सरकारला शरण आणावयाचें? कांहीं मंडळींचा सत्ता राबविण्याला विरोध होता. तर स्वतंत्र विचाराची आम्ही जी मंडळी होतों त्यांचें म्हणणें असें पडलें कीं सत्ता ताब्यांत घेऊन संयुक्त महाराष्ट्राचा लढा आपणांला अधिक प्रखर आणि प्रभावी करतां येईल. म्हणून निवडणुका जिंकल्यानंतर मंत्रिमंडळ बनविण्याची जबाबदारी आपल्याला पत्करलीच पाहिजे. तथापि, तो प्रश्न अकोला येथें अनिर्णीतच राहिला. मात्र निवडणुका समितीच्या विद्यमानें संयुक्त व्यासपीठावरूनच प्रत्येक पक्षानें लढल्या पाहिजेत याविषयीं बहुतेक सर्व पक्षांचें एकमत झालें. प्रत्येक पक्षानें आपापल्या व्यासपीठावरून निवडणुका लढावयाच्या ठरविल्यास मतदारांचा बुद्धिभेद आणि गोंधळ होईल आणि निवडणुकांत 'संयुक्त महाराष्ट्र समिती'ला अपेक्षित यश मिळणार नाहीं याबद्दल सर्वांची खात्री पटली. 'किमान कार्यक्रमा'चाहि प्रश्न अकोला येथें अनिर्णितच राहिला. 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण करणें' हा एकच कार्यक्रम निवडणुका जिंकावयास पुरा आहे असें सर्वानुमतें ठरलें.

अशा रीतीनें एकजुटीच्या दृष्टीनें 'संयुक्त महाराष्ट्र समिती'नें अकोला येथें निश्चितपणें आपलें पाऊल पुढें टाकलें. पण 'महाद्विभाषिक' आल्यानंतर सर्वच परिस्थितींत एकदम फरक पडला. आणि निवडणुकीबाबत 'समिती'ला आपल्या धोरणाचा फेरविचार करावा लागला. आतां 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र मिळविणें' एवढ्या एका भावनापूर्ण घोषणेवर निवडणुकांमध्यें निभाव लागणार नाहीं हें सर्वांना समजून चुकलें. महाद्विभाषिकाच्या आगमनानें लोकांच्या डोक्यांत गोंधळ निर्माण झालेला होता. तो जास्त जास्त वाढवून लोकांचा बुद्धिभेद करण्याचें कार्य कॉंग्रेसचे नेते आणि पत्रें यांनीं पहिल्या दिवसापासून चालविलें होतें. आतां मुंबई महाराष्ट्रापासून वेगळी होत नाहीं, मुंबईमधून सरकारी कचेऱ्या हलत नाहींत त्यामुळें नोकरवर्गाच्या बदल्या होत नाहींत, शिवाय महाद्विभाषिकांत मराठी जनतेचें प्रमाण पासष्ट टक्के राहणार असल्यानें या राज्यांत महाराष्ट्राचेंच वर्चस्व राहील, अशा तऱ्हेच्या

भ्रामक आणि फसव्या प्रचारानें महाराष्ट्रीय जनतेची हेतुपुरस्सर दिशाभूल करण्यांत येत होती. म्हणून 'समिती'पुढचें कार्य पूर्वीपेक्षां अधिक बिकट झालें होतें. खंडित महाराष्ट्रांत जनतेच्या भावनांना नुसतें आवाहन करून निवडणुका जिंकतां आल्या असत्या. पण महाद्विभाषिकानें या भावनांची धार सकृद्दर्शनीं बोथट करून टाकली होती. म्हणून तीं शस्त्रें टाकून देऊन दुसरीं निराळींच शस्त्रें हातांत धारण करणें आवश्यक होतें.

भारताच्या इतिहासांतून आणि भूगोलांतून महाराष्ट्राला नामशेष करून टाकण्याचें महाद्विभाषिक हें कसें महाभयंकर कारस्थान आहे हें पुराव्यानिशीं आणि आंकड्यांनिशीं लोकांना समजावून सांगणें आतां जरूर होतें. म्हणजे भावनेच्या आवाहनाची अवस्था संपून आतां बुद्धीला आवाहन करण्याची अवस्था सुरू झाली होती. भावनेचा भेद करून लोकांना फसविणें फार कठिण आहे. पण बुद्धिभेद करून लोकांची आणि विशेषतः अज्ञ जनतेची दिशाभूल करणें फार सोपें आहे. कांग्रेसजवळ प्रचाराचीं सर्व साधनें सिद्ध असल्यानें त्यांना अज्ञ जनांचा बुद्धिभेद सहज साध्य आहे. म्हणून समितीला आपली एकजूट पूर्वीपेक्षांहि अधिक मजबूत बनवून निवडणुकांमध्यें किमान कां होईना पण निश्चित कार्यक्रम मतदारांच्या पुढें ठेवण्यावांचून गत्यंतर नव्हतें. तथापि, पुन्हा 'समिती'मधील कांहीं घटक पक्षांच्या धोरणाची चलबिचल झाली आणि अकोला येथें टाकलेलें पाऊल पुन्हा मागें घ्यावें लागतें किंवा काय अशी भीति निर्माण झाली. निवडणुका 'संयुक्त महाराष्ट्र समिती'च्या व्यासपीठावरून न लढवितां प्रत्येक पक्षानें आपापसांत तडजोड करून जागा वांटून घ्याव्यात, आणि स्वतःच्या व्यासपीठावरून आपापल्या कार्यक्रमावर लढवाव्यात असें सुचविण्यापर्यंत 'समिती'मधल्या कांहीं घटक पक्षांची मजल गेली.

एवढ्यांत कांहीं महत्त्वाच्या घटना घडल्या. एक ही कीं, गुजरातमध्यें महाद्विभाषिकाविरुद्ध प्रचंड प्रक्षोभ निर्माण झाला आणि गुजराती जनता महाद्विभाषिकाच्या मागें आहे ही कॅांग्रेसवाल्यांनीं सर्वांची जी समजूत करून दिली होती ती सपशेल खोटी ठरली. त्यामुळें 'संयुक्त महाराष्ट्र समिती'ला फारच मोठा धीर आला. दुसरी घटना ही कीं, 'शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन'नें किमान कार्यक्रमाच्या आधारावर 'संयुक्त महाराष्ट्र समिती'शीं एकजूट करावी असा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीं तिला आदेश दिला. शे. का. फे. च्या येण्यामुळें 'समिती'च्या

सामर्थ्यात फारच मोठी भर पडणार होती. पण तेवढ्यासाठीं समितीला अस्पृश्य समाजाच्या उद्धाराचा कांहींतरी कार्यक्रम तयार करणें आवश्यक होतें. तसेंच मराठवाडा आणि महाविदर्भ यांचे कांहीं प्रादेशिक प्रश्न होते. त्यांना नुसत्या मुंबई-बद्दल आकर्षण वाटण्यासारखें नव्हतें. म्हणून मराठवाड्यांतील आणि विदर्भातील जनतेला त्याबद्दल आत्मीयता वाटेल असा कांहींतरी कार्यक्रम तिच्यापुढें ठेवल्या-खेरीज तिचा पाठिंबा 'समिती'ला मिळणें अशक्य होतें. या सर्व तपशिलांचा विचार केल्यानंतर 'किमान कार्यक्रमा' चा स्वीकार केल्यावांचून समितीला मुळींच गत्यंतर उरलें नाहीं. त्याप्रमाणें 'समिती' नें एक पोटसमिति नेमून किमान कार्यक्रमाचा आराखडा आतां तयार केलेला आहे.

संयुक्त महाराष्ट्र समितीमधल्या घटक पक्षांनीं महाद्विभाषिकाविरुद्ध जास्तींत जास्त लोकमत जागृत करावयाचें, निवडणुकांमध्यें आपापसांत मतांची फाटाफूट न करतां एका कॉंग्रेस उमेदवाराविरुद्ध आपल्यांतला एकच प्रतिस्पर्धी उभा करावयाचा येथपर्यंत सर्वांचें एकमत झालें. त्यांत आतां किमान कार्यक्रमाची भर पडली. फक्त एकच गोष्ट राहिली. निवडणुका समितीच्या व्यासपीठावरून लढवावयाच्या का प्रत्येक पक्षानें आपल्या व्यासपीठावरून लढवावयाच्या. प्रजा-समाजवादी पक्षाला 'संयुक्त आघाडी' या शब्दाची भीति वाटत होती. पण तिचें निराकरण स्वतः श्री. एस्. एम्. जोशी ह्यांनींच केलें. 'संयुक्त महाराष्ट्र समिती'मध्यें निरनिराळे राजकीय पक्ष असले तरी ती कांहीं या राजकीय पक्षांची 'संयुक्त आघाडी' नाहीं. ती संयुक्त महाराष्ट्रवादी जनतेची आघाडी (Popular Front) आहे. ही गोष्ट वस्तुस्थितीला अगदीं धरून आहे. 'संयुक्त महाराष्ट्र' हा राजकीय प्रश्न नसून तो सामाजिक आणि आर्थिक प्रश्न आहे. महाद्विभाषिक राज्यांत महाराष्ट्राचें आर्थिक आणि सामाजिक जीवन उद्ध्वस्त होऊन त्याची अस्मिता आणि अस्तित्व नष्ट होण्याचा संभव आहे. म्हणून महाद्विभाषिक राज्य नको. ही 'संयुक्तमहाराष्ट्र समिती'ची भूमिका एस्. एम्. नीं स्पष्ट केली.

त्यानंतर दुसरें एक गंडांतर मध्येंच उपस्थित झालें. प्रजासमाजवादी पक्षाच्या राष्ट्रीय कार्यकारिणीनें मुंबईमधल्या आपल्या बैठकींत जातीयवादी आणि साम्यवादी यांच्याशीं निवडणुकांमध्यें कोणत्याहि प्रकारची तडजोड करावयाची नाहीं असा आदेश दिला. तेव्हां आतां 'प्रजासमाजवादी' पक्ष 'समिती'मधून बाहेर पडणार कीं काय असा संशय निर्माण झाला. पण त्याचेंहि निराकरण एस्. एम्.

यांनीं ताबडतोब करून टाकलें. 'समिति' हा कांहीं राजकीय पक्ष नव्हे. ती एक जनता आघाडी आहे. ती जातीयवादी नाहीं आणि साम्यवादीहि नाहीं. तिचा कार्यक्रम महाराष्ट्राच्या आर्थिक आणि सामाजिक उद्धाराचा आहे. म्हणून 'समिती'मधील प्रजासमाजवादी पक्षाला त्यांच्या कार्यकारिणीचा आदेश प्रतिबंधक ठरत नाहीं.

हें सर्व एवढ्या तपशिलानें सांगण्याचें कारण हें कीं, 'संयुक्त महाराष्ट्र समिति' ही केवढ्या अग्निदिव्यामधून तावून सुलाखून निघाली आहे हें महाराष्ट्रांतील सर्व लोकांना कळावें. आतां 'संयुक्त महाराष्ट्र समिति' ही तीन कोटी मराठी जनतेची खरीखुरी महाद्विभाषिकविरोधी आघाडी तयार झालेली आहे. आगामी निवडणुका ह्या आघाडीच्या विक्रमानें एका व्यासपीठावरून किमान कार्यक्रमाच्या आधारावर लढल्या जातील अशी अधिकृत घोषणा शिवाजी पार्कवर आज भरत असलेली 'संयुक्त महाराष्ट्र परिषद्' करणार आहे! महाराष्ट्राच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहावी अशी ही घटना आहे. कारण मराठी जनतेची आणि तिचा कैवार घेणाऱ्या विविध राजकीय पक्षांची अशी एकजूट आजपर्यंत कधीं झाल्याचा इतिहासांत दाखला नाहीं. मागील निवडणुकांमध्यें कांग्रेसला अवघीं ४५ टक्के मतें पडलीं. आणि विरोधक पक्षांना ५५ टक्के मतें पडूनहि त्यांच्यामध्यें ऐक्य नसल्यानें विजयाचें माप कॅांग्रेसच्या पदरांत पडलें. येत्या निवडणुकांत आतां तसें होण्याचें भयच राहिलें नाहीं. कॅांग्रेसचा एक उमेदवार तर त्याच्या विरुद्ध 'समिती'चा एकच उमेदवार अशी फक्त दोघांमध्येंच सरळ सरळ कुस्ती होईल. म्हणजे कॅांग्रेस विरोधी मतें वाया जाणार नाहींत.

'संयुक्त महाराष्ट्र समिती'मधील भिन्न भिन्न राजकीय पक्षांमध्यें एकजूट होणें अशक्य आहे, अशा तऱ्हेच्या वावड्या कॅांग्रेसचे नेते आणि वृत्तपत्रें आजपर्यंत उडवीत होतीं. त्या सर्वांना 'समिती'नें घडवून आणलेल्या एकजुटीनें चांगलीच चपराक बसणार आहे. आम्हांला सर्वांत आश्चर्य वाटतें तें पंडित नेहरूंचें. त्यांनीं गेल्या रविवारीं दिल्ली येथें एका जाहीर भाषणांत कॅांग्रेसविरोधी पक्षांच्या एकजुटीची 'लंगड्यांची एकजूट' असें वर्णन करून टर उडविली. ते म्हणाले, "आगामी निवडणुकींत कॅांग्रेसविरुद्ध एकजूट करण्याचे प्रयत्न सर्वत्र सुरू झाले आहेत. याचा अर्थ एकेकटे कोणीहि कॅांग्रेसशीं सामना देऊं शकत नाहींत असाच आहे. दहा लंगडे एकत्र आल्यानें कांहीं चांगला

घडधाकट मनुष्य तयार होत नाहीं. वास्तविक निवडणुकींत मूलभूत तत्त्वांचा विचार झाला पाहिजे. पण तसें कोठेंच होत नाहीं." स्वतःचा कॉंग्रेसपक्ष हा तेवढा मूलभूत तत्त्वांच्या स्थिर भूमीवर उभा राहिलेला एक घडधाकट माणूस आणि विरोधी पक्षांची एकजूट म्हणजे दहा तत्त्वशून्य लंगड्यांची एकजूट ही जी पंडित नेहरूंनीं आपल्याच तोंडानें आपल्याच पक्षाची वारेमाप जाहिरात केलेली आहे, तिच्यांत घमेंडीखेरीज दुसरें कांहीं नाहीं.

विरोधी पक्षांची एकजूट ही जर लंगड्यांची एकजूट असेल तर कॉंग्रेसपक्ष ही देशांतील जनतेच्या रक्तावर जगणाऱ्या लांडग्यांची एकजूट आहे! गरिबांना फसविणारे आणि लुबाडणारे काळाबाजारवाले, मजुरांना शोषणारे कारखानदार आणि भांडवलवाले, निरपराधी नागरिकांवर गोळीबार करून त्यांना ठार करणारे खुनी मंत्री, लक्षावधि रुपयांची अफरातफर करणारे लांचखाऊ ह्या सर्वांची एकजूट म्हणजे कॉंग्रेस! सत्य, अहिंसा, शुद्ध चारित्र्य, समता आणि लोकशाही या साऱ्या तत्त्वांची राजरोसपणें राखरांगोळी करणाऱ्या कॉंग्रेसजवळ 'मूलभूत तत्त्वें' आहेत असें स्वतः नेहरूंनीं म्हणावें ह्यावरून दिव्याखालचा अंधार दिव्याला दिसत नाहीं हेंच खरें. विरोधी पक्ष लंगडे आहेत असें नेहरू आज खुशाल म्हणोत, पण त्यांच्या कॉंग्रेस पक्षाला पाय नाहींत, हात नाहींत अन् डोळेहि नाहींत. तो एक नेहरूंच्या पाठुंगळीला बसलेला मुरदाड मांसाचा गोळा आहे हें भारतामधल्या एखाद्या लहान पोराला देखील ठाऊक आहे. जीना गेल्यानंतर 'मुस्लीम लीग'चे जसे तीन तेरा वाजले, तशी नेहरूंच्यानंतर कॉंग्रेसची स्थिति होणार आहे. नेहरू गेले कीं कॉंग्रेस कोलमडली अन् धुळीला मिळालीच ही गोष्ट काळ्या दगडावरची अगदीं रेघ आहे. म्हणून आम्ही म्हणतों कीं कॉंग्रेसच्या मूलभूत तत्त्वांची घमेंड निदान नेहरूंनीं तरी मारूं नये.

'महाद्विभाषिक' राज्याबद्दल ही नेहरूंनीं आतां जी भूमिका पत्करली आहे ती अशीच अप्रामाणिकपणाची आणि घमेंडखोरीची आहे. 'महागुजरात जनता परिषदे'चे अध्यक्ष श्री. हिंमतलाल शुक्ल ह्यांनीं महाद्विभाषिक राज्याचा निर्णय हा जबरदस्तीचा निर्णय असून तो शहाणपणाला, औचित्याला, लोकशाहीला आणि घटनेला धरून नाहीं असें पंडित नेहरूंना एक पत्र लिहून कळविलें. त्या पत्राला उत्तर देतांना नेहरू लिहितात कीं, "महाद्विभाषिकानें गुजरातचें कसें नुकसान होणार हें मला कळत नाहीं. सध्यांचें प्रक्षुब्ध वातावरण निवळल्यानंतर हा निर्णय कसा आपल्या

हिताचा आहे तें गुजराती जनतेला कळून येईल. प्रत्येक राज्यानें आणि गटानें देशाच्या हिताकडे दुर्लक्ष करून स्वतःपुरताच मर्यादित विचार केला तर भारतवर्ष कसा तयार होणार ? पंतप्रधान हा लोकसभेचा सेवक असतो. त्यांच्या हुकमाची अंमलबजावणी करणें हें माझें कर्तव्य आहे. त्यांच्याशीं माझा मतभेद झाला तर मला राजिनामा देऊन बाहेर पडावयाला हवें. गुजरातची इच्छा म्हणजे लोकसभेंतील गुजराती प्रतिनिधींची इच्छा. त्यांच्याखेरीज गुजरातेंतल्या इतर लोकांना किंवा गटांना काय वाटतें त्याचा विचार करण्याचें मला काय कारण ? लोकसभेंत महाद्विभाषिकाविरुद्ध एकसुद्धां आवाज उठला नाहीं. एवढ्या विवाद्य विषयावर एवढें प्रचंड मतैक्य आजपर्यंत लोकसभेमध्यें कधीं दिसलें नाहीं. महाद्विभाषिकाची सूचना कांहीं सरकारनें केली नाहीं. लोकसभेनें तो निर्णय घेतला. त्या निर्णयाविरुद्ध लोकशाही सरकारला कसें जातां येईल ? सरकारचें धोरण हें कांहीं रस्त्यावरच्या निदर्शनांनीं आणि हिंसेच्या धमकावण्यांनीं बदलत नाहीं ! ”

नेहरूंचें हें उत्तर वाचलें म्हणजे विरोधी पक्षांच्याबद्दल त्यांच्या मनामध्यें किती तुच्छता आणि द्वेष आहे हें दिसून येतें. कोणत्याही प्रदेशांतील कॉंग्रेसपक्षीयांचें जें मत तेंच त्या प्रदेशांतील जनतेचें मत. त्या प्रदेशांतील बाकीच्या पक्षांना जें वाटतें त्यांचा सरकारनें विचार करण्याची मुद्धां जरूरी नाहीं असाच सिद्धांत नेहरूंनीं तयार केलेला दिसतो आहे. ह्या एकाच गोष्टीवरून नेहरूंच्या लोकशाहीची कल्पना येतें. विरोधी पक्षांना वाढूं द्यायचें नाहीं, तें वाढले नाहींत तर त्यांना लंगडे म्हणावयाचें आणि लांब जीभ काढून लोकशाहीच्या वारेमाप वल्गना करावयाच्या हेंच नेहरूंच्या जीवनाचें आतां सूत्र झालेलें दिसतें आहे. अहमदाबादला नेहरू परवांचे दिवशीं जाणार आहेत. त्यावेळीं ‘ महागुजरात जनता परिषदे ’चें एक शिष्टमंडळ नेहरूंना भेटूं इच्छीत होतें. त्याला नकार देतांना नेहरूंच्या चिटणिसांनीं लिहिलें आहे, “ महाद्विभाषिक हा लोकसभेचा अंतिम निर्णय आहे. तो आतां ह्या भारताचा कायदा झालेला आहे. म्हणून ह्या प्रश्नावर भेटणें निरर्थक आहे. ” ह्या उत्तरावरून सत्तेचा उन्माद नेहरूंच्या डोक्यांत किती शिरलेला आहे हें दिसून येतें.

महाद्विभाषिक हा लोकसभेचा अपरिवर्तनीय निर्णय आहे असें नेहरूंनीं महाराष्ट्राला आणि गुजरातला आव्हान दिलें आहे. म्हणून आगामी निवडणुकींत विरोधी पक्षांच्या एकजुटीनें मुंबई राज्यांतील कॉंग्रेसला नेस्तनाबूद करून महाद्विभाषिक राज्य तुम्ही आमच्या इच्छेविरुद्ध आमच्या प्रदेशांत कसें चालवूं शकतां असें

उलट आव्हान देणें आवश्यक होतें. तें आव्हान शिवाजी पार्कमध्यें भरलेल्या प्रचंड परिषदेमध्यें तीन कोटी मराठी जनतेच्या वतीनें 'संयुक्त महाराष्ट्र समिती'नें एका मुखानें आणि आवाजानें काँग्रेसश्रेष्ठींना देण्यांत फारच मोठें यश मिळवलें आहे ह्यांत शंका नाहीं!

३०-९-५६

# गिधाड गेलें आणि कावळा आला !

गेल्या मंगळवारीं मुंबई राज्यांतली एक अत्यंत अमंगळ घटना घडून आली. महाराष्ट्राच्या इतिहासामध्यें एवढी अमंगळ गोष्ट आजपर्यंत कधीं घडली नसेल. काय महाराष्ट्राचें दुर्दैव आहे पाहा! गेल्या वर्षामध्यें एकाहिपेक्षां एक भयानक संकटें महाराष्ट्रावर आलीं. भारताच्या इतिहासामधून आणि भूगोलांतून महाराष्ट्राला नष्ट करण्यासाठीं नेहरू-ढेबर-मोरारजी प्रभृति महाराष्ट्रद्वेष्ट्या कॉंग्रेसश्रेष्ठींनीं नाना तऱ्हेचीं भयानक आणि क्रूर कारस्थानें रचलीं. त्यांच्या ह्या सर्व जुलमाशीं आणि अन्यायाशीं तीन कोटी मराठी जनता प्राणपणानें लढली. हजारों स्त्रीपुरुष सत्याग्रह करून तुरुंगांत गेले. शेकडों लोकांनीं आपलें रक्त सांडलें आणि प्राणाची होळी केली. तथापि, महाराष्ट्राचें हें सर्व शौर्य, हा सारा पराक्रम आणि हें सारें बलिदान व्यर्थ गेलें. कॉंग्रेसश्रेष्ठींनीं लोकशाहीचा दिवसाढवळ्या खून केला आणि भारतांतील चौदा राज्यें एकभाषी करून महाराष्ट्राच्या आणि गुजरातच्या पांच कोटी जनतेला जबरदस्तीनें महाद्विभाषिकाच्या सापळ्यांत ढकलून दिलें. एवढेंहि करून महाराष्ट्रावर आणि गुजरातवर पुरता सूड उगवला गेला नाहीं म्हणूनच कीं काय मुंबई राज्यांतला आणि महाराष्ट्रांतला एक अत्यंत क्षुद्र चारित्र्यशून्य आणि कुटिल बुद्धीचा माणूस त्यांनीं मुंबई राज्याच्या मुख्य मंत्रिपदावर गेल्या मंगळवारीं स्थापन केला.

विस्तारानें आणि वैभवानें जें 'द्विभाषिक मुंबई राज्य' अखिल भारतांत पहिल्या दर्जाचें आहे अशा कॉंग्रेसश्रेष्ठी गेला महिनाभर एकसारख्या तुताऱ्या फुंकताहेत, त्या राज्याच्या अत्युच्च कळसावर त्यांनीं यशवंतराव चव्हाणासारख्या एका फडतूस इसमाला नेऊन बसवावें ह्यापेक्षां लोकशाहीची अधिक घोर विटंबना ह्या देशांत होणें शक्य आहे काय? महात्मा गांधींचीं सत्य आणि अहिंसा हीं बिरुदें गळ्यांत बांधणाऱ्या कॉंग्रेसच्या राजकारणाचा ह्याहून अधिक अधःपात होणें अशक्य आहे. यशवंतराव चव्हाणासारख्यानें मुंबई राज्याचे मुख्यमंत्री होणें म्हणजे एखाद्या

सरड्यानें शेषाच्या आसनावर चढण्यासारखें किंवा एखाद्या गांढूळानें तक्षकाचा मुकुट मस्तकावर घालण्यासारखें आहे. राजकारण हें वारांगनेसारखें आहे असें जुने सुभाषितकार म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. स्वतःच्या देहाचा विक्रय करण्यापलीकडे वारांगनेला ज्याप्रमाणें दुसरा विवेक नसतो, त्याप्रमाणें सत्ताधारी राजकारणहि आपली अधम वासना भागविण्यासाठीं कोणत्या क्षुद्र माणसाला केव्हां कुठें नेऊन बसवील हें कांहीं सांगतां येणार नाहीं.

नव्या मुंबई राज्याच्या कायदेमंडळांतील तीनशेंतेहतीस गुजराती आणि मराठी कॉंग्रेसपक्षीयांनीं आपल्या मतांची माळ यशवंतराव चव्हाणांच्या गळ्यांत घालावी असे कोणते अलौकिक सद्गुण ह्या यशवंतरावांच्या अंगामध्यें उचंबळून वायां चालले आहेत बरें ? कोणत्या शास्त्रांत, कोणत्या विषयांत किंवा जीवनाच्या कोणत्या क्षेत्रांत यशवंतरावांनीं आतांपर्यंत एकादा तरी पराक्रम करून दाखविलेला आहे ? यशवंतराव काय विद्वान् आहे, का वक्ता आहे, का तज्ज्ञ आहे, का मुत्सद्दी आहे ? मंत्रिमंडळांतून जर बाहेर पडला तर त्याला वकिलीच्या धंद्यावर शंभर रुपये महिना मिळण्याची देखील मारामार पडल्यावांचून रहाणार नाहीं. बरें, यशवंतरावांचें आतांपर्यंतचें राजकीय चारित्र्य पाहिलें तर कोणाहि सज्जन माणसाच्या अंगावर शहारा आल्याखेरीज राहणार नाहीं. उत्तर सातार्‍याच्या राजकारणांत गेल्या दहा वर्षांत जीं भयानक कृत्यें घडलीं त्यांची एकमेव प्रेरक शक्ति यशवंतराव चव्हाण ही आहे, ही गोष्ट जगजाहीर आहे. अशा माणसाच्या हातांत मुंबई राज्याची सर्व सत्ता जाणें म्हणजे चोराच्या हातांत जामदारखान्याच्या किल्ल्या जाण्यासारखें किंवा माकडाच्या हातांत कोलीत देण्यासारखें आहे.

पंडित नेहरूंना किंवा मोरारजींना काय ह्या सर्व गोष्टी माहीत नाहींत ? त्यांना यशवंतरावांचें सर्व चारित्र्य संपूर्ण माहित आहे. खडा न् खडा ठाऊक आहे. मग असें जर आहे तर त्यांनीं यशवंतरावांना मुंबई राज्याचे मुख्य मंत्री कसें होऊं दिलें ? यशवंतरावांच्या अंगांतल्या गुणाभावाकडे किंवा दुर्गुणांकडे त्यांनीं जाणून-बुजून कां दुर्लक्ष केलें ? त्याचें एकच कारण आणि तें हें कीं तीन कोटी मराठी माणसांमध्यें एवढ्या प्रकर्षानें जो 'गुण' सहसा आढळून येणार नाहीं, तो एक भयानक 'गुण' यशवंतरावांच्या अंगामध्यें त्यांना आढळून आला आणि म्हणून त्यांच्यावर बेहद्द खूष होऊन त्यांनीं मुंबई राज्याचें मुख्यमंत्रिपद त्यांना बहाल करून टाकलें ! तो गुण म्हणजे महाराष्ट्रद्रोह ! सूर्याजी पिसाळानंतर एवढा महाराष्ट्र-

द्रोही माणूस ह्या महाराष्ट्रांत होऊन गेलेला नाहीं. काँग्रेसश्रेष्ठींच्या महाराष्ट्रद्वेष्ट्या राजकारणाचा कळस होण्याची भयानक पात्रता यशवंतरावाइतकी दुसऱ्या कोणा महाराष्ट्रीय काँग्रेसवाल्यामध्यें आहे?

आजचे काँग्रेसचे राज्यकर्ते हे महाराष्ट्राचे द्वेष्टे आहेत हे चिंतामणराव देशमुखांचे उद्गार आम्हांला पावलोपावलीं आठवतात. ह्या महाराष्ट्रद्वेष्ट्या राजकारणाचा वारसा इंग्रज सरकारकडून सरदार वल्लभभाई पटेल ह्यांनीं घेतला, आणि पंडित नेहरूंनीं तो आतां पुढें चालविला आहे. महाराष्ट्राचा, महाराष्ट्राच्या इतिहासाचा, संस्कृतीचा आणि महापुरुषांचा जो मनापासून द्वेष करतो त्यालाच काँग्रेसच्या दरबारांत सर्व सन्मानाचें शेलापागोटें मिळतें असा आतांपर्यंतचा इतिहास आहे. मुंबई राज्याचे मुख्य प्रधान बाळासाहेब खेर ह्यांना का नेमण्यांत आलें? तर महाराष्ट्राशीं जास्तींत जास्त विश्वासघात करण्याचें आश्वासन त्यांनीं वल्लभभाईना दिलें म्हणून! श्रीशिवछत्रपति आणि लोकमान्य टिळक ह्यांच्या स्मरणार्थ सुट्टी देण्यांत यावी अशी जेव्हां त्यांना सूचना करण्यांत आली, तेव्हां बाळासाहेब खेरांनीं जें उत्तर दिलें तें सर्वांना माहीत आहे. ते म्हणाले, "काँग्रेसची महापुरुषाची जी व्याख्या आहे, त्या व्याख्येच्या चौकटींत श्रीशिवछत्रपति आणि लोकमान्य टिळक बसत नाहींत!" छत्रपति आणि लोकमान्य हे सुट्टी देण्याच्या योग्यतेचे महापुरुष नाहींत अशी महाराष्ट्राच्या परमपूज्य दैवतांची विटंबना करणारा बाळासाहेब खेरांसारखा नराधम हा काँग्रेसच्या राज्यांत मुख्य प्रधानाच्या हुद्द्यावर जाऊन बसतो ह्याचें रहस्य ह्याखेरीज दुसरें काय आहे? बेळगांव-कारवारचा मराठी भाषिक भाग कर्नाटकांत ढकलण्याचें सर्व नीच कारस्थान ह्याच बाळासाहेब खेरांचें. बेळगांवचे राणी पार्वतीदेवी कॉलेज हें कर्नाटक विश्वविद्यालयाला जबरदस्तीनें जोडून ह्या कुटिल कारस्थानाचा पाया बाळासाहेबांनीं घातला.

बाळासाहेब खेर गेले आणि त्यांच्या मागून मोरारजी देसाई आले. महाराष्ट्रद्वेषाचें जहर त्यांच्या रक्तांत किती भिनलें आहे तें एडवर्ड डीनला त्यांनीं दिलेल्या मुलाखतींत संपूर्णपणें प्रकट झालें आहे. मोरारजी म्हणाले, "महाराष्ट्रीय इतके नालायक लोक आहेत कीं मुंबई शहर जर त्यांच्या ताब्यांत दिलें तर पांच वर्षांत तें त्याचें वाटोळें करतील. मराठी लोकांचें हिंसेशीं लग्न लागलें आहे. ते तुमच्या पार्टींत केव्हां सुरा खुपसतील हें तुम्हांला कळणार नाहीं. दुसऱ्यांनीं चांगल्या गोष्टी केल्या कीं महाराष्ट्रीयांनीं त्यांच्यावर दरोडा घातलाच म्हणून समजा. साऱ्या

भारतांत असे लोक आढळणार नाहींत. गांधींना ठार मारावयाला मराठी माणसा-खेरीज दुसरा कोणीहि तयार झाला नसता. आपल्या शत्रूच्या पोटांत वाघनखें खुपसणाऱ्या शिवाजीची स्तुति फक्त महाराष्ट्रीयांनींच करावी!" इंग्रज हे महाराष्ट्रीयांचा मनापासून द्वेष करीत. पण महाराष्ट्राची एवढी अधम निंदा इंग्रजांनीं देखील केली नसेल. मुंबई महाराष्ट्राला मिळूं नये ह्यासाठीं जर जास्तींत जास्त कुणीं आपली शक्ति, युक्ति आणि सत्ता वापरली असेल तर ती मोरारजींनीं. महाराष्ट्राचा जो जास्तींत जास्त द्वेष किंवा द्रोह करील त्यालाच मुंबई राज्याचें मुख्यमंत्रिपद मिळतें अशी आतांपर्यंतची परंपरा आहे. ह्याच परंपरेला अनुसरून महाराष्ट्रद्रोही यशवंतराव चव्हाणांची या उच्चपदावर निवड झालेली आहे ही सूर्यप्रकाशासारखी स्वच्छ गोष्ट आहे.

निवडणुकीचा निकाल जाहीर होतांच यशवंतराव चव्हाण म्हणाले, "श्री. बाळासाहेब खेर आणि मोरारजी देसाई ह्यांच्यासारख्या थोर नेत्यांनीं जें पद भूषविलें व ज्या अधिकारपदाची शोभा वाढविली त्या पदावर माझी नियुक्ति करून आपण माझा फार मोठा गौरव केला आहे. माझ्या ह्या निवडणुकीमागें मला परमेश्वरी शक्ति दिसते!" खेर आणि देसाई ह्यांची महाराष्ट्रद्वेषाची आणि द्रोहाची परंपरा चाल-वण्यास यशवंतरावाखेरीज दुसरा कोण लायक माणूस सापडणार? 'महाद्विभाषिक' ही 'परमेश्वरी घटना' आहे असें नेहरू म्हणाले. तर आपली निवड 'परमेश्वरा'नें केली असें चव्हाण म्हणतात. खरें आहे तें. पण हा परमेश्वर स्वर्गातला नसून दिल्लीमधला आहे. 'तीन कोटी मराठी माणसापेक्षां नेहरू हे श्रेष्ठ आहेत!' अशी फलटणच्या मनमोहन राजवाड्यांतून चव्हाणानें जी महाराष्ट्रद्रोहाची पहिली घोषणा केली, त्या घोषणेनें हा 'दिल्लीमधला परमेश्वर' प्रसन्न होऊन त्यानेंच त्यांना मुंबई राज्याच्या मुख्यमंत्रिपदावर नेऊन बसविलें आहे. मोरारजींच्या मंत्रिमंडळा-मध्यें आपलें हें महाराष्ट्रद्रोही धोरण आणि चारित्र्य यशवंतरावांनीं अत्यंत निरपवादपणें आणि सुसंगतपणें राखलें म्हणूनच त्यांना हें पारितोषिक मिळालें.

यशवंतरावाच्या ह्या महाराष्ट्रद्रोहाबद्दल साऱ्या मराठी जनतेनें त्यांचा धिक्कार केला. जेथें जेथें महाराष्ट्रामध्यें त्यांनीं उघडपणें जाण्याचा प्रयत्न केला तेथें तेथें त्यांचें काळ्या निशाणांनीं आणि पादत्राणांनींच स्वागत झालें. पुण्याच्या शिवाजी आखाड्यांत त्यांची जी धुळधाण झाली तिला तुलनाच नाहीं. त्यांच्या मोटरीवर जोड्यांचा अक्षरशः वर्षाव झाला. सासवड-बारामतीच्या दौऱ्यांत हडपसर आणि

वाल्हें येथें त्यांच्या गळ्यांत खेटरांच्या आणि चपलांच्या माळा घालण्यांत आल्या. उभ्या महाराष्ट्रांत ह्या घटकेला यशवंतराव चव्हाणाएवढा तिरस्कृत आणि विटंबित माणूस दुसरा कोणीहि नाहीं. पण एवढी सार्वजनिक विटंबना आणि निर्भर्त्सना अत्यंत निर्लज्जपणानें आणि कोडगेपणानें सहन करूनहि आपल्या महाराष्ट्रद्रोही धोरणापासून यशवंतराव यत्किंचित्‌हि ढळले नाहींत. ह्याच त्यांच्या अभूतपूर्व गुणांवर काँग्रेसश्रेष्ठी प्रसन्न होऊन त्यांनीं त्यांना मुंबई राज्याचें मुख्यमंत्रिपद बहाल केलें आहे!

भाऊसाहेब हिरे हे यशवंतरावांपेक्षां कांहीं कमी महाराष्ट्रद्रोही नाहींत. मोरारजींच्या गोळीबाराचें त्यांनीं बेशरमपणें समर्थन केलें. ते म्हणाले, "राज्य करायचें म्हणजे गोळ्या मारायलाच पाहिजेत!" नेहरूंची स्तुति करण्याच्या बाबतींतहि हिरे हे चव्हाणांच्या कांहीं फार मागें राहिले नाहींत. चव्हाण म्हणाले, "नेहरू हे महाराष्ट्रापेक्षां श्रेष्ठ आहेत!" तर हिरे उद्गारले कीं, "आजच्या आणि उद्यांच्या हिंदुस्थानचे जनक नेहरूच होत!" तथापि, कोणती गोष्ट केव्हां बोलायची किंवा केव्हां करायची ह्याचें तारतम्य चव्हाणांना जसें आहे तसें हिऱ्यांना नाहीं. म्हणून चव्हाणांचा महाराष्ट्रद्रोह जसा काँग्रेसश्रेष्ठींच्या पसंतीला उतरला तसा हिऱ्यांचा उतरला नाहीं. संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर आपल्या मंत्रिपदाचा राजिनामा देण्याची चव्हाणांना जशी इच्छा नव्हती, तशी भाऊसाहेबांनाहि नव्हती. पण राजिनामा देण्याची गोष्ट चव्हाणांनीं चुकून आपल्या तोंडामधून कधीं काढली नाहीं. तर भाऊसाहेबांनीं राजिनामा देण्याचें आणि परत घेण्याचें ढोंगी नाटक करून स्वतःच्या पायावर निष्कारण धोंडा पाडून घेतला. भाऊसाहेब हिरे हा अत्यंत चंचल, दुर्बल, भ्याड आणि अवसानघातकी माणूस आहे. त्यामुळें जनतेमध्येंहि त्यांनीं आपली बेअब्रू करून घेतली आणि काँग्रेसमधलीहि आपली प्रतिष्ठा त्यांनीं गमावली. नाहीं तर महाराष्ट्राचा विश्वासघात चव्हाणाइतका करण्याची मानसिक सिद्धता त्यांच्याजवळ असतांनाहि आपल्या हातांतलें भरंवशाचें मुख्यमंत्रिपद केवळ मोरारजींना नाखूष करून त्यांनीं गमावलें.

बाकी, भाऊसाहेबांपेक्षां तिप्पट मतें मिळवून आपण त्यांच्यावर मोठी मात केली अशा जर कल्पनेंत यशवंतराव भराऱ्या मारीत असतील तर तो त्यांचा निव्वळ भ्रम ठरेल. मुख्यमंत्रिपदाचा त्याग करून मोरारजींनीं फार मोठी तत्त्वनिष्ठा दाखविली ही गोष्ट जितकी झूट, तितकीच आपल्या योग्यतेच्या जोरावर काँग्रेसपक्षीयांचा प्रचंड पाठिंबा यशवंतरावांनीं मिळवला ही गोष्ट खोटी आहे. आगामी निवडणुकांत

महाराष्ट्राच्या सार्वजनिक स्वास्थ्याची आणि जीवनाची धुळधाण उडवून महाराष्ट्रावर भयानक सूड उगवण्यासाठीं नेहरू आणि मोरारजी ह्यांनीं चव्हाणाचा हा 'अस्तनीं-तला निखारा' हातांत धरला आहे. वस्तुतः, सर्व सत्ता आणि सूत्रें मोरारजीच हलवणार. चव्हाणांच्या मंत्रिमंडळांतलें गृहमंत्रिपद सौराष्ट्राचे रसिकलाल पारेख ह्यांना द्यावयाचें मोरारजींनीं आधींच ठरविलेलें आहे. त्यामुळें चव्हाणांच्या हातीं इकडची काडी तिकडे करण्याचाहि अधिकार राहणार नाहीं. पण सगळ्या वाईटपणाचे धनी मात्र त्यांना व्हावें लागणार. महाराष्ट्राच्या पाठींत आतांपर्यंत केवळ विश्वासघाताची कट्यारच चव्हाणांनीं खुपसली. पण आगामी निवडणुकींत महाराष्ट्राच्या डोक्यावर चव्हाणांच्या हातून 'कुऱ्हाडीचे घाव' घालण्याचा मोरारजींचा डाव आहे. उत्तर साताऱ्यांत चव्हाणांचे कित्येक मित्र आणि संबंधी आतांपर्यंत काय उद्योग करीत होते हें सर्वांना माहित आहे. चव्हाण मुख्य मंत्री झाल्यामुळें ह्या सर्व गणंगांना आणि समाजशत्रूंना भलताच चेव चढणार आहे.

क्षुद्र माणसें महत्त्वाला चढलीं म्हणजे तीं कांहीं मोठीं होत नाहींत. किंबहुना प्राप्त झालेल्या महत्त्वानें त्यांचा क्षुद्रपणा जास्तच उजेडांत येतो. राजवाड्याच्या कळसावर कावळा जाऊन बसला म्हणून कांहीं त्याला कोणी गरुड म्हणत नाहीं असें एक संस्कृत सुभाषित आहे. त्याप्रमाणें मुंबई राज्याच्या मुख्यमंत्रिपदावर यशवंत-राव चव्हाण जाऊन बसले म्हणून कांहीं ते महापुरुष ठरत नाहींत. बाळासाहेब खेर आणि मोरारजी देसाई हे देखील मुंबई राज्याचे मुख्य मंत्री होते. म्हणून आज त्यांना महाराष्ट्रांतलें किंवा गुजरातमधलें कोण कुत्रें विचारतें आहे? त्यांच्या-पेक्षांहि यशवंतरावांची स्थिति भयंकर होईल. यशवंतरावांचें मुख्यमंत्रिपद पावसाळी छत्र्यांप्रमाणें निवडणुका होईपर्यंत चार महिने टिकेल. त्यानंतर त्यांचें स्थान घराच्या माळ्यावर किंवा घराबाहेरच्या उकिरड्यावर. सार्वत्रिक निवडणुका झाल्यानंतर यशवंतराव चव्हाण नांवाचा कोणी माणूस मुंबई राज्याचा मुख्य-मंत्री होऊन गेला ह्याची नांवनिशाणी देखील शिल्लक उरणार नाहीं. वस्तुतः, मोरारजी गेले आणि चव्हाण आले ह्यामुळें तत्त्वतः कांहींच बदल झालेला नाहीं. गिधाड गेलें आणि कावळा आला एवढाच फरक. मोरारजी हा जर शिमगा तर चव्हाण हें त्या शिमग्याचें कवित्व ! इतकेंच.

तथापि, मुंबई राज्यावरचें मोरारजीचें कुटिल आणि अमंगळ वर्चस्व जरी अद्याप आहे तसेंच कायम असलें तरी मुंबई राज्याच्या रंगभूमीवरचा मोरारजी हा

भयंकर क्रूरकर्मा कलिपुरुष यापुढें त्या ठिकाणीं प्रत्यक्षपणें वावरतांना दिसणार नाहीं, ह्या जाणिवेनें मुंबई राज्यांतील जनतेला कल्पनातीत आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. गेल्या नऊ वर्षांत ज्यानें एक हजार एकशें पंचायशीं वेळां गोळीबार करून साडेतीनशें माणसें ठार मारलीं, हीं माणसें ठार मारतांना त्यांच्या वयाचा, लिंगाचा किंवा भाषेचा पक्षपाती विचार करण्याचा ज्यानें क्षुद्रपणा दाखवला नाहीं, एवढेंच नव्हे तर सर्व माणसांवर प्रेम करणारे आणि सर्व सुखी व्हावेत म्हणून झटणारे आपण एक वैष्णवजन आहोंत असेंच डोळ्यांत अश्रू आणून जो अद्याप सांगतो आहे, असा मोरारजीसारखा माणूस भारताच्या इतिहासांत आजपर्यंत कधीं झाला नाहीं, असेंच उद्यांच्या इतिहासकारांना नमूद करावें लागेल. मुंबई राज्यावरचें हें भयानक गंडांतर एक नोव्हेंबरपासून कायमचें नाहींसें झालें ह्याबद्दल ह्या राज्यांतल्या सर्व प्रजाजनांनीं वस्तुतः तो दिवस 'मुक्तिदिन' (Deliverence Day) म्हणून पाळावयाला हवा.

मुंबई राज्याच्या मुख्यमंत्रिपदावर यशवंतराव चव्हाणांची निवड झाली ह्याबद्दल सर्व मराठी आणि गुजराती जनतेचें आम्ही अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों. कारण, यशवंतरावांच्या कारकीर्दीत महाद्विभाषिक राज्याचें संपूर्ण वाटोळें होऊन आगामी निवडणुकींत संयुक्त महाराष्ट्र आणि महागुजरात निश्चितपणें निर्माण होतील ह्याविषयीं आम्हांला आतां तर मुळींच शंका राहिली नाहीं!

२१-१०-५६

# महाद्विभाषिकांचा निःपात होवो !

एक नोव्हेंबरपासून स्वतंत्र भारतामधील लोकशाहीच्या एका नव्या पर्वाला प्रारंभ झालेला आहे. स्वातंत्र्य येऊन नऊ वर्षें झालीं, तरी लोकशाहीच्या कित्येक मूलभूत सिद्धांतांचा समावेश देशाच्या राज्यकारभारांत करण्यांत आलेला नव्हता. भाषिक राज्य हाच खरा लोकशाहीचा पाया होय ह्या दृष्टीनें एक नोव्हेंबर रोजीं भारतांत 'अ' दर्जाचीं जीं तेरा राज्यें, 'ब' दर्जाचें जें एक राज्य आणि 'क' दर्जाचीं जीं पांच राज्यें निर्माण होत आहेत त्यांपैकीं 'अ' दर्जाचें एकटें एक 'द्विभाषिक मुंबई राज्य' वजा केलें तर बाकीचीं सर्व अठरा राज्यें (पंजाबचा अपवाद सोडून) भाषिक तत्त्वांवर निर्माण झालेलीं आहेत हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. ही लोकशाहीच्या दृष्टीनें भारताची फार मोठी प्रगति आहे ह्यांत काय शंका आहे ? भारतासारख्या बहुभाषिक देशामध्यें भाषिक तत्त्वावर घटकराज्यें बनविल्याखेरीज जनतेमध्यें एकात्मता निर्माण होणें अशक्य आहे ही गोष्ट लोकमान्य टिळकांच्या वेळेपासून काँग्रेस पुढाऱ्यांनीं ओळखली होती. मोतीलाल नेहरू, महात्मा गांधी आणि पंडित जवाहरलाल नेहरूसुद्धां भाषिक राज्यांचे पहिल्यापासून कट्टर पुरस्कर्ते होते. ह्या देशांतून इंग्रजी सत्ता नष्ट झाल्यानंतर देशाची पुनर्रचना भाषिक तत्त्वांवर करण्यांत येईल अशी १९२० सालापासून काँग्रेस जनतेला जी सालोसाल आश्वासनें देत होती तीं एवढ्यासाठींच.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतरहि गेल्या नऊ वर्षांत काँग्रेसचे नेते तीन कमिशनें नेमून, लाखों रुपये खर्च करून आणि परिश्रमांचे प्रचंड डोंगर उभारून जर कोणत्या एका गोष्टीचा विचार करीत असतील तर तो ह्याच भाषावार राज्यपुनर्रचनेचा. म्हणून, भारतीय जनतेचें कित्येक वर्षांचें हें अत्यंत आवडतें आणि लाडकें स्वप्न एक नोव्हेंबर रोजीं अंशतः तरी पूर्ण होत आहे ह्याबद्दल, भारतामधील लोकशाहीच्या सर्व पुरस्कर्त्यांना अंतःकरणापासून हर्ष झाल्यावांचून राहणार नाहीं. अर्थात्, भारतीय जनतेच्या हातीं लोकशाहीचा हा जो मंगल कलश काँग्रेसश्रेष्ठींनीं ठेवलेला

आहे, त्याजवर मुंबईच्या द्विभाषिक राज्याचा काळाकुट्ट डाग जर त्यांनीं जाणूनबुजून ठेवला नसता तर आम्हीं काँग्रेसश्रेष्ठींचें खरोखरच मनापासून अभिनंदन केलें असतें. पण—पण भारताचें दुर्दैव, लोकशाहीचें दुर्भाग्य आणि महाराष्ट्र नि गुजरातमधील पांच कोटी जनतेचें कमनशीब म्हणून काँग्रेसश्रेष्ठींनीं अठरा भाषिक राज्यांचें प्रचंड मंदिर ह्या देशांत उभारून त्या मंदिराचा कळस जें मुंबई राज्य तें द्विभाषिक बनविलें आणि त्या कळसावरच लोकशाहीला सुळीं देऊन टाकलें! एक नोव्हेंबर रोजीं भारतांत लोकशाही जन्माला येत आहे हें खरें पण त्याच क्षणीं त्या लोकशाहीच्या नरड्यामध्यें महाद्विभाषिक मुंबईचें घातकी नख खुपसण्याचा राक्षसी प्रयत्न होतो आहे हें बघून आनंदापेक्षां संतापाचीच भावना आमच्या मनामध्यें अनावर होतें आहे. म्हणून एक नोव्हेंबर रोजीं भारतांत अवतीर्ण होणाऱ्या सर्व एकभाषिक राज्यांचें आम्ही अभिनंदन करतों आणि भारताच्या लोकशाहीला हरताळ फासणाऱ्या मुंबईच्या महाद्विभाषिक राज्याचा धिक्कार करतों!

मुंबईचें महाद्विभाषिक राज्य ही तीन कोटी मराठी आणि दोन कोटी गुजराती जनतेवरील अन्यायाची आणि जुल्माची परिसीमा होय. हें महाद्विभाषिक राज्य कोणाला पाहिजे होतें? आणि काँग्रेसश्रेष्ठींकडे तें मागितलें होतें कोणीं? जें कोणीं कधींहि मागितलें नव्हतें आणि ज्याला सर्व जनतेचा निकराचा विरोध होता आणि अजूनहि आहे, असें द्विभाषिक राज्य पांच कोटी जनतेवर जुल्मानें आणि जबर-दस्तीनें लादण्यांत काँग्रेसश्रेष्ठींना काय आनंद होत असेल आणि काय समाधान लाभत असेल तें त्यांचें त्यांनाच ठाऊक! मुंबई-बेळगांव-कारवार-निपाणीसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण करण्यांत यावा अशी मागणी तीन कोटी मराठी जनता एकमुखानें इतकीं वर्षें करीत आहे. हें काय काँग्रेसश्रेष्ठींना माहीत नाहीं? महाराष्ट्राची ही मागणी काँग्रेसश्रेष्ठींनीं दर वेळेला जाणूनबुजून आणि हेतुपुरःसर लाथाडली. दार कमिशननें संयुक्त महाराष्ट्राच्या योजनेला प्रथम वाटाण्याच्या अक्षता लावल्या. ज. व. प. समितीनें दार कमिशनचीच 'री' ओढली आणि फाजलअल्ली समितीनें 'संयुक्त महाराष्ट्रा'ला सपशेल मूठमाती देऊन द्विभाषिकाचा वेताळ प्रथम महाराष्ट्राच्या खांद्यावर बसविला. येथपासून तीन कोटी मराठी जनता आणि काँग्रेसश्रेष्ठी ह्यांच्यामधील रणसंग्रामाला प्रारंभ झाला.

हें घनघोर युद्ध गेलें वर्षभर निकरानें चालू आहे. संयुक्त महाराष्ट्र निर्माण व्हावा यासाठीं एकशेंपांच जिवांनीं आपल्या प्राणांचें बलिदान केलें. शेकडों

लोकांनीं आपलें रक्त सांडलें. पन्नास हजार स्त्री-पुरुष सत्याग्रह करून तुरुंगांत गेले. हें न बघावयाला काय काँग्रेसश्रेष्ठींच्या डोळ्यांच्या खांचा झाल्या आहेत ? गेलें वर्षभर सारा महाराष्ट्र संयुक्त महाराष्ट्रासाठीं आकाशपाताळ एक करतो आहे ! लाखों लोकांच्या शेकडों सभा साऱ्या महाराष्ट्रामध्यें भरल्या. विराट् मोर्चे काढण्यांत आले. संप आणि हरताळ पुकारण्यांत आले. शेकडों लोकांनीं काँग्रेसच्या निषेधार्थ स्थानिक स्वराज्यसंस्थांचे आणि कायदेमंडळाचे राजिनामे दिले. संयुक्त महाराष्ट्र मिळवण्यासाठीं लोकशाही चळवळीची जेवढी म्हणून अहिंसात्मक आणि सत्याग्रही साधनें आहेत तेवढीं महाराष्ट्रानें वापरलीं. संयुक्त महाराष्ट्रासाठीं मराठी जनतेनें जेवढी चळवळ केली तेवढी स्वातंत्र्यासाठीं देखील केली नसेल. इंग्रजांच्या राज्यांत महाराष्ट्रानें जर एवढी जगड्व्याळ चळवळ केली असती, तर इंग्रजांनीं महाराष्ट्राला एकदां नाहीं दहा वेळां संयुक्त महाराष्ट्र देऊन टाकलें असतें. झोपीं गेलेल्याला जागें करतां येतें पण झोपेचें सोंग घेतलेल्याला कसें जागें करतां येणार ?

इंग्रज हे खरे लोकशाहीनिष्ठ होते. लोकशाहीची प्रतिष्ठा राखण्यासाठीं भारताला स्वातंत्र्य देऊन ते ह्या देशांतून मुकाट्यानें चालते झाले. पण काँग्रेसवाल्यांची लोकशाहीनिष्ठा हें एक प्रचंड ढोंग आहे. काँग्रेसवाल्यांचें सगळेंच कांहीं ढोंग आहे. त्यांचें सत्य हें ढोंग आहे. त्यांची अहिंसा हें ढोंग आहे. त्यांचा अपरिग्रह हें ढोंग आहे. त्यांचें ब्रह्मचर्य हें ढोंग आहे. त्यांची लोकशाही हें ढोंग आहे. आणि त्यांचा समाजवाद हेंहि ढोंग आहे. मराठी जनतेला त्यांना 'संयुक्त महाराष्ट्र' मुळीं द्यावयाचाच नाहीं. म्हणून संयुक्त महाराष्ट्रासाठीं एवढी चळवळ करून सुद्धां काँग्रेसश्रेष्ठींच्या मनावर त्याचा कांहींएक परिणाम झाला नाहीं. महाराष्ट्रानें जी जी म्हणून गोष्ट त्यांच्याजवळ मागितली तिला त्यांनीं साफ नकार दिला. आणि जी जी गोष्ट महाराष्ट्राला नको होती ती ती जबरदस्तीनें त्यांनीं त्याच्यावर लादली. तीन कोटी मराठी जनतेच्या आकांक्षांचा राक्षसी खून करून तिच्या बोकांडीं महाद्विभाषिकाची राजवट बसविणाऱ्या काँग्रेसश्रेष्ठींसारखे जुलमी आणि सैतानी सुलतान आजपर्यंत जगांत होऊन गेले नसतील.

भारतांतल्या बहुतेक सर्व भाषिकांना लोकशाहीच्या तत्त्वानुसार भाषिक राज्यें देऊन फक्त महाराष्ट्र आणि गुजरात ह्या प्रदेशांतील जनतेवर महाद्विभाषिक राजवट कां लादण्यांत आली अशी रास्त शंका कुणालाहि येईल. त्याचें उत्तर माजी अर्थमंत्री चिंतामणराव देशमुख ह्यांनीं मागेंच देऊन टाकलें आहे. आणि तें हें

की आजच्या राज्यकर्त्यांच्या अंतःकरणांत महाराष्ट्राबद्दल वैरभाव आहे. आजचे राज्यकर्ते हे महाराष्ट्राचे शत्रू आहेत. दुष्मन् आहेत. त्यांना भारताच्या इतिहासांतून आणि भारताच्या भूगोलांतून महाराष्ट्र नष्ट करून टाकावयाचा आहे. महाराष्ट्राचीं दैवतें, महाराष्ट्राचे महापुरुष, महाराष्ट्राची संस्कृति, महाराष्ट्राची मुत्सद्देगिरी आणि महाराष्ट्राचा पराक्रम त्यांच्या डोळ्यांत रात्रंदिवस सलतो आहे. महाराष्ट्राबद्दल त्यांना मत्सर वाटतो आहे. महाराष्ट्राबद्दल असूया वाटते आहे. म्हणून संयुक्त महाराष्ट्राच्या लोकशाही आंदोलनाची धादांत खोटी आणि खोडसाळ बदनामी करण्याची एकहि संधि आतांपर्यंत त्यांनीं दवडलेली नाहीं.

इंग्रजींत जी एक म्हण आहे कीं 'कुत्र्याला आधीं शिवी द्या आणि मग गोळी घाला !' त्या म्हणीची अक्षरशः अंमलबजावणी त्यांनीं महाराष्ट्राच्या बाबतींत केली आहे. महाराष्ट्र हा हिंसावादी आहे, महाराष्ट्र हा अत्याचारी आहे, महाराष्ट्र हा स्त्रियांची अब्रू घेणारा आहे, महाराष्ट्र हा अन्य भाषिकांचीं दुकानें लुटणारा आणि घरेंदारें जाळणारा आहे, अशी महाराष्ट्राची अनन्वित आणि यथेच्छ निंदा करून मग काँग्रेस सरकारनें महाराष्ट्राच्या निःशस्त्र आणि निरपराध जनतेवर गोळ्या झाडल्या आहेत. कायदा आणि सुव्यवस्था ह्यांच्या प्रतिपालनासाठीं कांहीं मुंबईच्या काँग्रेससरकारनें गोळीबार केलेला नाहीं, तर केवळ संयुक्तमहाराष्ट्रवादी जनतेवर सूड उगवण्यासाठीं म्हणून हा गोळीबार करण्यांत आलेला आहे. मुंबईच्या चाळींमधील बायकामुलांवर अश्रुधूर टाकून त्यांना चाळींबाहेर काढण्यांत आलें आणि मग तीं रस्त्यांवर आल्यानंतर त्यांच्यावर बेगुमान गोळ्या झाडण्यांत आल्या, हा भयानक रहस्यस्फोट चिंतामणराव देशमुखांनीं लोकसभेंत केला. मुंबईच्या काळाचौकी विभागांत मोरारजी देसाईंचे मानसपुत्र डेप्युटी पोलीस कमिशनर मोडक आणि जॉनक्रास ह्या दोघांनीं निःशस्त्र जमावावर गोळीबार करून प्रेतांच्या राशी पाडल्या आणि रक्ताचा पूर वाहवला ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे.

महाराष्ट्रीय जनतेवर मुंबईच्या काँग्रेस सरकारनें एवढे हिंस्र अत्याचार करूनहि पुन्हा मराठी जनता हिंसावादी आणि काँग्रेस सरकार आपलें अहिंसावादीच. जनतेवर गोळीबार कां करण्यांत आला ह्याचीं मोरारजींनीं आतां निराळींच कारणें दिलीं आहेत. ते एकदां म्हणतात कीं, पोलिसांनीं आत्मसंरक्षणासाठीं गोळीबार केला. तर दुसऱ्यांदा ते म्हणतात कीं, महात्मा गांधी आणि राष्ट्रध्वज ह्यांची विटंबना झाल्यानंतर गोळीबार न करावा तर काय करावें? मोरारजींचीं हीं दोन्ही

कारणें खोटीं आहेत. संयुक्तमहाराष्ट्रवादी आंदोलनांत एकशेंपांच माणसें ठार झालीं. पण एकहि पोलीस मरण पावलेला नाहीं. तेव्हां आत्मसंरक्षणासाठीं पोलिसांना गोळीबार करावा लागला ही गोष्ट साफ खोटी आहे. त्याचप्रमाणें पोलिसांच्या गोळीबारांत जीं मुलें आणि माणसें ठार झालीं त्यांनीं महात्मा गांधींच्या फोटोची वा राष्ट्रध्वजाची विटंबना करण्याचा प्रयत्न केला ही गोष्ट सिद्ध झालेली नाहीं. गोळीबारांत मरण पावलेल्यांपैकीं पुष्कळसे लोक घरांत बसल्या बसल्या मृत्युमुखीं पडलेले आहेत. तेव्हां ते आपल्या घरांत महात्मा गांधींच्या फोटोची किंवा राष्ट्रध्वजाची विटंबना करीत बसले होते असा आरोप हातभट्टीची दारू प्राशन केल्याखेरीज मोरारजींना करतां येणार नाहीं. सारांश, मराठी जनतेनें संयुक्त महाराष्ट्र मागण्याचें घोर पातक केलें म्हणून तिच्यावर सूड उगविण्यासाठीं नाना तऱ्हेचे अघोरी अत्याचार काँग्रेस सरकारनें तिजवर केले. एवढेंच नव्हे, त्या सूडाच्या होळींत त्यांनीं दोन कोटी गुजराती जनतेचासुद्धां बळी टाकला.

आम्हांला गुजराती जनतेबद्दल सर्वांत जास्त सहानुभूति वाटते. कारण, मोरारजी देसाई आणि ढेबर हे गुजरातचे प्रखर पक्षपाती असतांना सुद्धां त्यांना गुजरातचें कल्याण करतां आलें नाहीं. कारण गुजरातचें हित करण्यापेक्षां सुद्धां महाराष्ट्राचें वाटोळें करण्याकडे त्यांचें अधिक लक्ष्य होतें. आणि ह्या त्यांच्या महाराष्ट्रद्वेषाच्या आगींत गुजरातचा नाहक बळी पडला. महाद्विभाषिक ही 'परमेश्वरी प्रेरणा' आहे, हा 'राष्ट्रीय तोडगा' आहे अशी नेहरू आणि पंत ह्यांनीं त्याची कितीहि जाहिरात केली आणि गुजरातमधल्या नि महाराष्ट्रांतल्या बहुसंख्य जनतेनें महाद्विभाषिकाला मान्यता दिली आहे असा काँग्रेसवाल्यांनीं कितीहि खोटा प्रचार चालवला असला तरी महाद्विभाषिक राज्य हा महाराष्ट्रद्वेष्ट्या काँग्रेस-श्रेष्ठींनीं महाराष्ट्रावर आणि गुजरातवर उगवलेला एक भयानक सूड आहे ही गोष्ट आतां सर्वांना कळून चुकली आहे. एक ऑगस्टपर्यंत 'मुंबई ही महाराष्ट्राला मिळाली तर मला अतिशय आनंद होईल, एवढेंच नव्हे तर महाराष्ट्राला मुंबई मिळावी म्हणून मी त्याची वकिलीसुद्धां करीन!' अशी भाषा पंडित जवाहरलाल नेहरू करीत होते. तेच पंडित नेहरू 'महाद्विभाषिक ही अदृश्य शक्तीची योजना आहे!' अशी भाषा सात ऑगस्टपासून बोलूं लागले. आणि आतां यांना ह्या महाद्विभाषिकाचा एवढा उन्माद चढला आहे कीं 'भारतामधल्या किंवा भारताबाहेरच्या कोठल्याहि शक्तीच्या अंगीं महाद्विभाषिक नष्ट करण्याचें

सामर्थ्य नाहीं!' अशा धमक्या ते मराठी आणि गुजराती जनतेला देऊं लागले आहेत. पंडित नेहरू, मोरारजी देसाई किंवा ढेबर हे तर बोलून चालून महाराष्ट्राचे शत्रूच होत.

अमेरिकन विद्यार्थी एडवर्ड डीन ह्यांना दिलेल्या मुलाखतींत मोरारजींनीं महाराष्ट्राची जेवढी बदनामी केली आहे तेवढी इंग्रजांनीं देखील केली नसेल. पण महाराष्ट्राला नेस्तनाबूद करण्याचा ह्या तीन महाराष्ट्रशत्रूंचा डाव आज जो महाद्विभाषिकाच्या रूपानें प्रकट होत आहे, त्याचें कारण ह्या महाराष्ट्राच्या शत्रूंना आमच्या महाराष्ट्रद्रोही कॉंग्रेस नेत्यांनीं साहाय्य केलें हें होय. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या लढ्याचे आमचे सेनापति शंकरराव देव ह्यांनीं महाराष्ट्राचा जास्तींत जास्त द्रोह करून शेवटीं आपण 'महाद्विभाषिकवादी झालों असल्याची' घोषणा केली आणि आतां ते उघडउघडपणें शत्रूला जाऊन मिळाले आहेत. काका गाडगिळांनीं 'संयुक्त महाराष्ट्रासाठीं महाभारता'चें युद्ध होईल अशा घोषणा करून मराठी जनतेचा बुद्धिभेद केला अन् अखेर 'महाद्विभाषिकाचा आतां कायदा झाला आहे तेव्हां आतां तो मानल्यावांचून गत्यंतर नाहीं' असें म्हणून संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना तोंडघशीं पाडलें आहे. भाऊसाहेब हिरे आणि यशवंतराव चव्हाण ह्यांच्यामध्यें महाराष्ट्राचा विश्वासघात करण्याच्या बाबतींत चढाओढ चालू होती. त्या चढाओढींत भाऊसाहेब हिऱ्यांचा पराजय होऊन त्यांची मंत्रिमंडळांतून हकालपट्टी करण्यांत आली आणि यशवंतराव चव्हाण हे 'महाद्विभाषिका'च्या हंगामी मंत्रिमंडळाचे मुख्य प्रधान झाले. तीन कोटी मराठी माणसांपेक्षां नेहरू मोठे आहेत ही पूजा नेहरूदेवांच्या हिरोबीं रुजू झाली आणि त्याचें पारितोषिक यशवंतरावांना मिळालें.

सारांश, एक नोव्हेंबर रोजीं अस्तित्वांत येणारें 'महाद्विभाषिक' राज्य हें महाराष्ट्रावर सूड घेण्यासाठीं निर्माण झालेलें असून महाराष्ट्राशीं करण्यांत आलेल्या हरामखोरींतून जन्मास आलेलें आहे. म्हणून तीन कोटी मराठी जनतेच्या मुळावर जन्मलेलें हें महाद्विभाषिक राज्य शक्य तितक्या लौकर नष्ट होण्यांतच मराठी जनतेचें कल्याण आहे. मामा देवगिरीकर म्हणतात, "थाटामाटांत दिवाळी साजरी करून 'महाद्विभाषिका'चें स्वागत करा." मामा देवगिरीकरांचा भाऊ किंवा मुलगा मोरारजींच्या गोळीबारांत ठार झाला असता म्हणजे असे उद्गार त्यांच्या तोंडून निघाले नसते. मामा आणि शंकरराव देव 'ब्रह्मचारी' असल्यानें

त्यांना गोळीबारामध्यें मेलेल्या मुलाबाळांच्या दुःखाची कल्पना येणें शक्य नाहीं. महाराष्ट्राच्या गेल्या पांचसातशें वर्षांच्या इतिहासांत अशी भयंकर दिवाळी आलेली नसेल. 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या झगड्यांत मरण पावलेल्या पवित्र हुतात्म्यांच्या रक्ताची शपथ घेऊन आम्ही परमेश्वराच्या चरणाजवळ प्रार्थना करतों कीं मराठी लोकांच्या इच्छेविरुद्ध त्यांच्यावर लादण्यांत आलेल्या 'महाद्विभाषिक' राज्याचा निःपात होवो. हें 'महाद्विभाषिक' राज्य साकार करण्यांत ज्या ज्या महाराष्ट्रशत्रूंनीं आणि महाराष्ट्रद्रोह्यांनीं भाग घेतला असेल त्यांचें वाटोळें होवो. त्यांचें निसंतान होवो.

४-११-५६

# नरराक्षस मोरारजी अखेर गेला !

मुंबई राज्यांतील जनतेच्या बोकांडीं सतत नऊ वर्षें बसलेला नरराक्षस मोरारजी देसाई अखेर ह्या राज्यांतून गेला ह्या विचारानें ह्या राज्यांतील कोट्यवधि जनता सुटकेचा आणि समाधानाचा निःश्वास टाकल्यावांचून राहणार नाहीं. जगाच्या इतिहासांत पुष्कळ दुष्ट आणि क्रूर माणसें होऊन गेलीं असतील. पण मोरारजी-सारखा उलट्या काळजाचा, हिंस्र हृदयाचा आणि राक्षसी बुद्धीचा माणूस क्वचितच झाला असेल. 'माणूस' ह्या शब्दानें त्याचा उल्लेख करतांनासुद्धां आमच्या अंगावर शहारा उभा राहतो. चंगीझखान किंवा तैमूरलंग ह्या रक्तपिपासू सैतानांचीं नांवें आपण इतिहासांत नुसतीं वाचतों. त्यामुळें त्यांच्या दुष्टपणाची आपणांस तितकीशी कल्पना येत नाहीं. पण मोरारजींनीं आपल्या नऊ वर्षांच्या कारकीर्दींत केलेलें भयानक हत्याकांड पाहिल्यानंतर चंगीझखान आणि तैमूरलंग ह्यांच्या क्रौर्याची पुष्कळशी कल्पना येते. ब्रिटिशांनीं दीडशें वर्षांत जेवढा गोळीबार केला नसेल तेवढा गोळीबार अवघ्या नऊ वर्षांत मोरारजींनीं केला. परवांच त्यांनीं आपल्या थोबाडामधून त्या गोळीबाराचा आंकडा सांगितला. नऊ वर्षांत त्यांनीं एकंदर एक हजार एकशेंपंचायशीं वेळां गोळीबार केला आणि तीनशेंपंचवीस माणसें ठार मारलीं. जखमी आणि जायबंदी किती झालीं त्याची तर गणतीच नाहीं.

महात्मा गांधी ज्या राष्ट्राचे जनक आहेत असें अभिमानानें सांगितलें जातें, 'सत्य आणि अहिंसा' हीं दोन बिरुदें ज्या देशांतले राज्यकर्ते सांजसकाळ आपल्या गळ्यांत अडकवून फिरतात, त्या देशामधल्या एका राज्याच्या मुख्य प्रधानानें अंगांत खादीचे कपडे आणि डोक्याला गांधी टोपी घालून एक हजार एकशेंपंचायशीं वेळां गोळीबार करावा आणि राजरोसपणें सव्वातीनशें माणसें ठार मारावींत ह्यापेक्षां ह्या राष्ट्राच्या तोंडाला काळोखी फासणारी अधिक भयंकर गोष्ट कांहीं असूं शकेल काय ? मोरारजी हें मुंबई राज्यावरचें फार मोठें संकट होतें. हें संकट ह्या राज्यामधून तरी कसें नष्ट होईल ह्याची कोट्यवधि जनतेला विवंचना लागून

राहिली होती. प्राण गेला तरी मुंबई राज्याची मानगूट सोडावयाची नाहीं असा ह्या बलसाडच्या वेताळानें जणुं कांहीं निर्धारच केला होता. ‘अरबी भाषेंतल्या सुरस आणि चमत्कारिक गोष्टी’ मधल्या सिंदबादच्या मानगुटीला बसलेल्या दुष्ट थेरड्याप्रमाणें मुंबई राज्याच्या नरडीभोंवतीं आपल्या सत्तेचा विळखा आवळूनच हा नरसर्प बसला होता. त्यामुळें ह्या राज्यांतील साऱ्या जनतेचे प्राण अक्षरशः कासावीस झाले होते.

महाराष्ट्रांतले लोक तर मोरारजीला उठल्याबसल्या शिव्या देत होते. पण गुजरातच्या लोकांना जेव्हां मोरारजीचा उबग आला, तेव्हां बलसाडच्या मतदारांनीं गेल्या निवडणुकींत त्यांना चारी मुंडे चीत करून त्यांचें नाक तळापासून कापून काढलें. मोरारजीचा पराभव हा गेल्या निवडणुकींतला सर्वांत मोठा चमत्कार होता. मोरारजी निवडणुकींत जेव्हां आदळला तेव्हां लोकांनीं घरोघर साखरा वाटल्या. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं आमच्या बेवकूफ भाऊसाहेब हिऱ्यांनीं मोरारजीला तार पाठवून हंबरडा फोडला कीं, “तुमच्यावांचून मुंबईचें राज्य आम्हांला चालविणें अशक्य आहे!” स्वतःच्या तोंडानें स्वतःची नालायकी कबूल करणारा असा नादान माणूस कुणीं पाहिला आहे का? भाऊसाहेब हिऱ्यांनीं जर ही तार मोरारजीला पाठविली नसती तर त्याचे चारदोन पूर्वज काय नरकांत गेले असते? मोरारजीला काय तेंच पाहिजे होतें. आपण गेलों तर मुंबई राज्य चालणें अशक्य आहे असा गाजावाजा करून ते फिरून अहमदाबादमधून निवडणुकीला उभे राहिले आणि निवडून येऊन पुन्हा मुंबई राज्याच्या बोकांडीं येऊन बसले. एकदां निवडणुकींत पडलेल्या उमेदवारानें पुन्हा दुसरीकडून निवडून यावयाचें ह्यापेक्षां लोकशाहीची अधिक विटंबना काय होऊं शकेल? लोकशाहीचा मूलभूत सिद्धांत पायाखालीं तुडवूनच मोरारजी मुंबई राज्याचे मुख्य प्रधान झाले ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.

गेल्या निवडणुकींत बलसाडच्या मतदारांनीं पाडलेला हा मोरारजी जर मुंबई राज्याचा मुख्य प्रधान झाला नसता तर तीन कोटी मराठी जनतेला ‘मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र’ निश्चित मिळाला असता ह्याविषयीं आम्हांला तिळमात्र शंका नाहीं. मुंबई-बेळगांवसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण होऊं नये ह्यासाठीं जर जास्तींत जास्त कारवाई कोणीं केली असेल तर ती मोरारजींनीं. आणि मुंबई राज्याचे ते मुख्य प्रधान होते म्हणूनच त्यांना हें करतां आलें. मोरारजी हा महाराष्ट्राचा सर्वांत

मोठा दुष्मन्. अमेरिकन विद्यार्थी एडवर्ड डीन ह्याला दिलेल्या मुलाखतीमध्यें मोरारजींनीं आपल्या अंतःकरणांतलें महाराष्ट्रद्वेषाचें सर्व गरळ ओकून टाकलें आहे. "मराठी लोक हे पाठींत सुरी खुपसणारे आहेत. हिंसावृत्ति त्यांच्या रोमरोमांत मुरलेली आहे. आर्थिक दृष्ट्या स्वतःची उन्नति करण्यास लागणारी धाडसी वृत्ति अंगीं नसल्याकारणानें दुसऱ्याच्या चांगल्या गोष्टींवर डल्ला मारण्याची त्यांना साहजिकच इच्छा असते. गांधींचा खून मराठी माणसाखेरीज दुसऱ्या कोणींहि केला नसता. आपल्या शत्रूच्या पाठींत सुरी खुपसणाऱ्या शिवाजीसारख्या माणसाची स्तुति मराठी लोकांखेरीज दुसरा कोणीहि करणार नाहीं." ही महाराष्ट्रीय लोकांची आणि त्यांच्या थोरे पुरुषाची जी धादांत खोटी आणि नीच निंदा मोरारजींनीं त्या अमेरिकन विद्यार्थ्याजवळ केली ती पाहिली म्हणजे हा माणूस महाराष्ट्राचा केवढ्या पराकाष्ठेचा द्वेष्टा असला पाहिजे हें कळून येतें.

ऐतिहासिक काळांत सुद्धां महाराष्ट्राचा असा द्वेष त्याच्या शत्रूंनीं केला नसेल. ज्या शिवाजी महाराजांच्या जोड्याजवळ सुद्धां बसण्याची मोरारजींची योग्यता नाहीं त्यांनीं शिवाजीला मारेकरी अन् खुनी म्हणावें ही गोष्ट महाराष्ट्रीय माणूस कधीं तरी विसरूं शकेल काय? असा हा महाराष्ट्राचा दुष्मन् मुंबई राज्याचा मुख्य प्रधान असल्यावर त्याच्या राजवटींत मराठी जनतेचें जास्तींत जास्त वाटोळें व्हावें ह्यांत नवल तें काय? राज्यपुनर्रचना समिति ही मुंबई महाराष्ट्राला देण्यास अनुकूल होती. तशी त्यांनीं शिफारसहि केली होती. पण मोरारजींनीं त्यांना आपली शिफारस बदलावयाला लाविली आणि महाराष्ट्रापासून वऱ्हाड कापून तें मुंबईसह महागुजरातला जोडण्याची व द्विभाषिक राज्य बनविण्याची कुटिल योजना त्यांनीं त्या समितीवर जबरदस्तीनें लादली. विशाल महाद्विभाषिकाचा पर्याय मोरारजींनीं नाकारला आणि मुंबई राज्याचे तीन तुकडे करावयाला लावले. येथून संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याला प्रारंभ झाला. हा लढा नेस्तनाबूद करण्यासाटीं आणि संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना बदनाम आणि बेचिराख करण्यासाठीं मोरारजींनीं बंदूकधारी पोलिसांच्या साहाय्यानें एकापेक्षांहि एक भयंकर असे जे अत्याचार आणि रक्तपात केले त्यांची आठवण झाली कीं प्रत्येक मराठी माणसाच्या तळपायाची आग मस्तकाला जाते.

कायदा आणि सुव्यवस्था ह्यांच्या संरक्षणापेक्षां मराठी जनतेच्या छातींत धडकी बसविण्यासाठीं आणि तिच्यावर सूड घेण्यासाठीं म्हणून मोरारजींनीं गोळीबारांचें

सत्र सुरू केलें. पोलिसांना ३०३ छापाच्या भयंकर बंदुका आणून दिल्या आणि बेफाम गोळीबार करण्याचा सर्रास परवाना देऊन टाकला. मोरारजीच्या ह्या गोळीबाराचें वैशिष्ट्य म्हणजे घरांत बसलेलीं मुलें आणि म्हातारीं माणसें देखील त्या गोळीबाराला बळी पडलीं. अश्रुधूर, लाठीमार आणि गोळीबार ह्यांचा ह्या काळांत मोरारजीच्या पोलिसांनीं कहर केला. 'दिसला कीं मारा आणि ठार करण्यासाठीं मारा' असा त्यांनीं पोलीस अधिकाऱ्यांना मुळीं हुकूमच देऊन टाकला. जानेवारी महिन्याच्या दंगलींत ह्या पोलीस अत्याचारांचा कळसच झाला. चाळींत राहणाऱ्या मुलांना आणि स्त्रियांना अश्रुधूर सोडून बाहेर रस्त्यावर आणण्यांत आलें आणि मग पोलिसांनीं त्यांच्यावर गोळीबार करून त्यांचे मुडदे पाडले हा मोरारजींच्या भीषण क्रौर्याचा इतिहास चिंतामणराव देशमुखांनींच लोकसभेंत सांगितला. ह्या काळांत मुंबईमधल्या अनेक निरपराधी आणि निःशस्त्र नागरिकांची मोरारजींनीं जवळ जवळ कत्तलच केली आणि एवढेंहि करून त्याची जाहीर चौकशी करण्याला साफ नकार दिला.

त्याचबरोबर संयुक्त महाराष्ट्रवादी हे गुंड आहेत, दंगेखोर आहेत, अत्याचारी आहेत, गुजराती व्यापाऱ्यांचीं त्यांनीं दुकानें लुटलीं, स्त्रियांची अब्रू घेतली, अशा तऱ्हेचा धादांत खोटा आणि खुनशी प्रचार करून 'संयुक्त महाराष्ट्र'ची चळवळ बदनाम करण्याची मोरारजींनीं अगदीं पराकाष्ठा केली. 'माझ्या बंदुकीच्या सामर्थ्यावर मी ही संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ठार करीन' असा मोरारजींनीं जणुं कांहीं विडाच उचलला. संयुक्त महाराष्ट्रासाठीं मराठी जनतेनें जी अभूतपूर्व चळवळ केली ती ब्रिटिशांच्या राजवटींत जर केली असती तर ब्रिटिशांनीं एकदां सोडून दहा वेळां मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र देऊन टाकला असता. पण महाराष्ट्रानें एवढें आकाशपाताळ एक करूनसुद्धां त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं आणि शेवटीं त्याला महाद्विभाषिक राज्यांतच जें जबरदस्तीनें ढकलण्यांत आलें त्याचें कारण केवळ हाच कलिपुरुष मोरारजी. महाराष्ट्राचें एकहि मागणें कॉंग्रेसश्रेष्ठींना त्यांनीं शेवटपर्यंत मान्य करूं दिलें नाहीं.

खंडित महाराष्ट्रांत कॉंग्रेस नष्ट होईल आणि मग केंद्रशासित मुंबई नाक मुठींत धरून महाराष्ट्राला द्यावी लागेल असें पाहतांच मोरारजी, ढेबर आणि नेहरू ह्यांनीं 'महाद्विभाषिका'चें भयंकर कारस्थान रचलें आणि महाराष्ट्राबरोबर गुजरातचाहि बळी घेऊन टाकला. मोरारजी हे तसे कट्टर महागुजरातवादी आहेत.

पण महाराष्ट्राचा विध्वंस व्हावा म्हणून आपल्या आवडत्या गुजरातला खर्ची टाकावयाला सुद्धां त्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. ही दुष्टपणाची अगदीं परिसीमा होय. दुसऱ्याला अपशकुन करण्यासाठीं स्वतःचें नाक त्यांनीं अक्षरशः कापून घेतलें. आपण गुजरातचे एकमेव पुढारी आहोंत आणि आपण सांगूं त्याला गुजरात मान तुकावील अशी मोरारजींना घमेंड वाटत होती. पण त्याच घमेंडीमुळें त्यांचा नाश झाला. महाद्विभाषिक राज्याविरुद्ध गुजराती प्रतिक्रिया एवढ्या प्रखर बंडखोरीची होईल असें मोरारजींना स्वप्नांत सुद्धां कधीं वाटलें नसेल. महागुजरातवाद्यांचा हा उठाव दडपून टाकण्यासाठीं मोरारजींनीं गोळीबाराचा आपला ठराविक उपाय अमलांत आणला. त्या गोळीबारांत निरपराधी तरुण विद्यार्थ्यांची भयंकर हिंस्र आणि क्रूर हत्या झाली. त्या हत्येमुळें सारा गुजरात एवढा खवळून उटला कीं अहमदाबादमधें कॉंग्रेस आणि गांधी टोपी एका दिवसांत जमीनदोस्त झाली.

मोरारजींच्या फोटोच्या साऱ्या गुजरातमधें प्रेतयात्रा काढण्यांत आल्या. मोरारजींच्या सभेवर अहमदाबादच्या नऊ लाख लोकांनीं बहिष्कार घातला. ही गोष्ट मोरारजींना असह्य झाली. त्यांनीं आपलें सर्वस्व पणाला लावावयाचें ठरवून आठ दिवसांच्या उपोषणाची घोषणा केली. पण अहमदाबादच्या जनतेच्या मनावर त्याचा कांहींहि परिणाम न होतां लोकांनीं त्यांना जोडे आणि दगड मारून अहमदाबादमधून हाकून दिलें. तरी देखील अहमदाबादेंत आपला विजय झाला अशा निर्लज्ज आरोळ्या ठोकीत मोरारजी मुंबईत परत आले. बलसाडच्या निवडणुकींत पडल्यानंतर ज्या अहमदाबादनें मोरारजींना पुन्हा निवडून देऊन त्यांची अब्रू वांचवली, त्याच अहमदाबादनें शेवटीं मोरारजींची अशी कांहीं धिंड काढली कीं यावज्जन्म ते ती विसरूं शकणार नाहींत. महाराष्ट्रांत तर मोरारजींना कुणी कुत्रें सुद्धां विचारीत नाहीं. त्याची मोरारजींना विशेष खंत नाहीं. पण गुजरातच्या राजधानीमधून आपल्या भाषाबांधवांनीं आपल्याला लाथा मारून हाकून द्यावें ही गोष्ट त्यांच्या जिवाला फार लागून राहिली. आणि म्हणूनच महाद्विभाषिकाचे मुख्य प्रधान होण्याबाबत त्यांना विशेष आसक्ति राहिली नाहीं.

'एकमतानें निवड झाल्याखेरीज मी महाद्विभाषिकाचा मुख्य प्रधान होणार नाहीं' हा जो तत्त्वनिष्ठेचा मोरारजींनीं आव आणला तें त्यांचें नुसतें सोंग होतें. मुंबई राज्याचें मुख्यप्रधानपद प्राण गेला तरी (म्हणजे दुसऱ्यांचा) सोडावयाचें नाहीं अशी मोरारजींची आतांपर्यंतची जिद्द होती. आणि बिनविरोध नसली

तरी यशवंतराव चव्हाणाप्रमाणें बहुमतानें मोरारजींची निवड मुख्य प्रधान म्हणून सहज होऊं शकली असती. पण मुंबई राज्याचे मुख्य प्रधान सध्यांच्या परिस्थितींत तरी होण्यांत मोरारजींना विशेष अर्थ वाटला नाहीं. महाराष्ट्रांत जोडे खायचे आणि गुजरातेंत धोंडे खायचे असा दुहेरी मार खाऊन मुख्य प्रधान होण्यापेक्षां कांहीं काळ दिल्लीला जाऊन बसलेलें बरें असा मोरारजींनीं विचार केला असावा असें दिसतें. सारांश, मोरारजींनीं महाराष्ट्रावर आणि गुजरातवर जे हिंस्र अत्याचार केले त्यांचा अपरिहार्य परिणाम म्हणूनच त्यांना मुंबई राज्य आतां सोडून बाहेर पडावें लागत आहे. मुंबई राज्य सोडून जातांना मोरारजींना किती दुःख होत असेल ह्याची आम्हांला कल्पना आहे. आणि कदाचित् निवडणुकीनंतर मुंबई राज्यांत परत येण्याचें त्यांच्या डोक्यांत कारस्थान शिजतहि असावें.

'मी कुठेंहि गेलों तरी मुंबई राज्याकडेच माझें लक्ष राहील, मुंबई राज्याच्या सेवेसाठीं मी सदैव सिद्ध राहीन, सर्वांनीं जर मला एकमतानें बोलावलें तर मुंबईला मला परत यावें लागेल!' हे जे उद्‌गार अलिकडे मोरारजींनीं काढले आहेत त्याचा अर्थ आम्हांला तरी हाच दिसतो आहे. तथापि, मुंबई राज्यांत परत येण्याची यापुढें मोरारजींनीं कितीहि कारवाई केली तरी तो त्यांचा बेत यशस्वीं होणें सर्वस्वी अशक्य आहे. मुंबईच्या बोकांडीं नऊ वर्षें बसलेला हा नरराक्षस मोरारजी आतां जो गेला तो कायमचा गेला. फिरून तो ह्या मुंबई राज्याचा मुख्यमंत्री होणें अशक्य आहे ही अगदीं काळ्या दगडावरची रेघ आहे. मुख्य प्रधानपदावरून मोरारजींना खालीं ओढावयाला भाऊसाहेब हिरे कारणीभूत झाले, ह्याबद्दल त्यांचें अभिनंदन करावयाला हवें. बलसाडच्या निवडणुकींत पडल्यानंतर मुंबई राज्याच्या उरावर येऊन बसण्याचें मोरारजींना आमंत्रण देऊन भाऊसाहेब हिऱ्यांनीं जो गुन्हा केला होता त्याची निष्कृति त्यांनीं आतां केली हें जरी खरें असलें, तरी मोरारजीचे मुंबई राज्या मुख्य प्रधान झाल्यामुळें 'संयुक्त महाराष्ट्रा'ला मराठी जनता आज जी अंतरली त्याचें खापर सर्वस्वीं भाऊसाहेब हिऱ्यांच्याच डोक्यावर फुटतें ह्यांत कांहीं संशय नाहीं. म्हणून हिऱ्यांचें ह्याबाबत अभिनंदन करतांना कोणालाहि विशेष उत्साह वाटणार नाहीं.

मोरारजींनीं आजपर्यंत केलेले सर्व भयंकर अत्याचार जगजाहीर असतांनाहि त्यांच्या अंगीं नाना तऱ्हेचे गुण चिकटवून त्यांची भरमसाट प्रशंसा करणारे अनेक लोक आढळून येतात. पंडित नेहरूंसारख्यांनीं स्वतः जेथें 'मोरारजी हा राष्ट्राचा

मौल्यवान् ठेवा आहे!' असे उद्गार काढून मोरारजीला डोक्यावर घेऊन नाचावयाचेंच काय तें बाकी ठेवलें आहे तेथें इतरांसंबंधीं काय बोलायचें? मुंबईचे माजी गव्हर्नर हरेकृष्ण मेहताब हे म्हणाले, "मोरारजी हे पक्षपाती आहेत असा आरोप त्यांचे शत्रू देखील त्यांच्यावर करणार नाहींत!" हरेकृष्ण मेहताब ह्यांचें हें म्हणणें खरें आहे. मोरारजींनीं मराठी माणसें गोळ्या मारून जितक्या निर्दयतेनें ठार मारलीं, तितक्याच क्रूरतेनें त्यांनीं गुजराती माणसांच्याही कवट्या उडवल्या. त्याच्यामध्यें त्यांनीं कोणताहि पक्षपात केला नाहीं. कॉंग्रेसश्रेष्ठी किंवा नेते ह्यांनीं मोरारजींची स्तुति करावी ह्यांत आम्हांला कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. कारण, तो त्यांच्या पक्षपाती प्रचाराचा एक भाग आहे. पण मोरारजींची स्तुति करणारीं कित्येक अज़ागळ आणि दुधखुळीं माणसें ह्या महाराष्ट्रांत आहेत ह्याचें आम्हांला आश्चर्य वाटतें. मोरारजी हा नीतिमान् आहे, सद्गुणी आहे, चारित्र्यवान् आहे, सत्यवक्ता आहे, तत्त्वनिष्ठ आहे, पैशाला स्पर्शहि करणारा नाहीं, राज्यकारभारांत कडक आणि कर्तबगार आहे अशा त्यांच्या गुणांच्या अनेक दंतकथा हीं मंडळी वेळींअवेळीं गात असतात.

क्रौर्याला आणि दुष्टपणाला कडकपणाचें आणि कर्तबगारीचें सोज्ज्वळ स्वरूप प्राप्त व्हावें ह्याचें आम्हांला सर्वांत आश्चर्य वाटतें. निःशस्त्र आणि निरपराधी नागरिकांना बंदुकीच्या गोळ्या घालून ठार मारणारा माणूस हा सद्गुणी आहे, नीतिमान् आहे, चारित्र्यवान् आहे असें म्हणणें म्हणजे ह्या पवित्र विशेषणांची बदनामी करण्यासारखें आहे. मोरारजी हा पावलोपावलीं खोटें बोलणारा, वक्र बुद्धीचा आणि कुटिल अंतःकरणाचा माणूस आहे ही गोष्ट 'संयुक्त महाराष्ट्र'-विरुद्ध त्यांनीं गेल्या वर्षांत ज्या निरनिराळ्या दुष्ट कारवाया केल्या त्यावरून सिद्ध होण्यासारखी आहे. मोरारजी हे तत्त्वनिष्ठ तर नाहींतच, पण ते पराकाष्ठेचे ढोंगी आहेत. अहमदाबादच्या तरुण मुलांना गोळ्या घालून ठार करावयाचें आणि फिरून त्यांच्याबद्दल गुजरात प्रांतिक कॉंग्रेसच्या सभेंत दुःख व्यक्त करावयाचें असलें किळसवाणें ढोंग मोरारजींखेरीज दुसरा कोणीहि करूं शकणार नाहीं. आणि त्याचबरोबर गोळीबारांत मेलेल्या मराठी माणसांबद्दल दुःख व्यक्त करावयाला मात्र साफ नकार द्यायचा, असला मनाचा हलकटपणासुद्धां केवळ मोरारजींच्या अंगींच आढळून येईल.

अहमदाबादला त्यांनीं केलेलें आठ दिवसांचें उपोषण हें तर त्यांचें सर्वांत

मोठें ढोंग होय. एक दिवस सुद्धां त्यांनीं प्रामाणिकपणानें उपोषण केलें नाहीं. डॉक्टराकडून प्रकृति बिघडल्याचीं खोटीं सर्टिफिकेटें घेऊन त्याच्या जोरावर त्यांनीं जनतेच्या डोळ्यांत सपशेल धूळ टाकली. ह्याबद्दल निदान आमच्या मनांत तरी शंका नाहीं. बरें, अहमदाबादच्या जनतेनें आपलें भाषण शांतपणें ऐकलें नाहीं तर आपण कदापि उपोषण सोडणार नाहीं ही मोरारजींची प्रतिज्ञा होती. पण मोरारजींचें व्याख्यान अहमदाबादच्या लोकांनीं शांतपणें ऐकून घेण्याची तर गोष्ट दूरच राहिली, पण त्यांनीं मोरारजींना अक्षरशः जोडे आणि दगड मारले. तरी देखील आपलाच विजय झाला असा पुकारा करून मोरारजींनीं उपोषण सोडलें. ह्यावरून त्यांच्या तथाकथित तत्त्वनिष्ठेचें स्वरूप लक्ष्यांत येईल. मोरारजींच्या हट्टीपणाला, उर्मटपणाला आणि दुराग्रहाला तर सीमा नाहीं. कोणाचें कांहींहि म्हणणें ऐकून घ्यावयाचें नाहीं आणि सत्तेच्या नि दंडुकेशाहीच्या जोरावर जें मर्जीला वाटेल तें करावयाचें हा मोरारजींचा खाक्या सर्वत्र प्रसिद्धच आहे. अशा माणसाला का कडक आणि तत्त्वनिष्ठ म्हणावयाचें ?

भारतांतील बहुसंख्य जनता ही मद्यसेवन न करणारी आहे. शेकडा पांच ते सहा माणसें मद्यप्राशन करतात. असें असतां ह्या पांच टक्के मद्यपी लोकांना सुधारण्यासाठीं जनतेचे सालीना पंधरा कोटी रुपये खड्डयांत घालावयाचे ह्यापेक्षां अधिक मूर्खपणा जगांत कांहीं असूं शकेल काय ? आणि एवढा पैसा खर्च करून मुंबई राज्यांतली दारू नष्ट झाली आहे म्हणतां कीं काय? मुळींच नाहीं. दारूबंदीचा अर्थ उघडपणें दारू पिणें बंद झालें. पण चोरट्या आणि विषारी दारूचे पाट समाजाच्या सर्व तळांतून आजकाल झिरपूं लागले आहेत ही गोष्ट जगजाहीर आहे. चोरून दारू गाळण्याचा धंदा आज केवढ्या भयानक प्रमाणावर मुंबई राज्यांत चालू आहे हें सर्वांना माहीत आहे. आम्ही स्थानबद्धतेंत असतांना तुरुंगांतले पंचाहत्तर टक्के कैदी दारूबंदी कायद्याचा भंग करून तुरुंगांत आलेले आम्हांला आढळले. सारे तुरुंग आजकाल दारूबंदी कायद्याच्या गुन्हेगारांनीं भरून गेले आहेत. पोलिसांना तर दुसरा उद्योगच उरला नाहीं. चोर दरोडेखोर ह्यांना पकडण्याच्या ऐवजीं ते दारूबंदीचा कायदा मोडणाराच्या मागें हात धुवून लागले आहेत. दारूबंदीचा कायदा आल्यापासून कायदा मोडण्याची आणि गुंडगिरीची प्रवृत्ति समाजांत जास्तच बळावली आहे. सारांश, दारूबंदीमुळें समाजाची जी भयानक हानि झाली आहे त्याची अजून पुष्कळांना कल्पना नाहीं.

आतां दारूबंदीचा कायदा काढून टाकला तरी बेकायदा दारू गाळण्याचा चोरटा धंदा समाजांतून नष्ट होणें अशक्य आहे. दारूबंदीचा आपला हेका अतिरेकाला नेऊन मोरारजीनें मुंबई राज्याचें अनन्वित नुकसान केलें आहे. अजागळ लोकांना वाटतें कीं दारू बंद करून मोरारजींनीं समाजाची नीति सुधारण्याचा प्रयत्न केला आहे. पण हा निव्वळ भ्रम आहे. जुगार आणि वेश्याव्यवसाय ह्यांना सर्रास परवाना द्यायचा आणि नुसत्या दारूबंदीनें समाजाची नीति सुधारेल असें म्हणायचें ह्याला कांहीं अर्थ आहे काय? नाटकावर करमणुकीचा पस्तीस टक्के कर लादून मराठी रंगभूमीचा तर मोरारजींनीं अक्षरशः खूनच केलेला आहे. सारांश, मोरारजी हा जेवढा क्रूर, ढोंगी आणि खुनशी आहे, तेवढाच दुराग्रही, मूर्ख आणि अरसिकहि पण आहे. आतां मोरारजी स्वतः पैशाला शिवत नाहीं असें म्हणतात. नसेल शिवत. पण आमच्या कानांवर ज्या बातम्या आहेत त्या लक्षांत घेतल्या तर मोरारजी हे अगदींच धुतल्या तांदुळासारखे आहेत असें म्हणतां येणार नाहीं. मोरारजींचे चिरंजीव कांतिलाल म्हणून आहेत. त्यांचें वय तीस वर्षांचें आहे. असें असून ह्यांची पथारी चाळीस ते पन्नास लाखांची आहे असें म्हणतात. हें कसें काय झालें ह्याचें संशोधन करण्यासारखें आहे.

मुंबई सोडून मोरारजी जेव्हां दिल्लीला जावयाला निघाले तेव्हां त्यांचा मुंबईत फार मोठा सन्मान झाला आणि त्यांना निरोप देण्यासाठीं अश्रुपूर्ण नेत्रांनीं हजारों नागरिक स्टेशनावर गेले, असा प्रचार मुंबईतल्या बहुसंख्य काँग्रेसधार्जिण्या पत्रांनीं करून मोरारजी अजूनहि केवढे लोकप्रिय आहेत असें भासविण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यावर कोणीहि विश्वास ठेवण्याचें कारण नाहीं. मुंबई सोडण्यापूर्वी मोरारजींचा सन्मान काय झाला? तर मुंबईच्या शिकारपुरी सावकारांनीं आणि कांहीं गोमंतक संस्थांनीं त्यांचा सत्कार केला. वाहवा, काय पण मोरारजींच्या लोकप्रियतेचा पुरावा! ह्या दोन्हीहि ठिकाणीं मोरारजींनीं मोठीं मासलेवाईक भाषणें केलीं. सावकारांना त्यांनीं उपदेश केला कीं, "ज्यांना तुम्ही कर्ज देतां त्यांच्याशीं माणुसकीनें वागा. त्यांनीं आपल्या अडी-अडचणींतून बाहेर यावें, त्यांना आत्महत्या करणें भाग पडूं नये, अशा रीतीनें तुम्ही त्यांच्याशीं वागा." मोरारजींनीं सावकारांना माणुसकीनें वागावयास सांगणें म्हणजे वाघानें लांडग्याला 'दयाळू हो' असें सांगण्यापैकींच आहे. गोमंतकीय लोकांना ते म्हणाले, "अहिंसेवर श्रद्धा ठेवा. आज ना उद्यां गोमंतक स्वतंत्र झाल्यावांचून राहणार नाहीं."

गेल्या नऊ वर्षांत सव्वातीनशें माणसें ठार मारणाऱ्या मोरारजींनीं 'अहिंसेवर श्रद्धा ठेवा' असा दुसऱ्यांना उपदेश करावा ह्यापेक्षां अहिंसेची अधिक क्रूर विटंबना कोणी करूं शकेल काय?

'सेंट्रल स्टेशना'वर मोरारजींना निरोप देतांना सदोबा पाटील म्हणाले, "मुरारजींच्या वियोगामुळें आज मुंबापुरी दुःखी झाली आहे." मोरारजी सद्गदित आवाजानें म्हणाले, "तुमचें हें अमर्याद प्रेम पाहून माझें अंतःकरण दाटून आलें आहे. तुमचें प्रेम मी कदापि विसरणार नाहीं. तुमच्या सेवेची मला अधिकाधिक संधि मिळावी ही परमेश्वराजवळ माझी प्रार्थना आहे." गाडी सुटली तेव्हां मोरारजींच्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलें. लोक ओरडून म्हणाले, "आवजो आवजो!" हें वर्णन वाचून आम्हांला हसतां हसतां पुरेवाट झाली. लुच्चा लेकाचा सदोबा. म्हणतो काय तर मोरारजीच्या वियोगामुळें मुंबापुरी दुःखी झाली. मोरारजी मुंबईतून गेले ह्याबद्दल कुत्रें देखील रडणार नाहीं अशी खरी परिस्थिति आहे. मग माणसांची गोष्ट कशाला? मोरारजी म्हणाले, "मला मुंबईची सेवा करावयाची आणखी संधि मिळावी!" मुंबईची सेवा करणें म्हणजे मुंबईतल्या निरपराधी नागरिकांना गोळ्या घालून ठार करणें. असल्या सेवेची संधि मोरारजींना हवी होय? अन् लोक म्हणाले, "आवजो!" कशाला आवजो? गोळ्या मारावयाला? मोरारजी हे लोकप्रिय आहेत असें भासविण्याचा काँग्रेस वृत्तपत्रांनीं कितीहि प्रयत्न केला तरी त्यानें कोणीहि फसूं शकणार नाहीं, मोरारजीएवढा तिरस्कृत आणि द्विष्ट माणूस आज उभ्या मुंबई राज्यांत नाहीं ही अगदीं खरी गोष्ट आहे.

आपल्या क्रूर, खुनी आणि जुलमी राजवटीनें ज्या मोरारजींनीं मुंबई राज्यांतील जनतेला नऊ वर्षें नाना तऱ्हेनें 'त्राहि भगवन्' करून सोडलें ते मोरारजी आतां मुंबई राज्यांतून चालते झाले ह्याबद्दल मुंबई राज्यांतील तमाम जनता आनंदानें 'मुक्तिदिन' साजरा केल्यावांचून राहणार नाहीं. एवढीं अनन्वित पापें करणाऱ्या माणसाला पंडित नेहरूंच्या राज्यांत शासन न होतां मध्यवर्ती मंत्रिमंडळांत सन्मानपूर्वक जागा मिळते हें पाहिल्यानंतर भारताच्या भवितव्याबद्दल मनाला साहजिकच चिंता वाटूं लागते. वस्तुतः नऊ वर्षांच्या कारकीर्दीत मोरारजींनीं जनतेविरुद्ध केलेल्या भीषण गुन्ह्यांची जाहीर न्यायासनासमोर चौकशीच व्हावयाला पाहिजे होती. पण सध्यांच्या परिस्थितींत ती होईल असें

दिसत नाहीं. परमेश्वराची काय योजना आहे कांहीं कळत नाहीं. पण सव्वातीनशें माणसांची हत्या करणाऱ्या ह्या नरराक्षसाच्या आयुष्याची अखेर तो सुखानें होऊं देईल असें वाटत नाहीं. ईश्वरी न्याय म्हणून कांहीं ह्या जगांत आहे कीं नाहीं? १९४७ सालीं मोरारजी गृहमंत्री असतां अमळनेरच्या आठ कामगारांना गोळ्या मारून ठार करण्यांत आलें. त्यावेळीं मुंबई कायदेमंडळांत भाषण करतांना कॉ. एस. ए. डांगे मोरारजींना उद्देशून म्हणाले, "Even Dictators have to die!" (हुकूमशहांनाहि एक दिवस मरायचें आहे.) त्याच स्वरांत आम्ही मोरारजींना बजावून सांगतों कीं, "तुमच्या सर्व कृतकर्मांचा जाब एक दिवस तुम्हांला द्यावा लागेल. याद राखा."

१८-११-५६

# हुतात्म्यांचें बलिदान व्यर्थ न होवो!

'संयुक्त महाराष्ट्रा'साठीं गेल्या वर्षी ह्याच सप्ताहांत ज्या हुतात्म्यांनीं आपल्या प्राणांचें बलिदान केलें, त्यांचें स्मरण करतांना आज आमचें हृदय शतशः विदीर्ण होतें आहे. आमच्या आंतड्यांना अक्षरशः पीळ पडतो आहे. इतकें दुःख आम्हांला आमच्या आयुष्यांत कधीं झालें नव्हतें. निरपराधी प्रजाजनांना गोळ्या घालून ठार मारण्याचा परिपाठ फक्त इंग्रजांच्या राज्यांत होता, अशी आमची समजूत होती. लोकांच्या रक्ताचे सडे रस्त्यावर सांडण्याचें राक्षसकर्म केवळ जुलमी राजाच्या राजवटीमध्येंच घडत असे अशी सर्वसामान्य जनाची कल्पना होती. पण अहिंसेची जपमाळ हातांत घेऊन भगवान् बुद्धाचें आणि महात्मा गांधींचें नाम-स्मरण करीत बसलेले आणि पंचशीलेचा नि विश्वशांतीचा संदेश उठल्या बसल्या जगाला देणारे कॉंग्रेसचे राज्यकर्ते नादिरशहाचा किंवा तैमुरलंगाचा अंगांत संचार व्हावा तसे एका आठवड्यांत पाऊणशें माणसें ठार मारतील आणि तीनशें माणसें जायबंदी करतील असें स्वप्नांत तरी कोणाला कधीं वाटलें असेल काय? लोक-शाहीची नौबद साऱ्या जगांत वाजवीत बसलेल्या भारतासारख्या महान् प्रजासत्ताक राज्यांत 'जालियनवाला बाग'ची राजरोसपणें रंगीत तालीम होईल ह्याची कल्पना तरी कोणाला होती का? निदान आम्हांला तरी नव्हती. म्हणून २१ नोव्हेंबर १९५५ रोजीं जेव्हां स्वतंत्र मुंबई राज्याचा निषेध करण्यासाठीं मुंबईच्या कामगारांनीं एकजुटीनें संप पुकारला आणि संयुक्तमहाराष्ट्रवादी सत्याग्रह्यांचा शांततामय मोर्चा कायदेमंडळाकडे जाऊं लागला, तेव्हां फ्लोरा फाऊंटनच्या मैदानांत जमलेल्या गर्दीवर पोलिसांनीं बेफाम गोळीबार करून जेव्हां चौदा-पंधरा माणसें जवळ जवळ आमच्या डोळ्यासमोर ठार मारलीं, तेव्हां आमच्या डोक्यांत प्रथम उजेड पडला कीं कॉंग्रेसचें हें जें राज्य आहे, तें माणसांचें नसून राक्षसांचें राज्य आहे.

एकादा माणूस दुसऱ्याला ठार मारतो आहे, किंवा कोणाच्या घरादाराला अथवा सार्वजनिक वाहनाला तो आग लावतो आहे असें आढळून आल्यास

त्याच्यावर गोळी झाडणें समर्थनीय ठरेल. ती गोळी झाडतांना देखील त्याचा प्राण न जाईल पण तो करीत असलेल्या गुन्ह्याचा प्रतिबंध होईल, ह्याची जोखीम गोळी झाडणारावर असते. लोकशाही राष्ट्रांत एकाद्याला देहांताचें शासन देण्याचा अधिकार न्यायासनालाच असतो. राज्यकारभार करणाऱ्या अधिकाऱ्यांना किंवा त्यांच्या नोकरांना तें शासन वापरतां येत नाहीं. २१ नोव्हेंबर रोजीं मोरारजींच्या पोलिसांनीं ज्यांच्यावर गोळीबार केला ते लोक कोणताहि गंभीर स्वरूपाचा गुन्हा करीत नव्हते. ते नुसते गर्दी करून उभे होते आणि 'संयुक्त महाराष्ट्रा'चा जयजयकार करीत होते. त्यांच्या गर्दीमुळें आणि आरडाओरडीमुळें कोणाच्याहि प्राणाला किंवा मालमत्तेला धोका उत्पन्न झालेला नव्हता. गोळीबारांत जीं माणसें मेलीं त्यांचें निरपराधित्व तर सूर्यप्रकाशासारखें स्वच्छ होतें. ते आपापले नैमित्तिक व्यवसाय नेहमींप्रमाणें करणारे सामान्य नागरिक होते. कॉरोनरच्या कोर्टानें ह्या गोळीबारांनीं मेलेल्यांची जी चौकशी झाली त्यावेळीं पोलिसांनीं केलेला सदर गोळीबार असमर्थनीय होता असाच आपला निर्णय दिला. त्या दिवशींच्या संयुक्त महाराष्ट्राच्या सत्याग्रहाचें आणि हरताळाचें विराट् स्वरूप पाहून भांबावून गेलेल्या, चिडलेल्या आणि संतापलेल्या मोरारजींनीं केवळ सूड घेण्यासाठीं गोळीबार करण्याचा आपल्या पोलिसांना हुकूम दिला होता ही गोष्ट त्यामुळें आपोआपच स्पष्ट झाली. तथापि, 'संयुक्त महाराष्ट्रा'चें जें भयानक हत्याकांड पुढें आठ आठवड्यांनीं मोरारजी करणार होते, त्याची ही एक नुसती 'झलक' होती ही गोष्ट त्यावेळीं कोणाच्याहि ध्यानांत आली नाहीं.

कॉंग्रेस सरकारच्या ह्या दडपशाहीमुळें 'संयुक्त महाराष्ट्राची' चळवळ तर थांबली नाहींच, पण महापुराच्या वेगानें आणि विस्तारानें ती धावूं लागली. त्या महापुरांत मुंबईचें स्वतंत्र राज्य कोठल्या कोठें वाहून गेलें. त्यामुळें कॉंग्रेस नेत्यांचे डोळे पांढरे झाले. त्यांच्या संतापाला पारावार उरला नाहीं. एकाद्या उन्मत्त गेंड्या-प्रमाणें रागानें ते आंधळे झाले. १६ जानेवारी १९५६ ह्या दिवशीं पहाटे तीन वाजल्यापासून सकाळीं सहा-सात वाजेपर्यंत 'संयुक्त महाराष्ट्रा'च्या पुढाऱ्यांची आणि चारशें कार्यकर्त्यांची अचानकपणें धरपकड करण्यांत आली. कॉंग्रेस सरकारच्या ह्या दडपशाहीचा निषेध करण्यासाठीं सारी मुंबई संपावर गेली. त्याच रात्रीं साडे-आठ वाजतां मुंबई केंद्रशासित करण्याची आणि बेळगांव-कारवार महाराष्ट्रामधून वगळण्याची अमंगळ घोषणा पंडित नेहरूंनीं नभोवाणीवरून केली. ह्या घोषणेनें

संयुक्तमहाराष्ट्रवादी जनतेच्या अगदीं काळजावरच वार केला. घायाळ झालेल्या मराठी जनतेचा चेंदामेंदा करावयाची ही फार उत्तम संधि आहे असा विचार करून मोरारजींनीं ठाकुरद्वारच्या रस्त्यावर बंडू गोखल्याचा बळी घेऊन आपल्या राक्षसी हत्याकांडाचा मुहूर्त केला.

त्याच दिवशीं बेळगांवांत पोलिसांनीं चार लोकांना ठार मारून रक्ताचीं कारंजीं उडविलीं. त्यानंतर लागोपाठ तीनचार दिवस मुंबईत आणि महाराष्ट्रांत मोरारजींनीं मराठी माणसांची जी भीषण कत्तल केली तिचें वर्णन करावयाला आमच्याजवळ शब्द नाहींत. मोरारजींनीं पोलीस अधिकाऱ्यांना मुळीं सरीस हुकूमच देऊन टाकला कीं 'दिसला माणूस कीं गोळी मारा' आणि 'अशी गोळी मारा कीं त्याला ठार करा!' मुख्य प्रधानानें असा परवाना दिल्यानंतर मोरारजींच्या खास मर्जीतल्या कांहीं पोलीस अधिकाऱ्यांनीं आपल्या राक्षसी अत्याचारांची पराकाष्ठा करावी ह्यांत आश्चर्य तें काय? कोणावर गोळी घालावी आणि कोणावर घालूं नये ह्याचा मुळीं त्यांनीं धरबंधच ठेवला नाहीं. माणूस रस्त्यावर आहे का घरांत बसला आहे हें त्यांनीं पाहिलें नाहीं. स्त्रियांत आणि पुरुषांत, अर्भकांत आणि वृद्धांमध्यें त्यांनीं भेद केला नाहीं. दादरचा नरेंद्र प्रधान पाहुण्याला पोहोंचवायला स्टेशनावर चालला होता. एका पोलीस अधिकाऱ्यानें नेम धरून त्याच्या मेंदूच्या चिंधड्या उडवल्या. बालण्णा कामाठी तंबाखू खात दारांत बसला होता. त्याची पोलीस इन्स्पेक्टरनें कवटी उडविली. यशवंत भगत आपल्या घराच्या गच्चीवर बसला होता. त्याच्या पोटांतून आरपार गोळी जाऊन तो मरण पावला. अठरा वर्षांचा विष्णु बाने. आईबापांचा एकुलता एक मुलगा. त्याच्या नाकांतून गोळी शिरून डोक्यांतून बाहेर पडली. सोळा वर्षांचा एडवीन साळवी. आपल्या घरासमोर रस्त्यावर खेळत होता. त्याच्या छातींत गोळी लागून तो मेला. बाबा सावंत तर आपल्या चाळीच्या व्हरांड्यांत बिचारा झोपला होता. झोपेंतच गोळी लागून तो मेला. नऊ वर्षांचा सुभाष मोरे आपल्या घरांत खेळत होता. दोनशें यार्डांवरून एका होमगार्डनें झाडलेली गोळी घराच्या पत्र्याच्या दोन भिंतींना भोक पाडून त्याच्या पानथरींत घुसली आणि तो तेथल्या तेथें मरून पडला. चौदा वर्षांचा गोरखनाथ आपल्या आईला जेवण पोहोंचवावयाला निघाला असतां छातींत गोळी लागून मेला. नऊ वर्षांचा महमद अल्ली घरांत जेवत होता. त्याची आई त्याच्या धाकट्या भावाला पाजीत होती. इतक्यांत सूं सूं करीत एक गोळी घरांत शिरली आणि छोट्या महंमदच्या मस्तकांत शिरून

तिनें त्याचा आईच्या देखत बळी घेतला. अशीं किती किती हृदयद्रावक उदाहरणें सांगावींत!

गोळ्या लागून माणसें रस्त्यावर जखमी होऊन किंवा मरून पडलीं. पण पोलिसांनीं त्यांना उचलूं सुद्धां दिलें नाहीं. जे उचलायला गेले त्यांना पकडून त्यांनीं घरफोडीच्या आरोपावरून तुरुंगांत पाठविलें, नाहींतर गोळ्या घालून मारलें. वासुदेव मांजरेकर हे रस्त्यावरचें असेंच एक प्रेत उचलावयाला गेले असतां, त्यांच्या पाठीवर गोळी मारून पोलीसांनीं त्यांना तेथल्या तेथें ठार केलें! आईच्या कडेवर बसलेलीं तीन-तीन महिन्यांचीं अर्भकें गोळ्या लागून जखमी व्हावींत, नऊ-नऊ दहा दहा वर्षांचा मुलांच्या मेंदूच्या किंवा आंतड्याच्या चिंधड्या व्हाव्यात ह्यापेक्षां मोरारजींच्या राक्षसी राजवटीचा अधिक भयानक पुरावा कोणता द्यावा? ऐशीं टक्के लोकांना कमरेच्या वर गोळ्या लागल्या आहेत ह्यावरून ठार मारण्यासाठींच गोळ्या झाडा हा मोरारजींनीं पोलिसांना दिलेला आदेश त्यांनीं किती तंतोतंत पाळला आहे हें दिसून येतें. चिंतामणराव देशमुखांनीं लोकसभेंत मोरारजींच्या अमानुषपणाचा जो एक भीषण प्रकार सांगितला तो तर ऐकवत सुद्धां नाहीं. कामगारांच्या चाळींत अश्रुधूर सोडून आंत राहणाऱ्या स्त्रीपुरुषांना बाहेर रस्त्यावर काढण्यांत आलें. बाहेर पोलीस बंदुका घेऊन उभे होतेच. चाळींतली मंडळी बाहेर येतांच त्यांनीं धडाधड गोळ्या मारल्या आणि रस्त्यावर रक्तामांसाचा चिखल केला.

संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांची ही भेसूर कत्तल करण्याच्या कामावर मोरारजींनीं डेप्युटी पोलीस कमिशनर ई. एस. मोडक आणि जॉनक्रास ह्या दोघा हिंस्र नरपशूंना मुद्दाम नेमलें होतें. मुंबईत झालेल्या रक्तपाताला मुख्यत्वेंकरून हेच दोघे कारणीभूत आहेत. कायद्याचें आणि सुव्यवस्थेचें वातावरण प्रस्थापित व्हावें म्हणून कांहीं काँग्रेस सरकारनें हा गोळीबार केलेला नाहीं. तर संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांवर सूड उगविण्यासाठीं आणि संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचीं पाळेंमुळें खणून काढण्यासाठीं म्हणून मोरारजींच्या काँग्रेस सरकारनें ही मराठी जनतेची कसाई कत्तल केली. मोरारजी तर महाराष्ट्राचा उघड उघड दुष्मनच होता. पण काँग्रेसश्रेष्ठींचीं मनें महाराष्ट्रद्वेषानें सडलेलीं आहेत असें भर लोकसभेंत त्यांच्या तोंडावर चिंतामणराव देशमुखांनीं त्यांना सांगितलें. गेल्या वर्षाच्या जानेवारी महिन्यांत मुंबईमध्यें आणि महाराष्ट्रामध्यें मोरारजींनीं जो हाहाःकार केला तो पाहून किंवा ऐकून ज्याच्या अंगाचा

क्रोधानें भडका उडणार नाहीं असा माणूस विरळा! मोरारजींच्या ह्या 'नरमेध-यज्ञा'चा निषेध करण्यासाठीं गेल्या वर्षी 'नवयुग'चा जो मुंबई सरकारनें जप्त केला होता त्या अंकांत आम्ही मोरारजींच्या खुनी पोलीस अधिकाऱ्यांना तळमळून शाप दिले होते कीं त्यांचीं बंदूक झाडणारीं बोटें महारोगानें झडोत आणि त्यांचीं मुलेंबाळें त्यांच्या डोळ्यांसमोर तडफडून मरोत! कित्येकांनीं त्याबद्दल आम्हांला ठपका दिला. कित्येक म्हणाले कीं असे शाप देणें भारतीय संस्कृतीला धरून नाहीं. म्हणून त्यांना हें सांगावयाला हवें कीं राजा दशरथानें विहिरींत पाणी भरीत असलेल्या श्रावणाला हरिण समजून मारलें, तर त्याच्या वृद्ध आई-बापांनीं पुत्रदुःखानें प्राण सोडतांना, "राजा, तूं देखील पुत्रशोकानें असाच मरशील!" असा दशरथाला शाप दिला. आणि येथें तर पोलीस अधिकाऱ्यांनीं जाणून बुजून आणि नेम धरून धरून नऊ नऊ वर्षांच्या मुलांच्या कवट्या उडवल्या म्हणून 'त्यांचें निसंतान होवो!' असा शाप जर आमच्या व्याकुळ अंतःकरणांतून आपोआप उमटला, तर त्याबद्दल कोणींहि आम्हांला दोष म्हणून कां द्यावा? गोळीबारामध्यें मेलेलीं मुलें हीं आपलीं स्वतःचीं मुलें आहेत ही भावना जे मनांत धरतील त्यांच्या तोंडून आमच्यापेक्षां निराळी शापवाणी बाहेर पडणार नाहीं.

मोरारजी हा तर बोलून चालून नरराक्षस होय! गेल्या नऊ वर्षांत त्यानें एक हजार एकशेंपंचायशीं वेळां गोळीबार करून सव्वातीनशें माणसें ठार केलीं आणि हजारों माणसें जायबंद केलीं. पण अशा नरपशूला पंडित नेहरूंच्या राज्यांत सन्मानाचें स्थान मिळतें, एवढेंच नव्हे तर 'मोरारजी हा राष्ट्राचा अन-मोल ठेवा आहे' असें म्हणून पंडित नेहरू ह्या नराधमाला डोक्यावर घेऊन थयथया नाचतात ह्याचें आम्हांला सर्वांत दुःख होतें. मुंबईत एवढा 'जालियन-वाला बाग' होऊनहि नेहरूंनीं त्याबद्दल निषेधाचें किंवा नापसंतीचें एक अक्षर मुद्धां तोंडांतून बाहेर काढूं नये किंवा गोळीबारांत जे निरपराधी नागरिक मेले त्यांच्या नातेवाईकांना सहानुभूतीचा किंवा सांत्वनाचा एक शब्द सुद्धां उच्चारूं नये ह्याचा अर्थ काय आहे? उलट नेहरू म्हणाले, "मुंबईत नुसत्या बंदुका वापरल्या हें नशिब समजा. इतर देशांत असें कांहीं घडलें असतें तर रणगाडेच आणलें असते!" म्हणजे मोरारजींनीं केलेली कत्तल ही फार कमी झाली, इतर देशांतल्या सरकारनें ह्याच्यापेक्षांहि भयंकर कत्तल केली असती अशी भाषा पंडित जवाहर-लालनीं आपल्या तोंडून काढावी हें कोणाला खरें तरी वाटेल काय? पंडितजी

मुंबईला आले. पण गोळीबारांत जखमी झालेल्या किंवा मरण पावलेल्या एकाहि माणसाच्या घरांत ते गेले नाहींत आणि त्यांच्या दुःखी नातेवाईकांच्या पाठीवरून प्रेमाचा हात त्यांनीं फिरविला नाहीं. पण निरपराधी जनतेची कत्तल करणाऱ्या पोलिसांच्या 'अलौकिक कर्तव्यनिष्ठेबद्दल' मात्र पंडितजी आमच्या मनांतून साफ साफ उतरले आणि आम्ही स्वतःशीं उद्गारलों कीं हा माणूस कोणाला कितीहि मोठा वाटत असला तरी त्याचें अंतःकरण अत्यंत लहान आहे ह्याविषयीं तिळमात्र शंका नाहीं.

म्हणून आम्ही म्हणतो कीं आजचे राज्यकर्ते हे नुसतेच महाराष्ट्रद्वेष्टे नव्हते तर महाराष्ट्रावर सूड उगवण्याच्याच बुद्धीनें राज्य करताहेत. ह्याची सूडबुद्धि एवढी राक्षसी आहे कीं आमच्यावर सूड उगवण्यासाठीं ह्यांनीं गुजरातचा सुद्धां बळी घेतला. आमचीं एकशेंपांच माणसें ठार मारून, शेकडों माणसें जखमी करून, हजारों माणसें तुरुंगांत डांबून, अन् आमच्या चारित्र्याला डांबर फासून शेवटीं ह्यांनीं आम्हांला नेस्तनाबूद करण्यासाठीं जें महाभयंकर महाद्विभाषिक राज्य आमच्यावर लादलें हा ह्यांनीं आमच्यावर सूड घेतला आहे. आमचा इतिहास, आमची परंपरा आणि आमचा स्वाभिमान ह्यांना स्मरून ह्या सूडाला आम्हीं येत्या निवडणुकींत जर प्रचंड उत्तर दिलें नाहीं तर भारताच्या इतिहासांतून महाराष्ट्र नामशेष झाल्याखेरीज रहाणार नाहीं. काँग्रेसच्या उमेदवाराला मत म्हणजे मराठी रक्तानें माखलेल्या हातांत मत टाकण्यासारखें आहे. ही खूणगांठ प्रत्येक पाक मराठ्यानें आपल्या मनाशीं बांधून ठेवावी. महाराष्ट्र कालत्रयींहि काँग्रेसला क्षमा करणार नाहीं. तो रामशास्त्र्यांच्या वाणीनें काँग्रेसला बजावील कीं, "देहांत प्रायश्चित्ताखेरीज तुला प्रायश्चित्तच नाहीं!" आगामी निवडणुकांत जर मराठी मुलुखामधून काँग्रेस नष्ट झाली नाहीं तर 'संयुक्त महाराष्ट्रा'साठीं हुतात्म्यांनीं सांडलेलें रक्त आणि केलेलें बलिदान मराठी जनतेनें व्यर्थ घालविलें असाच इतिहास तिला दोष देईल.

२०-१-५७

# महाराष्ट्राच्या शिवशक्तीला वंदन

काँग्रेसच्या राक्षसांनीं महाराष्ट्रावर केलेल्या अनंत अन्यायांचें आणि अत्याचारांचें निर्दाळण करण्यासाठीं जनतेमध्यें जागृत झालेल्या शिवशक्तीला आमचें वंदन असो. ह्या शिवशक्तीचा साक्षात्कार गेल्या दीड वर्षांपासून सर्वांना होतोच आहे. पण तिचें देदीप्यमान स्वरूप दोन मार्चपासून जें प्रकाशूं लागलें, तें अकरा मार्चला संपूर्ण अंशानें प्रकट झालेलें बघण्याचें भाग्य महाराष्ट्राला लाभलें. धन्य महाराष्ट्र आणि धन्य महाराष्ट्रांतील जनता. कोणाकोणाचें किती किती म्हणून अभिनंदन करावें? कोणाकोणाला शाबासक्या द्याव्यात अन् कोणाकोणाला डोक्यावर घेऊन थयथय नाचावें? सर्वांच्या आधीं आम्हांला वाटतें काँग्रेसचें अभिनंदन करावें. कारण, महाराष्ट्रावर त्यांनीं हा अघोर अन्याय केला नसता, तर अनेक वर्षांपासून निद्रित असलेली महाराष्ट्रांतली ही शिवशक्ति मुळीं जागृत झाली नसती. म्हणून त्या दृष्टीनें महाराष्ट्रावर काँग्रेसनें हे उपकारच केलें आहेत असें म्हणावें लागेल.

संयुक्त महाराष्ट्राच्या विजयाला यशवंतराव चव्हाणांनीं अगदीं प्रारंभींच अपशकुन केला खरा. वस्तुतः ते ज्या मतदार संघांतून उभे होते तेथील बहुसंख्य जनता ही कट्टर संयुक्तमहाराष्ट्रवादी होती. म्हणून त्या संघामधून ते निवडून येणें सर्वथैव अशक्य होतें. पण यशवंतराव हे मुंबई राज्याचे मुख्य प्रधान असल्यामुळें त्यांना आपल्या सत्तेचा आणि अधिकाराचा जो प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष फायदा मिळाला त्याच्याच जोरावर ते थोड्याशा मताधिक्यानें निवडून येऊं शकले. त्याच मतदारसंघामधल्या लोकसभेच्या काँग्रेस उमेदवाराचा समितीच्या उमेदवारानें पराभव केला हें पाहिल्यानंतर यशवंतराव चव्हाणांचा विजय हा शंकास्पद वाटूं लागतो. त्याखेरीज फलटणच्या 'मनमोहन' राजवाड्यामधून त्यांच्या बरोबरच महाराष्ट्रद्रोहाची घोषणा करणारे त्यांचे जे दोघे साथीदार मालोजीराव नाईक-निंबाळकर आणि गणपतराव तपासे ते प्रचंड मतांनीं पराभूत झाले. सातारा जिल्ह्यांतील ज्या मराठी मतदारांनीं या दोघां काँग्रेसमंत्र्यांना त्यांच्या

महाराष्ट्रद्रोहाचें जबरदस्त शासन दिलें, ते मराठी मतदार त्या महाराष्ट्रद्रोही त्रिकूटाच्या म्होरक्या जो यशवंतराव चव्हाण त्याला निवडून देतील हें कधीं तरी शक्य आहे काय? म्हणून यशवंतरावांच्या विजयाच्या पाठीमागें कुठल्यातरी 'अदृश्य शक्ती'नें कांहींतरी वेगळ्याच कारवाया केलेल्या असाव्यात असें वाटूं लागतें.

तथापि, यशवंतरावांना मिळालेल्या यशाचा महाराष्ट्रावर उलटा परिणाम झाला. दुःखानें आणि निराशेनें महाराष्ट्रांतली जनशक्ति अशी खवळून उठली कीं त्यानंतर जो कॉंग्रेसचा उमेदवार समोर दिसेल त्याचा स्वाहाकार करण्याचा तिनें सपाटा सुरू केला. नाईक-निंबाळकर अन् तपासे ह्या दोन मंत्र्यांप्रमाणेंच आणखी दोन मंत्र्यांचे तिनें बळीं घेतले. पुण्याचे 'बू' साठे तिनें 'भू'सपाट केले, तर भिवंडीच्या फकीचा तिनें बिसमिल्ला करून टाकला. मध्यवर्ती सरकारचे दोन श्रेष्ठ मंत्री हरिभाऊ पाटसकर अन् जगन्नाथराव भोसले ह्यांचा पराभव होईल असें स्वप्नांत सुद्धां कुणाला वाटलें नाहीं. त्यांत, पाटसकरांचा पराभव नौशीर भरूचासारख्या मुंबईच्या पारश्यानें करावा नि जगन्नाथरावांचा पराभव प्रेमजी अशर ह्या गुजराती गृहस्थानें करावा हा मराठी जनतेच्या संयुक्तमहाराष्ट्रनिष्ठेचा एक अद्भुत चमत्कारच समजला पाहिजे.

वीस-वीस पंचवीस-पंचवीस वर्षें ज्यांच्याकडे कॉंग्रेसच्या नेतृत्वाचें सालोसाल वतन चालत आलें होतें अशा मोठमोठ्या रथीमहारथींना संयुक्त महाराष्ट्रवादी मतदारांनीं अक्षरशः कापून काढलें. पुण्यांत काका गाडगीळ अन् पोपटलाल कोलमडले. रत्नागिरींत मोरोपंत जोशी अन् पी. के. सावंत आदळले. नाशिकांत गोविंदराव देशपांडे पालथे पडले. कऱ्हाडांत गणपतराव अळतेकर नि स्वामी रामानंद भारती उताणे झाले. नगरांत कानवडे पाटील न् बोगावतांचे बारा वाजले. तर सोलापुरांत तुळसीदास जाधवाचे तीन तेरा झाले. अशी साऱ्या महाराष्ट्रांत कॉंग्रेसवाल्यांची एकजात कत्तल झाली. दिशादिशांतून संयुक्त महाराष्ट्राच्या विजयाचे चौघडे आणि नौबती वाजूं लागल्या. आणि ह्या विजयानंदाच्या महोत्सवमंदिरावर मुंबईच्या मराठी जनतेनें तर सुवर्णकळसच चढवला.

मुंबईमधल्या अठ्ठावीसच्या अठ्ठावीस जागा जिंकण्याची सदोबा पाटलांनीं प्रतिज्ञा केली होती. ती संयुक्त महाराष्ट्र समितीनें सपशेल धुळीला मिळवून सदोबांचें अक्षरशः नाकच कापलें. लोकसभेच्या चार जागांपैकीं दोन जागा समितीनें मिळवल्या. एवढेंच नव्हे तर कॉंग्रेसपेक्षां एकलक्ष बावीस हजार मतें जास्त

मिळविलीं कॉंग्रेसला लोकसभेच्या दोन जागा अन् सात लक्ष नऊ हजार मतें मिळाळीं तर समितीला दोन जागा अन् आठ लक्ष एकतीस हजार मतें मिळालीं. आणि डांगे ह्या समितीच्या लोकसभेच्या उमेदवारानें तर साडेतीन लाख मतें मिळवून निवडणुकीचा अखिलभारतीय उच्चांक मोडला. विधानसभेच्या मुंबईमधील चोवीस जागांपैकीं कॉंग्रेसला जरी तेरा जागा मिळाल्या असल्या तरी मतें पांच लक्ष चौऱ्याहत्तर हजार मिळालीं पण समितीला अकरा जागा मिळूनसुद्धां सहा लक्ष पंचवीस हजार मतें म्हणजे कॉंग्रेसपेक्षां एकावन्न हजार मतें जास्त मिळालीं.

मुंबई ही महाराष्ट्राची आहे कीं नाहीं ह्या प्रश्नावर लोकमत (Referendum) घ्या असें सदोबा पाटलांचें पुष्कळ दिवसांपासूनचें आव्हान आहे. मुंबईमध्यें मराठी लोकसंख्या ही ४४ टक्के आहे असें राज्यपुनर्रचना समितीनें खानेसुमारीच्या आंकड्यांच्या आधारानें म्हटलेलें आहे. किंबहुना मुंबईमधली मराठी लोकांची संख्या ही पन्नास टक्क्यांहून कमी आहे असें दाखवण्याचें कारस्थान सत्ताधारी कॉंग्रेस सरकारनें पुष्कळ वर्षांपासून रचलेलें आहे. पण कॉंग्रेसवाल्यांचा हा दावा किती धादांत खोटा आहे हें मुंबईमधल्या निवडणुकीच्या निकालानें आतां ठणठणीतपणें सिद्ध केलें आहे. मुंबईमधलें मराठी लोकमत किंवा संयुक्त महाराष्ट्राच्या बाजूचें जनमत शेकडा पन्नास टक्क्यांहून अधिक आहे. एवढेंच नव्हे, तर मुंबईचा अंतर्भाव संयुक्त महाराष्ट्रामध्च्यें व्हावयाला पाहिजे असा मुंबईमधल्या मतदारांनीं बहुमतानें कौल दिलेला आहे.

महाराष्ट्रांत कॉंग्रेसला विधानसभेच्या तेहतीस जागा आणि एकवीस लाख एकूणनव्वद हजार मतें मिळालीं तर समितीला शंभर जागा आणि एकूणतीस लाख ऐंशीं हजार मतें मिळालीं. त्याचप्रमाणें महाराष्ट्रांत कॉंग्रेसला लोकसभेच्या अवघ्या दोन जागा आणि एकवीस लाख मतें मिळालीं तर समितीला वीस जागा आणि एकतीस लाख मतें मिळालीं. सारांश, मुंबईत आणि महाराष्ट्रामध्यें मिळून जर मतांचे आंकडे काढले तर विधानसभेच्या निवडणुकींत कॉंग्रेसपेक्षां समितीला पासष्ट जागा जास्त आणि नऊ लाख मतें अधिक मिळालीं असून लोकसभेच्या निवडणुकींत समितीला कॉंग्रेसपेक्षां अठरा जागा अधिक आणि पावणेबारा लाख मतें जास्त मिळालीं आहेत. म्हणजे द्विभाषिक राज्याच्या प्रश्नावर मुंबईमधल्या आणि महाराष्ट्रामधल्या जनतेनें कॉंग्रेसचा प्रचंड पराभव केलेला आहे.

तथापि, ह्या पराभवाचा बोध काँग्रेसवाल्यांना अजून होत नाहीं हें मोठें आश्चर्य आहे. पुण्यांत काका गाडगिळांचा सपशेल पराभव व्हावा ही एकच घटना केवढी महत्त्वपूर्ण आहे! एवढेंच नव्हे तर पुण्यांत एकहि काँग्रेसचा उमेदवार निवडून येऊं शकला नाहीं. काका गाडगीळ पडल्याबद्दल 'लोकमान्य'कार पांडोबा गाडगिळांना फार वाईट वाटलें. ते म्हणाले, "चाळीस वर्षांच्या लोकसेवेची परिणति अशी व्हावी ह्याचा खेद होतो." म्हणजे काकांच्या पराभवाचें खापर पांडोबांनीं जनतेच्याच डोक्यावर फोडलें आहे. काकांनीं चाळीस वर्षें जनतेची निरपेक्ष आणि निरलस सेवा केली असें मानलें, तरी एवढी सेवा केल्यानंतर चाळिसाव्या किंवा एकेचाळिसाव्या वर्षी जर त्यांनीं जनतेशीं द्रोह केला तर जनतेनें त्या द्रोहाकडे कानाडोळा करून काकांना पाहिल्यासारखेंच डोक्यावर घेऊन नाचावें असें पांडोबांचें म्हणणें आहे कीं काय? चाळीस वर्षें लोकांची सेवा करून ज्याला लोकांचा आत्मा उमगला नाहीं आणि लोकांच्या भावना समजल्या नाहींत तो लोकसेवेच्या पवित्र क्षेत्रांत राहावयास नालायक आहे असाच ह्याचा अर्थ आहे. द्विभाषिकवादी काँग्रेस आणि संयुक्तमहाराष्ट्रवादी जनता ह्या दोन परस्परविरोधी बाजूंचा अशक्य समन्वय घडवून आणण्याचा भंपकराव काकांनीं जो व्रात्य प्रयत्न केला, त्यामुळें कापलेल्या फळीवर बसून मधली खुंटी उपटण्याचा प्रयत्न करणाऱ्या उपद्यापी माकडाप्रमाणें त्यांची स्थिति झाली, दुसरें काय?

मुंबईमध्यें बहुसंख्य मतदारांनीं सदोबा पाटलांच्या तोंडाला डांबर फासलें तरी ती कोडगी 'स्वारी' संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या नांवानें अजून आपलीं बोटें मोडतेच आहे. मुंबईतल्या निवडणुकीबाबत त्यांनीं जो अभिप्राय व्यक्त केला आहे तो मोठा मासलेवाईक आहे. ते म्हणतात, "आतांपर्यंत जे निकाल जाहीर झाले आहेत त्यावरून एक वस्तुस्थिति स्पष्टपणें निदर्शनास आली आहे. ती ही कीं जनतेमध्यें भाषावादाचें विष वरवर दिसतें त्यापेक्षां अधिक खोल जाऊन भिनलें आहे. काँग्रेसनें बिगरमराठी विभागांतील साऱ्या जागा जिंकल्या आहेत. एवढेंच नव्हे, तर काँग्रेस तिकिटावर उभे असलेल्या मराठी वा बिगरमराठी उमेदवारांना सुद्धां फारच थोड्या मराठी मतदारांनीं मतें दिलीं आहेत. आपल्या राजकारणांत ही एक भयंकर अनिष्ट प्रवृत्ति दिसून येत आहे." सदोबाचे हे उद्गार नुसते खोटेच नाहींत, तर खोडसाळपणाचे आहेत. मराठी लोक हे आकुंचित भाषाभिमानानें पागल झालेले आहेत, त्यांच्या अंगांत भाषावादाचें

विष शिरल्यामुळें त्यांचीं माथीं पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें भडकलेलीं आहेत अशी त्यांची बदनामी करण्याचा काँग्रेसवाल्यांचा फार मोठा डाव आहे.

चोराच्या उलट्या बोंबा म्हणतात त्या ह्या. भारतांतल्या तेरा राज्यांची रचना भाषावार तत्त्वावर करून महाराष्ट्राला मात्र जुलमानें आणि पक्षपातानें ह्यांनीं द्विभाषिकाच्या सापळ्यांत कोंबलें. त्याचा प्रतिकार करण्याचा महाराष्ट्रानें शांततेच्या आणि सत्याग्रहाच्या मार्गानें प्रयत्न केला तर मराठी माणसें लुटारू, दंगेखोर आणि अत्याचारी आहेत अशी त्यांची देशभर बदनामी करून त्यांनीं त्यांच्यावर बंदुकीच्या गोळ्या झाडल्या अन् कुत्र्याप्रमाणें त्यांना रस्त्यामध्यें ठार मारलें. काँग्रेसच्या ह्या हिंस्र अत्याचारांना निवडणुकीच्या लोकशाही मार्गानें मराठी जनतेनें आतां बिनतोड उत्तर दिलें. तर भाषावादाचें विष तिच्या अंगांत भिनलें आहे असा फिरून तिच्या नांवानें शंखध्वनि करावयाची त्यांची तयारी आहेच !

काँग्रेसच्या महाराष्ट्रद्वेष्ट्या धोरणामुळें मुंबई शहराची मराठी आणि बिगर-मराठी अशी जवळजवळ फाळणीच पडलेली आहे. दक्षिण आणि उत्तर मुंबईत बिगर-मराठी लोक जास्त प्रमाणावर राहत असल्यानें महाराष्ट्रविरोधी प्रचार त्यांच्यामध्यें करून काँग्रेसनें त्यांचा जास्तींत जास्त पाठिंबा मिळवला आहे. म्हणूनच दक्षिण विभागांतून सदोबा पाटील आणि उत्तर विभागांतून कृष्ण मेनन लोकसभेमध्यें निवडून येऊं शकले. विधानसभेच्या निवडणुकींतहि दक्षिण मुंबईतल्या सहा मतदार संघांपैकीं फक्त एकाच मतदार संघांत म्हणजे गिरगांवांत समितीचा जय झाला, तर उत्तर मुंबईतल्या सहा मतदार संघांपैकीं फक्त माहिममध्येंच समितीला यश मिळालें. बहुसंख्य मराठी जनता मध्यमुंबईत एकत्रित झाली असल्यानें तेथें समितीला शंभर टक्के यश मिळालें. अशा रीतीनें मुंबईची भाषावार फाळणी करण्याची सर्व कारवाई काँग्रेसनेंच केलेली आहे हें विसरतां कामा नये.

काँग्रेस तिकिटावर उभ्या असलेल्या बिगरमराठी उमेदवारांस फार थोड्या मराठी मतदारांनीं मतें दिलीं हें सदोबांचें म्हणणें खरें असलें, तरी त्याचें कारण ते उमेदवार बिगरमराठी होते हें नसून ते द्विभाषिकवादी होते हें आहे. मुंबईतली मराठी जनता बिगरमराठी लोकांचा द्वेष करते असें सदोबांनीं जें खोडसाळपणें ध्वनित केलें आहे तें खोटें आहे. गुजराती आणि मराठी नागरिकांत काँग्रेसनें कांहीं प्रमाणावर राजकीय वैमनस्य निर्माण केलें आहे हें जरी खरें असलें तरी गुजराती सोडून बाकीची जी बिगरमराठी जनता आहे तिच्यापैकीं पुष्कळांनीं

समितीच्या उमेदवारांना ह्या निवडणुकींत पाठिंबा दिलेला आहे हें विसरतां कामा नये. मुंबईतली मराठी जनता ही सदोबा म्हणतात त्याप्रमाणें भाषावादी नसून लोकशाहीवादी आहे. मुंबई महाराष्ट्राला मिळूं नये हा भांडवलशाहीचा हट्ट पुरवण्यासाठीं काँग्रेसनें लोकशाहीला मूठमाती देऊन जें द्विभाषिक राज्य निर्माण केलें, तें लौकर नष्ट केलें नाहीं तर त्यापासून भारताच्या लोकशाहीला धोका निर्माण होण्याचा संभव आहे अशी मुंबईमधल्या मराठी माणसांची भावना आहे.

उलट सदोबा पाटलावर आम्ही जाहीरपणें असा आरोप करतों कीं गेलीं अठराएकोणीस वर्षें मुंबईमधली काँग्रेस ही अल्पसंख्याक जमातीची, प्रतिगामी भांडवलवाल्यांची आणि शहरांतल्या गुंडांची एक भयानक जनताविरोधी आघाडी त्यांनीं निर्माण करून ठेवली होती. भांडवलवाल्यांच्या थैल्या आणि गुंडांच्या सोडावॉटर बाटल्या ह्यांच्या जोरावर सदोबांनीं मुंबई शहरांत असा दरारा निर्माण करून ठेवला होता कीं काँग्रेसचा मुंबई शहरांत पराभव होणें सर्वथैव अशक्य आहे. ह्या दहशतीचें पेकाट ह्या निवडणुकीमध्यें समितीनें सपशेल मोडलें आहे. ह्या दृष्टीनें भायखळा भागांत प्रतापसिंग आणि माझगांव भागांत केशव बोरकर ह्या काँग्रेसच्या दोघां उमेदवारांचा समितीच्या उमेदवारांनीं जो पराभव केला तो विशेष महत्त्वाचा आहे. प्रतापसिंग आणि बोरकरदादा ह्यांचें चारित्र्य सर्व मुंबई शहराला माहित आहे. मुंबई काँग्रेसमधले सदोबा पाटलांचे हेच डावे आणि उजवे हात. ह्याच दोघां हस्तकांमार्फत सदोबांनीं मुंबईमधल्या आतांपर्यंतच्या साऱ्या काळ्या कारवाया केल्या. सदोबा पाटील जर मुंबई काँग्रेसचे ‘दादा’ नसते तर ह्या दोघां जणांना काँग्रेसच्या दाराजवळ सुद्धां कोणी उभे राहूं दिले नसते. प्रतापसिंगाचा आणि बोरकरदादाचा पराभव करून मुंबईच्या मराठी जनतेनें सदोबांचे दोन्ही हात त्यांच्या खांद्यापासूनच जणुं कांहीं तोडले आहेत असें म्हणावयाला हरकत नाहीं.

पंडित नेहरूंसारख्या मोटमोठ्या काँग्रेस पुढाऱ्यांनीं संयुक्त महाराष्ट्र समितीची निंदा आणि निर्भर्त्सना करण्याचा आजपर्यंत केवढा जगड्व्याळ प्रयत्न केला? समिति ही आवळ्याभोपळ्याची मोट आहे. लंगड्यापांगळ्यांची एकजूट आहे. अठरा धान्यांचें तें कडबोळें आहे. समितीमध्यें एकत्र आलेले पक्ष तत्त्वशून्य आणि संधिसाधु आहेत. त्यांची एकजूट कधीं कोलमडून पडेल तें सांगतां येणार नाहीं. असें सांगण्याचा त्यांनीं एकसारखा सपाटा सुरू ठेवला. एवढेंच नव्हे तर द्वितीय पंचवार्षिक योजनेचीं आणि समाजवादाचीं एकापेक्षांहि एक आकर्षक प्रलोभनें

दाखवून जनतेच्या डोळ्यांत धूळ टाकण्याचाहि त्यांनीं फार मोठा प्रयत्न केला. पण मुंबईमधल्या आणि महाराष्ट्रामधल्या मतदारांच्या मनावर काँग्रेसच्या ह्या सर्व प्रचाराचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. महाराष्ट्रांतला तमाम शेतकरी वर्ग आणि मुंबईमधला सारा कामगार वर्ग मध्यमवर्गीयांच्या खांद्याला खांदा लावून समितीच्या मागें उभा राहिला आणि काँग्रेसला त्यांनीं नेस्तनाबूद करून टाकलें. समिति ही निव्वळ निवडणुका जिंकण्यासाठीं स्थापन झालेली संधिसाधु पक्षांची एकजूट आहे असें जे म्हणत होते त्यांचें तर मतदारांनीं थोबाडच फोडून टाकलें. संयुक्त महाराष्ट्र निर्मितीचें समितीचें ध्येय हा केवळ एकभाषिक राज्य निर्माण करण्याचा प्रयत्न नसून जातिभेद, स्पृश्यास्पृश्य भेद आणि बहुसंख्य-अल्पसंख्य भेद हे सर्व भेद गाडून टाकून खऱ्याखुऱ्या समतेवर आणि सामाजिक न्यायावर आधारलेला नवमहाराष्ट्र निर्माण करण्याचा एक ऊर्जस्वल प्रयत्न आहे हें या निवडणुकीनें सिद्ध करून दाखविलें आहे.

जातीयवाद आणि प्रांतीयवाद ह्यांच्या विरुद्ध उठल्याबसल्या पंडित नेहरू आणि काँग्रेसनेते आक्रोश करीत असतात. पण देशांत जातीयवाद आणि प्रांतीयवाद जर कोणीं वाढवला असेल तर तो काँग्रेसनें. पुण्यामध्यें शुक्रवार पेठेमधून बाबूराव सणस ह्यांना काँग्रेसनें कां उभे केलें ? बाबूरावांचे कोणते गुण असे वाया चालले होते कीं ज्यांवर लुब्ध होऊन काँग्रेसनें त्यांना तिकिट द्यावें ! बाबूराव काय विद्वान् आहेत का वक्ते आहेत का समाजसेवक आहेत का सद्गुणाचे पुतळे आहेत ? जात हा बाबूरावांच्या अंगांतला एकच गुण ना ? मराठ्यांचीं आणि ब्राह्मणेतरांचीं मतें ते जास्त मिळवूं शकतील म्हणूनच त्यांना मुद्दाम काँग्रेसनें उभे केलें ? संयुक्त महाराष्ट्र समितीनें त्या मतदार संघांत एस्. एम्. जोशी ह्यांना उभे केलें तर त्यांच्याविरुद्ध सणसांच्या वतीनें काँग्रेसनें उघडउघड जातीय प्रचार केला. समितीचे कांहीं पुढारी ब्राह्मण जातीचे आहेत म्हणून संयुक्त महाराष्ट्र झाला तर ब्राह्मणांचें राज्य होईल अशा तऱ्हेचा खोडसाळ प्रचार काँग्रेसमधल्या कित्येक मराठ्यांनीं जाणूनबुजून केला ही गोष्ट जगजाहीर आहे. पण ह्या जातीयवादी प्रचाराचा मतदारांच्या मनावर कांहीं एक परिणाम झाला नाहीं. शुक्रवार पेठेंतल्या बहुसंख्य ब्राह्मणेतर जनतेनें काँग्रेसचे बाबूराव सणस ह्यांना निवडून न देतां, समितीचे एस्. एम्. जोशी ह्यांनाच बहुमतानें निवडून दिलें. काँग्रेसच्या जातीयवादाविरुद्ध समितीनें पुण्यांत जो हा अभूतपूर्व विजय मिळविला, त्यानें

समितीच्या प्रतिष्ठेची पताका जास्तींत जास्त उंच फडकवली आहे.

अस्पृश्यता नष्ट करण्याचे डंके काँग्रेस किती दिवसांपासून वाजवते आहे? सर्वसाधारण जागांवर अस्पृश्य उमेदवारांना काँग्रेस निवडून आणील अशी महात्मा गांधींनीं डॉ. आंबेडकरांना हमी दिली, म्हणून 'पुणें करारा'वर सही करावयाला ते तयार झाले. पण स्वातंत्र्य मिळून दहा वर्षे झालीं तरी काँग्रेसनें एकाहि अस्पृश्याला सर्वसाधारण जागेवर निवडून आणलें नाहीं. उलट अस्पृश्यां-मधील चांभारांना हातीं धरून स्पृश्यांच्या बहुमताच्या जोरावर बुद्धिमान् आणि कर्तबगार अशा महारांना दडपून टाकण्याचा काँग्रेसनें प्रयत्न केला. डॉ. आंबेडकरांना वचन देऊन त्यांच्याशीं काँग्रेसनें असा विश्वासघात करावा ही तर सर्वांत घृणास्पद गोष्ट आहे. आंबेडकरांनीं आणि त्यांच्या लक्षावधि अनुयायांनीं हिंदुधर्माचा त्याग करून बुद्धधर्माचा जो स्वीकार केला त्याला हें एक महत्त्वाचें कारण आहे. पण अस्पृश्यांच्या बाबतींत काँग्रेसनें केलेलें हें पातक समितीनें सपशेल धुवून काढलें. सर्वसाधारण जागांवर अनेक पूर्वास्पृश्यांना समितीनें लोकसभेंत आणि विधानसभेंत निवडून आणलें ही गोष्ट भारताच्या राजकीय आणि सामाजिक इतिहासांत सुवर्णाक्षरानें लिहून ठेवावी लागेल. नाशिक म्हणजे सनातनी हिंदूंचा केवढा कर्मठ बालेकिल्ला! त्या क्षेत्राच्या ठिकाणीं गोविंदराव देशपांड्यांसारख्या ब्राह्मणजातीच्या उमेदवाराचा भाऊसाहेब गायकवाड ह्या एक वेळ महार असलेल्या उमेदवारानें पराभव करावा हा केवढा चमत्कार? पुणें जिल्ह्यांतून साळुंके, नगर जिल्ह्यामधून बा. चं. कांबळे आणि मुंबई शहरामधून ॲ. भांडारे ही पूर्वास्पृश्य मंडळी सर्वसाधारण जागांवर स्पृश्यांच्या मतांच्या जोरावर समितीनें निवडून काँग्रेसवर सर्वांत मोठी मात केली आहे. महाराष्ट्राच्या राजकीय आणि सामाजिक जीवनांत यापुढें स्पृश्यास्पृश्य भेद राहणार नाहींत ही गोष्ट समितीनें सिद्ध करून काँग्रेसला खालीं पहावयाला लावलें आहे.

समिति ही केवळ भाषावादानें पागल झालेली आहे, अन्यभाषिकांच्या बाबतींत समितीचें धोरण अन्यायाचें आणि पक्षपाताचें आहे ह्या काँग्रेसनें केलेल्या आरोपाचेंहि समितीनें निर्दाळण केलें आहे. खानदेशांत नौशेर भरूचा ह्यांचें नांव तरी कोणाला माहीत होतें का? आणि हरिभाऊ पाटसकरांची तर उभी हयात खानदेशांत गेलेली. पण संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर काँग्रेसच्या मराठी उमेद-वाराचा समितीच्या पार्शी उमेदवारानें पराभव करून दाखवला. जगन्नाथराव

भोसले ह्यांच्याविरुद्धहि समितीनें प्रेमजी आशर ह्या गुजराती उमेदवाराला निवडून आणलें. पालघरमधूनहि नवनीत शहा नांवाच्या एका दुसऱ्या गुजराती उमेदवाराला, मालेगांवांतून हरून अनसारी ह्या मुसलमान नि मुंबईमधून पिंटो ह्या खिस्ती उमेदवारांना समितीनें निवडून आणलें.

जातिभेदांना आणि धर्मभेदांना जशी समितीनें मूठमाती दिली तशी महाराष्ट्रांतल्या राजकीय पक्षभेदांची कडवट आणि विषारी तीव्रताहि समितीनें नाहींशी करून टाकली. समितीमध्यें समाविष्ट झालेल्या कित्येक पक्षांमधून पूर्वी विस्तवदेखील जात नव्हता. कोण त्यांचीं भांडणें नि केवढा त्यांचा एकमेकांच्या विरुद्ध दुस्वास! पण एका समान ध्येयाच्या सिद्धीसाठीं समितीनें त्यांना एकत्र आणलें नि पक्षापेक्षां जनता मोठी ह्या लोकशाहीच्या मूलभूत सिद्धांताचा गुरुमंत्र त्यांना दिला. मतदारांनाहि राजकारणांत पक्षीय दृष्टीनें विचार करण्याची आतांपर्यंत जी अनिष्ट संवय लागली होती ती समितीनें नाहींशी केली. डॉ. लोहियांच्या 'समाजवादी' पक्षानें समितीमधून बाहेर पडून स्वतंत्रपणें आपले उमेदवार उभे केले होते. त्यांपैकीं एकहि उमेदवार यशस्वी होऊं शकला नाहीं. यावरून महाराष्ट्रांतले पक्षीय राजकारणाचे दिवस यापुढें संपले हीच गोष्ट सिद्ध होत नाहीं काय?

सारांश, निवडणुकीच्या अग्निदिव्यामधून 'संयुक्त महाराष्ट्र समिति' ही तावून सुलाखून निघाल्यानंतर तिचें सामर्थ्य, प्रतिष्ठा आणि वर्चस्व पूर्वींपेक्षां आतां सहस्रपटीनें वाढलेलें आहे. एवढेंच नव्हे, तर महाराष्ट्रामधील जनतेच्या पुरोगामी आणि लोकशाही उद्धाराची ती एकमेव आणि सर्वश्रेष्ठ आघाडी होऊन बसलेली आहे. स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वी महाराष्ट्रांत काँग्रेसला जें स्थान होतें तें स्थान 'समिती'ला आज प्राप्त झालें आहे. संयुक्त महाराष्ट्र निर्माण होईपर्यंत 'समिती'चा हा विजयी आणि विजिगीषु ध्वज एकसारखा उंच फडकत ठेवणें हें समितीमधल्या प्रत्येक पक्षाचें आणि घटकाचें कर्तव्य आहे. यापुढें महाराष्ट्रांतील सारें राजकारण 'समिती' च्या नांवानें आणि शिक्कामोर्तबानें चाललें पाहिजे. 'संयुक्त महाराष्ट्र समिती' च्या उमेदवारांना महाराष्ट्रांत जें अभूतपूर्व यश प्राप्त झालें आहे त्याचें सारें श्रेय मराठी जनतेला आहे. आणि विशेषतः संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनांत मुलांनीं आणि महिलांनीं जे पराक्रम केले त्यांचे पोवाडे महाराष्ट्राच्या भावी पिढ्यांनीं अनंत काळपर्यंत गावयाला हवेत.

महात्मा गांधींच्या आणि पंडित नेहरूंच्या नांवाची सारी पुण्याई आतां

कॉंग्रेसनें पणाला लावली तरी मुंबईसह ' संयुक्त महाराष्ट्र ' निर्माण झाल्यावांचून राहत नाहीं. आतां हा केवळ कालावधीचाच प्रश्न राहिला आहे. निवडणुकीच्या यशामुळें यंदाची ' होळी ' ही ' संयुक्त महाराष्ट्र 'ची ' दिवाळी ' म्हणूनच सर्वत्र साजरी होईल अशी आमची श्रद्धा आहे. म्हणून शिमग्याच्या होळ्या पेटवतांना त्या कॉंग्रेसनें लादलेल्या ' द्विभाषिका'च्याच होळया आपण पेटवतों आहोंत अशी भावना प्रत्येक मराठी माणसानें मनांत बाळगून ' संयुक्त महाराष्ट्र 'चा जयजयकार करावा. घरोघर संयुक्त महाराष्ट्राचे लाल झेंडे लावून दिव्यांची रोषणाई करावी. संयुक्त महाराष्ट्राचा हा विजयी सण जास्तींत जास्त हर्षानें आणि मांगल्यानें साजरा करावा अशी सर्व मराठी भाषिकांना आमची प्रार्थना आहे. मुंबईत आणि महाराष्ट्रांत समितीनें कॉंग्रेसचा पराभव करून जनतेमध्यें नवीन धीर आणि नवीन विश्वास निर्माण केला आहे. एवढेंच नव्हे तर नव्या युगाची मुहूर्तमेढ समितीनें महाराष्ट्रांत उभारली आहे.

१७-३-१९५७

# मुंबईवर महाराष्ट्राचा झेंडा !

अखेर शेवटीं मुंबई कॉर्पोरेशनच्या निवडणुका झाल्या आणि त्यांमध्यें मुंबई कॉंग्रेसचा सपशेल पराभव होऊन, संयुक्त महाराष्ट्र समितीला अभूतपूर्व यश मिळालें. एकंदर कॉर्पोरेशनच्या १३१ जागा आहेत. त्यांपैकीं ७२ समितीला मिळाल्या. ५७ कॉंग्रेसला आणि २ स्वतंत्रांना. त्या स्वतंत्रांपैकीं एकजण समितीशींच सहकार्य करील. म्हणजे समितीच्या बाजूला ७३ आणि कॉंग्रेसच्या बाजूला ५८ अशी कॉर्पोरेशनमधल्या सभासदांची अखेर विभागणी झालेली दिसेल. कॉर्पोरेशनचीं सूत्रें गेलीं एकोणीस वर्षें कॉंग्रेसच्या हातीं आहेत. पण समितीला जसें आज निर्णायक आणि प्रचंड बहुमत मिळालें तसें आजपर्यंत कॉंग्रेसला कधीं मिळालेलें नाहीं. लोकसभेच्या आणि विधानसभेच्या निवडणुकांमध्यें मुंबई शहरांत आणि महाराष्ट्रांत संयुक्त महाराष्ट्र समितीला जो अपूर्व विजय मिळाला त्याजवर कॉर्पोरेशनच्या या विजयानें अक्षरशः सुवर्णकळस चढवला आहे असें म्हणावयाला हरकत नाहीं. किंबहुना संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीच्या दृष्टीनें मुंबई कॉर्पोरेशनच्या निवडणुकींत समितीला मिळालेलें हें यश लोकसभेच्या आणि विधानसभेच्या निवडणुकीमध्यें मिळालेल्या यशापेक्षांहि अधिक मोलाचें आणि महत्त्वाचें आहे.

कॉर्पोरेशनच्या निवडणुकी जिंकून संयुक्त महाराष्ट्र समितीनें द्विभाषिक राज्याच्या पुरस्कर्त्यांच्या आणि मुंबई ही महाराष्ट्राची नसून कॉस्मॉपॉलिटन आहे असें म्हणणाऱ्यांच्या मस्तकांवर प्रचंड घणाचा घाव घालून त्यांच्या मेंदूच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडवून टाकल्या आहेत. मुंबई शहरांत महाराष्ट्रीय लोक बहुसंख्य नसून अल्पसंख्य आहेत असें सिद्ध करण्यासाठीं खानेसुमारीचे खोटे आंकडे दाखवण्यापासून कॉंग्रेस सरकारच्या फार वर्षांपासून कारवाया चालू आहेत. मुंबईच्या उपनगरांत बिगरमराठी लोकांची फार मोठी वसती असल्यानें त्यांचा मुंबई कॉर्पो-रेशनच्या परिसरांत समावेश केला म्हणजे मराठी माणसांचें प्रमाण आपोआपच कमी होईल. आणि मग 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रा'च्या मागणीला खो बसेल

एवढ्यासाठीं सदोबा पाटलानें हें महामुंबईचें पाताळयंत्र रचलें. आणि गंमतीची गोष्ट ही कीं आज जे हरिभाऊ पाटसकर द्विभाषिक राज्याचे पुरस्कर्ते झाले आहेत, ते पूर्वी ज्यावेळीं कट्टर संयुक्तमहाराष्ट्रवादी होते तेव्हां त्यांनीं मुंबईच्या विधान-सभेंत सदोबाच्या ह्या 'महामुंबई'च्या कारस्थानाला कसून विरोध केलेला आहे. मुंबईमधल्या महाराष्ट्रीयांची संख्या कमी आहे हें दाखवण्यासाठीं कोंकणीभाषिकांना त्यांतून वगळून निराळे काढणें, मराठीभाषिक मुसलमानांची मातृभाषा ते केवळ मुसलमान आहेत म्हणून उर्दू दाखवणें अशा नाना तऱ्हेच्या महाराष्ट्रविरोधी हिकमती आजपर्यंत लढवण्यांत आल्या. त्यामुळें खुद्द सदोबांचा देखील असा भ्रम झाला होता कीं मुंबई शहरांत मराठीभाषिक लोक अल्पसंख्य आहेत. म्हणूनच ते मधून मधून मुंबईच्या प्रश्नावर सार्वमत घ्या अशी संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांना आव्हानें देत असत.

गेल्याच्या मागील डिसेंबरांत मुंबई कॉर्पोरेशननें साठ विरुद्ध शून्य मतांनीं मुंबईचा समावेश महाराष्ट्रांत केला पाहिजे असा ठराव मंजूर केला होता. पण त्या सभेच्या कायदेशीरपणावर सदोबांनीं आक्षेप घेतला. पण त्या ठरावामुळें पंडित नेहरू मात्र सावध झाले आणि त्यांनीं स्वतंत्र मुंबई राज्याची कल्पना रद्द करून मुंबई केंद्रशासित करण्याचा नवा बूट निर्माण केला. विधान सभेच्या आणि लोकसभेच्या निवडणुकींत मुंबई शहरामध्यें समितीला कॉंग्रेसपेक्षां हजारों आणि लाखों मतें जास्त मिळालीं. पण आतां कॉर्पोरेशनच्या निवडणुकींत तर संयुक्त महाराष्ट्र समितीनें कॉंग्रेसचें थोबाडच फोडून काढलें आणि मुंबई ही महाराष्ट्राची आहे हें निर्विवादपणें सिद्ध करून दिलें. यापुढें मुंबई ही कॉस्मॉपालिटन आहे अशी पाजीपणाची खोडसाळ भाषा काढण्याची कॉंग्रेसवाल्यांची मुळीं हिंमतच होणार नाहीं !

कॉर्पोरेशनच्या निवडणुकींत समितीला पुष्कळ जागा मिळतील ह्याविषयीं आमची खात्रीच होती. पण एवढ्या जागा मिळतील अशी मात्र कुणाचीहि कल्पना नव्हती. आमच्यापैकीं कित्येक जण तर अशा मताचे होते कीं कॉर्पो-रेशनच्या निवडणुका समितीमार्फत मुळीं लढवूंच नयेत. त्यांचें म्हणणें असें कीं निरनिराळ्या पक्षांनीं आपापसांत समझौता करून जागांची वांटणी करून घ्यावी आणि समितीनें त्यांना फक्त आशीर्वाद द्यावा. पण ही सूचना समितीनें मान्य केली नाहीं. समितीनें आपल्याच नांवावर निवडणुका लढवण्याचें ठरविलें. पुढें

सर्व जागांसाठीं उमेदवार उभे न करतां फक्त ८० ते ८५ जागा लढवाव्यात असा समितीपुढें एक विचार आला. पण समितीमधल्या घटक पक्षांनीं आपापल्या याद्यांचा आग्रह धरला आणि त्या ओढाताणींत ही संख्या १०२ पर्यंत फुगली. आणि एवढेंहि करून स्त्रियांना किंवा अन्यभाषिकांना जेवढें वाजवी प्रतिनिधित्व समितीनें द्यावयाला पाहिजे होतें तेवढें दिलें नाहीं म्हणून समितीमधली जाणती मंडळी मनामधून फार अस्वस्थ आणि असंतुष्ट झाली होती.

ज्या मतदार संघांत पांच पांच जागा होत्या तेथें समितीनें दोन दोन जागा तरी मोकळ्या सोडावयाला हव्या होत्या. पण तेवढी सुद्धां सावधगिरी समिति दाखवूं शकली नाहीं. समितीनें त्या ठिकाणीं पांच पांच उमेदवार उभे केले. त्यामुळें उमेदवारांनीं आपल्या मतदारांकडून प्रत्येकीं किती मतें मागायचीं ह्याचा फार मोठा घोटाळा उत्पन्न झाला. त्यामधून नाना तऱ्हेचे मतभेद आणि गैरसमज निर्माण झाले. ह्या सर्व गोष्टींचा परिणाम अखेर निवडणुकीमध्यें कसा काय होतो ह्याची अनेकांना चिंता लागून राहिली. पण अखेर उमेदवारांपेक्षां मतदारच शहाणे ठरले. त्यांची संयुक्तमहाराष्ट्रनिष्ठा अधिक निःपक्षपाती आणि डोळस ठरली. त्यांनीं आपापल्या मतांची व्यवस्थित विभागणी करून समितीचे उमेदवार जास्तींत जास्त कसे निवडून येतील ह्याचा योग्य तो बंदोबस्त केला. म्हणून समितीतर्फे निवडून आलेल्या उमेदवारांचें अभिनंदन करण्यापेक्षां त्यांना निवडून आणणाऱ्या मतदारांचें जास्त कौतुक करावयाला हवें. दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी कीं समितीच्या उमेदवारांना केवळ मराठी मतदारांनींच मतें दिलीं असें नव्हे. हजारों बिगरमराठी माणसांनीं सुद्धां समितीलाच पाठिंबा दिला. ह्यावरून मुंबईचा समावेश संयुक्त महाराष्ट्रांत व्हावा ही मराठी जनतेची मागणी न्याय्य असल्याबद्दल मुंबईमधल्या अनेक बिगरमराठी लोकांची सुद्धां आतां खात्री झाली आहे हें उघड आहे.

काँग्रेसवाल्यांना ही निवडणूक पुढें ढकलण्याची इच्छा होती. मतदारांच्या याद्या सदोष आहेत, म्हणून निवडणुका पुढें ढकलाव्यात अशा अर्थाची जी फिर्याद मुलुंडच्या एका माणसानें मुंबई हायकोर्टात गुदरली होती, तिच्यामागें काँग्रेसवाल्यांची प्रेरणा होती असें म्हणतात. आणि तो तर्क खोटा आहें असें आम्हांला नाहीं वाटत. मुंबई काँग्रेसनें कॉर्पोरेशनसाठीं जीं एकेक इरसाल माणसें उभीं केलीं होतीं तीं पाहिलीं म्हणजे काँग्रेसपाशीं मनुष्यबळाचा केवढा तुटवडा आहे हें दिसून येतें. केशव बोरकर, सरदार प्रतापसिंग, डॉ. वा. शं. मटकर, रामा-

हर्डीकर, मधुसूदन खोपकर, जी. पी. नायर, गोविंद शंकर कंठी, माणिकराम तळपदे हीं काय 'माणसें' आहेत ? खरें पाहतां ह्यांना कॉर्पोरेशनपासून पांच मैलांच्या आंत फिरकूं देतां कामा नये. सदोबा पाटलांच्या गलिच्छ तालमींत आणि परंपरेंत ही मंडळी तयार झाली आहेत. कॉर्पोरेशनमध्यें जाऊन स्वतःच्या आणि सदोबाच्या तुंबड्या कशा भरावयाच्या एवढाच ह्यांचा धंदा. त्यांपैकीं बहुतेकांना मुंबईच्या मतदारांनीं जन्मभर याद राहील अशी अद्दल शिकवली आहे.

कॉंग्रेसचे जे लोक निवडून आले आहेत त्यांपैकीं एकहि माणूस बुद्धिमान्, लायक आणि कर्तबगार नाहीं. सारे एकाहिपेक्षां एक गणंग आहेत. समितीचीं निवडून आलेलीं माणसें एकापेक्षांहि एक सरस आणि धुरंधर आहेत. आचार्य दोंदे, बॅ. वेलिणकर, मोहिद्दिन हॅरिस, दिनकर देसाई, महाशब्दे, कॉ. मिरजकर, प्रा. राम जोशी हीं माणसें कॉर्पोरेशनच्या कारभारांत वर्षोनुवर्षें मुरलेलीं आहेत. त्यांच्या जोड्यापाशीं देखील बसण्याची कॉंग्रेसतर्फे निवडून आलेल्या कित्येक कॉर्पोरेटरांची लायकी नाहीं. ह्या निवडणुका जिंकण्यासाठीं कित्येक कॉंग्रेसवाल्यांनीं लाखों रुपये खर्च केले. त्याखेरीज मतदारांना दारू पाजणें, धाकदपटशा दाखवणें, त्यांना आपल्या मोटरगाड्यांतून मतदानकेंद्रावर घेऊन येणें इत्यादि अनेक बेकायदे-शीर अपप्रकार कॉंग्रेसच्या उमेदवारांनीं केले. त्याची ग्वाही कॉर्पोरेशनचे कॉंग्रेस-पक्षीय माजी अध्यक्ष डॉ. सायमन फरनॅण्डिस ह्यांनीं नुकतीच दिली आहे. परवांच्या निवडणुकींत स्वतः डॉ. फरनॅण्डिस हे कॉंग्रेसतर्फे उभे होते. पण त्यांचा पराभव झाल्यानें ते कॉंग्रेसवर खूपच भडकले आणि त्यांनीं कॉंग्रेसचीं हीं सर्व दुष्कृत्यें उजेडांत आणलीं. पण वाममार्गाचा कॉंग्रेसनें एवढा उपयोग करून सुद्धां त्याचा मतदारांवर कांहींहि परिणाम झाला नाहीं. त्यांनीं आपलीं मतें समितीच्याच उमेदवाराच्या पेटींत टाकलीं. म्हणूनच कॉर्पोरेशनच्या निवडणुकींत समितीनें मिळवलेलें हें यश असामान्य आहे असें आम्ही म्हणतों.

भांडवलवाल्यांच्या थैल्या आणि गुंडांच्या लाठ्या नि सोडावॉटरच्या बाटल्या ह्यांच्या जोरावर सदोबांनीं एकोणीस वर्षें मुंबई कॉर्पोरेशनमध्यें राज्य केलें. ह्या एकोणीस वर्षांत व्यक्तिशः सदोबांनीं आपला एवढा फायदा करून घेतला कीं त्यांनीं आपल्या घरावर सोन्याचीं कौलें घालावयाचीं काय ती बाकी ठेवली. उभ्या आयुष्यांत सदोबांनीं कोणाची नोकरी केली नाहीं. असें असतां आज सदोबा जे लक्षाधीश झाले आहेत ते कशाच्या जोरावर? सदोबांची एकंदर पथारी पस्तीस ते

चाळीस लाखाची आहे असें बोललें जातें. मुंबई शहरांत त्यांचे चारपांच ठिकाणीं राजविलासी फ्लॅट्स आहेत. त्यांचीं मुलेंबाळें शिक्षणासाठीं अमेरिकेला जाऊन आलीं आहेत. उठल्या बसल्या ते परदेशीं चकरा मारून येतात. मुंबईमधल्या मोठमोठ्या कंपन्यांचे ते डायरेक्टर आहेत असें कळतें. हें सर्व कशाच्या जोरावर त्यांनीं साधलें? कॉर्पोरेशनमध्यें मोठमोठ्या श्रीमंत व्यापाऱ्यांना तिकिटें देऊन वर्षानुवर्षे निवडून आणायचे. त्यांना म्युनिसिपालिटीमधील नाना तऱ्हेच्या फायद्यांचा लाभ मिळवून द्यावयाचा आणि त्यांत आपली भागिदारी ठेवायची. शिवाय, त्यांच्या मतांवर पुन्हा आपण मेयर व्हायचें तें निराळेंच. कै. नाथालाल पारेख हे सुप्रसिद्ध हिऱ्याचे व्यापारी वर्षानुवर्षे कॉर्पोरेशनमध्यें होते. त्यांची आणि सदोबांची फारच दाट मैत्री होती. त्यांच्यामुळें सदोबा हे हिऱ्याच्या व्यापाऱ्यांत शिरले असें ऐकिवांत आहे.

सरदार प्रतापसिंग हे गृहस्थ पूर्वी कॉर्पोरेशनमध्यें सभासद होते. त्या काळीं त्यांनीं कॉर्पोरेशनचीं कांहीं कंत्राटें घेतलीं म्हणून कोर्टानें त्यांचें सभासदत्व रद्द केलें होतें. असल्या माणसाला पुन्हा सदोबांनीं तिकीट देऊन पुन्हा यंदा निवडून आणलें. सरदार प्रतापसिंगाच्या व्यवहारांत सदोबांची निम्मी भागी आहे असें सर्वत्र बोललें जातें. केशव बोरकर आणि रामा हर्डीकर हे सदोबांचे हस्तक आपल्या मालकाचीं घाणेरडीं कामें करून आज स्वतःच गबर झाले आहेत. सदोबा आणि त्यांचे हे दोस्त ह्यांनीं गेल्या एकोणीस वर्षांत कॉर्पोरेशनच्या कुरणांत यथेच्छ चरून घेतलें आहे. वस्तुतः त्यांच्या सांपत्तिक परिस्थितीची जाहीर चौकशी व्हावयाला पाहिजे. पण हें नेहरूंचें राज्य मोठें विचित्र आहे. ह्या राज्यांत मोरारजीसारख्या खुनी मंत्र्याची आणि सदोबासारख्या चारित्र्यशून्य समाजसेवकाची मध्यवर्ती सरकारामध्यें बढती होते हें आश्चर्य नव्हे काय? हातांत भांडवलवाल्यांचा मुबलक पैसा नि मदतीला सरदार प्रतापसिंग, केशव बोरकर, रामा हर्डीकर असलीं माणसें. ह्यामुळें सदोबा हे मुंबई कॉर्पोरेशनचे 'दादा' होऊन बसले होते. त्यांच्या संसर्गामुळें मुंबई शहराचें सार्वजनिक जीवन अत्यंत गढूळ आणि गलिच्छ होऊन गेलें होतें. मुंबई काँग्रेसमध्यें सज्जन आणि प्रामाणिक माणसाला स्थानच उरलें नाहीं. म्हणून मुंबई काँग्रेस ही शहरांतल्या बहुसंख्य मराठी जनतेची वैरीण होऊन बसली.

गेल्या एकोणीस वर्षांचें सदोबांचें चरित्र पाहा. मुंबईमधल्या मराठी जनतेमध्यें

चुकून कधीं ते मिसळले नाहींत. परेल, लालबाग, शिवडी, धारावी, वरळी ह्या भागांतल्या मराठी कामगार विभागांत किंवा दादर-गिरगांवमधील मध्यम-वर्गीय महाराष्ट्रीय जनतेला त्यांनीं कधींहि आपलें तोंड दाखविलें नाहीं. सदोबाच्या सभा नि व्याख्यानें सर्व कोटांत, ताजमहाल हॉटेलमध्यें किंवा ग्रीन्स हॉटेलमध्यें, नाहींतर कॉंग्रेस हाऊसच्या आवारांत. पंडित नेहरूंची सभा असली तरच ते त्यांच्याबरोबर चौपाटीच्या सभेंत दिसावयाचे. मुंबईमधल्या मराठी जनतेपासून सदोबा आणि त्यांची मुंबई प्रदेश कॉंग्रेस ही अगदीं पहिल्यापासून कटाक्षानें अलिप्त राहिली आहे. त्याचा परिणाम जो व्हायचा तोच झाला. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची जेव्हां मागणी करण्यांत आली तेव्हां सदोबांनीं तिला कसून विरोध केला. एवढेंच नव्हे तर मुंबई शहर महाराष्ट्राला पांच हजार वर्षांत मिळणार नाहीं किंवा यावचन्द्रदिवाकरौ मिळणार नाहीं अशा छातीठोकपणें ते महाराष्ट्राला धमक्या देऊं लागले. महाराष्ट्रीय लोक नालायक आहेत, त्यांना राज्य कसें करावें ह्याची अक्कल नाहीं अशी उघड उघड शिवीगाळ करण्यापर्यंत त्यांची मजल गेली.

मराठी जनतेच्या भावना न समजण्याइतके कांहीं सदोबा मूर्ख नाहींत. पण सदोबा हे सरदार वल्लभभाई पटेलांचे हस्तक होते. त्यांनीं मुंबईमधल्या गुजराती भांडवलवाल्यांना स्वतःला विकून घेतलें असल्यामुळें संयुक्त महाराष्ट्राचे शत्रु होण्याखेरीज त्यांना मुळीं गत्यंतरच राहिलें नाहीं. उभ्या आयुष्यांत सदोबांनीं गरिबांचें म्हणून काम केलें नाहीं. त्यांच्या सगळ्या योजना श्रीमंतांच्या कल्याणाच्या. त्यांच्या कर्तृत्वाचें कुरुक्षेत्र कुलाबा, चौपाटी अन् मलबार हिल. मुंबई कॉर्पोरेशनला तर त्यांनीं कॉंग्रेसचें ब्रँच ऑफिसच बनवून टाकलें होतें. परदेशाचा किंवा स्वदेशांतला कोणीहि कॉंग्रेसधार्जिणा बडा माणूस आला कीं त्याला कॉर्पोरेशनचें मानपत्र आणि कमला नेहरू पार्कमध्यें 'ॲट होम' हा सदोबाचा खाक्या अगदीं ठरून गेला होता. अशा रीतीनें जनतेच्या लाखों रुपयांचा सदोबांनीं आजपर्यंत चुराडा करून टाकलेला आहे. मुंबई शहराच्या बोकांडीं बसलेलें हें सदोबांचें नि त्यांच्या कॉंग्रेसचें रावणराज्य अखेर एकोणीस वर्षांनीं आतां समाप्त झालें ह्या जाणिवेनें ह्या शहरांतील लक्षावधि जनता आतां समाधानानें निःश्वास टाकीत आहे. नेहरूंच्या मंत्रिमंडळांत जाण्याचा मान सदोबांना प्राप्त झाला असला तरी मुंबई शहरांतून त्यांची हकालपट्टी झाली आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. मुंबई शहराच्या सार्वजनिक जीवनांत सदोबांचें काळें तोंड यापुढें कधींहि दिसावयाचें

नाहीं हें मुंबईच्या जनतेचें काय सामान्य भाग्य आहे ? यावच्चन्द्रदिवाकरौ मुंबई महाराष्ट्राला मिळणार नाहीं असें सदोबांनीं मराठी जनतेला आव्हान दिलें होतें. ह्या आव्हानाचा स्वीकार करून समितीनें सदोबांना ह्या निवडणुकींत सपशेल उताणें पाडलें आहे आणि त्यांच्या छाताडावर पाय रोवून संयुक्त महाराष्ट्राचा झेंडा मुंबई कॉर्पोरेशनच्या कळसावर फडकविला आहे.

मुंबई कॉर्पोरेशन म्हणजे वीस कोटींचें संस्थान आहे. ओरिसा किंवा केरळ ह्या राज्यापेक्षांहि मुंबई कॉर्पोरेशनचें उत्पन्न अधिक आहे. एवढें प्रचंड राज्य आतां समितीच्या हातीं आलें आहे. समितीला आपलें कर्तृत्व दाखवावयाला ही केवढी मोठी संधि मिळाली आहे. आज मुंबई शहर कदाचित् श्रीमंतांना स्वर्ग वाटत असेल. पण गरिबांचा तर तो साक्षात् नरक आहे. दुसऱ्या महायुद्धापासून मुंबई शहराची लोकसंख्या साडेतीन पटीनें वाढलेली आहे. ज्या शहरांत पूर्वीं बारा लक्ष लोक राहत होते तेथें आज जवळ जवळ चाळीस लाख लोक राहात आहेत. त्यामुळें घरांची केवढी प्रचंड टंचाई निर्माण झाली आहे. पण कॉर्पोरेशननें कधीं त्या प्रश्नाकडे लक्ष दिलेलें नाहीं. चाळीचाळीमधून खोल्यांत माणसें शेळ्यामेंढ्यां-प्रमाणें राहात आहेत. रस्त्यावर पांचसहा लाख माणसें कुत्र्यामांजरांप्रमाणें झोपत आहेत. कमींत कमी दोन लाख खोल्या बांधल्या तर मुंबईमध्यें घरांचा प्रश्न मिटेल. कामगारांच्या वस्तींत संडास, पाण्याचे नळ, आणि दिवाबत्ती ह्यांची फार मोठी गैरसोय आहे. लोकसंख्येच्या मानानें शाळांची आणि दवाखान्यांची फार मोठी उणीव आहे. ट्रॅम आणि बस ह्यांची संख्या पुरेशी नसल्यानें शहरांतून प्रवास करतांना लोकांचे जे हाल होतात त्याला कांहीं सुमार नाहीं. जनतेच्या कल्याणाचीं अशीं अनंत कामें आहेत. पण सदोबांच्या काँग्रेसनें त्यांपैकीं एकाहि गोष्टीकडे आजपर्यंत कधीं लक्ष दिलेलें नाहीं.

उलट नागरिकांच्या डोक्यावरचा कराचा बोजा एकसारखा वाढवीतच नेलेला आहे. मुंबई शहरांत दर माणशीं सालीना रु. २५ कर आहे. एवढा भारी कर भारतामधल्या दुसऱ्या कोणत्याहि शहरांत नाहीं. 'समिती'नें निवडून दिलेल्या सभासदांत वीस-वीस पंचवीस-पंचवीस वर्षें कॉर्पोरेशनच्या कामाचा अनुभव असलेले नामांकित लोक आहेत. ते शहरसुधारणेच्या नवनवीन योजना आखून समितीची राजवट ही कशी निःपक्षपाती आणि लोकहितदक्ष आहे हें कृतीनेंच सिद्ध करून दाखवतील. आमची तर खात्री आहे कीं यापुढें

कॉर्पोरेशनचीं सूत्रें सदैव समितीच्याच हातीं रहातील. यापुढें कॉर्पोरेशनमध्यें कॉंग्रेस अधिकारारूढ पक्ष होण्याची मुळीं शक्यताच नाहीं. असें असून सदोबा पाटील आणि 'फ्री प्रेस' ह्यांनीं समितीची एकजूट लौकरच फुटून कॉर्पोरेशनचीं अधिकारसूत्रें पुन्हा कॉंग्रेसच्या हातीं येतील असें खोडसाळ भविष्य वर्तविलें आहे. सदोबा म्हणतात, "समितीमध्यें जे निरनिराळे पक्ष आहेत, त्यांमध्यें कोणत्याहि तऱ्हेचें विचारसाम्य नाहीं. म्हणून त्यांच्यांत निरनिराळे गट पडतील अन् भांडणें लागतील. त्याचा परिणाम असा होईल कीं कॉंग्रेसच्या हातीं पुन्हा कॉर्पोरेशनचीं सूत्रें येतील!" 'फ्री प्रेस' म्हणतो कीं, "दैनंदिन कारभाराचा बोजा समितीमधील विविध पक्षांना असह्य होईल. समिति म्हणजे बोलून चालून गवताच्या काड्यांनीं बांधलेलें गाठोडें. तें किती दिवस टिकणार? तेव्हां पुन्हां कॉंग्रेस अधिकारारूढ होणार हें कांहीं सांगावयाला नको!"

सदोबांसारखे कॉंग्रेसनेते आणि 'फ्री प्रेस'सारखीं कॉंग्रेसचीं भाडोत्री पत्रें किती निलाजरीं आणि नतद्रष्ट आहेत ह्याचा हा उत्तम पुरावा आहे. निवडणुकींत कॉंग्रेसचें नाक कापलें गेलें ह्याची त्यांना लाज नाहीं. पण समितीमध्यें भांडणें लागतील अन् कॉर्पोरेशनचीं सूत्रें फिरून कॉंग्रेसच्या हातीं येतील म्हणून गिधाडासारखे हे लेकाचे टपून बसले आहेत. काय म्हणावें ह्यांना? आम्ही सदोबांना आणि 'फ्री प्रेस'ला बजावून सांगतों कीं समितीमध्यें भांडणें लावून कॉर्पोरेशनची सत्ता कॉंग्रेसच्या हातीं येईल यासाठीं तुम्ही कल्पांतापर्यंत वाट पाहत बसा. मुंबई शहर महाराष्ट्राचें आहे ही गोष्ट तर आतां या निवडणुकांनीं सिद्धच केली आहे. ह्याचा योग्य तो बोध जर पंडित नेहरूंनीं आणि कॉंग्रेसश्रेष्ठींनीं घेतला नाहीं आणि लोकसभेचा पूर्वींचा निर्णय बदलून जर मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र त्वरित निर्माण केला नाहीं तर लोकसभेंत परवां भाई डांगे ह्यांनीं त्यांना ज्या प्रखर शब्दांत 'सुनावलें', त्याच शब्दांनीं सारा महाराष्ट्र त्यांना गर्जून सांगेल कीं, "लोकशाहीच्या निर्णयाला जर तुम्हीं मान्यता दिली नाहीं तर सत्याग्रह, संप आणि हरताळ ह्यांचा पुन्हा अवलंब करून मुंबईसह महाराष्ट्र तुमच्या हातून आम्हांला हिसकावून घ्यावा लागेल, याद राखा!"

१९-५-५७